# सिंहाला शह

## अफगाणिस्तान व वायव्य सीमाप्रान्त

### ऐतिहासिक व वर्णनात्मक विवेचन

( वीस चित्रें व दोन नकाशांसह )

लेखक
**श्रीपाद रामचंद्र टिकेकर,**
( 'केसरी' चे प्रवासी प्रतिनिधी

**किंमत रु. २**

१९३०

# THE CHECKMATED LION.

*Afghanistan & the N. W. Frontier*

*An Historical & Descriptive Study.*

With 20 illustrations & 2 maps.

BY

*SHRIPAD R. TIKEKAR.*

**Special Mid-Eastern Correspondent**

TO

*The Hindu*, Madras, *The Kesari* & *The Mahratta*, Poona.

WITH A FOREWORD

BY

**N. C. Kelkar**, B. A., LL. B., M. L. A.

**1930**

**Price Rs. 2.**

# प्रस्तावना



कांहीं कांहीं लेखक मराठी वाङ्मयांत नवीं खातीं उघडतात. रा. टिकेकर यांची कामगिरी तशाच प्रकारची आहे. त्यांनीं उघडलेलें खातें म्हणजे राजकीय प्रवासवृत्त हें होय. मराठी भाषेंत पूर्वींचीं प्रवासवृत्तें मुळींच नाहींत असें नाहीं. काशीयात्रेचें वर्णन, काश्मीर वर्णन, युरोपचा प्रवास वगैरे विषयांवर कांहीं पुस्तकें ग्रंथसंग्रहालयांतून आढळतात व त्यांतील कित्येक मनोरंजक व बोधप्रदहि आहेत. तथापि तीर्थक्षेत्रें काय किंवा काश्मीर काय, हीं हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच. तीर्थयात्रांचीं वर्णनें कित्येकांनीं भाविकपणें केलीं आहेत तर कित्येकांनी थोड्याशा कुत्सित बुद्धीनेंहि केलीं आहेत.

काश्मीरच्या वर्णनांत सृष्टिसौंदर्यापलीकडे कशावरहि लक्ष गेलेलें आढळत नाहीं. युरोपखंड हें मात्र असें आहे कीं, तिकडे प्रवास करून आलेल्या माणसाला त्याचा नाइलाज असतांहि इतक्या नव्या गोष्टी पाहावयास सांपडतात कीं, त्याची दृष्टि आपोआप विस्तृत झाल्याशिवाय राहातच नाहीं. पण तिकडील प्रवास वर्णनांतून राजकीय दृष्टि क्वचितच आढळते. हल्लीं पं. जवाहिरलाल नेहरू यांनी 'सोव्हिएट रशिया' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. किंवा २-३ वर्षांपूर्वी शौकत उस्मानी यांनीं 'पेशावर पासून मॉस्को' पर्यंतच्या आपल्या प्रवासाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. हीं दोनच पुस्तकें काय ती राजकीयदृष्ट्या लिहिलीं आहेत असें म्हणतां येईल. हीं दोन्ही पुस्तकें इंग्रजी भाषेंत लिहिलेलीं आहेत व या दोन्ही पैकीं दुसऱ्याचें भाषांतर झालें असून पहिल्याचें होत आहे. परंतु त्यांच्या मराठी लेखकांना भाषांतरें करण्याशिवाय अधिक श्रेय देतां येत नाहीं.

अशा पुस्तकांशिवाय एक वेगळें पुस्तक मराठी वाचकांना चांगलेंच परिचित आहे. तें म्हटलें म्हणजे वर्सईकर गोडसे भटजी यांनीं ५० वर्षांपूर्वी लिहिलेलें व रा. चिं. वि. वैद्य यांनीं छापविलेलें 'माझा प्रवास' हें होय. या पुस्तकाचें नांव उघड उघड प्रवासविषयासारखें असतां, आंतील हकीकत व वर्णनें हीं १८५७ सालच्या बंडासंबंधीं व खरोखरच चांगलीं ऐतिहासिक स्वरूपाचीं आहेत. ज्या

काळांत हें पुस्तक प्रसिद्ध झालें तो काळ धामधुमीचा नसता तर, रा. वैद्य यांनीं त्याला ' माझा प्रवास ' असें निर्गुण नांव न देतां, उत्तर हिंदुस्थानांतील बंडाची धामधूम असें यथार्थ नांव दिलें असतें. तें कसेंहि असो. पण येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं, सदर भटजींनीं दिलेली हकीकत वास्तविक बंडाची म्हणजे राजकीय असली तरी बिचाऱ्या भटजींच्या मनांत राजकारणाचा लेशहि नव्हता. नाहीं म्हणावयाला झांशीकरीण राणी लक्ष्मीबाई यांच्यासंबंधीं जो मजकुर त्यांनी लिहिला आहे त्यांत मात्र राष्ट्रीय अभिमान खरोखरच दिसून येतो. पण भटजी मूळ निघाले यज्ञाची दक्षिणा घेण्याला, पण परिस्थितीनें त्यांच्या गळ्यांत प्रवासी बातमीदाराचें काम बांधलें. त्याचाच छाप पुस्तकावर दिसून येतो.

परंतु या सर्वाहून वेगळें असें रा. टिकेकर यांचें पुस्तक होय. तें पुस्तक कोणत्या हेतूनें लिहिलें गेलें आहे याची मुळापासून पूर्ण माहिती मला असल्या-कारणानें, मला हें निश्चितपणें सांगतां येतें कीं, या पुस्तकाचा हेतू वर्णनापेक्षां राजकीय विवेचनाचाच अधिक आहे. व या पुस्तकाला 'अफगाणिस्थानचें वर्णन' असें चित्ताकर्षक नांव सहज देतां आलें असतें. तें न देतां, ' सिंहाला शह ' असें आंतरराष्ट्रीय राजकारणनिदर्शक नांव रा. टिकेकर यांनीं दिलें. गेल्यावर्षी रा. टिकेकर हे प्रथमत: अफगाणिस्थानांत प्रवासास निघाले ते केवळ अफ-गाणिस्थान पाहण्याकरितां नव्हे, तर अफगाणिस्थानांतील परिस्थिति किंबहुना अफ-गाणिस्थानपलीकडील आम्हांला अदृश्य अशा स्थितीत चाललेल्या पूर्व-पश्चिम राष्ट्रांतील द्वंद्वाची खरी माहिती समजून घेण्यांकरितां. सन १९२८ च्या आक्टो-बरांत रा. टिकेकर हे मजकडे आले व म्हणूं लागले कीं, 'अफगाणिस्थानांतील परिस्थितीचा अभ्यास करण्यासाठीं तिकडे जाण्याची माझी इच्छा आहे. तसेच काबूल येथें पुढील महिन्यांत पौर्वात्य राष्ट्र-संघाची ( एशियाटीक लीग ऑफ नेशन्स ) बैठक भरणार आहे. तिला जमल्यास हजर राहून व ती हकीकत समक्ष पाहून इकडे आपल्या लोकांस कळवावी अशी माझी इच्छा आहे.' अर्थात् कल्पना फारच उमदी होती. पण ' तिला प्रथमच अडचण पासपोर्टाची पडणार ' असे मी त्यांस म्हणालों. तथापि कांहीं कां होईना पासपोर्ट मागून तर पहावें असें त्यांनीं ठर-विलें. पुढें लवकरच अशी बातमी प्रसिद्ध झाली की, काबूल येथें भरणारी परिषद् भरत नाही. यामुळें रा. टिकेकर यांचा पुष्कळच विरस झाला. तथापि ही परिषद्

भरलेली पहावयास सांपडली असतां, ज्या पुष्कळ गोष्टींचा लाभ झाला असता, त्यांतील कांहीं थोड्यातरी नुसत्या अफगाणिस्थानची सफर केल्यानें लाभतीलच, असा विचार करून त्यांनीं काबूलला जाण्याचा पासपोर्ट मागितला; व सुदैवानें तो मिळालाहि. परंतु इतक्यांत पुनः दुर्दैव आडवें आलें. तें असें कीं, खुद्द काबूल येथें बंड होऊन अमीर अमानुल्ला याला राज्यत्याग करावा लागला. रा. टिकेकर तिकडे निघण्याची वेळ, ही ह्या बंडाची केवळ प्रस्तावनाच होती. तथापि वाहतुकीचा मार्गच बंद झाल्यावर, कोणालाहि पासपोर्टावर स्वार होऊन थोडेंच देशांतराला जातां येतें ? प्रथम एशियाटीक लीगच्या अधिवेशनाची बातमीपत्रें रा. टिकेकर यांनीं केसरीकडे पाठवावी असें ठरलें होतें. पण ते फेडरेशन बंद पडल्यानें ज्या प्रमाणें केसरीची निराशा झाली, त्याचप्रमाणें फेडरेशनची नाही तरी पण निदान अफगाणिस्थानची तरी बातमीपत्रें केसरींत घालतां येतील अशी नवी उमेद मला आली होती. पण काबूल येथील बंडानें तीहि फुकट गेली. तथापि रा. टिकेकर यांचा निश्चय अढळ असल्यानें त्यांनीं अशी नवी कल्पना सुचविली कीं, अफगाणिस्थान नाहीं तर पेशावरहून कराचीवरून मेसापोटेमियामध्यें जावें व नंतर जमेल त्याप्रमाणें इराण वगैरे देशांत सफर करावी. त्यांच्या या दृढनिश्चयाचें मला कौतुक तर वाटलेंच. पण शिवाय असेंहि वाटलें कीं, जें राजकारण अफगाणिस्थानांत आज रंगत आहे तत्सदृश राजकारण आज मेसापोटेमियांत तरी कोठें नाहीं ? ब्रिटिश साम्राज्याच्या उपसर्गानें अफगाणिस्थान, हिंदुस्थान, मेसापोटेमिया, व इराण हे सर्व देश कमीअधिक प्रमाणानें समदुःखी आहेत. किंबहुना अफगाणिस्थान हा देश हद्दीला हद्द लागून असला तरी हिंदुस्थानला राजकारणांत जितका जवळ, त्यापेक्षां साम्राज्याच्या धोरणाचा बोध घेण्याच्या दृष्टीनें दूरचा मेसापोटेमिया हा अधिक जवळ असेंच मानावें लागेल. अर्थात् रा. टिकेकर यांच्या सूचनेला संमति देण्यासारखी होती. पहिल्या तोंडीं उमेद खचलेली, हिंवाळयाला नुकताच प्रारंभ झालेला, त्या परक्या देशांतील भाषा व चालीरीती यांचें पूर्ण अज्ञान, असें असतां, रा. टिकेकर यांनीं या परदेशांतील प्रवासाचा आपला हेतू अखेर सिद्धीस नेला व तिकडे गेल्यावर त्यांनीं काय पाहिलें, कसें पाहिलें, व इकडील लोकांस तें सर्व कसें समजाविलें हें त्यांचीं केसरींतील प्रवासविषयक पत्रें ज्यांनीं वाचलीं असतील त्यांना

निराळें सांगण्याचें कारण नाहीं. केसरीच्या वाचकांना देतां न आलें तरी निदान स्वत: केसरीच्या संपादकाला तरी हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडील वस्तुस्थिति कळलेली असावी, या हेतूनें लो. टिळकांनी कांहीं गृहस्थांना पूर्वी नेपाळ, काश्मीर अफगाणिस्थान वगैरे देशांकडे जाण्याला मदत केली होती. पण एक तर तो काळ थोडासा विपरीत असल्यामुळें या प्रवाशांच्या ज्ञानाचा लाभ केसरीच्या वाचकांना करून घेतां आला नाहीं. पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी कीं, थोडेसें धाडस करून परदेशांत मनुष्य हिंडून आला तरी त्याला कसें लिहावें व इकडे काय कळवावें याची जाणीव असत नाहीं. किंबहुना अशा प्रवाशांपैकी एकाने लिहिलेलें नेपाळच्या वर्णनाचें हस्तलिखित आमच्या संग्रही आहे. आणि म्हणूनच तुलनात्मक दृष्टीनें रा. टिकेकर यांच्या केसरींतील पत्रांचें व त्यांच्या पुस्तकाचें महत्त्व आम्ही विशेष मानतों. त्यांच्या पत्रांतील विषय सर्वच नवीन. त्यांतील कांहीं इंग्रजी पुस्तकांतून वाचावयास मिळण्यासारखे आहेत. तथापि पुस्तकावरून होणाऱ्या ज्ञानाचें संवेदन वेगळें व समक्ष जाऊन हिंडूनफिरून पहात असतां, प्रवाशानें लिहिलेली हकीकत वाचून होणारें संवेदन कांहीं वेगळेंच होय. मला अशी गोष्ट आठवते कीं, सुमारें ४०–४५ वर्षांपूर्वी एखादा विलायतेहून जाऊन आलेला मनुष्य पाहिला की, त्याच्या तोंडाकडे इतरांची नजर अशी कांहीं खिळून बसे की, जणूं काय त्यानें पाहिलेले परदेश व लोकस्थिति यांचें चित्र किंवा नकाशा त्याच्या तोंडावर उमटलेला आहे. अर्थात् हें कुतूहल भ्रमात्मक होय. त्यापासून मूक आश्चर्याशिवाय दुसरा कांहीच लाभ नाहीं. परंतु रा. टिकेकर यांच्या पत्रांतून वर्णनाचा जिवंतपणा इतका होता कीं, तीं वाचणाराला आपण त्यांच्याच बरोबर त्या त्या देशांतून प्रवास करीत आहों असें वाटे. आणि दर आठवड्यास त्यांचें पत्र वाचावयास मिळेल काय अशा आतुरतेनें लोक वाट पहात, असें पुष्कळांनी मला सांगितलें आहे. असो.

प्रस्तुत पुस्तक अफगाणिस्थानासंबंधीचें आहे. वास्तविक पाहूं गेलें असतां अफगाणिस्थानासंबंधीचें वाङ्मय आमच्याकडेच पुष्कळ निर्माण व्हावयास पाहिजे आहे. अफगाणिस्थानचा व आमचा संबंध आज कालचा नव्हे. ब्रिटिश नाविकांना हिंदुस्थानचा सुगावा लागण्यापूर्वी शेकडों वर्षे आमचा व अफगाणांचा झगडा सुरू होता. अफगाणजनतेनें हिंदुस्थानच्या समृद्ध

भागावर लुटालुटीसाठी हल्ला केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. तशींच, हिंदी अंमलदारांनीं काबूलकंदाहारमध्यें आपली सत्ता प्रस्थापित केल्याचींहि कांहीं कमी नाहींत. पण अफगाणांपासून आम्हांस उपसर्गच अधिक पोहोंचत होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. अशा परिस्थितींत त्यांचा इतिहास, त्यांचें राजकारण, त्यांच्या हालचाली, त्यांच्या आकांक्षा इत्यादिकांकडे आम्ही हिंदी प्रजाजनांनींच विशेष लक्ष द्यावयास पाहिजे. परंतु आतांपर्यंतच्या अफगाणिस्थानासंबंधींच्या उपलब्ध वाङ्मयांत हिंदी दृष्टीनें लिहिलेलें असें पुस्तक एकच असावें, आणि तेंहि इंग्रजींत, ही गोष्ट आमच्या बेफिकिरीचीच निदर्शक होय. डॉ. अबदुल गनी नांवाचे एक पंजाबी मुसलमान गृहस्थ अमीर अबदुर रहमान व अमीर हबीबुल्ला यांच्या कारकिर्दींत अफगाणिस्थानांत सरकारी नोकरीसाठी राहिले होते. अमिरांच्या निकट सहवासाचा लाभ त्यांना मिळाला होता आणि अमानुल्ला गादीवर आला त्या क्रांतीच्या वेळीं ते बंदिवासांत होते. त्यामुळें तीन अमिरांच्या राजवटी त्यांनीं पाहिल्या व म्हणून त्यांनी लिहिलेलें *A Review of Political Situation in Central Asia* हें इंग्रजी पुस्तक मध्यंतरींच्या ( १९००-१९२० ) पर्यंतच्या इतिहासास उपयुक्त झालें आहे. परंतु त्या पुस्तकांतहि थोडीशी खिलापती दृष्टी दिसून येते. आणि विश्वबंधुत्वाचाहि कळवळा ग्रंथ लेखकास आला आहे असें वाटतें. म्हणजे शुद्ध हिंदी दृष्टीचा त्यात पूर्ण नसला तरी बराच अभाव आहे. शिवाय तें पुस्तक म्हणजे निवळ घडलेल्या गोष्टींचें व प्रसंगांचें टिपण आहे. टीकात्मक अथवा विवेचनात्मक भाग त्यांत फारच अल्प आहे. आणि प्रथम अमिराचे डॉक्टर, नंतर शिक्षणखात्यांचे सल्लागार, अशी विविध कामगिरी पार पाडणाऱ्याच्या हातून तशा प्रकारच्या चर्चात्मक ग्रंथाची अपेक्षा करणेंच चूक ठरलें असतें. सांगण्याचा मतितार्थ हा कीं, हें एकच एक असें पुस्तक देखील समाधानकारक नाहीं.

अफगाणिस्थानावरील इतर बहुतेक सर्व ग्रंथ इंग्रजी लष्करी अथवा मुलकी अधिकाऱ्यांनीं आपापल्या वेळच्या तटपुंज्या माहितीवर लिहिलेले आहेत. त्यांची दृष्टी अर्थातच हिंदी साम्राज्य कसें टिकवावें आणि तांबड्या रंगानें भूमि-प्रदेश कसे माखावे याच धोरणाची होती. शिवाय त्यांनीं वेगवेगळ्या कालखंडा-चाच विचार आपल्या पुस्तकांत केला आहे. इंग्रजींत अफगाणिस्थानचा प्राचीन

कालापासून आजतागायतचा इतिहास संकलित स्वरूपांत एका पुस्तकांत मिळत नव्हता. गेल्या डिसेंबर ( १९२९ ) मध्येंच सर जॉर्ज मॅक्मन् या लष्करी खात्यांतल्या गृहस्थानें एक बडा जाडा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. पण त्यांत साम्राज्यवाद्यांची गुर्मीची वृत्तीच प्रामुख्यानें दिसून येते. त्यांतील अफगाण युद्धांचें लष्करी विवेचन युद्धशास्त्रविशारदांना मनोरंजक वाटेल खरें. पण साहेब-मजकुरांची दृष्टि इतकी असमंजस आहे कीं, अफगाणस्वातंत्र्य मिळविणारा अमानुल्ला त्यांना अगदीं कमी प्रतीचा वाटतो ! तें कसेंहि असो, अफगाणिस्थानासंबंधीं सांगोपांग माहिती देणारा, अफगाणांच्या राजकीय धोरणांची हिंदी दृष्टीनें छाननी करणारा आणि आजमितीपर्यंतचा इतिहास सकलितरूपानें एकत्र आणणारा ग्रंथ इंग्रजींत तर नाहींच; पण तो आज मराठींत प्रथम प्रसिद्ध होत आहे ही वाङ्मयवृद्धीच्या दृष्टीनें आणि हिंदी राजकारणाच्या दृष्टीनेंहि खात्रीनें अभिमानाची बाब आहे.

रा. टिकेकर स्वत: अफगाणिस्थानांत जाऊं शकले नाहींत. पण त्यांनीं त्या देशासंबंधींची जी माहिती मिळविली होती ती मला अत्यंत उपयुक्त वाटली. त्याच वेळीं अफगाणरंगभूमीवरील दृश्यें अत्यंत त्वरेनें बदलत होतीं आणि प्रेक्षकांची जिज्ञासा व कुतहल फारच जागृत झालेलें दिसलें. म्हणून प्रथमत: अफगाणिस्थानासंबंधीं ग्रंथ लिहिण्यास मी त्यांना सांगितलें व तें काम त्यांनीं केलेंही. एखाद्या देशाचा टीकात्मक अभ्यास कसा करावा याचें हें पुस्तक उत्कृष्ट उदाहरण आहे. इतिहास, भूगोल, समाजरचना व धार्मिक आचारविचारांचा पगडा या सर्वांचा परिणाम तेथील राजकारणावर कसा होतो हें पहाणें अभ्यासकांना मनोरंजक वाटेल. आणि रा. टिकेकरांनीं याच प्रकारानें अफगाणिस्थानासंबंधींची सर्व माहिती वाचकांपुढें मांडली आहे. तीतील बहुतेक भाग दुसऱ्या ग्रंथांतून घेतला असल्याचें ठिकठिकाणीं दिलेल्या आधारभूत टीपांवरून व प्रारंभीं जोडलेल्या ग्रंथांच्या यादीवरून दिसून येईलच. पण तीनहि अफगाणयुद्धांची इष्टानिष्टता, तिसऱ्या अफगाणयुद्धाचें समर्थन, अमीर हबीबुल्लाची योग्यता, अमानुल्लानें परराष्ट्रांशीं केलेल्या तहांची छाननी, त्याच्या सुधारणांचे बरेवाईट परिणाम, युरोपियन सफरीचें राजनैतिक चष्म्यांतून निरीक्षण, पुढील काळांत झटपट घडून आलेल्या फेरबदलाची कारणमीमांसा, अमानुल्लाच्या अध:पाताचीं कारणें, अमा-

नुल्लाची योग्यता व अफगाण भवितव्यासंबंधींचे विचार इत्यादि भाग रा. टिकेकर यांनीं स्वत: विचार करूनच लिहिले आहेत. त्यांतील सर्वच मतें सर्वांना ग्राह्य वाटलीं नाहींत तरी, विचार करण्याची नवीन दिशा म्हणून त्या भागांस विशेष महत्त्व आहे.

माझ्या स्वतःच्या मतें तिसरें अफगाण युद्ध मुळींच समर्थनीय ठरत नाहीं. इ. स. १९१९ मध्यें हिंदी सरकारनें अवाढव्य लष्करी खर्च सोसून चालविलेली ही अल्पकाल गाजलेली लढाई केली नसती तरी चाललें असतें. आणि केल्या-नंतर ती मग अर्धवट सोडणें इष्ट ठरत नाहीं. त्या वेळीं अफगाणिस्थानला मागून फूस देण्यास अथवा सहाय्य करण्यास येण्याइतकी ताकद पुनर्जात रशियास नव्हती. मग ब्रिटिश मुत्सद्यांनीं अमानुल्लाकडून आलेलें तहाचें बोलणें तात्काळ कां स्वीकारलें ? ब्रिटिशांना लढाईचा कंटाळा आला होता असें म्हणावें तर चढा-ईची पहिली स्वारी ब्रिटिशांनींच भरली असें रा. टिकेकरांनीं साधार दर्शविलें आहे. एवढ्यानेंच रा. टिकेकरांनीं केलेलें विवेचन व १९१९ च्या युद्धाचें सम-र्थन चूक आहे असें म्हणण्याचा माझा हेतु नाहीं. विचाराची दुसरीहि एक दिशा प्रस्तुत प्रश्नासंबंधीं जातां जातां मला सुचली ती मी येथें निर्दिष्ट केली इतकेंच.

अफगाणिस्थानशीं रशियानें केलेल्या दोन तहांवरील ( इ. स. १९२१चा व १९२६चा ) रा. टिकेकरांची टीका अगदीं समतोल बुद्धीची दिसते. नेह-मींच्या अनुभवाची गोष्ट अशी की, ब्रिटिशांना विरोध करणारे ते सर्व चांगले, अशा विचारानें सामान्य जनांची सहानुभूति जर्मनी किंवा रशिया या देशांकडे जाते व हीं दोन राष्ट्रें करतील तें सर्वच उत्तम अशी बहुजनसमाजाची मनोवृत्ति आज देखील दिसून येते. परंतु स्वतंत्र राष्ट्रहिताहिताच्या दृष्टीनेंच रा. टिकेकर यांनीं विचार केला असून आवश्यक तेथें रशियास दोष देण्यास व त्या 'लोकोप-कारार्थ अवतरलेल्या' नव्या लोकशाही शासनसंस्थेच्या सद्धेतूंबद्दल संशय घेण्यास रा. टिकेकरांनीं सबळ कारणें दर्शविलीं आहेत. मला सर्व विवेचनांत कौतुक वाटलें तें याच गोष्टीचें.

परंतु शेवटीं अफगाणिस्थानचें भविष्य वर्तविणाऱ्या ज्योतिषाची भूमिका जेव्हां रा. टिकेकर यांनीं घेतली तेव्हां अफगाणिस्थानांत बोल्शेव्हिझमचा प्रसार

होणार व होणें इष्ट आहे असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. त्यामुळें हिंदुस्थानवर होणाऱ्या परिणामाचीहि थोडक्यांत आधुनिक युवकांच्या दृष्टीनें त्यांनीं चर्चा करून नव्याजुन्यांच्या लढयांची पूर्ति कशांत होईल तेंहि दर्शविलें आहे. बोल्शेव्हिझम चांगला कां वाईट हें निश्चितपणें ठरविण्याइतका दीर्घकाल रशियांतील नव्या प्रयोगास अद्याप झाला नाहीं. फ्रेंच राज्यक्रांति त्या वेळीं युरोपांत अपूर्व ठरली तरी तसा प्रकार अन्यत्र कोठेंच झाला नाहीं किंवा त्या क्रांतीमुळें घडून आणलेला बदल एकदम सर्व फ्रान्समध्यें कायमचा राहिला अशांतलाहि प्रकार झाला नाहीं.

रशियांत घडून आलें तेंच हिंदुस्थानांत अफगाणमार्गें घडून येईल हें रा. टिकेकरांचें विधान मला पटत नाहीं. जागतिक मजुरसंघांना विश्वबंधुत्व वाटण्याइतका उमाळा आला तर तो अनिष्ट किंवा वाईट मुळींच नव्हे. पण जित राहिलेलें राष्ट्र एकाएकीं ( दुसऱ्यांच्या आधारानें पाहिजे असल्यास ) उसळी मारून आंतरराष्ट्रीय भावनेच्या बाता मारूं लागतें ही कल्पना व्यावहारिकदृष्ट्या शक्य दिसत नाहीं. विकासवाद्यांची परंपरा खरी असेल तर, परावलंबी देशानें प्रथम स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा प्राप्त करून घ्यावा, स्वतंत्र भूमींतील स्वतंत्र वातावरणांतील जनता कशी राहते त्याचें स्वानुभवानें ज्ञान घ्यावें व नंतरच आंतरराष्ट्रीय एकीची भाषा बोलावी, हीच सरणि रास्त वाटते. आणि म्हणून रा. टिकेकरांचें भविष्य आहे त्याप्रमाणें बोल्शेव्हिझमचा प्रसार हिंदुस्थानांत होणार असेल तर तीहि एक महत्त्वाची व विचारार्ह बाब होईल.

अमानुल्लाच्या गुणवर्णनांत प्रस्तुत पुस्तकाचीं पुष्कळ पानें खर्ची पडलीं आहेत. ज्यानें ' सिंहाला शह ' दिला त्या अमानुल्लाची योग्यता वाटते तितकी नव्हती हें रा. टिकेकरांनी चांगल्या मार्मिक प्रकारें दर्शविलें आहे. किंबहुना पुस्तक वाचतांना मात्र असें दिसतें कीं, रा. टिकेकरांना देखील प्रथमतः अमानुल्ला फार मोठ्या योग्यतेचा आहे असें वाटत असावें. आणि अखेरीस सर्व विवेचनान्तीं अमानुल्लाची खरी योग्यता आपोआपच स्पष्ट झाल्यानें स्वतः पुस्तक लेखकाचीही निराशा झाली असली पाहिजे. पूर्वग्रहरहित वृत्तीनें हें पुस्तक लिहिलें आहे हें लक्षांत येण्यास एवढें उदाहरण पुरें आहे.

अफगाणिस्थानच्या जनतेची आक्रमणाकांक्षा अस्थानीं आहे व ब्रिटिश सरकारचें राज्य आहे तोंपर्यंत हिंदुस्थानास अफगाणांकडून उपसर्ग पोहोंचणार

नाहीं असें रा. टिकेकर यांनीं आपल्या विवेचनांत दर्शविलें आहे. अफगाणांची पात्रता हिंदुस्थानावर सत्ता गाजविण्याची असो वा नसो, लुटालुटीसाठीं त्या लोकांनीं हिंदुस्थानावर आजपर्यंत अनेक हल्ले केले आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. इ. स. १९१९ची अफगाण लढाई कराची बंदर घेण्याच्या उद्देशानें होती अशा आशयाची एक गुप्त रशियन तार हिंदी सरकारच्या हातीं लागली, ती प्रस्तुत पुस्तकांत उद्धृत केलीच आहे. **लोवेल टॉमस** नामक अमेरिकन प्रवासी लेखकानें तर काबूलमधील एका रहिवाशाचें खरेंखुरें अंतःकरण स्पष्ट करून दाखविलें आहे. त्यांतही हिंदुस्थान आक्रमणाची अफगाणांची महत्त्वाकांक्षा स्पष्टपणें मांडली आहे. प्रो. **हार्वित्झ** म्हणून एक भाषाशास्त्रज्ञ हिंदुस्थानांत १९२८ मध्यें येऊन गेले. त्यांनीं अफगाणिस्थानची सफर केली नसली तरी, सरहद्दीवरील अफगाणांचें मन कराची बंदरावर किती बसलें आहे त्याची फोड ' टाईम्स ऑफ इंडियां'तून पत्र लिहून केली होती. इतकें असून रा. टिकेकरांना अफगाणांचा हल्ला शक्य कां वाटत नाहीं तें त्यांनी आपल्या विवेचनांत दर्शविलेंच आहे. सिंध प्रांत अलग करावा या मागणींतहि अफगाण कारस्थानें असावी असा कित्येकांचा समज आहे. रा. टिकेकरांप्रमाणेंच हे दुसऱ्या टोकाचे लोक आहेत असें मला वाटतें. कोणतेंहि राष्ट्र जिवंत राहतें याची खूण म्हणजे त्याची वर्धिष्णु प्रकृति. आणि अफगाणिस्थानला वाढण्यास अवसर हिंदुस्थानकडेच सांपडावा यांत गैर कांहींच नाहीं. हिंदभूमीचा मोह सर्वांनाच तितका पडतो. पण हिंदी जनतेच्या दृष्टीनें अफगाणांचा हल्ला शक्य झाला तर, अत्यंत हानिकारक व अपमानास्पद ठरेल. कायमच्या आक्रमणासाठीं नसलें तरी निदान लुटीसाठीं तरी अफगाण मुलखांतील लुटारू हिंदी मुलखावर हल्ला करण्यासाठीं योग्य संधि पहात असतात हें सरहद्दीवरील दरसालच्या रिपोर्टांवरून दिसून येतें.

अफगाण अमिरांची हिंदुस्थानावर हल्ला करण्याची इच्छा असो वा नसो, हिंदी सरकार मात्र वरचेवर तिकडील हल्ल्यांचा बागुलबोवा दाखवून कोट्यावधि रुपये लष्करी बंदोबस्तासाठीं खर्च करीत असतें. रा. टिकेकरांनीं म्हटल्याप्रमाणें ब्रिटिशांसारखे अट्टल कारस्थानी जोंपर्यंत हिंदुस्थानचे ' पालनकर्ते ' आहेत तोंपर्यंत तरी अफगाणांची भीति हिंदी लोकांना बाळगण्याचें कारण नाहीं ! हिंदी जनतेला स्वातंत्र्य दिल्यास अफगाणांची स्वारी खास होणार व हिंदी लष्कराला

वायव्य सरहद्दीचें संरक्षण करितां येणार नाहीं अशीं कारणें, सरकारतर्फे नेहमीं 'लष्कराचें हिंदीकरण करा' असा प्रश्न ॲसेंब्लींत निघतो त्यावेळीं, पुढें करण्यांत येतात. परंतु ब्रिटिश अमदानीपूर्वी हिंदी राजकर्त्यांनीं त्या सरहद्दीचें रक्षण केलें नाहीं कीं काय ? शिखांनीं आपला अंमल अफगाणिस्थानांत कसा गाजविला हें इतिहासज्ञांस विदित आहेच. भिमथडीचीं तट्टें सिंधूनदाचें पाणी पिऊन अटकेपार गेलीं तीं तरी अफगाण सरदारांना मागें रेटीतच कीं नाहीं ? तर मग या ऐतिहासिक गोष्टींकडे दुर्लक्ष कसें करितां येईल ? आज इतकीं वर्षे हिंदी तिजोरींतील क्रोडो रुपये अफगाणिस्थानांत एकाना दुसऱ्या निमित्तानें ओतले जात आहेत. त्यासाठीं हिंदी जनतेनें अफगाणिस्थान आपल्या प्रदेशांत असावें अशी इच्छा प्रकट केली तर ती अयोग्य ठरेल असें वाटत नाहीं. उलट अफगाणिस्थान व हिंदुस्थान यांमधील रानटी टोळयांच्या स्वतंत्र मुलखांतील उपद्रवी व उपद्व्यापी पठाणांना वठणीवर आणण्यासाठीं, त्यांच्या दोन्ही बाजूंस दोन वेगळीं राज्यें नसतां, एकाच सत्ताधीशाचा अंमल असेल तर, सुलभ उपाय परिणामकारीरीत्या योजितां येतील. तेव्हां हिंदी सरहद्द सिंधूनदाची न मानतां अफगाणिस्थान देखील हिंदुस्थानांत समाविष्ट करण्याची आकांक्षा आम्ही बाळगण्यांत वावगें तें काय आहे ?

वायव्य सरहद्दीवरील बंदोबस्ताचें वर्णन रा. टिकेकरांनीं दिलें आहे. त्यांत लष्करी खर्चाच्या अजस्र बोजाबद्दल सरकारवर टीकाहि प्रसंगोपात त्यांना करावी लागली. पण कोणावरहि टीकास्त्र सोडणें सोपें असलें तरी त्याबरोबरच एखादी विधायक कार्यक्रमाची योजना सुचविण्याचें काम टीकाकारावर पडतें. रा. टिके-करांच्या निरीक्षणांतून ही बाबत कशी सुटली याचें मला आश्चर्य वाटतें. ॲसेंब्ली-मधून डॉ. मुंजे व बॅ. जयकर यांनीं सरकारला वारंवार बजावून सांगितलें कीं, देशांतील तरुणांना लष्करी कामगिरीसाठीं तयार करा. आणि स्वयंसेवकांची व देशी शिपायांची फौज तयार झाली, किंवा लष्करी अधिकाऱ्यांच्या निम्या जागां-वर जरी हिंदी माणसांची नेमणूक केली तरी पुष्कळ लष्करी खर्च कमी होऊन स्वदेशाचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य हिंदी जनतेंत येईल. पण ही साधी बाबही सरकार ऐकत नाहीं. लोकमताला मान दिला तर मग तें हिंदी सरकार कसलें ?

काबूल येथें राज्यक्रांति होऊन अमानुल्लाच्या राज्याबरोबर रा. टिकेकर यांची तिकडील प्रवासाची संधि गेली. तथापि मेसापोटेमियांतील प्रवास संपवून ते इराणांत गेले व हिंडले. इराणची सरहद्द अफगाणिस्थानला लागून राहिलेली आहे. तसेंच इराणी व अफगाणिस्थानी समाज यांच्यामध्यें जें साम्य आहे तें काबूलचा समाज व पेशावरचा समाज यांच्यामध्यें़हि थोडेंफार आहे. यामुळें इराणांतील लोकांशीं बोलल्या चालल्यानें, रा. टिकेकर यांना अफगाणिस्थानच्या राजकारणासंबंधानें जी माहिती मिळाली ती जवळ जवळ अफगाणिस्थानांत जाऊन मिळविण्याइतकीच मिळाली. शिवाय भरीला इंग्रजी पुस्तकें होतींच. या सर्वांचा लाभ घेऊन त्यांनीं अफगाणिस्थानासंबंधींचें हें पुस्तक लिहिलें आहे. येथें फिरून सांगण्याची गोष्ट हीच कीं, त्यांना केवळ मनोरंजक प्रवासवर्णन लिहावयाचें असतें तर केसरीच्या बातमीपत्रांतून आलेला कांहीं मजकूर व त्यांत घालतां आला असता असा आवांतर पुष्कळसा मजकूर मिळून त्यांना प्रवास वर्णनात्मक ग्रंथ मेसापोटेमिया व इराण यांसंबंधी सहज लिहितां आला असता. आतां अफगाणिस्थानच्या राजकारणावर नादिरशहाच्या विजयानें पडदा पडल्या-मुळें तिकडील राजकारणांत हिंदुस्थानच्या लोकांना फारशी मनोवेधकता उरलेली नाहीं. तरी ज्यांना हें माहीत आहे कीं, मेसापोटेमियापासून बोध घेण्यासारखा असला तरी, खरें भय असें अफगाणिस्थानापासूनच आहे, त्यांना हें पुस्तक मनोरंजक व बोधप्रद वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. शिवाय केवळ राजकारणाचा रुक्ष विषय त्यात नसून, देशवर्णन, वस्तुवर्णन, समाजवर्णन, काबूलच्या कटांतील व अंतरंगांतील राजकारणाचीं रहस्यें, लोभी मनानें पण तोंडावर साळसूदपणाचा बुरखा घालून अफगाणिस्थानांत येणारे प्रवासी मुत्सद्दी व राजकारणी हेर यांच्या कौशल्याच्या कारवाईच्या झटापटी अशीं अनेक मनोरंजक अंगें त्यांत आहेत. यामुळें कोणत्याहि दृष्टीनें पुस्तक वाचणाराला मुळींच कंटाळा येणार नाहीं.

रा. टिकेकर यांना आपल्या वडिलांपासून सोपी, चटकदार भाषा लिहि-ण्याची देणगी औरस हक्कानें मिळालेली आहे. आणि तिचा ते कसा चांगल्या रीतीनें उपयोग करूं शकतात ही गोष्ट त्यांचीं केसरींतील पत्रें वाचणारांच्या लक्षांत आलेलीच आहे. त्याच भाषापद्धतीचा या पुस्तकांत भरपूर उपयोग करण्यांत आला आहे. रा. टिकेकर यांचे वडीलहि केसरींतून लेख लिहीत असत. ते चांगले लेखक

असून, **धनुर्धारी** या नांवानें ते प्रसिद्ध होते. सोपी, घरगुती, ठसकदार भाषा लिहिण्यांत त्याचा हातखंडा असे. पण त्यांचा प्रवास फारसा दूरवर न झाल्यामुळें, त्यांच्या चर्चेच्या विषयांत घरगुती संसार व बाजारपेठ या पलीकडे फारशी मजल गेली नाहीं. म्हणून अभिनंदनाची गोष्ट ही कीं, त्यांच्या चिरंजीवांनीं भाषेचा गुण तोच ठेवून, उद्योगशीलता, प्रवासाची हौस व एक प्रकारचें धाडस या गोष्टींची भर घातल्यामुळें त्या गुणांचा विकास होऊन, ती भाषा राजकारणासारख्या वरच्या दर्जाच्या विषयाच्या चर्चेत उपयोगांत आणतां आली. शिवाय रा. टिकेकर यांनीं फोटोग्राफीची विद्या संपादन केली असल्यामुळें, आधुनिक प्रवाशाला आपल्या लेखांतून, पुस्तकांतून, प्रत्यक्ष चित्रें घालण्याचा जो फायदा मिळतो तो रा. टिकेकर यांना मिळालेला आहे. स्वतः पाहिलेली वस्तुस्थिति, स्वतः लिहिलेला लेख व स्वतः काढलेलीं छायाचित्रें हीं तीन्ही साधनें स्वतःचीं असणारा प्रवासी बातमीदार हाच खरा स्वावलंबी होय. आणि या दृष्टीनें निदान महाराष्ट्रापुरतें तरी रा. टिकेकर यांनी अनुकरणीय उदाहरण घालून दिलें आहे असें म्हणतां येईल. सुदैवाची गोष्ट अशी की, या एका सफरीनें रा. टिकेकर हे थकून गेलेले नसून उलट त्या सफरीमुळें आणखी निरनिराळया देशांतून असाच प्रवास करावा, इकडील लोकांना बाहेरची हकीकत कळवावी, अशी वाढती उमेद रा. टिकेकर यांनीं बाळगिली आहे. आपल्या देशांतील लोकांची कूपमंडूक वृत्ति अद्यापि गेलेली नाहीं. म्हणून दरवर्षी परदेशांतून हजारों प्रवासी अनेक हेतूंनीं व अनेक वेषांनीं इकडे येऊन जातात असें पाहिलें ऐकलें तरी त्यांच्या निश्चयी देश-प्रेमावर त्याचा कांहींच आघात होत नाहीं. पण वेळ आतां अशी आली आहे कीं, जो आपल्या देशाच्या सरहद्दीवरून, उंच मान करून, पलीकडे पाहाणार नाही त्याचा पाय स्वदेशांतहि जागीं टिकणार नाहीं. पाश्चात्य लोकांच्या वैभवाचें आश्चर्य करितांना व क्वचित् त्याची मीमांसा करितांना जें एक मुख्य कारण लक्षांत घ्यावें लागतें त्याची अजून आपणाला प्रचिती पटलेली नाहीं. तें कारण म्हटलें म्हणजे देशांतरच काय पण देशत्यागहि करण्याची धाडसी बुद्धि. या धाडसी बुद्धी-मुळें पाश्चात्य लोकांनीं सर्व जग हें वेदांती तत्वज्ञानाप्रमाणें नव्हे, पण संसारी स्वार्थबुद्धीनें आपलेंच आहे असें वाटतें. तें आपलें आहे असें मानणें व वाटेल त्याचा लाभ अनेक प्रकारें आपणाला मिळावा ही बुद्धि असणें, त्या पुढची

पायरी होय. '**इच्छति, यतते, करोति**' या क्रमानें त्यानीं जगांतील वाटेल त्या देशापासून मिळणारा कोणताहि फायदा आपल्या देशाला मिळवून दिलेला आहे. '**साहसे श्रीः प्रतिवसति**' या वचनांतील साहस याचा अर्थ तामस न करितां सात्त्विक किंवा राजस करितां येतो; व जगांतील इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानालाहि या पुढें हेंच बोधवचन नेहमी आपल्या डोळ्यांपुढें ठेवावें लागणार आहे.

एकंदरीनें पाहतां रा. टिकेकरांचें पुस्तक अपूर्व झालें आहे. अफगाणिस्थानासंबंधीं आणखी कांहीं सांगावयाचें राहिलें आहे असें मला तरी निदान वाटत नाहीं. शेवटचीं परिशिष्टें व नकाशे यांनीं भरपूर माहिती होते. इंग्रजी अधिकाऱ्यांची दृष्टी न ठेवितां स्वतःच्या विशिष्ट विचारासाठीं अफगाणिस्थानासंबंधीं पुस्तक अफगाणांनीं लिहिलेलें असें इंग्रजींत एकच आहे व तें म्हणजे सरदार **इकबाल अलीचें** 'अफगाण व अफगाणिस्थान'. त्याला देखील वर्णनापलकिडे विशेष महत्त्व आहे असें नाहीं. हिंदी राष्ट्राचा अफगाण धोरणांत दृष्टिकोन कसा असावा हें रा. टिकेकरांनी फारच चांगल्या प्रकारानें आपल्या पुस्तकांत दर्शविलें असल्यानें त्यांनीं तेच विचार इंग्रजींतून अवश्य पुढें मांडावेत. इतर देशी भाषांतूनहि त्याचीं भाषांतरें होऊन हिंदी जनतेनें अशा महत्त्वाच्या राजकीय प्रश्नांसंबंधीं विचार करण्यास शिकावें अशी माझी इच्छा आहे. इंग्रजींत लिहिण्याचा सराव रा. टिकेकरांना आहेच, तेव्हां त्यांनीं वेळ न दवडतां इंग्रजींतहि अफगाणिस्थानासंबंधींचें पुस्तक लिहून हिंदी विचारसरणी ब्रिटिश वाचकांस कळवावी असें माझें रा. टिकेकरांस आग्रहाचें सांगणें आहे.

नवी दिल्ली,
ता. २१-१-३०.

न. चिं. केळकर

# लेखकाचा खुलासा

मनुष्याच्या आंगीं असलेल्या निद्रिस्त शक्तींस जागें करून त्यांचा यथायोग्य उपयोग करून घेणें हीं कामें त्या मनुष्याच्या मित्रांचीं, स्फूर्तिदात्या देवतेचीं किंवा पूज्य पुढाऱ्यांचीं होत. स्वतःच्याच प्रेरणेनें एकादें कार्य करण्यास उद्युक्त झालेले कर्मवीर नसतात असें मात्र नव्हे. ते विरळा असतात.

माझी बाब सर्वसामान्यांपैकींच आहे. महाराष्ट्रवाचकांची कांहीं तरी सेवा मला करतां येईल असा आत्मविश्वास 'केसरी'नें माझ्या मनांत भरविला. खरें पाहूं गेलें तर, 'केसरीं'तून 'शरसंधान' करण्याचें काम वडिलार्जित असल्यानें ह्यापूर्वींच मीं तें हातीं घ्यावयास पाहिजे होतें. परंतु हातांत धनुकली घेऊन तिरंदाजीचें शिक्षण वडिलांकरवीं मिळवावें अशी आकांक्षा माझ्या मनांत उद्भवूं शकण्यापूर्वीच ती. **धनुर्धारींना** देवाधिदेवाचें पाचारण आलें व ते तिकडे गेले. कांहीं अवधीनंतर कां होईना, पण वडिलांच्या पावलांवर पाऊल टाकून जातांना मला दुःखमिश्रित आनंद होत आहे. आनंद अशासाठीं कीं, वडिलांची इच्छा पूर्ण करण्याचें व त्यांचाच कित्ता गिरविण्याचें भाग्य मला लाभलें आणि दुःखाचें कारण तर स्पष्टच आहे. अस्तु.

'केसरी'नें माझ्या आंगच्या निद्रित शक्तीस जागें केलें, इतकेंच नव्हे, पण तिला कार्याला जुंपून मजकडून यथाशक्ति सेवाही बजावून घेतली. ती सेवा करीत असतां आजूबाजूला पाहिल्यानें जें थोडेंबहुत ज्ञान प्राप्त झालें त्याचा चांगल्या प्रकारें उपयोग कसा करावा हेंही 'केसरी'कर्त्यांनींच मला सांगितलें आणि त्याचें दृश्य फल म्हणजे आज महाराष्ट्रवाचकवर्गापुढें येणारें हें पुस्तक होय.

पाहिलेल्या गोष्टी वर्तमानपत्रांतून वाचकांसाठीं लिहिणें हें काम सोपें आहे, तसें पुस्तकलेखनाचें नाहीं. लेखनशास्त्राची परिपूर्ण माहिती नसतां किंवा **न वृद्धाः सेवितास्त्वया**' हा भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास दिलेला शेरा माझे बाबतींतही खरा ठरत असतां, मी लहान तोंडीं मोठा घांस घेतला आहे असें कित्येकांस वाटेल; माझ्या हातून पुष्कळ चुका झालेल्याही आढळतील; किंबहुना माझा हा प्रथम प्रयत्न कांहींच्या दृष्टीनें हास्यास्पद देखील ठरेल. परंतु प्रत्येकाच्या मनाचें समाधान करण्याच्या भरीस न पडतां मला इतकेंच सांगावयाचें कीं, माझ्यापेक्षां

अधिक अधिकृत व अभ्यासी लेखकांनीं या विषयावर ग्रंथ लिहावे म्हणजे माझी चूक कोठें झाली तें तरी मला समजेल. लहरी गवयांना गाणें म्हणण्यास उद्युक्त करण्यासाठीं एखाद्या नवशिक्यालाच प्रथम मुद्दाम वेडेवांकडे आलाप काढावयास सांगतात. हेतु हा की, त्या बेसूर गाण्यामुळें लहरी गवय्यांची लहर जागृत व्हावी. आणि हा तोडगा यशस्वी ठरतो. तशा प्रकारची प्रेरणा जरी माझें नवशिक्याचें पुस्तक वाचून कोणा अभ्यासकास झाली, तरी देखील पुष्कळ कामगिरी होईल.

मेसॉपोटेमिया व इराणमधून प्रवास करून आलों असतां हें अफगाणिस्तानसंबंधीं पुस्तक लिहिले त्याचें कारण, लोकांचें त्या देशाविषयींचें कुतूहल होय. प्रस्तुत पुस्तकाचें 'महाराष्ट्र-शारदा' स्वागत कशी करते तें पाहून उपरोक्त दोन देशांसंबंधींही पुस्तकें लिहिण्याचा माझा मानस आहे. परंतु, अशा परदेशांबद्दलच्या ऐतिहासिक वर्णनात्मक ग्रंथांचें महाराष्ट्रीय वाचकवर्गाला वावडें असल्याचा आजपर्यंतचा अनुभव आहे, म्हणून पुढें पाऊल टाकतांना दूरवरचा विचार करावा लागतो. तें असो.

'केसरी'कर्त्यांनीं मजवर टाकलेली कामगिरी मी एकाकी असतों तर कितपत पार पाडतां आली असती याची मला शंका वाटते. 'घर बांधून पहावें किंवा लग्न करून पहावें' अशी एक मराठी म्हण नेहमीं ऐकण्यांत येते. तिची सत्यता अनुभवानें पटली नसली, तरी 'पुस्तक लिहून पहावें' असा आणखी एक चरण आधुनिक कालास अनुसरून त्या म्हणीस जोडावा असें मला वाटूं लागलें आहे. हें पुस्तक लिहिण्याची कल्पना आल्यानंतर त्याचा कच्चा आराखडा तयार करण्यापासून तों तहत त्याच्या प्रकाशनापर्यंत मला माझ्या अनेक मित्रांनीं मदत केली आहे, पण त्यांचा स्नेह निरपेक्ष असल्यानें मीं येथें त्यांचा निर्देश करीत नाहीं. पण एवढ्याही मदतीनें संपलें नाहीं. श्रम-विभागणीप्रमाणें मुद्रणालयाचे व्यवस्थापक ब्लॉकमेकर, जुळारी, मुद्रितें तपासण्यास सहाय्य करणारे माझे धाकटे बंधू, इतर प्रकारें प्रोत्साहन देणारे ज्येष्ठ बंधू व सर्व स्नेही मंडळी, यांचाही वांटा प्रस्तुत पुस्तकप्रकाशनांत आहेच. 'नवाकाळ'च्या संपादकांनीं स्नेहपूर्वक चित्रांची मदत केली, मुंबईच्या अफगाण कॉन्सलखात्यांतील श्री. आगा शौकत यांनीं स्वत:जवळचे पुष्कळ फोटो मला उपयोगासाठीं दिले; श्री. रुस्तमजी दुबाश यांनीं स्वसंग्रहांतील दोन अमूल्य चित्रें देऊन ग्रंथालय माझ्या उपयोगासाठीं मोकळें ठेवलें; 'लोकशिक्षण'कारांनीं आपल्या जवळचा एक सुंदर ब्लॉक उपयोगार्थ दिला;

श्री. रा. म. जांभेकर यांनीं पुस्तकाच्या नांवास अनुरूप असें चित्र अल्पकालांत करून दिलें, याबद्दल सर्वांचे व्यक्तिशः व सामुदायिक रीत्याही आभार मानणें माझें कर्तव्य आहे. मुद्रणालयांतील सर्वच मंडळींनीं हें काम 'भाडोत्री' वृत्तीनें न करतां मोठ्या हौसेनें व उत्साहानें केलें; बालोद्यान प्रेसनें नकाशे, व चित्रें छापण्याचें काम आपल्या नांवलौकिकांत भर घालण्याजोग्या कौशल्यानें करून दिलें; इत्यादि बाबी नमूद करण्यापेक्षां प्रत्यक्ष कृतीवरूनच वाचकांनीं ज्याचें त्याचें मोल ठरवावें. ह्या सर्वांचा आभारपूर्वक निर्देश औपचारिक दिसला, तरी तो मी मुद्दाम आणि मनःपूर्वक करीत आहें. वैयक्तिक नामनिर्देश केला नाहीं असे बरेच सहाय्यक आहेत; अशा 'अज्ञात' सहाय्यकांचेंही मी येथें स्मरण करितों.

आतां पुस्तकांतील भागासंबंधीं थोडें लिहावयाचें आहे. कित्येक विशेष-नामांच्या उच्चारांचा मी घोटाळा केला असा आरोप मजवर येईल. पण माझी अडचण अशी आहे. बहुतेक आधारभूत ग्रंथ इंग्रजींत. अफगाणांचे उच्चार स्पष्टपणें लिहिण्यासाठीं नागरीसारखी शास्त्रोक्त व परिपूर्ण लिपी देखील असमर्थ ठरते. मग इंग्रजीचें काय विचारतां? एक दोन उदाहरणांवरून ही अडचण स्पष्ट होईल. अफगाणांची भाषा 'पुश्तु' असें म्हणतात. तिचीच पश्तो, पुश्तो, पख्तो, पुख्तु, पुख्तो, अशीं नांवें प्रत्यक्ष व्यवहारांत आज रूढ आहेत. तीच गोष्ट 'पेशावर' ह्या शहराचा उच्चार करण्याची. बोलतांना 'प्शॉऽ' असा उच्चार केला तरच भागतें. नाहीं तर, पहिल्या वर्गांतील विद्यार्थी वाचतो त्याप्रमाणें 'पे शा व र' असा प्रत्येक अक्षराचा स्पष्ट उच्चार केल्यानें तिकडील लोक हंसूं लागतात. 'पिशा' असें साधारणपणें जलद म्हटलें तर जो उच्चार होईल त्यानें 'पेशावर' असा बोध होतो. कांहीं पठाण तर 'पेखाऽर' 'पिखाऽर' असा देखील उच्चार करतात. भाषाशास्त्राच्या ठराविक नियमानुसार हीं सर्व रूपें असल्याची ग्वाही तज्ज्ञ देतील. पण मला इतकेंच दाखवावयाचें कीं, होतां होईल तों तद्देशीय पण जनरूढीस विरोधी न ठरणारीं रूपेंच योजिलीं आहेत. फ्रेंच, इटालियन व इतर युरोपियन नांवांत थोडासा फरक सोईसाठीं करावा लागला आहे. उदाहरणार्थ, रशियांतील परराष्ट्रीय खात्यांतील, कोलौंटी असें नांव देण्यापेक्षां तिला श्रीमती कोलंती देवी बनविल्यानें थोडासा अनर्थ टळला आहे. पण एवढ्यावरून ह्या व अशा नांवांवर कोणी कोलांटी खाऊं नये.

इंग्रजी शिष्टाचाराप्रमाणें ' सर 'की आडनांवास चिकटत नाहीं. त्या व्यक्तीचेंच नांव ' सर 'नंतर यावें लागतें. परंतु ' सर 'की तोडून नुसतें आडनांव घेणें किंवा ' सर 'की जोडून नांव लिहिणें हे दोन्ही मार्ग सोईचे झाले नसते. दर खेपेस ' सर 'कीसह संपूर्ण नांव लिहावें तरीही पंचाईत होतेचि. म्हणजे ' सर लेस्ली विल्सन् ' असेंच दर वेळीं उपसर्गासह म्हटलें पाहिजे. 'सर लेस्ली' हा प्रयोग शुद्ध असला तरी ज्या हेतूसाठीं आपण त्या व्यक्तीचें नांव घेतों तो सिद्धीस जात नाहीं. आणि 'सर विल्सन्' म्हटलें तर शिष्टाचाराचा भंग होतो. नुसतें लेस्ली किंवा विल्सन् म्हटल्यानें त्या व्यक्तीची थोरवी लक्षांत येत नाहीं. तेव्हां इंग्रजी शिष्टाचारांचीं बंधनें थोडीं शिथिल करून मी ' सर ' की आडनांवास जोडली ती सोईसाठीं, शिष्टाचार-कोविदांनीं या नियमभंगाबद्दल क्षमा करावी.

शेवटीं वाङ्मयांतील शिस्तधारी सेनाध्यक्षांना-टीकाकारांना-विनंति करावयाची आहे. अलीकडे परस्पर प्रशंसेचा पंथ अत्यंत बोकाळला आहे. निदान शारदामंदिरांत असा दरबारी भाटशाहीचा प्रकार अनिष्ट असतांही अवलंबिला जातो. परंतु माझ्या प्रस्तुत पुस्तकाचें गुणवर्णन मुळींच न करतां **दोषविवेचनच** करावें असा माझा आग्रह परीक्षकांना, अभिप्रायलेखकांना, टीकाकारांना आणि सामान्य वाचकांना देखील आहे. प्रथमप्रयत्न आहे, उपक्रम स्तुत्य आहे, पुस्तक संग्राह्य आहे, असा प्रयत्न ह्यापूर्वींच कां झाला नाहीं म्हणून आश्चर्य वाटत होतें, इत्यादि 'पोंच व अभिप्रायां'तील ठराविक वाक्प्रचारांचा आतां पुरा वीट आला आहे ! वाङ्मयाचें खरें खुरें परीक्षण करण्याची शक्तीच शारदोपासकांच्या आंगीं उरली नाही कीं काय अशी बलवत्तर शंका येण्यासारखें आचरण आज काल शारदामंदिरांत जमणाऱ्या 'भगतगणां'कडून होत आहे. माझी दृष्टि स्वार्थी आहे. मला आणखीही वाङ्मयसेवा करण्याची उमेद व हौस आहे. तेव्हां पुढील वेळीं टाळावयाचे दोष व साध्य करावयाचे गुण यांचेंच विस्तृत, निर्भीड व स्पष्ट शब्दांत मला समजेल अशा रीतीनें विवेचन व्हावें अशी माझी इच्छा आहे. गुणवर्णन केल्यानें कार्यहानीच होण्याचा संभव असतो. तेव्हां तो मार्ग टाळावा. दोषैकदृष्टीनें परीक्षण केलें तरी चालेल. वैयक्तिक मतालाही मी मान देत असल्यानें वाचकांनींही टपालमार्गें माझे दोष मला दर्शविण्याची कृपा करावी अशी विनंति आहे.

प्रताप कार्यालय, गिरगांव–मुंबई ४.<br>२५ जानेवारी १९३०

श्री. रा. टिकेकर.

# आधारभूत ग्रंथ

# BIBLIOGRAPHY

Encyclopædia Britanica. XI, XII, & XIII Edns.
Imperial Gazetteers. Vols. I & V,
Balfour's Cyclopædia of India, East & South Asia. Vols. I, II & III.
Survey of International Affairs. 1920-23—Toynbee.
,, ,, ,, 1925 Vol. I — Toynbee.
The Ameer Abdur Rahman- Public Men of Today Series-S. Wheeler.
Life of Abdur Rahman. Vols. I & II- Mir Munshi S. M. Khan.
Parliamentary Papers : Hostilities with Afghanistan.
Parliamentary Papers relating to III Afghan War.
The Eastern Question, Vols. I & II— Duke of Argyll.
The Kingdom of Afghanistan.— Tate.
History of Afghanistan. — Malleson.
The Second Afghan War, Abridged Official Account.
First Afghan War and Its Causes.—Durand.
Gates of India. — Sir T. Holdich.
Indian Borderland ,,
With the Afghans. — Field.
Beyond Khyber Pass. — L. Thomas.
Through the Heart of Afghanistan. — Trinkler.
Among Wild Tribes of the Afghan Frontier. — Pennel.
Europe & the East. — Harris.
Review of Political Situation in Central Asia.—Dr. Abdul Ghani.
India's Contribution to the War.—Govt. of India.
Oxford History of India. — V. Smith.
Haydn's Dictionary of Dates. — Vincent. 25th Edn.
Treaties, Engagements & Sanads, Vol. XI, 4th Edn.
Afghanistan from Darius to Amanullah — Sir G. Macmunn. (1929)
Afghan & Pathan. — G. B. Scott. ( 1929 )
Defence of India. — "Arthur Vincent"
Peshawar to Moscow. — Shaukat Usmani.
British Government in India. — Lord Curzon.
( The London Times, The Times of India, Indian Year Books, "India in—" Series, Legislative Assembly Debates, Administration Reports, Census Reports &c. )

## अनुक्रमणिका

## परिशिष्टें



---

## प्रकरण पहिलें

# अफगाणिस्तान : सामान्य वर्णन

**१. भौगोलिक रचना व चतुःसीमा** :—हिंदुस्थानच्या वायव्येस काश्मीर संस्थानला लागून असलेला एक डोंगराळ प्रांत आहे तो **अफगाणिस्तान** होय. त्याचे उत्तरेकडे ऑक्सस नदीच्या पैलतीरीं असलेलीं बुखारा व समरकंद हीं रशियन संस्थानें त्यावर औत्सुक्यानें टपून बसलीं आहेत, तर पूर्व आणि दक्षिण दिशांकडे हिंदुस्थानासारखा श्रीमंत पण सोशिक शेजारी तिकडील अतिथिअभ्यागतांचें मनःपूर्वक स्वागत करण्यास सदैव सिद्ध आहे. पिढ्यान् पिढ्याचा लुटारू शत्रु म्हणजे इराण हा पश्चिमेकडून अफगाणांच्या मुलुखावर डोळा ठेऊन बसला आहे.

काश्मीरच्या बाजूस उच्च पर्वतश्रेणींनीं अफगाणिस्तानचें सीमासंरक्षणाचें काम पत्करिलें आहे. अफगाणिस्तानाच्या आग्नेय दिशेस कांहीं वनवृत्तीच्या स्वतंत्र टोळ्यांचा मुलुख असून तो हिंदी सरहद्द व अफगाण सीमा यांच्यामध्यें आहे. रानटी टोळ्यांवर प्रभुत्व असें कोणाही राजाचें नाहीं. डोंगराळ प्रदेशांत वास्तव्य करणाऱ्या लोकांना पोटभर खावयास पुरेल इतकेंही धान्य तेथें उत्पन्न होत नसल्यानें, लुटालूट, चोरी व दरवडे हेच दुय्यम धंदे त्यांना करावे लागतात. आणि अशांचा त्रास शेजारच्या दोन्ही देशांना होतो. त्यांतल्यात्यांत ह्या रानटी लोकांजवळ आधुनिक शस्त्रें भरपूर असल्यानें त्यांना वठणीवर आणणें हें सोपें काम नव्हे. त्यांच्याविषयीं एक स्वतंत्र विभाग लिहावयाचा असल्यानें तूर्त इतकेंच पहावयाचें कीं, अफगाण व हिंदी सीमा यांच्यामध्यें अशा सशस्त्र रानटी लुटारूंचें वास्तव्य आहे.

राष्ट्राराष्ट्रांतील सीमा ठरविणें हें काम अफगाणिस्तानच्या बाबतींत बरेंच कठीण गेलें आहे. नैसर्गिक सीमा फक्त उत्तरेच्या बाजूस ऑक्सस नदीनें केली आहे. बाकीच्या बाजूंस शेजारच्या लचके तोडणाऱ्या राष्ट्रांना संभाळून सरहद्द ठरविण्याचें कार्य कमिशनें नेमून करावें लागलें. उत्तरेची हद्द " **रुसो-अफगाण** " कमिशननें १८८४-८६ या सालांत निश्चित केली. हिंदुस्थानच्या बाजूची सीमा " **ड्यूरांड** " कराराप्रमाणें १८९३ मध्यें ठरली; पामीर कमिशननें १८९५ मध्यें ईशान्य सीमा मुक्रर केली आणि १९०४-५ च्या ' **पर्सो-बलूच** " कमिशननें पश्चिम बाजू निश्चित ठरविली.

**२. डोंगर, नद्या, हवामान** :—डोंगराळ प्रदेशांतील नद्या नौकानयनदृष्ट्या उपयोगी नसावयाच्या हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पावसाळी ओढ्यांइतकीच त्यांची किंमत. रहदारी अडविण्यापलीकडे जास्त काम त्यांच्या हातून होत नाहीं; तरी पण त्यांचें पाणी युक्तीनें शेतकीकडे वापरण्यांत अफगाणांनीं फारच कौशल्य दर्शविलें आहे. हाच प्रकार अफगाणिस्तानांतील नद्यांचा आहे. मात्र हिममयप्रदेशांत त्यांचीं उगमस्थानें असल्यानें पावसाळ्याऐवजीं उन्हाळ्यांत त्यांना पूर येतो. आपल्याकडेही सिंधु, ब्रह्मपुत्रा, गंगा इत्यादिकांना उन्हाळ्यांतच पाणी जास्त असतें ही गोष्ट सर्वांना माहीतच आहे.

अफगाणिस्तानांत हरीरूद, हेलमंद, काबूल आणि ऑक्सस या चार नद्या मुख्य आहेत. पहिलींत श्रीविष्णूचें नांव कसें गोंवलें गेलें याचा शोध संशोधकांनीं लावावा. हेलमंद ही दक्षिणवाहिनी असून पुढें पश्चिमेकडे वळून हेलमंद सरोवरांत उडी घेते. काबूल ही काबूल शहरावरून वहात येऊन रावी भरारीच्या अटकेजवळ सिंधूस मिळते. रशियन तुर्कस्तान व अफगाणिस्तान यांच्यामध्यें ऑक्सस नदी असून तिला अमुदारिया ( दर्या ? ) व जिहून अशीं आणखीं दोन नांवें आहेत. उन्हाळ्यांत पुरामुळें आणि हिवाळ्यांत हिमवृष्टीमुळें प्रवास करणें कठीण होतें. रेल्वे तर दूरच, पण चांगले रस्तेही अफगाणिस्तानांत अजून सर्वत्र झालेले नाहींत.

अफगाणिस्तानचें हवामान कसें असावें याची थोडक्यांत कल्पना बाबरच्या शब्दांत सांगतां येईल. " काबूलपासून एक दिवसाच्या मजलीवर जें गांव आहे तेथें बर्फ कधींच पडत नाहीं आणि दोन तासांच्या टप्प्यावर असलेल्या ठिकाणचें बर्फ कधींच वितळत नाहीं. " साधारणपणें असें म्हणतां येईल

की, अफगाणिस्तानांत बर्फ कधींच पडत नाहीं असें एकही ठिकाण नाहीं. अक्षय्य हिम असणारीं बरींच गिरिशिखरें आहेत. सर्वच देश समशीतोष्ण कटिबंधांतला; समुद्रसान्निध्य नाहीं. तेव्हां उच्च पर्वतराजींनीं व्याप्त अशा प्रदेशांत वातावरण असेंच असणार.

**३. क्षेत्रफळ व लोकसंख्या** :—अफगाणिस्तानचें क्षेत्रफळ सुमारें २,४५,००० चौरस मैल आहे. म्हणजे आकारमानानें हा गांधारराजांचा प्रदेश मुंबई इलाख्याच्या दुप्पट आहे. लोकसंख्या किती हें मात्र निश्चितपणें कोणालाच सांगतां येत नाहीं. आणि तर्क करणारे तज्ज्ञ आहेत त्यांचे अंदाज भिन्न भिन्न आहेत. इंग्रजी ज्ञानकोशकार पन्नास लाख असा आंकडा देतात, तर एक भौगोलिक तज्ज्ञ–न्यूमन्–एक कोटी वीस लक्ष असा अंदाज करितात. हिंदी लष्करी खात्याच्या पुस्तकांत अफगाणिस्तानची लोकसंख्या साठ लाख आहे असें लिहिलें असलें, तरी शिरोगणतीच्या तज्ज्ञांनीं ( १९२१ ) ६३,८०,५०० असा शेंकड्यापर्यंत अंदाज दिला आहे. तोच आपण मान्य करावा हें बरें. *

**४. लोकांचा धर्म व स्वभावविशेष** :—इस्लामपंथाचे "सुनी" लोकच अफगाणिस्तानांत जास्त आहेत. शिया आणि सुनी हे भेद कां व कसे पडले हें आतां बहुतेकांस कळून चुकलेंच आहे. "काफिरिस्तान" म्हणून जो एक लहानसा भाग अफगाणांच्या अंमलाखालीं आहे तो मात्र मुसलमानेतर होता. अलीकडे सक्तीनें मुसलमानी धर्म तेथें प्रस्थापित होत आहे. जगज्जेता शिकंदर हिंदुस्थानापर्यंत आला, तेव्हां त्याच्या अनुयायांपैकीं कांहीं लोक मागें राहिले; तेच काफिरिस्तानांतील "काफीर" असावेत. त्यांचे देव, त्यांचे रिवाज व त्यांच्या अवयवांची ठेवण हीं ग्रीकांशी जुळतात असें म्हणतात. ते पूर्वीपासून मुसलमानी धर्मापासून फटकून राहिले हें त्यांच्या प्रदेशाच्या व त्यांच्या नांवावरूनच स्पष्ट आहे. काफीर म्हणजे इस्लामेतर. प्राचीन हिंदी संस्कृतीदेखील काफिरिस्तानांत अवशिष्ट असावी. पण तो प्रांत अत्यंत बिकट असून लोकही रानटी असल्यानें तिकडे कोणी जात नाहीं. जाणें शक्य नाहीं असें मात्र नव्हे. कष्टदायक असलें तरी अशक्य नव्हे. आर्यसंस्कृतीच्या संशोधकांना तेथें भरपूर कार्यक्षेत्र आहे.

---

* अफगाणिस्तानविषयीं सविस्तर भौगोलिक माहिती परिशिष्टांत दिली आहे.

हिंदुकुश पर्वताच्या रांगा अफगाणिस्तानांत दूरवर पसरलेल्या आहेत. १९००० तें २४००० फूट उंचीचीं ( समुद्रसपाटीपासून ) शिखरें या प्रांतांत आहेत. वस्ती अर्थातच तुरळक असणार आणि दऱ्याखोऱ्यांतून टोळ्या करून राहण्याखेरीज अशा डोंगराळ मुलुखांत दुसरा मार्ग नसतो. परकीय प्रवाशांना अथवा शोधकांनाही अफगाणिस्तानांत जाणें मुष्कील असल्यानें बाह्य जगाचा व सुधारणेचा गधही अफगाणिस्तानांत परवांपरवांपर्यंत नव्हता. टोळ्या करून निस्तंत्र वृत्तीनें राहणें ही निसर्गाची सक्ती ज्या लोकांवर आहे त्यांना आपसांत कलह करण्याची बुद्धि आपोआपच होते. कारण शांततेनें कांहीं उद्योग-धंदा किंवा शेती करून उपजीविकेचें साधन हातीं लागण्याची आशा नसते. अशा परिस्थितीत कोणाचीं मेंढरें दिसलीं कीं, तीं पळवून आण; द्राक्षांचा मळा पूर्ण बहारांत आला म्हणजे तो लूट; फलाण्याजवळ पुष्कळशीं गुरेंढोरें आहेत, तर त्याला पैगंबराकडे रवाना करून आपण तीं आपल्या टोळींत वाटून घे; अशा विचारांकडे लोकांची प्रवृत्ति साहजिकच होते.* आणि तशी ती अफगाण मुलुखांतील जनतेत झाली असल्याचें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. लूट, चोरी, खून यांचा समावेश धनोत्पादक धंद्यांमध्यें होत असल्यानें त्यांना पातकें कोण समजेल? ही निसर्गत: क्रमाक्रमानें प्राप्त झालेली किंवा अवनत झालेली मनो-वृत्ति लक्षांत घेतल्यास अफगाणांचा देश राष्ट्र या पदवीस यथार्थपणें परवांपर्यंत कां पोहोंचू शकला नाहीं, याचा स्पष्ट उलगडा होईल, आणि अफगाणिस्तानच्या राष्ट्रीकरणांत राष्ट्रकर्त्या पुरुषांस अडचणी कोणत्या कारणानें आल्या, त्यांच्या इतिहासांत अंतस्थ कलहांची विपुलता कां झाली, तें कळून येईल.

निसर्गानें लूट, चोरी, मारामारी अशा धंद्यांस पोषक अशी भौगोलिक रचना केली आणि त्यांत एका हातांत कुराण व दुसऱ्यांत तरवार अशा कडव्या व क्रूर धर्माची जोड मिळाली. मग निर्बंध कसचा राहणार? अशा प्रकृतीचा परिणाम, अफगाणिस्तान हे राष्ट्र झालें नाहीं, होऊं शकलें नाहीं, या आश्चर्यांत तर दिसतोच; पण मुख्यत: शेजारच्या धनसंपन्न हिंदुस्थानास मात्र त्यामुळें अनेक हल्ले सोसावे लागले, यांत स्पष्टपणें दृग्गोचर होतो. दहाव्या शतकापासून इस्ला-मानुयायांच्या हातीं काबूल गेलें, तरी अठराव्या शतकापर्यंत तेथें तद्देशीय राज्य-

* सामाजिक चालीरीतीसंबंधीं विशेष विवेचन स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे.

कर्ता होऊं शकला नाहीं ही गोष्ट काय दर्शविते? नादिरशहाला ठार करून अब-दाली अहमदशहानें दुराणी वंशाचें राज्य काबूलवर स्थापिलें, हा प्रसंग अठराव्या शतकाच्या पूर्वार्धाच्या शेवटीं घडला. तत्पूर्वी येईल त्या लुटारूला वाटेल तो प्रांत लुटण्यास सहाय्य करणें यापलीकडे अफगाणांना दुसरा विचारच नव्हता असें त्यांच्याच एका लोकप्रिय कवीचें म्हणणें आहे. औरंगजेबाचा समकालीन असा खुशालखान नामक नामांकित कवि म्हणतोः—

> " खरोखर, अफगाणांना विचार आणि समज फार कमी; खाटिक-
> " खान्यांतील लांडया कुत्र्याप्रमाणें त्यांचें वर्तन आहे. मोंगलांकडून
> " मिळणाऱ्या सुवर्णाच्या आशेनें त्यांनीं साम्राज्यें घालविलीं. मोंगल
> " बादशाहांकडून मिळणाऱ्या अधिकाराची त्यांना फार हौस आहे.
> " ते निरुपयोगी व कुचकामी आहेत."

**५. 'अफगाण' नांवासंबंधीं निरनिराळ्या कल्पना :—**अफगाणांचें राष्ट्र हें अगदीं अलीकडेच झालेलें आहे. टोळीचे नायक आपली सत्ता निर-निराळ्या विभागांवर प्रस्थापित करीत, आणि तेच येथील राज्यकर्ते मानले जात. संघटित असें अफगाणांचें राज्य प्रथमतः **अहमदशहा अबदालीनेंच** अठराव्या शतकांत स्थापिलें. तत्पूर्वीचा इतिहास नीटपणें कळण्यासाटीं अंधःकारानें व्याप्त अशा अज्ञात प्रदेशांत बरेंच चांचपडत जावें लागतें.

आज राकट, रानटी व राक्षसी अफगाणांनीं व्यापलेला देश एक हजार वर्षांपूर्वी हिंदू राजांच्या सत्तेखाली होता. दुर्योधनाचें मातुलग्राम '**गांधार**' हेंच हल्लींचें 'कंदाहार' आहे असें आतां सामान्यपणें एकमतानें मान्य केलें जातें. पण पुराणांतील गोष्टींवर तरी विसंबून कां रहावें अशी आधुनिक चिकि-त्सकांची दृष्टि असल्यानें त्यांस पटणारा पुरावा दिला पाहिजे. काबूलच्या आस-पास सांपडणारीं नाणीं, पुतळे व इमारतीचे अवशेष यांवरून काबूलवरील हिंदु व बौद्ध अंमलाचीच गोष्ट सिद्ध होते. बौद्धधर्माचें वर्चस्व काबुलाधिपाच्या प्रजेवर होतें असें दर्शविणारे कांहीं शोध जर्मन पुराणवस्तुसंशोधकांनीं अलीकडे लावले आहेत. *

---

* Imperial Gazetteer of India, Vol. 5.

" अफगाणिस्तान " हें नांव कसें अस्तित्वांत आलें हें पाहणें थोडें गमतीचें आहे. अफगाण प्रजा आपणास पठाण म्हणवून घेते आणि पठाण म्हणतांच, तो पंधरा चोळण्यांच्या कापडाची केलेली सुरकतलेली बोंगळ व पोकळ विजार घालणारा क्रूर मनुष्य आपल्या डोळ्यांपुढें उभा राहतो. ( उत्तर हिंदुस्थांनातले रोहिलेही पठाणांप्रमाणेंच पोषाख करितात; पण ते खरे पठाण नव्हत. " अँग्लो-इंडियन " ही जशी एक मिश्र जात आहे, तशीच " इंडो-पठाण " म्हणजे रोहिले हीही एक जात आहे. अर्थात्‌च त्यांचा सामाजिक दर्जा कमीच असावयाचा. ) पठाण शब्दाची व्युत्पत्ति अशी सांगतात :—

दारियस हिस्टापेस ( ख्रि. पू. ५०० ) याच्या वेळच्या ग्रीक इतिहासांत " पख्त " म्हणून जो निर्देश आहे तो अफगाणिस्तानला उद्देशूनच आहे. पुश्त, पश्त व पख्त अशी नामांतरें त्या देशाचीं होत गेलीं असल्याचें तज्ज्ञ म्हणतात. त्यावरून पठाण हें नांव संभवतें.

हिरोडोट्‌सने " पॅक्ट्रियस " लोकांचा उल्लेख केला आहे तेच पठाण असेंही कित्येक अधिकाऱ्यांचें मत आहे. सीरियन भाषेत ' पठाण ' याचा अर्थ " सुकाणू " असा आहे. आणि " अफगाण " या नांवाचा संबंध यहुदी ( बेने इस्राएल ) राजा सॉल याच्या नातवाशीं जुळतो. सौलचा पुत्र जरमिया व जरमियाचा मुलगा अफगाना, अशी परंपरा लोक सांगतात. त्याला इतिहासाचा आधार नसला तरी आजच्या अफगाणांच्या कांहीं चालीरीती व विशेष, ज्यू लोकांप्रमाणें आहेत हें खरें. पैशांचा हावरेपणा ज्यू लोकांइतकाच अफगाणांमध्यें आढळतो. अफगाणांची चेहेरेपट्टी, विशेषतः नाकाची रचना ज्यू लोकांशीं साम्यता दर्शविते. कांहीं तज्ज्ञांनीं आणखीही एक सूचक कल्पना केली आहे. आर्मीनियन् भाषेत " अघवान् " म्हणजे पहाडी, डोंगरांत राहणारा. त्यावरून कदाचित् " अफगाण " हें नांव आलें असावें. कारण अफगाण हे सर्वच डोंगरांत राहणारे आहेत.

**६. काबुलचा हिंदु राजाः**—आतां हे कल्पनेचे खेळ आणि ' मतामतांचा गलबला ' सोडून इतिहास पाहिला असतां असें दिसतें कीं, इ. स. च्या दहाव्या शतकापासून इस्लामी धर्म काबुलाधिपतींनीं स्वीकारिला. तत्पूर्वीचे त्या प्रांताचे राजे—मग त्याचें नांव अफगाणिस्तान असो, कापिलपूर असो किंवा गांधार असो—हिंदू होते, मुसलमान खात्रीनें नव्हते. विक्रमा-

जिंतापासून चौथा पुरुष " उर्ज " नांवाचा होता व त्यानें काबूल शहर वसविलें असें मानितात " उर्ज " हा ' गुब्रा ' म्हणजे अग्निपूजक होता असें कांहींचें मत आहे, आणि त्याचेंच नांव ' काबूलशहा ' होतें असें कित्येकांना वाटतें. त्यापूर्वीच्या पराक्रमी राजांनीं आपला साद्यंत वृत्तांत लिहून तो सहज सुलभ असा ठेवला असता तर कल्पनाजालाचा किती तरी त्रास वाचला असता ! पण मग इतिहास व पुराणवस्तुसंशोधन यांच्या उद्योगास वाव कसा राहावा ?

हिंदु राजानें मुसलमानी धर्म स्वीकारिला, कां त्याला काबूलहून निघून जावें लागलें याविषयींही निश्चयात्मक कांहींच सांगतां येत नाहीं. मदीनेस पैगंबरानें इस्लामी धर्माची संस्थापना केल्याची बातमी कळतांच काबूलच्या हिंदु राजानें चौकशीसाठीं कांहीं शेलक्या लोकांचें एक शिष्टमंडळ तिकडे पाठविलें. तें सर्व मंडळ मदीनेस गेल्यावर इस्लामानुयायी झालें व परत स्वदेशीं येऊन त्यानें आपल्या धर्माचा प्रसार अफगाणिस्तानांत केला, असा एक उपलब्ध प्रवाद आहे. " उर्ज " राजाचा " काबूलशहा " झाला, तो याच वेळीं कीं काय, तें समजत नाहीं. तसेंच तुर्कोमानांनीं दहाव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदु राजापासून काबूल घेतलें असें म्हणतात त्याचा या प्रवादाशीं संबंध कसा जोडावयाचा तही स्पष्ट होत नाहीं.

दुसरीही एक दंतकथा आहे. नोहाचे दोन मुलगे ' काकूल ' आणि ' हाबूल ' या नांवाचे होते. त्यांनीं काबूल वसविलें. शहराला नांव काय द्यावें, असा तंटा सुरू झाल्यावर दोघांनीं समेट करून " काबूल " असें नांव ठरविलें. एकाच्या नांवांतलि " का " व दुसऱ्याच्या नामाभिधानांतील ' बूल " मिळून " काबूल " झालें !

# प्रकरण दुसरें

## पूर्वेतिहास : अफगाणिस्तानचें राष्ट्रीकरण

**७. अर्वाचीन इतिहास :**—अफगाणिस्तानचा संदिग्ध असा प्राचीन इतिहास सोडून अर्वाचीन काळाकडे पाहिलें तर त्याचे चार पोटभाग पडतात. पहिला अफगाण राष्ट्रीकरणाचा कालखंड स्वतंत्र मानावा लागेल. कारण या कालांत अफगाण जातीजमातींचा विस्कळितपणा जाऊन त्या काबूलच्या मध्यवर्ती राजकीय सत्तेखालीं एकत्रित झाल्या. यानंतर अफगाणिस्तानचा ब्रिटिशांशीं संबंध येऊन पहिलीं दोन अँग्लो-अफगाण युद्धें ज्या काळांत झालीं तो दुसरा कालखंड होय. यानंतर अबदुर रहमान व हबीबुल्ला ह्या दोन अमिरांच्या राष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाच्या कारकीर्दी झाल्या. त्यांचाही निराळाच कालखंड धरिला पाहिजे. आणि शेवटीं अमानुल्ला सिंहासनाधिष्ठित झाल्यापासून अफगाणिस्तानच्या आंतरराष्ट्रीय महत्त्वाचा पारा धांवपळ करीत वर चढूं लागला; म्हणून त्याच्या काळापासूनही एक नवीन कालखंड किंबहुना युग प्रवर्तलें असें म्हणतां येईल.

सबक्तगीन व महमद यानंतर शहाबुद्दीन घोरी आला व त्याच्या अंमलाखालून अफगाण प्रदेश मोंगल राजांकडे गेला. हिंदुस्थानावर स्वारी करण्यासाठीं सरळ मार्ग मिळावा म्हणून बाबरनें इ. स. १५२२ त कंदाहार घेतलें. नंतरच्या मोंगल दिल्लीश्वरांचीच अफगाणिस्तानावर सत्ता चालली. विलासप्रिय **शाहाजहान** काबुलास पुष्कळ वेळां गेला होता. आपलें राज्य किती अफाट पसरलें आहे हें पाहण्यासाठीं किंवा मधूनमधून "विलायते"स (विलायत = स्वदेश) जावें या हेतूनें मोंगल बादशहा अफगाणिस्तानची सफर करीत.

दिल्लीच्या केंद्रीभूत राज्यव्यवस्थेचा डोलारा पोकळ होत गेला त्याबरोबरच दूरस्थ काबुलावरील त्यांची सत्ता ढिली पडली. इतक्यांत प्रख्यात इराणी लुटारू **नादिरशहा** हिंदुस्थानावर चाल करून आला. जर्मन कैसरनें फ्रान्सवर हल्ला करण्यासाठीं मोकळा मार्ग हवा म्हणून गरीब बेल्जमचा जसा मध्यें चुराडा केला तसाच अफगाणिस्तानचाही हिंदुस्थानावर स्वारी करणारांनीं अनेक वेळां चुराडा केला ! नादिरशहानें काबूल व कंदाहार हीं दोन्हींही मुख्य शहरें काबीज केल्यावर हिंदुस्थानाकडे आपला मोर्चा वळविला.

**८. अफगाण राष्ट्रीकरणाचा पाया :—अहमदशहा अबदालीनें** अफगाणिस्तानचें एक स्वतंत्र राजघराणें आपल्या नांवानें स्थापिलें. इ. स. १७४७ मध्यें त्यानें नादिरशहाचा खून केला. कारण नादिरशहाबरोबर तोही हिंदुस्थानच्या स्वारीला आला होता आणि लूट करून काय काय फायदे होतात हें त्याला पूर्णपणें कळून चुकलें होतें. राज्यलोभानें, संपत्तीच्या आशेनें आणि अधिकारतृष्णा शमविण्यासाठीं त्यानें स्वतःच राजा होण्याचें मनांत आणिलें व त्याप्रमाणें आपल्या धन्याचा खून करून त्यानें आपल्या मार्गांतील एक मोठी धोंड नाहींशी केली. पानिपतच्या तृतीय रणसंग्रामांत मराठ्यांशीं सामना देणारा प्रख्यात " **दुराणी** " तो हाच अहमदशहा अबदाली. अफगाणिस्तानांतल्या अनेक जातींपैकीं "दुराणी" ही एक जात आहे आणि अहमदशहानें काबूलच्या गादीवर बसणाऱ्या याच जातीच्या दुराणी वंशाची स्थापना केली.

अहमदशहा इ. स. १७७३ मध्यें मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा **तिमूर** हा गादीवर आला. वीस वर्षें राज्योपभोग घेऊन हे तेवीस राजपुत्रांचे व सोळा राजकन्यांचे पराक्रमी वडील आणि अकरा राजमातांचे पतिराज पैगंबर-लोकवासी झाले ! अफगाणांना अगोदरच संस्कृति कशी ती माहीत नाहीं. त्यांत महमदाच्या कडव्या शिकवणीची भर, आणि एका राज्यासाठीं अनेक पुत्रांची धडपड ! मग अंदाधुंदी व अंतस्थ यादवी माजण्यास कसला विरोध असणार ? देशाचें भाग्य इतकेंच कीं, तेविसांपैकीं फक्त चारच राज्यपदाकांक्षी होते ! बाकीच्यांनीं आपलें सामर्थ्य ओळखून जास्त गडबड न करण्याचेंच ठरविलें.

**महमूद, झमान, शुजा** आणि **हुमायून** यांचा चौरंगी सामना सुरू झाला. झमान राज्यपदारूढ व्हावा अशी मृत अमिराची इच्छा होती; म्हणून प्रजेनें त्याला सिंहासनावर बसविलें आणि त्याच्या नांवचें नाणेंही पाडिलें. त्याच

वेळीं हुमायुनानेंही आपण अमीर असल्याचें जाहीर केलें. एक व्यापारी उंटांचा तांडा लुटून युद्धसामग्री मिळविल्यावर हुमायुनानें कंदाहार घेण्यासाठीं हल्ला केला. पण त्यांत अपयश येऊन तो झमानचा कैदी बनला !

झमानचें आसन तरी कोठें स्थिर होतें ? " विनाशकाले विपरीतबुद्धिः " म्हणतात त्याप्रमाणें त्याला पेशावरवर हल्ला करून पूर्वीप्रमाणें तो प्रांत आपल्या अंमलाखालीं आणण्याची इच्छा झाली, पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. राजा काबूलमध्यें नाहीं असें पाहतांच महमुदानें हिरात येथें बंडाचें निशाण उभारिलें. झमानशीं लढाया देऊन तो यशस्वी झाला व इ. स. १८०१ मध्यें त्यानें आपण अफगाणिस्तानचे अमीर असल्याचें जाहीर केलें.

झमानचें नशीब फार खडतर होतें. राज्यहानीमुळें त्याला इतका विषाद वाटला नसता, पण अत्यंत अपमानास्पद रीतीनें तो आपल्या प्रतिस्पर्धी बंधूच्या कचाट्यांत सांपडला, आणि राज्यमदानें अंध झालेल्या त्या महमुदानें झमानचे डोळे काढून त्याला अंध केलें व कैदेंत ठेविलें. मोठ्या युक्तिप्रयुक्तीनें बंदिगृहांतून सुटका करून घेतल्यावर झमान हिंदुस्थानांत अंबाल्यास पोहोंचला व ईस्ट इंडिया कंपनीचा दरमहा दीड हजार रुपयांचा पेन्शनर म्हणून राहिला.

महमुदाला तरी स्वास्थ्य कसें मिळणार? शुजानें त्याचा पराभव केला व स्वत: अमीरपद बळकाविलें. " रिक्ता भवंति भरिता भरिताश्च रिक्ताः " अशी दैवलीला चालू असल्यानें महमुदाकडून शुजाचा पराजय झाला. तो इतका कीं, आपल्या अंध बंधूच्या आश्रयाला जाण्याविना त्याला मार्गच उरला नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीनें अंबाल्यास असणाऱ्या या अमिरांची चांगली सोय केली होती. दोघांसाठीं मिळून सालीना पन्नास हजारांची नेमणूक व्यापारी म्हणविणाऱ्या कंपनीनें केली! व्यापारी तागडीचे धागेदोरे कोठपर्यंत जाऊन पोहोंचतात तें पाहण्यासारखें आहे.

महमूद पुनः अधिकारारूढ झाला. पण त्याच्यावर कुरघोडी करण्याची संधी त्याचाच विश्वासू वजीर **फतेखान** पहात होता. फतेखान हा बरकझी घराण्यापैकीं असून भूतकालांत काबूलचें राज्यपद आपल्या घराण्याकडे होतें तें फसवून दुराण्यांनीं घेतलें, अशी त्याची समजूत होती. महत्त्वाकांक्षेचें बीज अशा सुपीक जमिनींत तत्काळ रुजतें. इतकेंच नव्हे, तर तो वृक्ष चांगलाच फोफावतो. सदाचार, सद्वर्तन, पुण्य इत्यादि 'गवतां'कडे मग कोणाचें लक्ष जाणार ?

फतेखानास पावणे दोन डझन मुलगे होते ! या एकवीस पुत्रांत **दोस्त महमद्** हाच काय तो राज्यपदास योग्य होता. फतेखानाची महत्त्वाकांक्षा मनांतल्यामनांत असली तरी त्याचे डाव ओळखण्याइतकी धूर्तता **कामरान** म्हणून महमुदाचा मुलगा होता, त्याच्या अंगीं होती. बापाला सर्व हकीकत सांगून त्यानें आपल्या कुटिल कारस्थानास महमुदाची मान्यता मिळविली. एके दिवशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींची चर्चा करण्याच्या मिषानें फतेखानास आपल्या मुक्कामीं बापाकरवीं बोलावून कामराननें अत्यंत क्रूर प्रकारानें त्याचे डोळे काढिले व नंतर अमानुष रीत्या त्याचा प्राण घेतला !

फतेखानाची अशी आत्यंतिक अवस्था विश्वासघातानें आणि क्रूरपणानें करणाऱ्या बापलेकांविरुद्ध इतर सर्व सरदार उठले. काबुलमध्यें आणि अन्यत्र बंडाळी माजली. महमूद व कामरान पळून हिरातला गेले. दोस्त महमदानें आपल्या पराक्रमानें काबूल हस्तगत केलें. फतेखानाचा ज्येष्ठ मुलगा **अझिमखान** म्हणून होता. त्यानें आपल्या हातांत राहलि असें एक बाहुलें तयार केलें व त्याची अमीरपदावर स्थापना झाली. झमानचा मुलगा अयूब म्हणून होता तोच हा परभृत अमीर. कुलमुकत्यारी अझिमखानानें स्वतःकडेच घेतली. आणि आश्चर्य हें की, त्याच्या इतर बंधूंनींही "दादा"च्या सल्ल्याप्रमाणें चालण्याचें मान्य केलें. म्हणून कांहीं काळपर्यंत अंतस्थ कलहापासून अफगाणिस्तान अलिप्त राहिलें. इ. स. १८२१ मध्यें अझिमखान आजारी पडून कालवश झाल्यावर मात्र तंट्यास प्रारंभ झाला. अझिमचा वडील मुलगा बापाच्या वजीरीच्या पदावर आपला हक्क सांगूं लागला. दोस्त महमदासारखे महत्त्वाकांक्षी आणि कारस्थानी काका आपल्या पुतण्याला अशी भीक कां घालतील ? अझिमखानानें तीन कोट रुपयांची इस्टेट मागें ठेविली होती आणि त्यासाठीं मारामारी झाली तर त्यांत नवल कसचें ? अयूबची तारांबळ उडाली, कारण स्वतः आपलें आसन स्थिर राखावें इतकी कुवत त्याच्यांत नव्हती; म्हणून त्यानें हिंदुस्थानाकडे धूम ठोकली. आणि शेवटपर्यंत पंजाबच्या सिंहाचा–रणजितसिंगाचा–आश्रित म्हणून तो राहिला.

अझिमच्या भावांभावांत इस्टेटीची वांटणी झाली. तेव्हां काबूल व आसपासचा भाग दोस्त महमदाकडे आला ( १८२६ ). अयूब तर पळूनच गेलेला. तेव्हां आलेल्या अमीरपदासाठीं दोस्त महमदास सादर व्हावें लागलें. काबूलचें स्वामित्व त्या वेळीं जरा धोक्याचें होतें. पंजाबच्या सिंहानें एक उडी मारली

असती तर तो काबूलवर शीख राज्य स्थापन करूं शकता. इतकी योग्यता व शक्ति रणजितसिंगाच्या अंगीं खास होती. ईस्ट इंडिया कंपनीचें पेन्शन खाणारा शुजा अद्याप काबूलच्या पदाविषयीं निराश मुळींच झाला नव्हता. महमूद व कामरान हिरातच्या बाजूस होते, त्यांचा डाव काबूलच्या रोखानें चालू असावयाचाच. अशा रीतीनें घेरला गेलेला दोस्त महमद इंग्रजांना भीत नव्हता कीं काय, असा प्रश्न उभा राहिल्यास त्याचें उत्तर अगदीं सोपें आहे. इंग्रजांचा अफगाणाशीं प्रत्यक्ष संबंध हा वेळपावेतों फारसा आला नव्हता. कारण पंजाबच्या बाजूनें शीखराज्य व सिंधकडे सिंधचे अमीर असे मध्यें होते. पण पूर्व तयारी म्हणून अमीर व रणजितसिंग यांच्यांशीं दोस्तीचे तह करून अफगाणिस्तानकडून स्वारी झाल्यास त्या द्वाररक्षकांनीं आपलें काम नीट बजावावें अशी व्यवस्था दूरदृष्टीनें इंग्रजांनीं केली होती. इ. स १८२८ मध्यें महमूद पैगंबरवासी झाला व त्यामुळें हिरातची बाजू निर्धास्त झाली.

आपणांस काबूलचें राज्य मिळावें ही शुजाची इच्छा दोस्त महमद गादीवर आल्यानें जास्तच वाढली. कसें झालें तरी शुजाच्या वंशांत गादी चालत आलेली आणि दोस्त महमद पडला वजिराचा मुलगा. आपल्या डोळ्यांदेखत आपल्या घराण्याची ही अप्रतिष्ठा व त्याजबरोबर आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांची होणारी बडेजावी, साधारण माणसाला सुद्धां पाहवत नाहीं. मग शुजाला विशेष जोर चढला असला तर त्यांत त्याचा दोष नव्हे. परंतु योगायोग म्हणा, किंवा दोस्त महमदाची सद्दी म्हणा, शुजानें रणजितसिंगाकडून सहाय्य मिळवून मोठ्या युक्तीनें केलेला हल्ला काबूलच्या तत्कालीन अमिरानें परतविला. इतकेंच नव्हे, तर शुजाला नामोहरम होऊन परत लुधियान्यास यावें लागलें ( इ. स. १८३३ ).

**९. इंग्रजांचा अफगाणिस्तानशीं संबंध** :—याच प्रसंगानंतर इंग्रजांचा अफगाणिस्तानाशीं निकट संबंध आला, म्हणून थोडेंसें विषयांतर करून मागील गोष्टींची संगति जुळवावयाची आहे. युरोपमध्यें चक्रवर्ति नेपोलियननें आपल्या अतुल पराक्रमाच्या जोरावर इतर राष्ट्रांस कांपावयास लाविलें. त्यामुळें सर्वांनाच त्याची दहशत वाटूं लागली. त्याचीं कारस्थानें कोठपर्यंत पोहोंचलीं आहेत व तो आपले बेत कसे रचितो, हें त्या काळीं कोणास नीट कळलें नाहींच; पण आज त्याचा इतिहास वाचला म्हणजे नेपोलियनच्या

कर्तबगारीबद्दल विशेष कौतुक वाटतें. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं कांहीं फ्रेंच राजकारणी वकील इराणच्या शहाला भेटण्यासाठीं तेहरानला आले, ही गोष्ट कळतांच हिंदुस्थानांतील इंग्रज मुत्सद्यांचें धाबें दणाणलें. ईजिप्तमधील ' मुलुखगिरी ' करून नेपोलियन पुढें हिंदुस्थानाकडे आपला मोर्चा वळविणार; इराणकडून अफगाणिस्तान, तेथून पंजाब असें या बाजूसही लढाईचें तोंड लागणार; इत्यादि शक्य त्या शंका इंग्रजांच्या कारस्थानी डोक्यांत पटकन् आल्या आणि त्याला उपाय म्हणून अफगाणिस्तानमध्यें एक इंग्रज वकील पाठविण्याची व्यवस्था तत्काळ झाली.

इ. स. १८०८ मध्यें **मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन्** हा काबूलला गेला व त्यानें महमूद व वजीर फतेखान यांच्याशीं एक दोस्तीचा तह केला. १७ जून १८०९ रोजीं लॉर्ड मिंटोनें तो मान्य केला. त्यांत एकंदर तीनच कलमें होतीं:—

( १ ) इराण अथवा फ्रान्स यांच्या अफगाणिस्तानावर चढाई करण्याच्या प्रयत्नास अफगाणिस्ताननें यथाशक्ति विरोध करावा.

( २ ) ब्रिटिशांनी हा चढाईचा हल्ला परतविण्यासाठीं अफगाणिस्तानला मदत करावी.

( ३ ) अफगाण व ब्रिटिश राष्ट्रांची दोस्ती आणि ऐक्य कायम राहावीं.

अफगाण राजकारणांत ' दुर्बल राष्ट्रांचें संरक्षण करणाऱ्या ' ब्रिटिश राजकारणाचा चंचुप्रवेश झाला तो असा. या तहांत काय अर्थ आहे पहा! पहिल्या कलमाची आवश्यकता काय ? असा प्रश्न साध्या माणसालाही सुचेल. अफगाणिस्तानाला स्वतःवर हल्ला झाला तर काय करावें हें समजत नव्हतें कीं काय ? दुसऱ्या कलमांत इंग्रज मुत्सद्यांनीं आपणांवर कोणतेंच बंधन स्वीकारलेलें नाहीं. राजकारणांत दोस्ती, मैत्री, ऐक्य, कायम, अव्याहत, प्राचीन इत्यादि शब्दांचा उपयोग किती वेगळ्या अर्थानें पण सढळपणें कारितात याचें हा छोटासा तीन कलमी तह उत्तम उदाहरण आहे.

अफगाण भूमीस इंग्रजांचा किंवा युरोपियनांचा स्पर्श यापूर्वी झालेला होता. पण त्यांत राजकारणाचा संबंध नव्हता. १८ व्या शतकाचे अखेरीस **फॉर्स्टर** या इंग्रजानें हिंदुस्थानांतून युरोपला जाण्याचा खुष्कीचा मार्ग अवलंबिला असल्यानें त्याचा धाडसपूर्ण प्रवास अफगाणिस्तानांतून झाला. इ. स. १८२६ मध्यें **स्टर्लिंग**ची फेरी त्या भागांत कांहीं कालपर्यंत झाली. १८२७ मध्यें **मेसन**

नामक शोधकानें कांहीं प्राचीन अवशेषांकडे लक्ष वेधून अफगाणिस्तानांतील संशोधनाचें कार्य किती महत्त्वाचें आहे याची जगास ओळख करून दिली. बंगाल सिव्हिल सर्व्हिस मधील हे स्टर्लिंग काय हेतूनें तिकडे गेले तें समजत नाहीं. १८२८ मध्यें **फ्रेझर** व नंतरच्या वर्षी डॉ. **हार्लन्** हे प्रवासी त्या प्रदेशांत गेले होते. ख्रिस्ती धर्माचा प्रसार बुखाऱ्यास करण्यासाठीं डॉ. **वुल्फ**ही अफगाणिस्तानामधून गेला होता.*

**सर अलेक्झांडर बर्न्स** व त्यांचा हिंदुस्थानी हस्तक हे बुखाऱ्यास जातांना इ. स. १८३२ मध्यें काबूलमधून गेले. त्यांनीं तेथील परिस्थितीसंबंधीं लिहून ठेवलेली माहिती वाचून अफगाणिस्तानांमधील राजकारणाकडे हिंदुस्थानसरकारचें लक्ष वेधलें गेलें.

२१ फेब्रुवारी १८२८ रोजीं **तुर्कोमांची** येथें रशिया व इराण यांचा एक महत्त्वाचा तह होऊन त्यांची आपसांतील लढाई थांबली. मध्य आशियांतील राजकारणास या तहानें वेगळेंच वळण प्राप्त झालें. आणि न जाणतां हातीं आलेलें अवाढव्य साम्राज्य टिकवावें कसें, अशी पंचाईत पडलेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यवस्थापकांस आपलें परराष्ट्रीय धोरण थोडेंसें बदलण्याची आवश्यकता भासूं लागली. इराणचा डोळा अफगाणिस्तानामधील हिरात शहरावर होताच, आणि इराणी लष्करानें त्या नगरावर हल्ला केला ही गोष्ट दृष्टीआड करून चाललें नसतें. धूर्त व कारस्थानी इंग्रजांना तत्काल संशय आला. तेइरानमधील ब्रिटिश वकिलानें शहास परोपरीनें सांगून हिरातचा वेढा उठविण्याची विनंती केली असतांही त्याचा कांहींच उपयोग होत नाहींसें पाहून हिंदी सैन्य इराणाकडे रवाना करण्यांत आलें. इराण व अफगाणिस्तान अगदीं लागूनच आहे म्हणून इराणांतील घडामोडींचा परिणाम अफगाणिस्तानासंबंधींच्या ब्रिटिश धोरणावर कसा दिसून येई, हेंच आपणांस पहावयाचें आहे.

**१०. ब्रिटिशांचें धोरण बदलण्याचीं कारणें :**—इ. स. १८३६ मध्यें लॉर्ड बेंटिंक बदलून लॉर्ड ऑकलंड गव्हर्नर जनरल झाला. दोस्त महमदानें नव्या अधिकाऱ्याचें अभिनंदन करून शुभचिंतनपर संदेश पाठविला. पंजाबसिंहाच्या गर्जनेनें घाबरलेल्या दोस्त महमदाची पेशावर प्रांत शक्य तर

* Tate : Kingdom of Afghanistan, p. 134.

आपलेकडे मिळविण्यासाठीं व आपलें अमीरपद स्थिर राहण्यास शेजारच्या बलशाली ' फिरंग्यां ' चें सहाय्य आपणास व्हावें अशी अपेक्षा होती. ती ऑकलंडनें ओळखली व " स्वतंत्र देशाच्या अंतर्गत व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्याची मनीषा " नसल्याचें ताबडतोब कळविलें.

इंग्लंडचे परराष्ट्रीय मंत्री त्या वेळीं लॉर्ड पामर्स्टन होते. रशियाचें आशियांतील वाढतें वजन व इराणशीं अफगाणिस्तानांतील पुढाऱ्यांचीं चाललेलीं गुप्त खलबतें यांची माहिती सेंट पीटर्सबर्ग ( हल्लींचें लेनिनग्राड ) मधील इंग्रज वकील पामर्स्टन साहेबांस पाठवीत असे. त्यावरून आणि कदाचित् ' आशियाचा लहान प्रमाणावरील नकाशा वापरल्यानें'§ परराष्ट्रीय मंत्र्यांचा बराच गैरसमज झाला असावा. रशियाच्या भीतीनें पछाडून जाण्याची तादृश आवश्यकता नसतां त्यांनीं आपलें धोरण बदललें व अनवश्यक खर्चाचा बोजा ईस्ट इंडिया कंपनीवर टाकला असेंच बहुतेक इतिहासकारांचें म्हणणें आहे. अंतस्थ अफगाण भानगडींत संबंध नसतां कुरापत काढण्याचा सल्ला ऑकलंडसाहेबांना पामर्स्टन यांच्या गुप्त खलित्यामध्येंच मिळाला :—

" आपल्या हिंदी मुलुखाजवळ असलेल्या अफगाणिस्तानांत रशियाचें
" वर्चस्व वाढतें कीं काय, हें पाहण्यासाठीं अफगाण घडामोडींत विशेष
" बारकाईनें लक्ष घालण्यासाठीं काय उपाय योजावे हें ठरवावें .........
" दोस्त महमदाकडे एक गुप्त वकील राजकीय बाबींची चर्चा करण्या-
" साठीं पाठवावा, किंवा प्रथमतः व्यापारी मिषानेंच त्याला रवाना करावें...
" तें तुम्हींच ठरवावें...तुमच्या सरहद्दीवरील वकिलांकडून अथवा इराणांत
" गेलेल्या मि. मॅक्नीलकडून येणाऱ्या खलित्यावरून अफगाणिस्तानच्या
" कारभारांत केव्हां ढवळाढवळ करावयाची तें पाहून कोणते मार्ग
" स्वीकारावे हें ठरविण्याची जबाबदारी व अधिकार मी आपणांवरच
" सोंपवितों .........इराणचें वर्चस्व अफगाणिस्तानांत वाढूं नये म्हणून
" आणि रशियाचें वजन तेथें पडूं नये, यासाठीं अशी ढवळाढवळ करणें
" निःसंशय आवश्यक आहे. " ‡

---

§ V. Smith : Oxford History of India, p. 467.

‡ Colvin : p. 87. quoted by V. Smith, *op. cit.*

रशियन भीतीचा बागुलबोवा, ढवळाढवळ करण्याची मुभा व हातांत अफगाणिस्तानचे भूतपूर्व अमीर पेन्शनर म्हणून असतांना लॉर्ड ऑकलंडच्या कारस्थानी हस्तकांना स्फुरण कां चढूं नये ? पूर्वी अफगाणिस्तानांतून प्रवास करून आलेल्या बर्न्सलाच इ. स. १८३७ मध्यें काबूलकडे पाठविण्यांत आलें. बरोबर दोन इंग्रज सहाय्यक देऊन केवळ निरीक्षण करून रिपोर्ट करण्याच्या कामावर त्याची नेमणूक केली होती. पण अधिकारातिक्रम करून त्यानें रणजितसिंगाविरुद्ध अमिराला मदत करण्याचीं अभिवचनें दिलीं. इंग्रजांचा व रणजितसिंगाचा मैत्रीचा तह झाला असल्यानें तो मोडण्यास ते नाखूष होते. शिवाय बर्न्सचीं सर्वच मतें कलकत्त्याच्या अधिकाऱ्यांशीं जुळणारीं नव्हतीं. उलट बहुतेक मते अगदीं त्यांच्याविरुद्ध असल्यानें फारच विचित्र प्रसंग इंग्रज मुत्सद्यांवर आला. त्यामुळें बिचाऱ्या बर्न्सला परत बोलाविणें भाग पडलें. कारण त्यानें नसता अधिकार तरी घ्यावा कशाला ? असो. बर्न्सला परत बोलावल्यानंतर इंग्रज, रणजितसिंग व शुजा यांच्यामध्यें मैत्रीचा तह होऊन कंपनीसरकारनें शुजास काबूलच्या गादीवर बसवावें असें ठरलें. पहिल्या अफगाण युद्धाची सुरवात अशा तहानें झाली!

पामर्स्टन आणि ऑकलंडप्रभृति राजकारणपटूंची रशियन वर्चस्वाची भीति रास्त होती कीं नाहीं, हा मोठा वादग्रस्त आणि चर्चेचा प्रश्न आहे. तिजमुळें ईस्ट इंडिया कंपनीचें अफगाणिस्तानविषयींचें धोरण बदलल्यामुळेंच या प्रसंगाचें व तद्विषयक इंग्रजी धोरणांचें आणि कृत्यांचें किंचित् चिकित्सक दृष्टीनें निरीक्षण करणें जरूर आहे.

**११. हिंदुस्थानविषयींची निराधार भीति** :—ईस्ट इंडिया कंपनीची वायव्य सरहद्द त्या वेळीं (इ. स. १८३६-३८) हल्लींच्या आग्रा प्रांतांत होती. पंजाबमध्यें शिखांचें राज्य, राजपुतान्यांतील वाळवंट ओलांडून पलीकडे गेल्यावर भावलपूर व सिंध हीं स्वतंत्र संस्थानें, अफगाणिस्तान व ईस्ट इंडिया कंपनी यांच्यामध्यें असतांना आणि विशेषतः अनुल्लंघ्य असा सिंधूनद मध्यें असतांना अफगाणिस्तानापलीकडे चळवळ करणाऱ्या रशियन अस्वलाची भीति इंग्रजांना कां वाटावी ? या प्रश्नांची उत्तरें दोन संभवतात. एक तर मध्यंतरींचा सर्व प्रांत घशांत घालण्याचें ठरलें असल्यानें अफगाणिस्तान अगदीं नजीक येऊन ठेपणार म्हणून पूर्वतयारी, व दुसरें असें कीं, छोटेखानी पुस्तकी नकाशे नेहमीं जवळ

बाळगल्यानें राशिया हिंदुस्थानाजवळ आला ही चुकीची भावना अंतराचें भान न राहिल्यामुळें दृढ झाली व तीच पुढें परराष्ट्रीय धोरण ठेवणारांच्या मनांत असल्यानें अशी घोडचूक वरिष्ठांच्या हातून घडली. अगदीं साधें व आपल्या परिचयाचें उदाहरण द्यावयाचें तर दक्षिणेंत पुण्यामुंबईकडे राहणाराला काशी, प्रयाग, दिल्ली, लाहोर, कलकत्ता हीं शहरें अगदीं जवळचीं वाटतात. प्रयागला असणारास लाहोर, पेशावर अगदींच समीपचें, अशी त्यांची जी कल्पना होते, ती बव्हंशीं नकाशामुळेंच झालेली असते. असाच कांहींसा प्रकार अफगाण धोरण ठरविण्याच्या बाबतींत झाला असावा असें म्हणतां येतें.

इंग्लंडमधील मंत्र्यांना इकडील प्रदेशाची कल्पना नसावी व अंतराचें आकलन त्यांना करितां आलें नाहीं, हें एक वेळ खरें मानितां येईल. परंतु, ईस्ट इंडिया कंपनीच्या मुख्य अधिकाऱ्यांना या साध्या गोष्टी कशा समजल्या नाहींत? तर याला प्रत्युत्तर असें कीं, सिंध व पंजाब हीं संस्थानें आपल्या अंमलाखालीं आणण्याच्या आशेमुळें अफगाणिस्तानांत नसती लुडबुड करण्याची वरिष्ठांकडून आलेली आज्ञा मानणें, ऑकलंडच्या मनाला जास्त पटणारें व सोईचें होतें असाही एक संभवनीय तर्क निघतो. तें कांहींही असो, ऑकलंडनें अफगाणिस्तानांत नसता चोंबडेपणा करण्याचें ठरविल्यानें हिंदी तिजोरीवर मोठा बोजा पडला, इंग्रज व हिंदी शिपायांचें रक्त विनाकारण सांडलें, हजारों सैनिक निष्कारण मृत्युमुखीं पडले, ब्रिटिशांची अब्रू व इज्जत धुळीस मिळाली, अफगाणिस्तानमध्यें बखेडे माजून रक्तपात, जाळपोळ, लुटालूट झाली...... ! ह्या अनर्थपरंपरेचें वर्णन यथावकाश पुढें येणार आहे, तिचें मूळ ऑकलंडच्या वरील कृत्यांत होतें !

# प्रकरण तिसरें

## पहिलें अँग्लो-अफगाण युध्द

**१२. पहिलें अँग्लो--अफगाण युद्धः**--१ ऑक्टोबर १८३८ रोजीं पहिलें अफगाण युद्ध जाहीर करण्यांत येऊन सैन्याची जमवाजमवही झाली. खैबर घाटांतून सैन्य अफगाणिस्तानांत नेणें सोपें असलें तरी पंजाबच्या सिंहाचें मन दुखवूं नये अशी ऑकलंडची इच्छा होती, म्हणून केट्टयाकडील बोलन घाटानें सैन्य न्यावयाचें ठरलें. दोस्त महमदाचा पाडाव करून शुजाला अमीर करण्याचा इरादा ऑकलंडच्या मनांत होता. हें अफगाण युद्ध हिरातवर इराण्यांचा हल्ला झाल्यामुळें करावें लागलें. पण युद्ध पुकारल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं इराणी फौजेनें हिरातचा वेढा उठविल्याचें कळलें, तरी एकदां पुढें टाकलेलें पाऊल मागें फिरविणें ऑकलंडला अशक्य वाटलें; आणि सैन्याची सारखी प्रगति होऊं लागली.

अल्प श्रमानें कंदाहार घेतल्यावर कामरानला वळविण्यासाठीं एक इंग्रज वकील हिरातकडे गेला. बाकीचें सैन्य काबूलच्या रोखानें कूच करूं लागलें. वाटेंत गझनी येथें मोठी लढाई झाली. तेथील अभेद्य किल्ला बरेच दिवस लढवितां यावा म्हणून दाणावैरणीचा उत्तम बंदोबस्त करून दोस्त महमदानें तो आपल्या मुलाच्या स्वाधीन केला. स्वतः अमीर निराळ्याच युक्तींत गुंतला होता. इंग्रज सेनानायकांनीं कमताकत बाजू बरोबर शोधून काढली व त्याच ठिकाणीं हल्ला करून किल्ला सर केला; आंतील रसद भरपूर होती ती आपल्या सैनिकांत वाटली. अफगाणभूमीवर इंग्रजांनीं केलेलें पहिलें युद्ध तें हेंच आणि त्यांतही इंग्रजांनाच यशःश्रीनें माळ घातली. मग काय विचारतां ? आपल्या युद्धचातुर्याची व शौर्याची ते स्वतःच तारीफ करूं लागले !

खरें पाहिलें असतां अफगाण जनतेच्या स्वाभिमानशून्यतेमुळेंच इंग्रजांना विजयप्राप्ति झाली. इंग्रजांच्या मोठ्या तोफा जवळ नव्हत्या व त्यांची रसद संपत आलेली, असें असतांना गझनीसारखा किल्ला त्यांना लीलया सर करितां यावा हें कोडेंच वाटेल. पण दुराणी लोकांच्या वर्तनानें दोस्त महमदाचे बेत फसले. ह्या टोळींतील योद्धे अगदीं अखेरपर्यंत तटस्थ राहून दोघांचें भांडण पहात होते आणि शेवटी इंग्रजांचें पारडें खालीं जातें असें वाटलें तेव्हां त्यांनीं दोस्त महमदाचा पक्ष सोडला व इंग्रजांस मिळून आपल्या अमिराविरुद्ध ते लढले ! अर्थात् दोस्त महमदास पलायनाखेरीज दुसरा मार्गच नव्हता.

**१३. शुजाचा काबूलप्रवेश** :—मोठ्या उमेदीनें ६२ वर्षांचा म्हातारा **शुजा** काबूलमध्यें इंग्रजी संगिनींच्या जोरावर अमीर म्हणून राहण्यास आला. अडीच-तीन तपांनंतर आपली राजनगरी आपल्या दृष्टीस पडली म्हणून शुजाच्या नेत्रांत आनंदाश्रू उभे राहिले असें म्हणतात. ' सूकर-मांस ' खाणाऱ्या फिरंग्यांचें सहाय्य न घेतां तो काबूल सर करिता, तर अफगाण जनतेनेंही उत्साहानें आणि अभिमानानें त्याचें स्वागत केलें असतें. परंतु इंग्रजी शिपायांच्या गराड्यांत आपला अमीर नगर-प्रवेश करितो हें त्यांना पाहवेना. सरकारी लेखकांनीं शुजाच्या मिरवणुकीचें पुष्कळ वर्णन केलें असलें तरी, सत्यवादी इतिहासकार तिला " प्रेतयात्रा " असेंच म्हणतात आणि अफगाण मनःस्थिति लक्षांत घेतां दुसरी बाजूच खरी दिसते. परावलंबी अधिपति कोणाही मनुष्यास आवडणें शक्य नाहीं—अफगाणांना तर नाहींच नाहीं. मग सूकर-भक्षकांच्या हातीं बाहुलें होऊन राहणारा राजा त्यांना कितपत आवडला असेल हें वाचकांनींच ठरवावें.

इंग्रज सेनानींची ऐट व चैन या काबूलप्राप्तीमुळें वाढली ! त्यांना आपण स्वर्ग मिळविला असें वाटलें—आणि हिंदी कल्पनेप्रमाणें त्या सर्वांना स्वर्ग लाभलाही ! फक्त दोन-तीन वर्षांनंतर ही गोष्ट घडली इतकेंच. शुजाबरोबरच्या इंग्रज वकिलानें काय करावयाचें ठरविलें, तें खालील त्याच्या पत्रांतील उताऱ्यावरून स्पष्ट होईल.

" शुजाला स्वतंत्र राजा मानून तेथील ( काबूलमधील ) अधिकार-सूत्रें
" आपल्या हातीं ठेऊन घेणें इंग्रज वकिलाला शक्य दिसलें. हे साधण्यासाठीं
" त्यानें अंतर्गतव्यवस्था म्हणजे दिवाणी व फौजदारी खटल्यांचे निकाल
" करणें, शेतसारा ठरविणें व वसूल करणें, जमाबंदीचा वाटेल तसा

" विनियोग करूं देणें इत्यादि बाबी सर्वस्वीं शुजाचे हातीं ठेविल्या. मात्र
" परराष्ट्रांशी व इतर स्वतंत्र बंडखोर टोळयांशीं संबंध ठेवण्याचा अधिकार
" तेवढा त्याला नव्हता. "*

" स्वतंत्र " राजाची ही अगदीं नवी व्याख्या आहे कीं नाहीं ? मंडालेस किंवा अन्यत्र 'श्रीकृष्णजन्मस्थानां' त ठेविलेले लोकही याच अर्थानें स्वतंत्र कां मानूं नयेत ? शुजाला इंग्रजांनीं स्वतंत्र राजा म्हटलें काय, किंवा सार्वभौम सत्ताधीश म्हटले काय, रानटी अफगाणांना नव्या अमिराची किंमत तत्काळ कळून आली आणि त्यांच्या मनांत उद्भवलेल्या भावनांचा परिणाम, शुजा व त्याचे संरक्षक इंग्रज या दोघांनाही चांगलाच भोंवला.

युद्धासाठी एकंदर २०,००० फौज नेली होती, त्यांपैकीं १०,००० काबूलमध्यें ठेवणें इष्ट वाटलें, म्हणून उर्वरित सैन्य परत गेलें. मात्र आतां अफगाणिस्तानांत शांतता झाली, प्रजाजन इंग्रजांची वाखाणणी करितात, आपली इज्जत तेथें फार आहे, इत्यादि काल्पनिक समजुतींवर आपापलीं बायकापोरेंही सेनाधिकाऱ्यांनीं काबूलला नेलीं. परंतु शुजाचें बूड स्थिर होईल असा रंग दिसेना. बंडें वरचेवर होत. तीं मोडून अंतर्गत राज्यव्यवस्था सुरळीतपणें मार्गाला लागेपर्यंत आपण तळ येथेंच द्यावा असें इंग्रज अधिकाऱ्यांचें म्हणणें होतें. पण लोक काय म्हणत असत याचें वर्णन पहा:—

" लुटुपुटीचा राजा, लोकांच्या आवडीविरुद्ध आणि परकीयांचें वर्चस्व असलेली राज्यपद्धति, एक परकीय वकील, आणि केवळ इंग्रजी तरवारींच्या जोरावर आपले अप्रिय हुकुम बजावून घेणारी सिंहासनाधिष्ठित व्यक्ति व सर्वत्र महागाई घडवून आणणारी ही मोठी फौज आम्हांला काय करावयाची आहे ?"¶

इंग्रजांचा हल्ला काबूलवर झाला तेव्हां पळून गेलेला दोस्त महमद नोव्हेंबर १८४० मध्यें इंग्रजांच्या आश्रयास गेला आणि त्याला कलकत्यास मोठ्या सरबराईनें ठेविण्यांत आलें होतें. अफगाणिस्तानांतील वातावरण, दोस्त मोकळा राहिल्यास खवळण्याचा संभव फार; म्हणून त्या माजी अमिराला मासिक तनख्याच्या रुपेरी शृंखलेनें हिंदुस्थानांतच बद्ध करून ठेविलें.

* Col. G. M. Malleson: *History of Afghanistan*, (1879), p. 389.

¶ Sir H. M. Durand: *The First Afghan War and Its Causes*, pp. 193–194.

१८४० साल अखेरीस हिशेबाचे आंकडे ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांपुढें विचारासाठीं ठेवले गेले तेव्हां अफगाण युद्धानें किती रुपयांचा चुराडा उडविला हें त्यांना कळून चुकलें आणि तात्काळ इंग्रज सैन्य अफगाणिस्तानांतून परत बोलावण्याचें धोरण स्वीकारण्याचा त्यांचा आग्रह पडला. 'अफगाणिस्तानाशीं आपणाला काय करावयाचें आहे? त्याचें कांहींही होवो' अशी डायरेक्टरांची विचारसरणी होती. परंतु ऑकलंडचें कोठें तसें मत होतें! 'रुसोफोबिया' नें (रशियाच्या भुतानें) पूर्णपणें पछाडल्याप्रमाणें त्यानें आपलेंच घोडें पुढें दामटण्याचा उपक्रम चालविला. याचा परिणाम मात्र फार घातुक झाला.

कोहिस्तानमधील अफगाणांनीं बंडाळी आरंभिली आणि ता. २ नोव्हेंबर १८४१ रोजीं काबूलमध्यें गोंधळ उडाला. कोहिस्तानी बंडखोर राजनगरींत शिरले होते व त्यांनीं बर्न्सचा खून करून तिजोरी लुटली. तिजोरींत सुमारें १,७०,००० पौंड रोख होते! आपल्या प्रजेचा कडवा स्वभाव माहीत असल्यानें शुजानें इंग्रज सैनिकांची कुमक मागितली. परंतु सर्वत्रच घोडचुका होत गेल्या आणि इंग्रजांचा पुरा बींमोड झाला!

"साडेचार हजार योद्धे म्हणजे कांहीं लहानसहान फौज नव्हे. चांगला वाकब, कुशल व धीराचा नायक असता तर बंडखोरांना उडवून देणें अशक्य नव्हतें. पण......इंग्रज सेनानींचा दुबळेपणा अत्यंत हास्यास्पद ठरला. कोणता तरी घोर अपराध केल्यामुळें अंतःकरणें जड व्हावींत असे ते सैनिक वागत; सेनाधिकाऱ्यांचें धैर्य खचलें आहे असें वाटे; इंग्रज सेनेचे उजवे हात दुबळे झाल्याप्रमाणें दिसत आणि ह्यामुळेंच शत्रूंशीं सामना देण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उरलें नाहीं कीं काय अशी शंका येई," * असें त्या वेळच्या परिस्थितीचें वर्णन सर ड्यूरांडनेंच केलें आहे.

**१४. ब्रिटिश सैन्याची कत्तल**:—१८४१च्या नाताळापूर्वी दोनच दिवस म्हणजे २३ डिसेंबर रोजीं इंग्रज वकील **सर मॅकनाकथन** याचा दोस्त महमदाच्या मुलानें कपटानें खून केला व त्याच्या बरोबरीच्या तेरा इसमांच्या वांट्यास तेंच नशीब आलें! अवशिष्ट इंग्रज सेना तत्काळ परत नेल्याविना गत्यंतर नाहीं असें पाहून माघार घेण्याचा हुकूम घेऊन सेनाधिकारी निघाले खरे, पण थंडी, बर्फाचीं वादळें, संपलेली रसद इत्यादि अडचणींमुळें बरेच लोक

* *Ibid*, p. 372.

कामास आले. हिंदुस्थानाकडे जातांना बहुतेक गोऱ्या व हिंदी शिपायांना गिलझी टोळ्यांनी अगदीं चिरून काढिलें ! जखमी झालेले डॉ. ब्रायडेन व ४-५ हिंदी शिपाई इतकीच मंडळी मोठ्या मुष्किलीनें जलालाबादेस पोहोंचली व त्यांनीं झालेल्या दुःखद प्रसंगाचे वर्णन करुणापूर्ण वाणीनें सांगितलें. ( १३ जानेवारी १८४२ ). या कत्तलींत एकंदर किती माणसें दगावलीं हें निश्चित सांगतां येत नाहीं. पण तीं १५ हजारांपेक्षां अधिक होतीं इतकें मात्र खरें ! ४५०० इंग्रज सैन्य व १२००० 'अनुयायी' असे आंकडे स्मिथनें दिले आहेत, तर अन्यत्र ३८४९ सैनिक व १२००० अनुयायी असा उल्लेख आहे.*

इतक्या लोकांचें रक्त खैबरघाटांत अफगाणिस्तानाच्या सरहद्दीवर सांडलें, याचें कारण केवळ ऑकलंडचा अत्याग्रह ! अफगाणांनीं हें जें क्रूर कृत्य केलें त्याला अनेक कारणें घडून आलीं असें स्मिथ म्हणतो.

" बर्न्स व इतर सैनिक यांच्या स्वेच्छाचारामुळें अफगाण चिडले होते. जनरल
" एल्फिन्स्टन हा षंढाप्रमाणें वागला आणि इतर अधिकाऱ्यांनीं अनुपमेय
" मूर्खपणा प्रकट केला. वरिष्ठ अधिकारी भांडले. सर्व सेना नायकरहित झाली
" आणि लढाईचा हुकुम दिला तरी कोणी शस्त्र चालवीना. वरच्या अधि-
" काऱ्यांच्या वेडामुळेंच आलेलें हें संकट थोड्या पण शहाण्या हस्तकांना
" टाळतां येणें शक्य नव्हतें."†

इंग्रज सैन्यानें काबूलहून माघार घेतली तरी जलालाबाद, कंदाहार, कलात–इ–गझनी येथें निरनिराळे सेनानायक आपलें आसन स्थिर करून बसलेच होते. त्यांना बऱ्याच हाल अपेष्टा सोसाव्या लागल्याः परंतु देशाप्रीत्यर्थ प्राणांची आहुति देण्यासाठीं तयार झालेल्या त्या इंग्रज वीरांनीं त्यांची क्षिति बाळगली नाहीं. उलट, इंग्रज सैनिकांचा बिमोड करून व वकिलाला ठार मारून इंग्लिश राष्ट्राचा अपमान केला, त्याचा सूड उगविण्याची भावना त्या ख्रिस्ती शिपायांच्या मनांत जागृत होती.

**१५. ब्रिटिशांच्या अपमानाची भरपाई :—** इकडे १८४२च्या फेब्रुवारी अखेरीस ऑकलंडच्या जागीं एलिनूबरो आले आणि त्यांनीं कंदाहार

* Haydn's Dictionary of Dates, 25th Edition

† V. Smith, *Oxford History of India*, p. 680

येथें जनरल नॉट यांस आणि जलालाबाद येथें जनरल पोलक यांस पत्रें लिहून परत फिरण्याची आज्ञा केली. परंतु "त्या दोन्ही सेनाधिपांस योग्य वाटल्यास गझनी–काबूलमार्गें माघार घ्यावी किंवा दोघांच्या संमतीनें योग्य दिसेल तें करावें"§ अशी सवलत देऊन ठेविली. काबूलमध्यें शुजाचा खून झाला अशी बातमीही याच सुमारास आली. इंग्रज सैन्य परतल्यावर अमिराचें रक्षण कोणी करावें ?

सेनाध्यक्षांवर त्यांच्या वरिष्ठानें विश्वास टाकल्यावर त्यांना हुरूप कां चढूं नये ? इंग्लंडचें गमावलेलें वजन व ब्रिटिशांची मोठी इज्जत अफगाणिस्तानांत पुनः प्रस्थापित करण्यासाठीं, अडकून राहिलेल्या कांहीं इंग्रज प्रजाजनांना सोडविण्याकरितां आणि सुडाची तृष्णा शमविण्याच्या हेतूनें त्या दोनही सेनाधिपतींनीं पुनः एकदां काबूलवर इंग्रजी निशाण फडकविण्याचें ठरविलें आणि तदनुसार नॉट गझनीमार्गें व पोलक जलालाबादेहून निघाला. ता. १५ सप्टेंबर १८४२ मध्यें काबूल पोलकच्या ताब्यांत होतें. गुलाम म्हणून ठिकठिकाणीं विकण्यासाठीं नेलेले इंग्रज प्रजाजन एकत्र केले, त्यांना आपल्या ताब्यांत घेतलें आणि आतां काबूलचा सूड कसा घ्यावा या विचारांत तो होता.

इंग्रजांचें सैन्य काबूलमध्यें हिंडत होतें. त्यांनीं काबूलमधील मोठा बाजार लुटला व जाळूनपोळून उध्वस्त केला ! इंग्लंडची इभ्रत आतां अफगाणिस्तानांत स्थिर झाली असें त्या अधिकाऱ्यांस वाटलें व एलिन्‌बरोच्या नवीन धोरणास मान्यता दर्शविण्यासाठीं म्हणून लगेच त्यांनीं माघार घेतली. मात्र परत येतांना "सोमनाथाचे चंदनी दरवाजे" आणण्यास ते विसरले नाहींत. एलिन्‌बरोनें तीं महाद्वारें आणण्यास वारंवार बजविलें होतें. गझनीच्या महमदानें सोरटी सोमनाथावर स्वारी करून येथील चंदनी दरवाजे अफगाणिस्तानांत नेऊन टाकिले होते. 'हिंदु जनतेच्या अपमानाचें स्मारक होऊन इतके दिवस परदेशांत राहिलेले पण आतां त्यांच्या राष्ट्रीय वैभवाचें अभिमानास्पद प्रदर्शन करणारे' ते दरवाजे मोठ्या डौलानें मिरवीत आणले व फिरोजपूर येथें एक जंगी समारंभ घडवून आणिला. पण गंमत ही कीं, ते दरवाजे चंदनी नसून 'पाइन' लांकडाचे केले आहेत असें तज्ज्ञांनीं सांगण्यापूर्वींच लोकांनीं या प्रकाराची किंमत ओळखली होती. लष्करी खर्च बेसुमार झाला तो केवळ अधिका-

§ V. Smith : *Oxford History of India*, p. 683.

त्यांच्या मूर्खपणामुळें व इभ्रत साफ करण्याच्या हट्टाला पेटल्यामुळेंच. लोकां-कडून पैसा उकळण्यापूर्वी त्यांना कांहीं गोड भुलथापांनीं झुलविलें पाहिजे, अशी राजनीति आहे. म्हणून अफगाण युद्धांत सोरटी सोमनाथाचीं चंदनी दारें परत आणिलीं असें लोकांचें समाधान करण्यासाठीं हा सर्व 'तमाशा' (या हिंदी शब्दाचा अर्थ मराठींतील अर्थापेक्षां भिन्न असला तरी मराठीच अर्थ यथायोग्य तऱ्हेनें लागूं पडतो) साजरा करावा लागला. पुढें त्या द्वारांवर सबक्तगीनाचा अरबी लेख आढळून आल्यानें तर सर्वच मुसळ केरांत गेलें ! पहिल्या अफगाण युद्धाचा शेवट असा झाला !

**१६. युद्धाची इष्टानिष्टता** :—ऑकलंडला अफगाणिस्तानांत लुड-बुड करण्यास संधि कशी मिळाली हें आपण पाहिलेंच आहे. दोस्त महमदानें दोस्तीखातर हस्तांदोलनासाठीं पुढें केलेला हात ऐटीनें झिडकारूनही मग पुन्हां 'स्वतंत्र राष्ट्रांच्या अंतस्थ बाबीं'त पडण्याची पाळी त्यास आलीच ! इराणनें हिरातचा वेढा उठविला होता; इंग्लंड व अफगाणिस्तान यांचा दोस्तीचा तह झाला होता; काबूलचा अमीर परस्पर दोस्तीची भाषा करण्यास उत्सुक; ह्या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून ऑकलंडनें जें वर्तन केलें त्यावरून ऑकलंडची व्हाइरॉयसारख्या बड्या जबाबदारीच्या जागेस अपात्रता व्यक्त होते. त्याला

"सत्य ठरविण्याची अक्कल नव्हती, तो वेड्या व अयोग्य सल्लागारांच्या
"सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार झाला, दुर्बलांना धमकी देण्यासाठीं
"तो सिद्ध झाला; इतकेंच नव्हे तर स्वतःचें एक विचित्र व भ्रामक धोरण
"त्यानें ठरविलें; त्यांतील पोकळपणा कळून आल्यानंतर देखील त्याच
"धोरणानें तो वागूं लागला; त्यानें युद्धनीतीच्या मुख्य तत्त्वांचें उल्लंघन
"केलें; अयोग्य सेनाधिपांच्या हाताखालीं हजारों सैनिक देऊन त्यांच्या
"जिवावर पाणी सोडण्यास तो तयार झाला आणि पार्लमेंटच्या माहिती-
"साठीं निवडक माहितीच पुरविण्याची त्यानें मूक संमति दर्शविली."¶

इत्यादि मत स्मिथनेंच ऑकलंडविषयीं व्यक्त केलें आहे तें सर्वथा समर्थनीय असेंच आहे.

शुजाला गादीवर आणून विशेष लाभ कांहीं होण्यासारखा नव्हता. शिवाय अफगाणिस्तानांत सैन्य पाठवावयाचें तर वाटेंतील कडक हिंवाळा,

¶ V. Smith: *Oxford History of India*, pp. 674–675.

पाण्याचा अभाव, दळणवळणाचीं अपुरीं साधनें यांचा विचार करावयास नको काय ? मागें दर्शविल्याप्रमाणें १८३६-३८ मध्यें पंजाबचें राज्य व सिंधच्या अमिरांची हद्द अफगाणिस्तानास लागून असतां, त्यापलीकडील भागांत विनाकारण कुरापत काढून सैन्य नेण्याची व भलत्याच खर्चानें पोसण्याची जबाबदारी घ्यावी का ? हाच पहिला प्रश्न विचारतां येण्यासारखा आहे. असें धरून चाललों कीं, हिंदुस्थानांतील इंग्रजांची व अफगाणांची हद्द अगदीं जवळ आली, तरी मध्यंतरीं नैसर्गिक हद्द–सिंधू नदाची–आहेच. ती ओलांडणें हें सोपें नाहीं. मग ही फाजील दूरदृष्टीची तजवीज करण्याची आवश्यकता कां भासावी ? या सर्वांचें उत्तर वर दिलेल्या स्मिथच्या उताऱ्यांतच आहे. " विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतविधः " अशीच ही अवस्था झाली. या युद्धाप्रीत्यर्थ खर्च किती झाला याचे आंकडे उपलब्ध नाहींत. माणसांची हानि किती झाली तें वर आलेंच आहे. अफगाणिस्तान म्हटलें, कीं इंग्रजांना सन १८४२ ची आठवण होते व हिंदुस्थानच्या वायव्य सीमेवरील प्रवेशद्वारापुढें घातलेल्या मानवी रक्ताच्या सड्याचा प्रसंग डोळ्यांपुढें उभा राहतो. " आमच्या रक्तसिंचनानें आम्ही अफगाणिस्तानची हद्द रंगवून ठेविली आहे, " असे कित्येक अधिकाऱ्यांचे उद्गार असतात त्याची यथार्थता पटते. इंग्रज राजकर्त्यांच्या हिंदुस्थानांत ज्या कांहीं ढोबळ चुका झाल्या त्यांत या युद्धाचा प्रामुख्यानें समावेश होईल.

---

## प्रकरण चवथें

# पूर्वेतिहास : दुसरें अँग्लो--अफगाण युद्ध

१७. **अमीरपदासाठीं धडपड** :--शुजा शेवटीं आपल्या देश-बंधूंच्या रागाला बळी पडून त्यांच्याच हातून मारला गेला. मग दोस्त महमदास अमीरपद देण्याविना इंग्रजांना दुसरें गत्यंतरच नव्हतें. कारण दोन तीन टोळयांच्या पुढाऱ्यांनीं आपणांस अमीरपद मिळविण्याचा प्रयोग करून पाहिला होता. त्यांत त्यांना यश आलें नाहीं. सिंहासनावर अधिष्ठित होण्यापूर्वी 'शोणित' तुडवीत जावें लागण्याची परंपरा अफगाणिस्तानांतच विशेष श्रद्धेनें पाळली जाते! तेथील मुकुट व राजदंड हे केवळ कंटकमयच असतात असें नव्हे, तर बहुतेक प्रसंगीं रक्तानें माखलेलेही असतात. तेव्हां अफगाण राज्य हें अत्यंत शूर वीरालाच मिळतें व मिळाल्यावर तें टिकविण्याचें काम त्यालाच करावें लागतें. राजासन हें वंशपरंपरेनें चालत नसून "योग्यता असेल त्यानेंच राज्यसूत्रें हातीं घ्यावीं" हा तिकडील प्रांतांचा शिरस्ता आहे.

हिरातचा प्रांत कामरानकडे राहिला तो नंतर **यार महमद** नामक त्याच्या वजिरानें आपणांकडे घेतला. कामरानला ठार करण्यांत (१८४२) वजिराला कांहींच वाटलें नाहीं. यार महमदला आपल्याकडे वळवून घेऊन म्हणजे त्याच्या तोंडाला चांदीचें कुलूप लावून इंग्रजांनीं, हिरात इराणी मोहास बळी न पडेल अशी व्यवस्था केली होती. मेजर टॉडनें यार महमदाशीं तह केला त्याप्रमाणें दरमहा रु. २५००० यार महमदाला मिळत. यार महमद इ. स. १८५१ मध्यें मेल्यानंतर त्याचा मुलगा **सय्यद महमद** गादीवर आला. काबूलमध्यें दोस्त महमद अमीर झाला होता. तरीही हिरात वेगळें राखण्याची

इंग्रजांची खटपट चालू होती. अफगाणिस्तानची देवडी म्हणून हिरातला लष्करी महत्त्व आहे, कारण रशिया किंवा इराणमधून येणारास त्या शहरामधूनच यावें लागतें. अफगाणिस्तानमध्यें इतर परकी वर्चस्व माजूं नये हें हिंदुस्थानांतील इंग्रजी अंमलाच्या दृष्टीनें इष्ट असल्यानें पर्यायानें अफगाणिस्तानचें प्रवेशद्वारच आपण राखावें, अशी मसलत इंग्रज मुत्सद्यांची होती आणि हिरात येथील अमिरास किंवा त्याच्या वजिरास पैसे चारण्याचा हेतुही हाच.

सय्यद महमद हा सुमारें चार वर्षें अमीर म्हणून नांदला असेल नसेल इतक्यांत झमान व शुजा यांच्या नातवानें-महमद युसफनें-त्याला गादीवरून काढून टाकिलें व हिरातची अमीरी बळकाविली. युसफचा कल प्रथमतः इराणी शहाकडे दिसल्यानें इंग्रजांच्या कपाळास आंठ्या चढल्या. इराणी नाणें त्यानें हिरातमध्यें चालू तर केलेंच, पण त्यापुढेंही एक पायरी जाऊन, मशिदींत होणाऱ्या खुदब्यांत–प्रार्थनेंत–इराणी शहाचें नांव घातलें ! याचा अर्थ असा कीं, हिरातचा सत्ताधीश इराणचा शहा. ही परिस्थिती इंग्रजांना इष्ट नसल्यानें काय करावें हा त्यांना पेंच पडला. याच सुमारास इराणी शहाची तेहरानकडून आणि काबूलहून दोस्त महमदची स्वारी होणार अशा कचाट्यांत आपण सांपडलों, अशी युसफची समजूत झाली. तेव्हां त्यानें इंग्रज वकिलाकडे सहाय्याची याचना केली. परंतु लॉर्ड कॅनिंगनें ती फेटाळली.

१८. **दोस्त महमदाचें पुनरागमन**:—हिरात कसेंही करून आपल्या अंमलाखालीं आणण्यासाठीं दोस्त महमद इंग्रजांशीं तह करण्यास सिद्ध झाला पंजाबचे कमिशनर **सर लॉरेन्स** हे व्हाइसरॉयांच्या वतीनें हजर होते व अमीर दोस्त महमद जातीनें **जमरूद्**पर्यंत आला होता. तहावर दोघांच्या सह्या होण्यापूर्वीच म्हणजे १ नोव्हेंबर १८५६ रोजीं इंग्रजांनीं इराणशीं युद्ध पुकारिलें आणि नंतर चार महिन्यांनीं जो तह झाला त्यांत "हिरातमधून इराणी फौज ताबडतोब काढून घेण्यांत यावी" ही मुख्य अट इंग्रजांनीं इराण्यांवर घातली.

दोस्त महमदाशीं झालेल्या तहांत—

१. इराणशीं लढाई चालू आहे तोंपर्यंत अमिरास सालीना १२ लाख रुपयांची खंडणी मिळावी;

२. अमिरानें अफगाण संरक्षणाप्रीत्यर्थ ठराविक सैन्य नेहमीं जय्यत ठेवावें; तें ठेविलें आहे हें पाहण्यासाठीं ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं लक्ष ठेवावें; आणि

३. लष्करी मदतीसाठीं ब्रिटिश तज्ज्ञांस बोलाविलें असतां त्यांनीं अमिरास सर्व प्रकारें सहाय्य द्यावें;

अशा मुख्य अटी होत्या. शिवाय पांच लाख रुपये आणि पांच हजार बंदुका अमिरास नजराणा म्हणून मिळाल्या त्या वेगळ्या !

लढाईची प्रत्यक्ष झळ आपणांस न लागूं देतां पैसा भरपूर देऊन तिसऱ्याकडून सामना लढविणें ही इंग्रजांची युद्धनीति युरोपमधील लढायांच्या वेळींही पहावयास मिळाली आहे. राष्ट्रांतील मनुष्यबळ थोडें असतें आणि इतर अनेक धनोत्पादक उपायांना खंड पडूं नये अशी इच्छा असते तेव्हां असाच परस्पर पाहुण्याकडून विंचू मारवून घ्यावा लागतो. पाहिजे तर त्या पाहुण्यांना आपण जोर द्यावा !

१९. **दोस्त महमदाचा मृत्यु** :--हिरात आपल्या राज्यांत असावें म्हणून इंग्रजांशीं दोस्त महमदानें संधान बांधिलें खरें; पण इंग्रजांचा डाव निराळाच होता. हिरातमधून इराणी फौज निघून गेली होती तरी आपल्याच हस्तकांपैकीं एकाची तेथें स्थापना इराणी शहानें केली. इंग्रज वकील टेलर म्हणून बगदादहून आला, त्यानें या नवीन अधिकाऱ्यास मान्यता दर्शविली. पण त्यामुळें अमिराची आकांक्षा अतृप्त राहिली ! हिरातच्या सरदारानें काबूलच्या अंमलाखालील कांहीं मुलुखांवर स्वारी केल्यामुळें दोस्त महमदालाही हिरातवर हल्ला करणें क्रमप्राप्त झालें आणि तो मोठ्या हौसेनें जातीनें निघाला. दहा महिने वेढा देऊन त्यानें अखेरीस हिरात काबीज केलें खरें. पण कांहीं दिवसांनीं ९ जून १८६३ रोजीं तो मरण पावला.

२०. **अमीर शेरअली** :—दोस्त महमदचीं एक डझन मुलें ( कोणी म्हणतात सोळा ) राज्यपदासाठीं वारस होतीं. परंतु फक्त **शेरअली**, **महमद अफझलखान** व **महमद अझमखान** या तिघांनींच आपला हक्क सांगितला.

शेरअली हा आपल्यामागून गादीवर यावा अशी मृत अमिराची इच्छा होती.* कदाचित् शेरअलीच्या मनांत इंग्रजांविषयीं असलेलें वैमनस्य हेंच राज्यपदाची लायकी दर्शविणारें असावें. कारण अफझलखान हा सर्वांत वडील

* या ठिकाणीं एवढें सांगणें आवश्यक आहे कीं दोन्ही पुत्रांचें वर्णन इंग्रज अधिकारी मेजर ल्यूम्स्डनेकृत " ए मिशन टु कंदाहार " या पुस्तकांतील असल्यानें तें पूर्वग्रहरहित आहे असें मानितां येत नाहीं.

मुलगा आणि अत्यंत शूर असतां " क्रूर व रागीट " अशा शेरअलीस प्राधान्य कां मिळावें ? अफझलखानाची लष्करी आवड आणि उदार वृत्ति प्रशंसनीय होती असें म्हणतात.

शेरअली अमीर असल्याचें इंग्रजांनीं मान्य केलें, कारण दोस्त महमदाशीं झालेल्या ठरावांत शेरअलीसच मान्यता देण्याचें ठरलें होतें. इतर बंधूंचे झगडे व अंतस्थ यादवी यांमुळें शेरअली अमीर होतांक्षणींच त्याला इंग्रजांच्या सहाय्याची जरूरी विशेष भासूं लागली. हिंदुस्थानांत एक वकील पाठवून त्यानें नवा दोस्तीचा तह करण्याची आणि कुमक पाठविण्याची इंग्रजांस विनंति केली. ' माझ्या नंतर माझ्याच मुलाचा वारसा हक्क मानला जावा ' अशी दूरदृष्टीची मागणीही अमिरानें राज्यावर येतांक्षणींच इंग्रजांकडे केली, यावरून त्याची परिस्थिति किती बिकट असली पाहिजे याचें ज्ञान होईल.

**२१. ब्रिटिशांचें धरसोडीचें धोरण :**—ऑकलंडचें अफगाणिस्तानांतलें चुकलेलें धोरण सांभाळून घेण्यासाठीं एलिन्बरो आला आणि त्यानें इंग्रज सैन्यास परत बोलाविलें खरें, परंतु अफगाण परिस्थितीसंबंधीं धरसोडीचें धोरण इंग्रज मुत्सद्यांनीं जाणूनबुजून स्वीकारिलें, कां त्यांच्या तद्देशीय अज्ञानाचें तें फल होय हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. झालेल्या परिणामावरून आणि साधारण परिस्थितीचा विचार केल्यावर आंतरराष्ट्रीय राजकीय संबंधांचा नवशिका विद्यार्थी ही वारी चुकली असें म्हणूं शकेल.

शेरअली आपण होऊन इंग्रजांची मनधरणी करण्यास आला असतां त्याला धुडकावून लावणारें उत्तर कंपनीसरकारकडून गेलें. आपण सध्यां संकटांत आहोंत, इंग्रजांचें सहाय्य असल्यास फार बरें, अशा अपेक्षेनें शेरअलीनें वकील पाठविला, त्यास अगदीं सडेतोडपणानें " पूर्वीचा तह अमलांत आहे, नवा करण्याची आवश्यकता नाहीं " असें उत्तर इंग्रज अधिकाऱ्यांनीं दिलें. शेरअलीची किती बरें निराशा झाली असेल ? शेरअलीच्या पत्रांचीं उत्तरें तरी तावडतोब गेलीं असें मानावें, तर पहिल्याच पत्राचें उत्तर साडेपांच महिन्यांनीं रवाना झालें ! त्या वेळीं टपालाची सोय नव्हती असें धरून चालावें तर शेरअलीच्या विरोधकांकडून इंग्रजांस जाणाऱ्या पत्रांना त्वरित जबाब मिळत असे. कोणत्या तरी विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊन इंग्रजांनीं शेरअली अडचणींत असतांना त्याची उपेक्षा फार केली हें खरें. अफगाणिस्तानच्या या वेळच्या धोरणामुळें

" मास्टर्ली इन्‌ॲक्टिव्हिटी "-कौशल्यपूर्ण शैथिल्य-हा एक नवा मार्ग इंग्रजी राजकारणांत आला.

अशा दिरंगाईमुळें शेरअलीनें रशियाकडे लक्ष दिलें व ' अस्वला 'कडून मदतीची अपेक्षा केली, तर ' सिंहा'नें कां गुरगुरावें ? इकडे, अफजलखानानें अमीरपदप्राप्तीसाठीं शेरअलीशीं सामना दिला व त्या कडाक्याच्या संग्रामानंतर कांहीं काळापुरता दोन्ही भावांचा संधि झाला. परंतु पुढें लवकरच भांडणास पुनः तोंड लागलें. काबूलच्या उत्तरेस असलेल्या अफगाण तुर्कस्तानचा अभिलाष अफझलला होता आणि त्यासाठीं त्यानें खटपट चालविली. शेरअलीपुढें आपल्या बापाचें कांहीं चालेना हें पाहून अफझलपुत्र **अबदुर रहमान** ( भावी नामांकित अमीर-अमानुल्लाचा आजा ) घाबरून बुखाऱ्यास पळून गेला. तेथील खानाकडून सहाय्य आणावें असाही त्याचा बेत होता. बुखाऱ्यास अबदुर रहमानचें आदरपूर्ण स्वागत झालें

२२. **अबदुर रहमानचा पहिला पराक्रम** :—इकडे अफझल शेरअलीचा कचाट्यांत सांपडला आणि त्याचे वांट्यास कारागृहवास आला. बापाची इच्छा पूर्ण करण्यासाठीं अबदुर रहमान बुखाऱ्याहून सैन्य घेऊन निघाला. तो ऑक्सस उतरून अफगाणिस्तानांत आला. शेरअली खोस्त व कुरम बाजूंस अझमखानाचें पारिपत्य करण्यांत गुंतला असतां अफगाण तुर्कस्तानवर अबदुर रहमाननें मालकी स्थापिली आणि नंतर काबूलकडेही त्यानें आपलें लक्ष वळविलें.

शेरअली आपल्या विरोधकांचा पाडाव करीत असतां त्याच्या अनेक पुत्रांपैकीं एक जण एकाएकीं मृत्यु पावल्यानें अमिरास पुत्रवियोगाचा जबरदस्त धक्का बसला. आपला अमीर या दुःखानें वेडा होतो कीं काय अशी भीति अफगाण प्रजेस पडली. कांहीं महिने तर शेरअली घराबाहेर निघाला नाहीं. अमीर असा शोकमग्न आहे असें समजतांच त्याच्या राज्यपदाकांक्षी भावांनीं पुनः उचल खाल्ली. अबदुर रहमान व त्याचा काका अझमखान हे एक झाले आणि त्यांनीं मिळून काबूलवर स्वारी केली. शेरअलीचा ज्येष्ठ मुलगा काबूलचें राज्य सांभाळीत होता, त्याचा पराजय करून काकापुतण्यांनीं काबूल आपल्या ताब्यांत घेतलें. हें समजतांच पुत्रशोक आंवरून शेरअली आपली राजनगरी परत मिळविण्यासाठीं निघाला. वाटेंतच अबदुर रहमाननें आपल्या अमीरकाकाचा पराभव करून त्यास पळावयास लाविलें ( १० मे १८६६ ).

**२३. राणीसरकारचें अफगाणिस्तानासंबंधीं धोरण :—** शेरअली पळून गेला तो कदाचित् इराणी शहाची मदत मागण्यास जाईल, आणि तसें झालें तर युद्ध करणें कठीण पडेल असें जाणून हिंदुस्थानसरकारनें राणीसरकारच्या सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडियास खलिता धाडला, तो असा:—

" अमीर शेरअलीनें इराणशीं संगनमत केल्यास व काबूल येथील सत्ताधारी
" अमीर जर शेरअलीविरुद्ध टिकाव धरण्यासारखा असेल तर आपण
" त्याचीच ( काबुलाधिपतीचीच ) बाजू घ्यावी, असें आमचें मत आहे. त्याला
" आमची मदत थोडीशी खंडणी आणि दारूगोळा व हत्यारें यांचीच होईल. "[1]

याला जें उत्तर आलें त्यापैकीं महत्त्वाचा भागच खालीं दिला आहे:—

गुप्त नं. १५ इंडिया ऑफिस, लंडन, २६-१२-१८६७.

"......आपल्या सरहद्दीवरील शांततेचा भंग होत नाहीं किंवा अफगाणि-
" स्तानच्या स्वातंत्र्यास धोका आणण्याजोगे तह इतर राष्ट्रांशीं होत नाहींत,
" तोंपर्यंत अंतःस्थ यादवींत पडूं नये असें राणीसरकारचें अफगाणिस्तानां-
" तील घोटाळ्यासंबंधींचें धोरण आहे. हें धोरण फार पूर्वींपासूनचें असून
" आजही त्याच दिशेनें जावयाचें आहे. परंतु जर कां दोन्हीं पक्षांपैकीं
" कोणीही परकी सहाय्य घेऊन राष्ट्रीय इच्छेविरुद्ध स्वतः बलशाली होण्याचा
" प्रयत्न करीत आहे अशी आपणांस शंका घेण्यास अवसर मिळाला आणि
" विशेषेंकरून अफगाणिस्तानचा कोणताही भाग परकीयांना देऊन त्यांचें
" सहाय्य मिळविण्याची खटपट होत आहे असें आपणांस दिसून आलें, तर
" त्यांना आपण 'असा मार्ग स्वीकारल्यानें ब्रिटिशांना तुमच्या प्रतिस्पर्ध्यांना
" मदत करण्यास भाग पाडाल' अशी स्पष्ट सूचना देणें योग्य होईल....
" शेरअलीनें इराणचें सहाय्य मिळवून अफगाणिस्तानांत शहाचा कांहीं संबंध
" आणविण्याचें ठरविलें असल्याची आपली खात्री झाली असल्यास काबूल-
" मधील सत्ताधाऱ्यास "खंडणी, दारूगोळा व हत्यारें," देण्याची आपली योजना
" मला मान्य आहे. शेरअलीशीं झालेला तह, असें झालें तर, रद्द होईल.

**लॉर्ड नॉर्थकोट.** "[2]

---

1. Foreign Office despatch from Simla to the Secretary of State for India, London, dated 3rd Sept. 1867.

2. Parliamentary Papers.

**२४. शेरअलीचें पुनरागमनः**––शेरअलीच्या हातून काबूल गेलें ही गोष्ट एका दृष्टीनें इंग्रजांच्या पथ्यावर पडली. अफजलखान काबूलचा अमीर झाला आणि त्याला राणीसरकारनें मानलें. पण कर्मधर्मसंयोग असा कीं, एक वर्षानंतर (१ ऑक्टोबर १८६७) मध्यें तो पैगंबरलोकवासी झाला आणि त्याचा बंधु अझमखान हा काबूलकंदाहारचा अमीर असल्याचें इंग्रजांनीं घोषित केलें. शेरअलीस स्वस्थ कसें बसवेल ? त्यानें व त्याच्या वडील मुलानें दोन दिशांनीं वेगळे प्रयत्न चालविले. हिरातकंदाहारवरील त्यांच्या दोन स्वाऱ्या फसल्या. शेवटीं अमिराच्या थोरल्या पुत्रानें कंदाहार काबीज केल्याची बातमी समजल्यावर त्यानेंही काबूलवर हल्ला केला. आणि ८ सप्टेंबर १८६८ रोजीं मोठ्या विजयानें राजनगरींत प्रवेश केला.

अमीर शेरअली पुनः गादीवर आलेला पहातांच इंग्रजांना थोडेंसें समाधान झाल्यासारखें दिसलें. कारण, कांहीं तरी राज्यकारभाराचें ज्ञान असलेला आणि परशत्रूंशीं स्वतः होऊन तोंड देण्याचें सामर्थ्य अंगीं असणारा असा हा अमीर काबूलवर असणें इंग्रजांच्या पथ्यावर होतें. नाहींतर त्यांनाच अफगाणिस्तान स्वतंत्र कसें राहील ही काळजी सारखी लागून राहिली असती. शेरअली गादीवर येतांक्षणींच त्याला सहा लाख रुपये व ६००० बंदुका इंग्रजांकडून बक्षीस म्हणून आल्या ! एवढें दातृत्व कोणत्या 'अंतरींच्या भिन्न भावा'नें प्रेरित झालें होतें हें इंग्रजी राजनीति माहीत असणाऱ्यास आतां सांगावयास का पाहिजे ?

अबदुर रहमान व अल्प काळ अमीर म्हणून गाजलेला त्याचा चुलता अझमखान, यांनीं मिळून पुन: शेरअलीवर हल्ला केला; पण शेरअलीनें दोघांची अशी तिरपिट उडवून दिली कीं, त्यांना पाठीस पाय लावून पळ काढण्याविना मार्गच उरला नाहीं. इराणच्या रोखानें काकापुतणे पळत असतां वाटेंतच अझमखान चिरकालीन निद्रावश झाला ! ( ६ ऑक्टोबर १८६९ ).

गादीवर येतांच शेरअलीनें इंग्रजांस खलिता लिहून व्हाइसरॉयांची मुलाखत व्हावी अशी आपली उत्कट इच्छा प्रकट केली होती. पण होय नाहीं करण्यांतच बरेच दिवस गेले व शेवटीं अंबाला येथें अर्ल मेयो व अमीर शेरअली यांची भेट झाली. भेटींत काय व्हावयाचें होतें ? तुमच्याशीं आमची दोस्ती राहील असें अभिवचन मिळाल्यावर अमिराला बरें वाटलें. मला अंतस्थ शत्रू उद्भवले तर त्यांची बाजू तुम्ही घेऊं नका असेंही शेरअलीनें इंग्रजांस सांगितलें.

हिंदुस्थानचें संरक्षण करण्याला हा सामर्थ्यवान् द्वारपाल चांगला आहे असें पाहून आणखी सहा लाखांची दाक्षिणा व दोन डोंगरी तोफा इतका नजराणा अमिरास देण्यांत आला. हिंदुस्थानांत पैसे पुष्कळच होते, त्याचा उपयोग तरी कसा करावा ही पंचाईत इंग्रजांना पडलेली. मग परस्पर काम भागविण्यासाठीं त्यांनीं अमिराला ही खैरात वाटली तर त्यांत नवल काय ?

इतर अमिरांच्या पश्चात् गादीबद्दल बखेडे माजत, तर शेरअलीचे दोन मुलगे-याकुब व अयुबखान-बाप जिवंत असतांनाच त्याविरुद्ध कट करूं लागले. हिरातचा भाग तर काबूलस्थ शेरअलीच्या हातांतून जाऊन तेथील अधिकाऱ्यांच्या हातींच राहिला. बापलेकांचें बाह्यात्कारीं तरी सख्य झालेंसें दिसलें. पण गुप्त कारस्थानें चालूंच होतीं.

**२५. रशियन अस्वलानें हातपाय पसरले:**—पूर्व तुर्कस्थानांतील खिवा ही अमिरी रशियाच्या आश्रयांत इ. स. १८७३ मध्यें गेल्यामुळें रशियन सरहद्द अफगाणिस्तानच्या सीमेला अगदीं लागून आली. युरोप व आशिया या दोनही खंडांत उत्तरेकडील भाग व्यापून राहिलेलें रशियन साम्राज्य आपले हातपाय आणखी पसरणार नाहीं अशी कोणाचीच खात्री नसल्यानें व उलट ही पीडा विनाकारण जवळ येत चालली असेंच इंग्रज मुत्सद्यांस वाटत असल्यानें अमिराची चैन झाली हें खरें; पण त्यामुळें आशियांतील राजकारणास नवीन महत्त्व प्राप्त झालें.

रशियाचें मध्य आशियांतलें धोरण चढाईचें होतें हें तर स्पष्टच दिसत होतें, म्हणून इंग्रजांनीं रशियाशीं गुप्त करार करून अफगाणिस्तानची वायव्य सरहद्द निश्चित करून टाकली. या गुप्त करारास " **क्लॅरेंडन्-गॉर्टचकॉफ ॲग्रिमेंट, १८७२-७३** " असें नांव असून त्यायोगानें अफगाणांचा कोणता प्रांत कोणाकडे, त्यावर सत्ता कोणाची इत्यादि आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या बाबी ठरविल्या गेल्या. पण मौज ही कीं, त्यांत अफगाण अमिराचा मुळींच संबंध नव्हता. आपल्या देशाची सीमा ठरविण्याचीं खलबतें या दोन उपटसुंभांनीं चालविलीं आहेत ही बातमीसुद्धां बिचाऱ्या काबूलस्थ अमिरास नव्हती !

**२६. ब्रिटिशांचे अमिराला खूष करण्याचे प्रयत्न :**—अफगाणिस्तानची सरहद्द ठरवून झाल्यावर अमिराला खूष करण्याची खटपट करणें इंग्रजांना भाग पडलें. अस्वल सिंहाकडे पाहून गुरगुरूं लागतांच, एवढा मोठा

वनराज पण तो देखील घाबरला, आणि शेजारच्या फाटक्यातुटक्या प्राण्यांची विनवणी करूं लागला. इ. स. १८७३ मध्यें शेरअलीस हिंदुस्थान सरकारकडून १५००० एनफील्ड् रायफल्स्, ५०० स्नायडर रायफल्स् आणि १०००००० गोळ्या इतकें सामान मिळालें ! शिवाय दहा लाख रुपये कोहाट येथील तिजोरींत ठेवून "पाहिजे तेव्हां घेऊन जा" असें सांगितलें होतें.§ पण या देणगीबरोबरच ब्रिटिश मुत्सद्यांना कांहीं विशिष्ट अटी लादावयाच्या होत्या. शिवाय अमिरालाही कळून चुकलें कीं, रशियानें पुढें सरकवलेल्या प्याद्याचा शह इंग्रजी राज्यास भोंवणारा आहे. त्या कारणानें असो वा अन्य कारणानें असो-अमीर इंग्रजांशीं जरा फटकून राहूं लागला.

**२७. दुसऱ्या अँग्लो-अफगाण युद्धाची प्रस्तावना** :---रशियन अस्वलाचें पाऊल दिवसानुदिवस पुढेंच पडूं लागलें. **बुखारा, खोकंद, समरकंद** इत्यादि ठिकाणच्या खानांचें आपसांत भांडण चाललेलें पाहून रशियानें आपला डाव साधला. आणि १८७६ मध्यें सर्व पूर्व तुर्कस्तान रशियाच्या अंमलाखालीं आलें ! अफगाणिस्तानशीं व इराणशीं रशियन सरहद्द येऊन भिडली ! अर्थात् ब्रिटिशांचें धाबें दणाणलें आणि त्यांस हिंदुस्थान वांचविण्यासाठीं नाना प्रकारच्या युक्त्या योजणें प्राप्त झालें.

इंग्लंडचें व रशियाचें सख्य पूर्वीपासूनच विख्यात आहे. युरोपांतील हीं प्रतिस्पर्धी राष्ट्रें आपले डाव आशियांत येऊन खेळूं लागलीं. इंग्लंड आपणांस वचकून आहे असें कळतांच रशियाला चढाई करण्यास चेव आला. हिंदुस्थानच्या देवडीवर-अफगाणिस्तानच्या अमिराकडे-"चौकशी" करण्यासाठीं रशियन वकील रवाना झाले !

रशियाची तुर्कस्तानांतील प्रगति पाहून इंग्रज मुत्सद्यांची कसली तयारी चालली होती हें कळण्यासाठीं एका पत्रांतील उतारा पुरेसा होईल.

" **गुप्त नं. ३४** इंडिया-ऑफिस, लंडन, १९।११।१८७५.

" **हिंदुस्थानचे व्हाइसरॉय यांस—**

" ......आपलें पहिलें कार्य म्हणजे त्याला ( शेरअलीस ) वळवून घेऊन " आमचा एक तात्पुरता वकील काबूलमध्यें ठेऊन घे असें सांगावयाचें.

---

§ Parliamentary Papers.

" आम्हांस राजकीय कारणासाठीं कायमचा वकील त्याच्या राज्यांत ठेवा-
" वयाचा आहे हें पाहिजे तर उघड करूं नये. कांहीं तरी साध्या क्षुल्लक
" कारणासाठीं आम्ही वकील तिकडे पाठवीत आहों असें वरपांगीं भासविणें
" फायद्याचें होईल आणि असें कारण हुडकून काढणें किंवा नसल्यास
" उपस्थित करणें ही गोष्ट तुम्हांस ( व्हाइसरॉयांस ) अवघड नाहीं. राणी-
" सरकारच्या वतीनें मी आपणांस यासाठीं विनंति करितों कीं, शक्य त्या
" तांतडीनें आपण तिकडे एक वकीलमंडळ रवाना करण्यासाठीं निमित्त
" हुडकून काढावें आणि त्या वकिलाचा योग्य मानमरातब राखण्याचा
" आग्रह अमिरास करावा. वकिलातीचें बाह्य स्वरूप कसें ठेवावयाचें आणि
" संरक्षक सैनिक देणें इष्ट असल्यास ते किती असावेत इत्यादि बाबी
" निश्चित करणें मी तुम्हांवरच (व्हाइसरॉयांवर ) सोंपवितों....*

**—सॅलिस्बरी.** "

अफगाणांचा परकीयांशीं विरोध लक्षांत घेऊन आणि इ. स. १८४१ ची स्मृति ताजी असल्यानें हिंदुस्थानसरकार वरचेवर लंडनला लिहून कळवी कीं, सध्यांच्या परिस्थितींत वकील पाठाविणें इष्ट नाहीं. आपल्या तर्फेचा एक हिंदी अधिकारी तेथें ठेविला आहे. तो सर्व हकीकत वेळोवेळीं कळवीत आहे. पण विलायत सरकारचें मत निराळेंच होतें. आपणांस ज्या हेतूनें पाहणी करावयास पाहिजे किंवा ज्या प्रकारची माहिती यावयास पाहिजे ती येत नसल्याने एक तरी इंग्रज वकील काबुलीं राहणें अत्यावश्यक आहे असें टुमणें स्टेट सेक्रेटरींनीं व्हाइसरॉयांच्या मागें लाविलें व त्यासंबंधींचें उद्धृत केलेलें पत्र वर दिलें आहेच. बाह्यात्कारीं अफगाण स्वातंत्र्याच्या आणि आपल्या तटस्थ वृत्तीच्या कितीही बढाया मारिल्या तरी, वरील पत्रांत इंग्रज राजनीतीचें खरें स्वरूप, वरचा पडदा नाहींसा झाल्यानें स्पष्ट दिसत आहे.

**२८. वकीलमंडळाची रवानगी :—** हिंदुस्थानसरकारनें वरिष्ठ सरकारच्या आज्ञेनुसार एक वकील-मंडळ तयार करून तें काबूलकडे रवाना करण्याची सिद्धता केली. **सर नेव्हिल चेंबर्लेन** हा मुख्य वकील नेमून त्याच्या इतमामास साजेल असाच सरंजाम बरोबर दिला गेला. वकिलाची सरबराई नीट

---

* Parliamentary Papers.

ठेवण्यास अमिरास पत्रें जात, पण अमिराची किंमत आतां चढूं लागली. रशियाचें पुढें पाऊल पाहून त्याच्या मनांत वेगळीच आकांक्षा आली आणि इंग्रज वकिलाची इकडे सुरक्षितता राहणार नाहीं, सबब कोणासच पाठवूं नये अशा प्रकारचीं टाळाटाळीचीं उत्तरें त्याजकडून आलीं. तो गरजू होता तेव्हां त्याच्या पत्रास सरळ उत्तरेंही इंग्रजांकडून गेलीं नाहींत. तेव्हां तो इंग्रजांशीं फटकून वागला तर तो दोष कोणाचा ?

नं. १३।१८७७ ची गुप्त तार अशी आहेः—

"हिंदुस्थानसरकारच्या परकीय खात्याकडून
मार्क्विस ऑफ सॅलिस्बरी, स्टेट सेक्रेटरी, लंडन, यांस,
सिमला, १० मे १८७७.

"अंबाल्यास झालेल्या मुलाखतीनंतर व्हाइसरॉयांनीं अमिरास १,००,०००
"पौंड * (११,५०,००० रु.) आणि २०,००० रायफल्स बक्षीस दिल्या."

दुसरी एक तार आहे तीः—

"......आतांपर्यंत अमिरास ब्रिटिशसरकाराकडून एकंदर १२ तोफा,
"२१,४०० रायफल्स्, ११,००० मस्केटस्, १,२०० कार्बाईन्स, १,०००
"पिस्तुलें, २,५०,००० पौंड रोख म्हणजे २८,७५,००० रुपये, इतका
"ऐवज पोहोंचला आहे."

बंदुका व हत्यारें इंग्लंडमध्यें तयार होत असलीं तरी, त्यांची किंमत हिंदी तिजोरींतूनच गेलेली आहे हें विसरून चालणार नाहीं. अफगाणिस्तानचा व हिंदुस्थानचा ऋणानुबंध काय असेल तो असो, इ. स. च्या दहाव्या अकराव्या शतकापासून तों न्यायी इंग्रजी अमदानाच्या आरंभापर्यंत तिकडील लुटारूंची धाड हिंदुस्थानावर येत असे. ती लूट इंग्रजी रियासतीपासून थांबली असें पुस्तकी समाधान असले तरी अन्य मार्गांनीं अफगाणिस्तानांत सालीना लाखों रुपये ओतले जात आहेतच ! त्याचा तादृश फायदा हिंदुस्थानला काय झाला ? या खर्चाची बचत करणें शक्य होतें कीं नाहीं ? या विभागाच्या शेवटीं या प्रश्नांचा जास्त ऊहापोह करावयाचा आहे, तेव्हांच त्यांचीं यथामति उत्तरें दिलीं जातील.

---

* इ. स. १८७५ ते १८८० च्या दरम्यान रुपयाचा दर २२·२२१ ते १९·९६१ पेन्स असल्यानें सरासरी काढून ढोबळमानाच्या हिशेबानें वरील आंकडा दिला आहे.

**२९ ब्रिटिशसिंहाचा उपमर्द :—** वर सांगितल्याप्रमाणें एक मोठा पिंड अमीर शेरअलीस देऊन " आमच्या वकिलाचें स्वागत करा " अशी हुकुमवजा विनंति व्हाइसरॉयांनीं केली आणि २५० रक्षकांनिशीं नेव्हिल चेंबर्लेन यांस रवाना केलें. परंतु अफगाण हद्दींत **अली मस्जिद** येथें अफगाण अधिकाऱ्यांनीं त्या वकीलमंडळास प्रवेश देण्याचें नाकारलें. ब्रिटिश सिंहाचा हा उपमर्द झाला अशा हकाटीनें कारवाई सुरू झाली.

यावर व्हाइसरॉयांनीं स्टेट सेक्रेटरीस छोटीशीच तार केली:—

" अमिरानें जबाब दिला नाहीं. शिष्टमंडळ मोडून टाकिलें. "

२६ सप्टेंबर १८७७.

इकडे हिंदुस्थानसरकारच्या काबूलमधील प्रतिनिधीनें बातमी दिली कीं, रशियन वकिलाचा मोठ्या मानानें काबूलमध्यें अमिरानें सत्कार केला! आधींच ब्रिटिशांचा उपमर्द झालेला; त्यांत त्यांच्या प्रतिस्पर्ध्यास मिळालेला मान पाहून "क्षते क्षार" टाकिल्याप्रमाणें व्हाइसरॉयांना वाटलें व त्यांनीं लागलीच एक मोठा निर्वाणीचा खलिता अमिरास लिहून पाठविला. उत्तर २० नोव्हेंबर १८७८ च्या आंत आलें नाहीं तर आम्हांस तुमच्याविरुद्ध युद्ध पुकारण्यास भाग पाडाल अशी वाकिली धमकीही दिली.*

**३०. शेरअलीचा स्पष्ट खुलासा :—** शेरअलीनें व्हाइसरॉयांच्या खलित्यास दिलेलें उत्तर मुत्सद्देगिरीचें आहे. ता. १९ सप्टेंबर १८७८ रोजीं त्यानें तें लिहिलें.

" ब्रिटिशसरकारची सदिच्छा आणि ब्रिटिश वकिलाचे स्नेहपूर्ण हेतु
" ह्यांसंबंधीं आपण आपल्या पत्राच्या आरंभीं जो निर्देश केला आहे त्या-

* या ठिकाणीं तारखांचा किंचित् घोटाळा उडालेला दिसतो. इंग्रज मिशन मोडलें, तें २१ सप्टेंबर १८७८ या दिवशीं असें " टेट " नामक इंग्रज लेखक म्हणतो. (पृ. १७४); तर पार्लमेंटरी पेपर्समध्यें २६ सप्टेंबर १८७७ ची वर उद्धृत केलेली तार आहे. त्यामुळें रशियन वकील भेटण्यापूर्वी इंग्रज वकील निघाले कां मागाहून तें नक्की कळत नाहीं. तसेंच "टेट" च्या म्हणण्याप्रमाणें अफगाणिस्तानांत राशियन वकिलांचें ११ ऑगस्ट १८७८ रोजीं जाहीर स्वागत करण्यांत आलें, तर पार्लमेंटरी पेपर्सप्रमाणें आमिरानें २६ जुलै १८७८ रोजी दरबार भरवून त्यांचें स्वागत केलें असें आहे. याचा निर्णय लागणें मुष्कील असलें तरी या बाबी इतक्या महत्त्वाच्या नाहींत.)

" विषयीं मला इतकेंच लिहावयाचें आहे कीं, सदिच्छा केवळ शाब्दिकच
" असेल तर तिजवर कितपत विश्वास ठेवावा, हें आपणच ठरवावें. कारण
" आपली विद्वत्ता आणि न्यायप्रियता हीं जगभर मानिलीं जात आहेत.
" जर सदिच्छा ही कृतींतच असते असें मानलें, तर ब्रिटिशसरकारकडून
" गेल्या कांहीं वर्षांत आमच्या " ईश्वरदत्त " सरकारी ( अमीर अफगाण
" सरकारचा उल्लेख नेहमीं God-granted government असाच करीत
" असल्याचें दिसतें ) अधिकाऱ्यांपुढें ज्या विविध इच्छा प्रदर्शित करण्यांत
" आल्या किंवा ज्या योजना त्यांच्यापुढें मांडण्यांत आल्या, त्यांत तरी ती
" सदिच्छा प्रकट झालेली नाहीं. आणि त्या योजनाच मुळीं अशा होत्या
" कीं त्या स्वीकारणें हें अशक्य होतें !

" आतां मी ब्रिटिश वकिलास भेट देण्याचें नाकारलें त्यासंबंधीं खुलासा
" असा......ब्रिटिश वकिलांना परत फिरविण्यामध्यें आमचे " ईश्वरदत्त"
" सरकारी अधिकारी कोणत्याही वैमनस्याच्या भावनेनें प्रेरित झाले
" नव्हते असें मी खात्रीनें म्हणतों. कोणत्याही प्रकारचा अपमान करावा
" अशीही त्यांची इच्छा नव्हती. परंतु आमच्या सरकारच्या स्वातंत्र्यावर
" ब्रिटिश वकिलाच्या आगमनानें घाला येईल असें त्यांना वाटलें आणि
" आज कित्येक वर्षे नांदत असलेल्या या शेजारच्या दोस्त राष्ट्रांतील स्नेहांत
" बिघाड येईल अशी भीति त्यांना वाटली.

" स्नेही राष्ट्रांच्या शिरस्त्यानुसार केवळ मैत्रीखातर आणि तात्पुरत्या
" स्वरूपाचें एकादें वकीलमंडळ-फार तर २० ते ३० संरक्षकांसह-पाठविण्याची
" ब्रिटिशसरकारची इच्छा असेल ( " रशियन वकिलाबरोबर इतकेच संरक्षक
" होते " ) तर हा " पैगंबराचा बंदा " ( अमीर स्वतःस किती नम्रपणानें
" संबोधितो तें पहा) त्यांच्या प्रगतीस विरोध करणार नाहीं. " ‡

**३१. दुसरें अँग्लो-अफगाण युद्ध :—** वेड्या अमिरानें देखील ब्रिटिशांचे डावपेंच ओळखून त्यांना खरमरीत उत्तर द्यावें ही एकच गोष्ट इंग्रजांच्या राजकारणाचें स्वरूप अफगाणांना किती नीटपणें कळलें होतें हें दर्शविण्यास पुरी आहे. इंग्रजांचा कावा ओळखणें, त्यांच्या शाब्दिक मोहजालास न

‡ Parliamentary Papers.

भुलणें आणि धमकावणीस भीक न घालणें इत्यादि मुत्सद्देगिरीचीं कामें शेरअलीनें फारच चातुर्यानें केलीं. त्यानें आपल्यापरीनें योग्य व समर्पक उत्तर इंग्रजांना तत्काळ दिलें खरें, पण निमित्ताला टेकलेले राजकारणपटु अधिकारी अपमानानें विशेषच चिडले होते. ब्रिटिश सरकारचा अपमान आणि त्याच वेळीं रशियाचा सन्मान या दोन बाबींमुळेंच व्हाइसरॉयांना दुसरें अफगाण युद्ध पुकारणें प्राप्त झालें. २० नोव्हेंबर १८७८ ला अपेक्षेप्रमाणें अमिराकडून उत्तर आलें नाहीं या सबबीवर इंग्रजांनीं २१ रोजीं युद्ध पुकारिलें आणि बोलनघाटांतून कंदाहारवर, कुरम दरींतून मध्यभागीं व गझनीकडे, आणि खैबर घाटांतून काबूलवर असा त्यांनीं तिहेरी हल्ला एकदम चढविला.

ब्रिटिशांचा चोहोंकडे जयच होत गेला. रशियन वकिलातींतील कांहीं मंडळी तेथें होती त्यांच्या बरोबर अमीर शेरअलीनें ता. १० डिसेंबर १८७८ रोजीं पलायन केलें. त्यानें जातां जातां व्हाइसरॉयास दम भरणारें एक पत्र खरडून टाकलें. त्याचा आशय असाः—

"सेंट पीटर्सबर्ग येथें जाऊन मी युरोपमधील सर्व राष्ट्रांपुढें तुमच्यामाझ्यांत झालेल्या व्यवहारांचें सर्व पुराण सांगणार आहें."

आपल्या शत्रूपुढें आपली नाचक्की होऊं नये आणि युरोपांत असलेला आपला दबदबा कमी होऊं नये या साठीं तरी इंग्रज सरकार नमतें घेईल व आपलें धोरण बदलील अशी आशा शेरअलीस होती. पण एकदां निढावल्यावर मग अशा शापांची भीति कोण बाळगणार ?

इंग्रज सेनेचा पराक्रम अफगाणिस्तानांत चालू होताच. जानेवारी १८७९ च्या अखेरीस बहुतेक अफगाण प्रदेश त्यांच्या अंमलाखालीं आला. या गौरवाचें योग्य पारितोषिक त्यांना लवकरच मिळावें अशी योजना विधात्यानें अगोदरच करून ठेविलेली दिसली.

**३२. काबूलची पूर्ण सत्ता ब्रिटिशांकडे आली :**—अमीर-पदाला कोणी नामधारी वारस मिळवावा या हेतूनें इंग्रजांनीं शेरअलीच्या याकूब-खान नामक पुत्राशीं बोलणें सुरू केलें. इतक्यांत २१ फेब्रुवारी १८७९ रोजीं शेरअली मझार-इ-शरीफ येथें निवर्तल्याचें वर्तमान आल्यानें त्या बोलण्यास विशेष महत्त्व आलें. याकूबखानाशीं "गंडमकचा तह" ता. २६ मे १८७९ रोजीं करण्यांत आला. यायोगें इंग्रजांना अमिरास सालीना ६०,००० पौंडाची

खंडणी द्यावी लागली. त्याचा मोबदला म्हणून कुरम, पिशीन व सिबी हे तीन जिल्हे, खैबर घाट व मिचनी कंदा यांवर स्वामित्व आणि हिंदुस्थान व अफगाणिस्तानमधील रानटी लोकांच्या मुलुखांवर अधिकार, इतक्या सवलती इंग्रजांना मिळाल्या.‡

प्रामाणिकपणाचें प्रदर्शन करण्यासाठी ब्रिटिशांनीं एक कलम असें घातलें कीं, उपरोक्त तीन जिल्ह्यांच्या कारभारांत खर्चवेंच वजा जातां उरेल तें द्रव्य अमिराला दिलें जाईल. अगोदरच सरहद्दीवरील मुलुख, डोंगराळ प्रदेश, लष्करी फाजील खर्चाची नेहमीं संवय लागलेली, अशा जिल्ह्यांच्या इंग्रजी कारभारांत का कधीं बचत होते ?

गंडमक येथें झालेल्या तहांतील चवथ्या कलमानुसार काबूल येथें एक ब्रिटिश वकील रहावा असें ठरलें होतें. **सर लुई कावेगनारी** या सद्गृहस्थांची त्या जागेवर नेमणूक झाल्यावर सिमल्याहून जुलै १८७९ च्या पहिल्या आठवड्यांत निघून सुमार २० दिवसांनीं ते काबूलास पोहोंचले. अमिराच्या राजवाड्याजवळच त्यांची राहण्याची सोय करण्यांत आली होती. पण थोड्याच दिवसांत आपणांवर काय आपत्ति कोसळणार आहे याची जाणीव त्यांनाच काय पण इतर कोणालाहीं नव्हती.

**३३. ब्रिटिश वकिलातीचा पुरा बीमोड :**—आपल्या राजनगरींत "फिरंगी"–डुकर खाणारे फिरंगी–येऊन राहतात हें अफगाणांना मुळींच मान्य झालें नाहीं. त्यांच्या मनांतून १८४१ मधील फिरंग्यांची कत्तल गेली नव्हती. १८७९ सालींही १८४३ च्या प्रसंगाची पुनरावृत्ति कां करूं नये ! आपल्या राजधानीस विटाळणारे हे फिरंगी आपणांस पाहिजेत तरी कशाला ! त्यांच्या सैन्यामुळें येथें महागाई होते ना ? मग काय उपाय ? उपाय ना ! अगदींच साधा ! त्या क्रुद्ध अफगाणांनी ब्रिटिश रेसिडेन्सीस वेढा दिला आणि तेथील एकूण एक मनुष्य चिरून काढिला ( ३ सप्टेंबर १८७९ ).

या कृत्यांत याकुबखानचें अंग असावें. कारण हिराती सैनिक त्यानें काबुलांत आणिले होते. त्यांनींच हा क्रूर पराक्रम पार पाडिला असें म्हणतात. इतकेंच नव्हे तर, जलालाबादेस असणाऱ्या इंग्रज फौजेवरही याकुबखान चालून

‡ Treaties, Engagements & Sanads, Vol. XI.

गेला. पण त्याचा पराभव झाला. नंतर इंग्रज सेनापतींनी काबूल पुनः काबीज केल्यावर आपण "राजसंन्यास" करणार असल्याचें याकुबखानानें त्यांस कळविलें. अशा थापांनीं इंग्रजांचें आपणांवरील लक्ष कमी करून पूर्व तुर्कस्थानांत पळून जाण्याचा त्याचा विचार होता. पण इंग्रजांनीं त्याला नजरकैदेंतच ठेविलें. नंतर त्याच्या सर्व कुटुंबियांसह त्यास हिंदुस्थानकडे रवाना करण्याचा हुकूम आल्यानें त्याप्रमाणें तो ३० ऑक्टोबर रोजीं पेशावरमार्गे रवाना झाला.

**३४. इंग्रज सेनांनींनीं सूड उगवला :—** इंग्रजांच्या वाढत्या सत्ते-विरुद्ध हें उघड उघड बंडच झालें. पण त्यावेळीं अफगाणांची आपसांतील वैमनस्यें, पुढारीपदासाठीं कोणाही योग्य माणसाचा अभाव व इंग्रजांचा दरारा यांमुळें तें बंड विशेष फलदायी झालें नाहीं. आतां काबूल सोडून जावें असें इंग्रजी अधि-काऱ्यांना वाटेना. शेरअलीनें इंग्रजाच्या केलेल्या हेतुपुरस्सर अपमानाचा सूड उगविण्याची हीच संधि आहे असें त्यांच्या मनांत आलें व त्याप्रमाणें 'खुनास खून' करून त्यांनीं आपल्या मनाचें समाधान केलें. ज. रॉबर्ट्सनें काबूल काबीज केल्यानंतर ९२ अफगाणांना इंग्रज वकिलाची व त्याच्या अनुयायांची कत्तल केल्याच्या आरोपावरून फांशीं दिलें. १८४१ व १८७९ अशा दोन वेळां इंग्रज वकिलांच्या कत्तली केल्यामुळें इंग्लंडचा दरारा आणि इभ्रत अफगाणांच्या दृष्टीनें कमी झाली होती. तिची सव्याज भरपाई करण्यासाठीं सर्व अफगाणिस्तान जिंकून पादाक्रांत करावें असा विचार त्यांच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. वास्त-विक पाहतां अफगाणिस्तानचे धनी आतां इंग्रजच झाले होते. परतु अफगाण-नागरिकांवर सत्ता चालविणाऱ्या इंग्रजांचा द्वेष करण्याची वृत्ति स्थानिक जनतेंत मुळींच कमी झाली नसून उलट ती वाढली होती. म्हणून दुसऱ्याच्या घरांत फार दिवस राहणेंही योग्य व इष्ट नव्हतें. कारण मधूनमधून स्वतंत्र टोळ्या आपलाच एक अमीर उभा करून बंड पुकारीत आणि इंग्रजांशीं सामना देत. संघटित असा कोणताच प्रयत्न नसल्यानें सर्व प्रयत्न अर्थात्च विफल होत.

**३५. अबदुर रहमान अमीर होतो :—** अशाच एका प्रयत्नांपैकीं १८८० मध्यें अबदुर रहमाननें केलेला प्रयत्न होता. रशियन तुर्कस्थानांतून बरीचशी फौज घेऊन तो अफगाणिस्तानांत आला आणि येतां येतांच हिंदुकुश पर्वताच्या उत्तरेकडील भागांवर त्यानें आपलें स्वामित्व स्थापित केलें. ही बातमी कळतांच इतर लहानसहान बंडखोरांनीं—स्वातंत्र्येच्छूंनीं—त्यालाच सहाय्य दिलें

आणि तो लोकप्रिय होऊन अमीर होणार अशीं चिन्हें दिसतांच इंग्रजांनीं त्याला हातीं धरण्याचें ठरविलें व त्या धोरणानें कारवाई सुरू झाली. कलकत्त्याहून व्हाइसरॉयांनीं इंडिया ऑफिसची संमति मिळविल्यानंतर "तुला काबूलचा अमीर करितों--आमच्या अटी मान्य कर" अशा आशयाचें निश्चयात्मक पत्र अबदुर रहमान यास गेलें.

कंदाहार इंग्रजांच्या ताब्यांत होतें तें सोडण्यास त्यांची तयारी नव्हती आणि हिरात अयुबखानाकडे होतें तें जिंकण्यास अमीर स्वतंत्रपणें मुखत्यार होता. त्यास इंग्रजांची हरकत नव्हती. विनाकारण फार ताणून धरण्यांत अर्थ नाहीं असें पाहून अबदुर रहमाननें सर्व अटी मान्य केल्यावर २२ जुलै १८८० मध्यें काबूल येथें मोठा दरबार भरवून अबदुर रहमान हा काबूलचा अमीर असल्याचें घोषित करण्यांत आलें. जुलै अखेर व ऑगस्टच्या पहिल्या दिवशीं काबूलपासून सोळा मैलांवर झिम्मा येथें एक बैठक झाली, त्या वेळीं कोणत्याही प्रकारच्या तहाचीं बंधनें अमिरावर न घालतां ब्रिटिशसरकारचे "हेतु व इच्छा" अमिरास कळविण्यांत आल्या. आपसांतील समजुती होत्या त्या ह्याः--

१. हिंदुस्थानसरकारला आवश्यक वाटेल तितका दारुगोळा व हत्यारें आणि द्रव्य अमिरास दिलें जाईल.

२. काबूल व आसपासचीं छोटीं संस्थानें यांचा तो अमीर मानिला जाईल.

३. हिरात जिंकून आपल्या अंमलाखालीं आणण्याची अमिरानें पाहिजे ती खटपट करावी, परंतु कंदाहारचे बाबतींत मात्र मुळींच हालचाल करूं नये.

४. पिशिंन, सिबी आणि कुरम हे जिल्हे अतःपर अफगाणिस्तानच्या मालकीचे नसून ब्रिटिशांचे आहेत असें समजावें.

५. खैबर घाट व मिचनी कंदा यांवर आणि तत्संबंधी रानटी टोळ्यांवर ताबा ब्रिटिशांचा राहील.

६. काबूलचे परराष्ट्रीय संबंध हिंदुस्थानसरकारच्या मान्यतेनुसार चालविले जावेत. ‡

हा तह नव्हे--पण इच्छा, हेतु--समजुती, वाटेल तें नांव त्याला द्या. पहिल्या कलमानें अमिरास आमिष दाखविलें पण आपणांवर कोणतेंही बंधन लादून घेतलें नाहीं. दुसऱ्या व तिसऱ्यांत अमिराचें कार्यक्षेत्र निश्चित केलें आहे.

‡ Treaties, Engagements & Sanads, Vol. XI.

हेरात पाहिजे तर जिंकावें–पण कंदाहारला हात लावूं नये, असें कां? तर
कंदाहार आपणांकडे रहावें अशी हिंदुस्थानसरकारची उत्कट इच्छा होती; उलट
हेरात काबीज करण्यांत आपल्या पदरचे पैसे खर्च होत नसल्यानें तें जिंकण्यास
' परवानगी ' कां देऊं नये? कांहीं अफगाण सरदारांच्याच ताब्यांत तें वायव्य
सीमानगर असल्यानें अमिरानें त्यांना जिंकलें तर परस्पर काम भागलें. पिशिन,
सिबी व कुरम पूर्वीच घशांत पडले होते ( पृ.४० पहा ). फक्त उदक सुटावयाचेंच
राहिलें होतें तें चौथ्या कलमानें सोडून घेतलें. पिशिन, सिबी हे बलुचिस्तान-
मधील भाग असून यांतच क्वेट्याचा समावेश होतो. थळ आणि पाराचिनार हा
जो हिंदुस्थानांतून काबूलकडे जाण्याचा मार्ग आहे तो कुरमविभागांत असल्यानें
तो हातीं येणें आवश्यक होऊन बसलें खैबर व मिचनी हे तर पेशावरहून
काबूलचे राजमार्गच. त्यांचें महत्त्व सांगावयास कशाला पाहिजे? रानटी टोळ्यां-
वरचा ताबा आपणांकडे असावा असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, कोणत्याही
निमित्तानें काबूलच्या अमिराचें व त्यांचें मेतकूट जमूं नये. वेळप्रसंग पडल्यास
आपणांसच त्यांना उठवितां यावें! हा हेतु किती युक्तीनें पार पाडला हें पुढें
यथावकाश कळेलच. पण ज्ञानोबाची मेख आहे ती सहाव्या कलमांत. आमची
संमति घेऊन काय करावयाचें तें करा–बाकी तुम्ही स्वतंत्र. अशा प्रकारची
समजूत मान्य करून अबदुर रहमान काबूलचा अमीर झाला. ११ ऑगस्ट
१८८० रोजीं जनरल सर स्टयुवर्डनें काबूल अमिराच्या स्वाधीन केलें. ब्रिटिश
फौजा दहा महिने काबूलमध्यें राहिल्यानंतर हळूहळू परत गेल्या. परत नेण्या-
सारखें सर्व सामान नेऊन उरलेलें " सर्व " अमिरास बक्षीस देण्यांत आलें.

**२६. ब्रिटिश कंदाहारवरील हक्क सोडतात :**—कंदाहार हिंदु-
स्थानसरकारच्या ताब्यांत आल्यावर तें सोडणें त्यांच्या जिवावर आलें. तेथें
आपलें सैन्य ठेवून अफगाणिस्तानांतील त्रास कायमचा मिटविण्याची त्यांची
योजना विलायतेंत इंडिया ऑफिसमध्यें मान्य झाली नाहीं. उलट कंदाहारमधून
सैन्य तत्काळ परत आणा अशीं एकसारखीं पत्रें तिकडून येऊं लागलीं. आपल्या-
कडील तज्ज्ञांचीं मतें विलायतसरकारास कळवून फेरविचार करण्यासही हिंदुस्थान-
सरकारनें लिहिलें. परंतु इंडिया ऑफिसनें आपला निश्चय बदलला नाहीं.
अफगाण सरहद्दीसंबंधीं असलेल्या दोन धोरणांचें विवेचन सरहद्द प्रकरणांत
येईलच. त्यांतील पुरोगामी धोरणांतही ( फॉर्वर्ड पॉलिसी ) दोन प्रकार होते.

अफगाण सरहद्दीस पोहोंचेपर्यंत हळुहळू पाय पसरा असें म्हणणारे कांहीं, आणि दुसऱ्यांचें मत असें कीं, अफगाण मुलखांतही सांपडेल तितका प्रदेश अंमलाखालीं आणा ! यांपैकीं कंदाहार सोडूं नये असें म्हणणारें हिंदीसरकार पुरोगामी धोरणाच्या दुसऱ्या प्रकाराचा पुरस्कार करीत होतें. विलायतसरकार पुरोगामी मताचेंच; पण अफगाणसीमेला जाऊन पोहोंचेपर्यंतच आपण जावें असें त्यांचें म्हणणें; अशा मतभेदांत शेवटीं विलायतसरकारच्या म्हणण्यास हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांस मान तुकवावी लागली व कंदाहारचें सैन्य त्यांस परत बोलवावें लागलें.

दुसरेंही कारण कंदाहारमधील सैन्य काढून घेण्यास घडलें. तेथें नामधारी सरदार उभा केला होता तो अगदींच दुर्बल निघाला. रानटी टोळ्यांच्या प्रदेशांत राजा किंवा मुख्य नायक नेहमींच शूर व सामर्थ्यवान् लागतो. इंग्रजांच्या सेनेशिवाय त्या कंदाहारच्या सरदाराचें पाऊल पडेनासें झालें आणि ब्रिटिशांनाच त्याचा कंटाळा आला. यामुळें एप्रिल १८८१ मध्यें इंग्रजांनीं आपलें सैन्य कंदाहारमधून हालविलें आणि अमीर अबदुर रहमानच्या अधिकाऱ्यांकडे त्यांनीं त्या ऐतिहासिक नगराचा व प्रांताचा ताबा दिला.

**३७. युद्धाचा अवाढव्य खर्च:**—द्वितीय अफगाण युद्धाची अखेर आतां झाली म्हणावयास हरकत नाहीं. ३१ मे १८८१ अखेर या युद्धाचा खर्च सुमारें * १,९५,००,००० पौंड (२३,४०,००,००० रु.)¶ आला असें सरकारी रिपोर्टांत म्हटलें असून, हिंदी तिजोरींतून १,४५,००,००० पौंड (१७,४०,००,००० रु.) गेले. हिंदुस्थानचा फायदा यापासून काय झाला ? जनतेचें कोणतें कल्याण झालें ? अफगाणिस्तानला तरी काय मिळालें किंवा इंग्लंडचा तादृश लाभ कोणता झाला ? इत्यादि प्रश्नांचा येथें किंचित् विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

दुसऱ्या एका पुस्तकाप्रमाणें या दुसऱ्या अफगाण युद्धाचा एकूण खर्च २,३४,९४,४८०‡ पौंड (२५,१८,३३,७६० रु.) आला. त्यापैकीं फक्त

---

* *Second Afghan War. 1878–80. Abridged Official Account*: App. XXXVIII

¶ २० पेन्सांस रुपया या दरानें.

‡ Haydn's : Dictionary of Dates, 25th Edn.

५०,००,००० पौंड (६,००,००,००० रु.)–पुरा पावहिस्साही नव्हे-इंग्लंडनें दिले आणि बाकीचा बोजा हिंदुस्थाननें सोसला.

**३८. युद्धाची इष्टानिष्टता :**—हें युद्ध १८७८ मध्यें सुरू झालें तरी त्याचें बीज लॉर्ड सॅलिसबरीनें १९–११–१८७५ रोजीं हिंदुस्थानचे व्हाइसरॉय यांस गुप्त पत्र नं. ३४ चें लिहिलें ( पृ. ३४-३५ पहा ) त्यांतच होतें. शेरअलीच्या दरबारीं इंग्रज वकील अवश्य असावा असें सॅलिस्बरीचें म्हणणें होतें. इंग्रजांनीं आपणांस सहाय्य करावें, आपल्या वडिलांचा व त्यांचा लोभ होता तो कायम रहावा या हेतूंनीं प्रेरित होऊन शेरअलीनें हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांस पत्रें लिहिलीं तर त्याला धड उत्तरेंही वेळेवर गेलीं नाहीत. जीं गेलीं तीं अत्यंत तुसडेपणानें व अमिराच्या अडचणींचा विचार न करितांच लिहिलीं होतीं असें म्हणावें लागतें. अमीर ' जोडून ' घेणें किती इष्ट व महत्त्वाचें आहे इकडे दुर्लक्ष करून त्याला ' तोडून ' टाकणारीं पत्रें इंग्रज अधिकाऱ्यांनीं लिहिलीं याचा साहजिकच परिणाम असा झाला की, शेरअली रशियाकडे वळला व इंग्रजांकडून अपेक्षिलेले सहाय्य त्यानें रशियाकडून मिळविलें.

इंग्लंडमधील वरचेवर बदलणाऱ्या मंत्रिमंडळाचें व हिंदुस्थानांतील व्हाइसरॉयांचें अफगाण धोरण एक नव्हतें म्हणून कांहीं घोटाळा झाला खरा, पण मंत्रिमंडळांत तरी या धोरणासंबंधानें एकवाक्यता कोठें होती ? पार्लमेंटरी पद्धतींत जे कांहीं दोष आहेत त्यांतील मुख्य हा कीं, कोणत्याही एका प्रश्नासंबंधींचें मत निश्चित न राहतां सत्ताधारी पक्षाबरोबर तेंही बदलत जातें. अंतस्थ बाबींत या फेरबदलानें कांहींहा परिणाम झालेला चालेल. पण परराष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय संबंधाचें धोरण ठराविक असणे इष्ट असतें. अफगाण युद्धांचा इतिहास पाहिला तर इंग्लंडचें धोरण किती चपळपणें धांवणारें होतें हें स्पष्ट दिसून येईल. असो.

रशियाची अफगाणांशी मैत्री जमली असें गृहीत धरलें तर काय झालें असतें ? हिंदुस्थानावर त्यांचा हल्ला होण्याची भीति प्रत्येक घटकेस राहिली असती हें खरें; पण अफगाणिस्तानाला किंवा रशियालाही इंग्लंडच्या स्वारीची मुळीं शक्यताच वाटली नाहीं कीं काय ? इंग्रज अधिकारी रशिया जवळ आला म्हणून घाबरत. आणि इंग्रज शेजारीं येणार याचा विचार रशियानें कधींच का केला नाहीं ? अस्वलाला पाहून सिंह गुरगुरतो, तसेंच सिंह दृष्टीस

पडतांच अस्वलही कांहीं हालचाल करीलच. मग ही एकपक्षीय भीति कां व कशामुळें ?

रशियानें मध्यआशियांत आपलें राज्य स्थापिलें; भांडखोर खानांना व अमिरांना वश करून घेऊन आपलाच लाभ करून घेतला; तरीही इंग्लंडनें हिंदुस्थान काबीज करणें व रशियानें बुखारा व समरकंद आपल्या साम्राज्यास जोडणें यांत महदंतर होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे झारशाही ही ब्रिटिशनोकरशाहीपेक्षां बरी ठरली ! " आम्ही जेते–तुम्ही जित; तुमचें संरक्षण करण्याची जबाबदारी सर्वस्वीं आमच्यावर–तुम्ही नालायख " अशा नात्यानें ब्रिटिश अधिकारी हिंदी प्रजेशीं राहात. तशी स्थिति रशियनांची नव्हती. म्हणून रशिया किंवा दुसरा परकी शत्रू हिंदुस्थानावर आला तर जबरदस्तीनें आपण होऊनच हिंदी जनतेवर इंग्रजांनी आपणांस लादून घेतलें असल्यानें ती जनता आपणांस मदत न करितां शत्रूसच मिळणार हें इंग्रजांस उघड दिसलें. आणि रशियाची किंवा इतरांची त्यांस भीति वाटली ती यासाठींच.

एकदां शेरअलीनें रशियाची मदत स्वीकारल्यावर त्याला नंतर कितीही गोंजारलें तर तो पुनः पूर्ववत् कसा होईल ? इंग्रज रशियाला भितात ही गोष्टच शेरअलीस कळावयास नको होती. बरें, एकदां युद्ध पुकारलें तर तें नेटपणें तडीस नेऊन, अशा क्रूर व विश्वासघातकी अफगाणांनीं सांगितल्याप्रमाणें ' होस हो ' न करतां, जपून रहावयाचें तें सोडून नव्या अमिराच्या म्हणण्यास मान्यता देऊन इंग्रजांनीं काबूलमध्यें आपला वकील ठेवावयास नको होता. कंदाहार अथवा जलालाबाद हीं ठिकाणें इंग्रजी फौजेच्या आवाक्यांत असल्यानें अधिक सुरक्षित होतीं. कावेगनारीचा खून झाला तो या तात्कालिक मान्यतेमुळेंच. नव्या अमिराचा इंग्रज वकील मारण्याचा घाट पहिल्यापासून असो वा नसो–अफगाण मनस्थिति, मागील अनुभव व इतिहास आणि अंतस्थ यादवी यांकडे लक्ष देऊन काबूलमध्यें कावेगनारीनें रहावयास नको होतें.

इंग्रजांना अफगाण अमीर आपल्या हातीं ठेवावयाचा होता तर, त्याला उघडपणें कोणत्याही प्रकारें सहाय्य करून चाललें नसतें. परावलंबी राजा अफगाण प्रजेस मानवत नाहीं आणि इंग्रजावलंबी राजा तर मुळींच नाहीं. तेव्हां अत्यंत गुप्त प्रकारें त्याला वळवून घेणें, रशिया आणि इराण यांच्या विरुद्ध त्याचें मन कलुषित करणें हेंच राजकारस्थानाच्या दृष्टीनें योग्य ठरलें असतें. अमिराला

पैसे चारून " तूं आमच्याच तंत्रानें वाग " असें इंग्रज मुत्सद्दी म्हणत. त्याचा साहजिकच विपरीत परिणाम झाला. इंग्रज कोणाला तरी भिऊन आपली खुशामत करण्याची खटपट करतात ही गोष्ट अमिराच्या मनांत येण्यास वेळ लागला नाहीं. तसेंच परराष्ट्रीय संबंध आपल्याच हातांत इंग्रजांनीं ठेवल्यामुळें " इंग्रज अरेरावी "विषयीं अफगाणांच्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला. हें सर्व टाळण्यासाठीं अफगाण अमिराला मनापासून पण गुप्त सहाय्य करून त्याला इराणाविरुद्ध आणि रशियाविरुद्ध फितवून ठेवणेंच सोईचें झालें असतें. शस्त्रबलावर आपली दहशत अफगाणिस्तानावर गाजविण्याची आकांक्षा धरल्यानें अफगाणांचा केवळ गैरविश्वासच इंग्रजांनीं संपादन केला असें नव्हे तर, " × × × प्रथमं वंदे " या न्यायानें ब्रिटिश म्हटला कीं चार हात दूर ठेवा अशी वृत्ति अफगाणांची झाली. इंग्रजांची वागणूकच अशी झाली कीं, दुसऱ्या कोणत्याही स्वाभिमानी लोकांनीं त्यांच्याशीं ह्याच प्रकारचें वर्तन केलें असतें.

दुसऱ्या युद्धास खर्च किती अजस्र झाला हें पाहिलें म्हणजे हिंदुस्थानच्या दौर्बल्याची कींव येते! लढाई अफगाणिस्तानांत, रशिया स्वारी करील ही काल्पनिक भीति, इंग्रजांचा अपमान झालेला आणि खर्च सोसतात कोण? तर हिंदुस्थानांतील राणीसरकारचे राजनिष्ठ सेवक प्रजाजन! एकूण खर्च पंचवीस कोट रुपयांवर आला पण ब्रिटिशांनीं यांपैकीं केवळ सहा कोटी रुपयेच दिले!! हिंदुस्थानांत अगणित संपत्ति होती त्या हिंदुस्थानच्या घोर पातकासाठींच त्याच्यावर त्या युद्धखर्चाचा बोजा टाकण्यांत आला कीं काय?

दुसऱ्या अफगाण युद्धानें इंग्रजांना काय लाभ झाला? मुलुख किती वाढला हें पाहिलें तर कुरम, पिशीन व सिबी हे तीन जिल्हे कायमचे लाल रंगानें माखले गेले हा पहिला फायदा होय. क्वेट्याचा भाग व बोलन घाट याच जिल्ह्यांत असल्यानें महसुलाच्या दृष्टीनें नसलें तरी लष्करी दृष्ट्या त्याचें महत्त्व विशेष आहे. क्वेटा म्हणजे कंदाहारचें प्रवेशद्वार असें म्हटलें तर त्याचें योग्य वर्णन होईल. हिंदुस्थानची त्या बाजूची सीमा सांभाळण्याचें लष्करी नाक्याचें ठिकाण दुसऱ्या अफगाण युद्धानें मिळालें असें मानल्यास हा सौदा फारच महागाईचा झाला असें सर्वजण म्हणतील. पंचवीस कोट रुपयांत हिंदुस्थानच्या संरक्षणाची उत्तम प्रकारें कायमची तजवीज करतां आली असती. पण या गोष्टी आतां सांगून काय उपयोग?

## प्रकरण पांचवें

# अमीर अबदुर रहमान व अमीर हबीबुल्ला

**३९. अमिराचे ब्रिटिशांशीं संबंधः—**कंदाहारमधून इंग्रजी सैन्य निघून गेलें असें समजतांच हिरातमध्यें असणाऱ्या अयुबखानास तो प्रांत आपल्या राज्यास जोडावा असें वाटलें आणि त्यानें जातीनें कंदाहारवर स्वारी केली. हिरातच्या अमिराकडेच बहुधा कंदाहारचें स्वामित्व असावें असा मागील इतिहासावरून शिरस्ताच पडलेला दिसे. तेव्हां अयुबखानाची इच्छा तशी वावगी नव्हती. अयुबचा समाचार घेण्यास अबदुर रहमान स्वतः निघाला आणि इकडे अयुबचा पराभव करीत असतांनाच आपल्या दुसऱ्या एका सरदाराकडून हिरातवर हल्ला करवून तें सीमानगरही आपल्या ताब्यांत घेतलें. अयुबखान पळून इराणांत गेला. ४ ऑगस्ट १८८१ रोजी हिरातवर काबूलच्या अमिराचें निशाण फडकलें.

**लॉर्ड डफरिन** व्हाइसरॉय असतांना इ. स. १८८५ मध्यें अमीर अबदुर रहमान हिंदुस्थानांत रावळपिंडी येथें आला होता. तेथे त्याचें डफरिनशीं खलबत झालें. आणि बरीचशी खंडणी—सालीना १२ लक्ष रुपयांची—अमिराला हिंदुस्थानसरकारकडून मिळावी असें ठरलें. शिवाय अमिराला लागणाऱ्या बंदुका, हत्यारें व दारुगोळा हिंदुस्थानांतून जाऊं देण्याची सवलतही त्याला देण्यांत आली.

रावळपिंडीस असतांना अमिरानें एक फ्रेंच इंजिनियर मि. जेरोम म्हणून काबुलास नेण्यासाठीं आपल्या नौकरीत घेतला व त्याच्या हातून काबूल येथें एक मोठा बंदुकांचा व गोळ्यांचा कारखाना उभारला. अफगाणिस्तानांतील नौकरीस राहिलेला पहिला युरोपियन हाच होय.



अमीर अब्दुर रहमान G. C. B., G. C. S. I.

**४०. अंतस्थ बंडाळीः**—दुराणी घराण्यांतील अमीर काबूलमध्यें राज्य करतो हें गिलझी (गिलचे?) जातींना पाहवलें नाहीं व त्यांनीं अमिराविरुद्ध १८८६ व १८८७ मध्यें बंडें केलीं. पळून गेलेल्या अयुबखानास तेहरानमध्यें जवळजवळ कैद्याप्रमाणेंच ठेविलें होतें. परंतु इंग्रजांना डिवचण्याची मिळेल ती संधि वांया घालवावयाची नाहीं असा जणूं काय रशियाचा पणच असल्यानें तेहरानमधील रशियन वकिलाच्या सहाय्यानें अयुबखान सुटून बंडखोरांना सहाय्य करण्यासाठीं धांवला. परंतु अफगाण सरहद्दीवरच तो पकडला गेला. पुढें ब्रिटिशांनीं त्याला व त्याच्या कुटुंबांतील सर्व मुलाबाळांस आणून हिंदुस्थानांत ठेविलें. हिंदुस्थानची ख्याति आदरातिथ्याविषयीं असल्यानें या यवन पाहुण्याचा ( ? ) सर्व खर्च हिंदी तिजोरींतूनच होत राहिल्यास नवल नाहीं.

हजारा म्हणूनही एक जात अफगाणिस्तानांत आहे. त्या लोकांनींही १८९०–९१ सालीं दोन बंडें करून आमिरास त्रास दिला. परंतु आमिरानें त्या दोन्ही बंडांचा पाडाव केला. १८९२–९३ सालांतही हजारांचा त्रास होत होताच.

**४१. काबुलाधिपतीस खूष राखण्याची धडपड :**—१८९३ मध्यें इंग्रजांना प्रेमाचा पान्हा फुटून आमिराला मिळणारी खंडणीची रक्कम दीडपट करण्यांत आली.

आपल्या द्वितीय चिरंजिवास आमिरानें विलायतची यात्रा करण्यास १८९५ मध्यें पाठविलें. **नासिरुल्लाखान** २९-४-१८९५ रोजीं मुंबईहून निघाला, आणि लंडनला गेल्यावर विंड्सर कॅसलमध्यें राणीसरकारचा खास पाहुणा म्हणून त्याचें स्वागत झालें. तीन साडेतीन महिने इंग्लंडमध्यें राहिल्यावर पॅरिस, रोम, नेपल्स हीं शहरें पहात हे अमीरपुत्र कराचीला पोहोंचले व क्वेटा-कंदाहारमार्गें परत राजधानीस गेले.

अमिरास, त्याच्या प्रथम व द्वितीय पुत्रांस इंग्रजसरकारकडून बऱ्याच मोठ्या मानाच्या पदव्या मिळाल्या.

येथें थोडें विषयांतर करून अबदुर रहमानचा पूर्वेतिहास पाहणें अप्रस्तुत होणार नाहीं.

**४२. अबदुर रहमाननें अमीरपद कसें मिळविलें :**— अहमदशहा अबदालीनें अफगाण राष्ट्राचा पाया रचला असें वर सांगितलेंच आहे. या

अफगाण राष्ट्रीकरणाच्या प्रयत्नास मूर्त स्वरूप दिलें असेल तर तें अमीर अबदुर रहमाननेंच. यावरूनच त्याची योग्यता कळून येईल. आणखीही अनेक दृष्टींनीं आपणांस त्याच्या चरित्राकडे पाहतां येतें. इंग्रजांशीं त्याचें नातें कोणत्या प्रकारचें होतें हें बारकाईनें निरीक्षण केल्यास त्याची मुत्सद्देगिरी कळून आल्यावांचून राहणार नाहीं. वरपांगीं पाहणाराच्या मतें अमिरानें ब्रिटिशांचा वरचष्मा परराष्ट्रीय बाबींत मान्य केला या एवढयाच कारणानें अबदुर रहमान कमी योग्यतेचा ठरतो. परंतु कांहीं अंतस्थ गोष्टी उघडकीस आल्या म्हणजे त्याची वास्तविक थोरवी स्पष्ट होईल.

इ. स. १८७८मध्यें इंग्रजांचा काबूलवर हल्ला झाला तेव्हां तत्कालीन अमीर शेरअली हा पळून गेला. हें वर्तमान समजतांच रशियन मुलखांत राहात असलेला अबदुर रहमान मोठया त्वेषानें इंग्रजांना अफगाणिस्तानांतून घालवून देण्यास निघाला. वाटेंतील ठिकठिकाणच्या टोळीनायकांस पत्रें लिहून "आपल्या पवित्र भूमींतून परकीय लुडबुड्यांना हांकून लावण्याच्या प्रयत्नांत" साहाय्य करा अशी त्यानें विनंति केली. वाटेंत त्याच्या सासऱ्यानें त्याला धमकी देऊन "माझ्या प्रांतांत पाय टाकशील तर तुझ्या अनुयायांसह सर्वांची कत्तल करीन" असा निरोप पाठविला. त्याला अबदुर रहमाननें दिलेलें उत्तर इतकें जोरदार होतें कीं, श्वशुरांच्या तळपायाची आग मस्तकास गेली आणि 'दशमग्रहा' विरुद्ध लढण्यासाठीं त्यांनीं सुमारें १२,००० फौज जमा केली. अबदुर रहमानजवळ केवळ ११० च लोक होते.* पण जांवयाच्या शौर्यामुळें सासऱ्याचा जंगी पराजय होऊन त्याला पळून जावें लागलें. नेपोलियन बोनापार्टचा संचार अबदुर रहमानमध्यें झाल्यासारखें पुढील अनेक प्रसंगांवरून म्हणावें लागतें. याच यशाविषयीं तो म्हणतो, "माझी सर्व मदार पैगंबरावर होती, त्यामुळें मला इतका हुरूप आला कीं, तमाम दुनिया जरी मजवर चालून आली असती, तरी पावलाखालील कीटकाप्रमाणें ती चिरडून गेली असती."

---

* हें वर्णन वस्तुत: खरें वाटणार नाहीं. पण डॉ. अबदुल गनींच्या पुस्तकांतील माहितीवरच या प्रसंगाविषयीं माझी सारी भिस्त आहे. त्यांनीं दिलेलेच आंकडे मीं उद्धृत केले आहेत. अन्यत्र कोठेंही ही माहिती आली नसल्यानें त्यांच्याविषयीं खात्री मी कशी देऊं?

**A. Gani** : *Review of Political Situation in Central Asia*, **pp. 27-28.**

बोनापार्ट आपणांस "दैव-पुत्र"-चाइल्ड ऑफ डेस्टिनी-म्हणवून घेत असे. तसाच अबदुर रहमान म्हणे-"पैगंबराची सेवा करण्याची खरीखुरी मनापासून इच्छा ज्यांची असते त्यांच्या यशाची हमी खुदाच घेतो. माझी अशी दृढ समजूत होती तिचा परिणाम पहा कसा झाला तो ? मी आज अमीरपदारूढ आहें."

नेपोलियनचें आणखीही साम्य दाखविणारीं स्थळें पुष्कळ आहेत. सैनिकांना उद्देशून व प्रजाजनांना आपल्याकडे वळवून घेण्यासाठीं त्यानें वेळोवेळीं केलेलीं भाषणें अगदी बोनापार्टी वळणाचीं दिसतात.

इंग्रजांना अफगाणिस्तानांतून हांकून लावण्यासाठीं तो अनुयायी जमवीत असतां सर्व लोकांना उद्देशून काढिलेला जाहीरनामा किती युक्तीनें व शहाणपणानें लिहिला आहे तो पहाः—

"अहो मुसलमानांनों ! मी अफगाणांशीं लढण्यासाठीं आलों नसून (गाझा) -धर्मयुद्ध-करण्यास्तव आलों आहें. माझा हुकूम तुम्ही सर्वांनीं मानला पाहिजे. कारण ती अल्लाची व पैगंबराचीच आज्ञा आहे. आपण सर्व अल्लाचे बंदे गुलाम आहोंत आणि धर्मयुद्ध करणें आपणां सर्वांचें प्राप्त कर्तव्य आहे."

मध्यंतरीं त्याला अनेक मित्रांनीं कळविलें कीं, वाटेंत बरेच सरदार तुला विश्वासघातानें ठार करणार आहेत; तूं पुढें जाऊं नकोस. पण अबदुर रहमान अशांना डरणार होता थोडाच ? ज्या सरदारानें त्याला विश्वासघातानें दगा करण्याचें ठरविलें होतें त्याच्याच घरांत अबदुर रहमान शिरला व बसल्या जागींच त्याचा खून करून त्यानें त्याला पैगंबरसदनीं पाठविलें ! यांतही नेपोलियनी छटा दिसत नाहीं काय ? अफगाणिस्तानचा हा बोनापार्ट इंग्रजांशीं कसा वागला तेंही पाहण्यासारखें आहे.

**४३. अबदुर रहमानची इंग्रजांशीं वागणूक :—**अबदुर रहमान **ऑक्सस** नदी ओलांडून कुंदुझ येथें आला. तेव्हां काबूलस्थ **सर लेपेल ग्रिफिन** साहेबांनीं पत्र लिहून त्याचें क्षेमाचिंतन केलें. आणि "राशिया कसा सोडला व पुढील बेत काय" हें जाणण्याची इच्छा दर्शविली.

अमिराची लोकसंग्रहाची आवड प्रथमपासून होती हें त्याच्या वर्तनावरून दिसतें. इंग्रजांचें पत्र येतांच त्यानें तें सर्व सैनिकांसमक्ष वाचून दाखविलें व "उत्तर काय लिहूं ?" असें त्यांना विचारलें. नंतर सर्वांनुमतें खालील मसुदा मान्य झालाः—

"रशियाच्या अनुमतीनें मी इकडे आलों असून माझा मुख्य हेतु अंतस्थ भानगडींपासून स्वदेशाचें संरक्षण करण्याचा आहे."

ग्रिफिनसाहेबांनीं मोठ्या उदारपणानें पुनः पत्र लिहिलें. आणि अबदुर रहमाननें तत्काल काबूलकडे येऊन राज्यकारभार हातीं घ्यावी अशी सदिच्छा प्रकट केली. पण अबदुर रहमान असातसा नव्हता. त्यानें उत्तर पाठविलें त्यांतच स्पष्टपणें खुलासा करण्याची विनंति होती ( १६ मे १८८० ).

"माझ्या प्रजाजनांना खालील प्रश्नांचीं उत्तरें तुमच्याकडून पाहिजेतः—

१. माझ्या राज्याच्या सीमा कोणत्या ?

२. कंदाहार त्यांत समाविष्ट करणार किंवा नाहीं ?

३. अफगाणिस्तानांत ब्रिटिश फौज अथवा इंग्रज वकील राहील काय ?

४. ब्रिटिशांच्या कोणत्या शत्रूशीं मला लढावें लागेल ?

५. मला व माझ्या प्रजाजनांना ब्रिटिश काय सवलती देणार आहेत ?

६. त्याबद्दल ब्रिटिशांना मोबदला कोणता पाहिजे ?"

ग्रिफिननें १४ जून १८८० रोजीं उत्तर पाठविलें, आणि आपल्या अटी कळविल्या. ब्रिटिशांच्या वतीनें एक मुसलमान गुमास्ता तेवढा काबूलमध्यें राहणार होता. बाकीच्या अटी अमीरपद अर्पण करितांना ज्या "समजुती" वर इंग्रजांची व अबदुर रहमानाची दोस्ती जमली त्या मागें दिल्याच आहेत.

आतां प्रश्न असा संभवतो की, अशा अटींवर अमिरानें ब्रिटिशांशीं मैत्री तरी कां केली ?

इंग्लंडसारख्या बलाढ्य राष्ट्राचें वैर संपादणें ही गोष्ट साधी नव्हे ! त्यांच्यांशीं दोस्ती करावयास मिळणें हाही कांहीं लहानसान लाभ म्हणतां येणार नाहीं. रशिया सोडून आलेल्या अबदुर रहमानास त्या दिशेनें हल्ला होईल अशी वारंवार भीति वाटली तर त्यांत आश्चर्य कसचें ? अफगाणिस्तानांतील "पोटजातींचें एकीकरण" अद्यापि झालें नव्हतें; स्वतः अबदुर रहमान अगदीं नुकताच पदारूढ झालेला; इंग्रजांनीं सर्व देश व्यापलेला; तेव्हां दुसऱ्यांच्या सहाय्याची अपेक्षा त्याला वाटली हें वावगें नव्हे. उलट कौटिलीय अर्थशास्त्रांत म्हटल्याप्रमाणें:–

**"दुर्बलो राजा बलवताभियुक्तः तद्विशिष्टबलमाश्रयेत यमितरो मंत्रशक्त्या नातिसंदध्यात्।"** ( उत्तरार्ध ७।११३ )

याचा अर्थ:—बलाढ्य शत्रूशीं गांठ पडली असतां बलहीनानें शत्रूहून अधिक शक्तिमान् व शत्रूच्या कारस्थानास दाद न देणाराचा आश्रय करावा.

म्हणून अबदुर रहमाननें इंग्रजांशीं सख्य केलें व अफगाणिस्तानांतील अंतर्व्यवस्थेंत पुरें लक्ष घालून राष्ट्राची सुधारणा चालविली.

**४४. अमिरानें केलेल्या अंतर्गत सुधारणा:**—जमीनमहसुलाची योग्य व्यवस्था लावण्यांत अमिराची पुष्कळ मेहनत खर्च झाली. अफगाणिस्तानांत प्रजेकडून महसूल कांहीं ठिकाणीं रुपयांत आणि कित्येक ठिकाणीं पिकाच्या रूपानें घेतला जातो. परंतु सारामाफीचीही वहिवाट असल्यानें अधिकाऱ्यांस मोंगलाई हातचलाखी करण्यास अवसर पुष्कळ सांपडतो. बरें, जिल्ह्याच्या अधिकाऱ्यांवर जरा करडी नजर केली कीं, त्यांचा "स्वैरसंचार" बंद झाल्यानें ते उलटतील ही भीति राज्यकर्त्यांना असतेच. दळणवळणाचीं साधनें असलीं म्हणजे केंद्रीभूत राज्यशकट हाकणें सुलभ होतें. पण अफगाणमुलुखांची भौगोलिक रचनाच अशी आहे कीं, तेथें उंट, खेचरें व गाढवें यांचीच योजना वाहतुकीच्या कामाकडे केली जावी. मग अमिराचे सद्धेतु तडीस जाण्यास किती अडचणी आल्या असतील याची कल्पनाच करावी !

अमीर काबूलाधिपति झाला तेव्हां तिजोरी रितीच होती. गंगाजळी ठेवीची पद्धत त्या वेळीं कोठली अंमलांत असणार ? पण १९०१ सालीं अमीर निवर्तला तेव्हां सुमारें सात कोटी काबुली रुपये ( एक काबुली रुपया=इंग्रजी ९–१० आणे ) व तीन कोटींचें सोनें, चांदी, रत्नें वगैरे ऐवज अशी शिल्लक होती ! अमिराच्या कार्याची थोडी तरी कल्पना येण्यास हे आंकडे पुरे आहेत.

**४५. अबदुर रहमानचा राज्यकारभार:**—रशियांत तरुणपणचा काळ हालअपेष्टांत गेल्यामुळें अनेक अनुभवांचें ज्ञान त्यास झाले होतें. आणि म्हणूनच त्याची कारकीर्द प्रजेस सुखावह व राज्यास भरभराटीची गेली. प्रथमतः जरी त्यानें लोकमतानुवर्ती कारभार हांकण्याची वृत्ति दर्शविली तरी पुढें अरेरावी सुलतानशाहीच तो गाजवूं लागला—नव्हे गाजविणें त्याला भागच पडलें ! लोकनायक होण्यापूर्वी सर्वांची मर्जी संपादण्यासाठीं त्यानें आपण जनमतानुयायी असल्याचें दाखविलें. पुढें एकदां सर्व अफगाणांवर सत्ता प्राप्त झाल्यावर त्यांना कह्यांत ठेवण्यासाठीं एकतंत्रीपणानेंच त्याला चालावें लागलें. रशियाची नामांकित हेरपद्धति अबदुर रहमाननें प्रत्यक्ष पाहिलेली व अनुभवलेली.

तिचा परिणाम त्याच्यावर इतका झाला होता कीं, पुढें काबूलमध्ये व इतरत्र पसरलेलें त्याच्या गुप्त हेरांचें जाळें पाहून ही कला रशियानेंच अफगाणांपासून तर घेतली नसेल ना ? अशी शंका उत्पन्न होई ! घरोघर अमिराचे हेर आपलें काम बजावण्यासाठी ठेवलेले होते. बायकांना वश करून त्यांना त्यांच्या पतींवर देखरेख ठेविण्याचें काम दिलें होतें असें कित्येकजण म्हणतात. परकीयांनीं वेढलेल्या स्वातंत्र्येच्छू छोट्या राष्ट्रांत अशी हेरपद्धति आवश्यकच होती.

हिरात, कंदाहार व काबूल अशीं तीनही मुख्य शहरें याच अमिराच्या अंमलाखालीं प्रथमत: आलीं असल्यानें लोकांनीं बंडें केलीं, त्यांचा उपशमही अमिरानें केला: आणि आपलें राज्य भरभराटीनें चालविण्याची खटपट आरंभिली. सर्व मुल्लांना आपण स्वतंत्र आहोंत, आपणांवर कोणाचा ताबा नाहीं असें वाटे. निरनिराळ्या टोळ्यांचे नायक तर अमिरापेक्षांही सामर्थ्यवान् असल्याप्रमाणें वागत आणि अशा अडचणीमुळें अमिराच्या इच्छेप्रमाणें सर्वत्र सारखी सत्ता नांदत नव्हती. हे मुल्ला व टोळीनायक अनेक अमानुष लीलांनीं रयतेला गांजीत; लुटालूट करणें, मुशाफरांना व व्यापाऱ्यांना धमकावून त्यांची चीजवस्त लांबाविणें इत्यादि संभावित ( ? ) मार्गांनीं ते आपली उपजीविका करीत, आणि अशा कृत्यांसाठी कांहींनीं नोकरसुद्धां ठेविले होते. मुल्लांनीं तर इस्लामी धर्माची शिकवण म्हणून परजीवोपजीवनाचा मार्ग सुचविला; कोणीही कांहीं काम करू नये असें उपदेशिलें आणि अनेक प्रकारचे कर प्रजेवर लादून त्यांना ' त्राहि भगवन् ' असें करून सोडिलें होतें. परंतु पंधरा वर्षें एकसारखी खटपट केल्यावर अमिराला समाधान वाटलें. कित्येक नाठाळांना त्यानें कैदेंत टाकलें, कांहींना हद्दपार केलें आणि बाकीच्यांना देहान्त शिक्षा देण्यासही त्यानें कमी केलें नाहीं.

शिस्तीचे कडक उपाय अंमलांत आणण्यासाठी आणि विशेषतः प्रजेच्या स्वैर वर्तनास आळा घालून राज्य एकतंत्री करण्यासाठी अमिरास क्रूरपणानें वागावें लागलें. अर्थातच त्याला शत्रु उत्पन्न झाले. एकदां तर त्याच्यावर प्राणांतक गोळी कोणी दुष्टानें झाडली. पण अफगाणिस्तानच्या उन्नतीसाठीं अमिराची आवश्यकता असल्यानें सुदैवानें खुर्चीच्या पाठीला चाटूनच ती गोळी निघून गेली व अबदुर रहमान सुखरूप राहिला. सर्व खुर्चींत भरगच्च रीतीनें बसण्याइतकें विस्तृत शरीर असतांही या संकटांतून तो कसा बचावला याचें लोकांना फार आश्चर्य वाटलें !

**४६. काफिरिस्तानची मोहीम** :--अमिराची दुसरी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे **काफिरिस्तान**संबंधींची आहे. अफगाणिस्तान आणि काश्मीर यांच्यामध्यें, चित्रळ–पेशावरच्या पश्चिमेस हा छोटासा प्रदेश आहे. अलेक्झांडरच्या अनुयायांपैकीं हे 'काफिर' असावेत असा सर्वांचा तर्क आहे. ते मुसलमानी धर्मानुयायी नसून त्यांच्यावर सत्ता अशी आजपर्यंत कोणींच गाजविली नव्हती. ड्यूरांडनें १८९३मध्यें अफगाण सरहद्द ठरविली त्या वेळीं काफिरिस्तान अमिरास दिलें आणि मोबदला वजिरिस्तान मिळविलें. वजिरिस्तानचें महत्त्व काय आहे हें पुढें सीमाप्रांतप्रकरणांत येईलच.

काफिरांवर राज्य करून त्यांना मुस्लीमधर्मदीक्षा देण्यांत अमिरानें इंग्रज-शासनाधिकाऱ्यांचा कित्ता डोळ्यांपुढें ठेविला होता असें दिसतें. त्यानें लढाईनें किंवा जबरदस्तीनें त्यांच्यावर चढाई करण्याचा प्रयत्न मुद्दाम टाळला आणि नजराणे पाठविणें, आपल्याकडे त्यांच्या पुढाऱ्यांना बोलावून त्यांचा सन्मान करणें वगैरे वशीकरणाचे प्रयोग अमिरानें करून पाहिले. ह्या मोहक प्रकारांना अज्ञानी, रानटी व लोभी काफिर भुलले याविषयीं आश्चर्य कां वाटावें ? पण एवढ्यानेंही भागेना. मुसलमानी धर्म स्वीकारण्यास त्यांची तयारी दिसेना. इकडे तर पामीरचा भाग रशियाकडे गेलेला. तेव्हां आपण फार गडबड केली तर, रशिया काफिरांचा प्रांत आपल्या साम्राज्यास जोडील ही भीति अमिरास वाटली म्हणून त्यानें गुपचुपपणें एके दिवशीं भर हिंवाळ्यांत सर्व डोंगर बर्फाच्छादित असतांना **बदकशान, पंजशीर, लमकान व अस्मार** या चार बाजूंनीं एकदम हल्ला करून काफिरांचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें ( १८९५ ). बर्फामुळें काफिरांना डोंगरांत लपूनछपून राहतां येईना.

पुढें क्रमाक्रमानें तेथें मुल्लांची रवानगी करून मुसलमानी धर्माची दीक्षा काफिरांना देण्याची व्यवस्था अमिरानें केली व ग्रीक लोकांचा हा हिंदुस्थान-शेजारचा अवशेष कालमानानें अफगाणिस्तानांत मिसळून गेला.

**४७. अबदुर रहमानची मुत्सद्देगिरी**:—बंदुकी व दारु-गोळ्यांचा यंत्रसहाय्यानें चालणारा कारखाना त्यानें काबूलमध्यें काढिला. चाम-ड्याचा व कांचेचा असे दोन कारखानेही सुरू झाले. शांतता नांदून वाटेंतील सर्व मारेकऱ्यांचा आणि लुटारूंचा बंदोबस्त केल्यानें व्यापार वाढला व त्याचा परिणाम पर्यायानें सरकारी तिजोरीवर अनुकूल असाच झाला.

अमिराला काम करण्याची भारी हौस असे व अफगाणिस्तानची उन्नति कशी होईल हा ध्यास त्याला सारखा लागलेला होता. रशियाच्या भीतीस्तव त्यानें इंग्लंडशीं मैत्री केली तरी, इंग्रजांचें प्राबल्य आपल्यावर नको असें त्याला वाटत असे. पण इलाजच नव्हता म्हणून ब्रिटिशांशीं त्याला सख्य जोडावें लागलें. अमिराला रशियाची भीति वाटे याला कांहीं कारणें होतीं कीं नाहीं अशीही शंका ऐतिहासिक चिकित्सकाला आल्यावांचून राहणार नाहीं. अमीर रावळपिंडीस व्हाइसरॉयला भेटण्यास आला असतां ( १८८५ ) रशियन हद्दीवर घडलेला प्रकार पाहिला म्हणजे रशियासंबंधींची भीति निष्कारण नव्हती असें दिसून येईल. अफगाण-रूसो हद्दीवर पेंचदें म्हणून एक गांव आहे. तेथील अंमल अफगाणांचाच. पण रशियानें त्यावर आपलें स्वामित्व सांगितलें व अफगाण-मुलुखावर रशियन फौजेनें स्वारी केली. ती वेळ म्हणजे अफगाण–रशियन सरहद्द मुक्रर करण्याचें कामिशन आपलें काम करीत असतांनाची होती. इंग्रज व रशियन वकील जवळपास होतेच. त्यांना पंचाइत पडली कीं, सीमा आंखण्याचें काम निभावतें कीं नाहीं ? कांहीं दिवस कार्य बंद झाल्यानें दोन्ही वकील आपापल्या ठिकाणीं परतले. परंतु पुनः लगेच दोन्ही राष्ट्रांनीं सरहद्दीची आंखणी करण्याचें ठरवून १८८८ मध्यें सर्व काम समाप्त केले. पेंचदें रशियन हद्दींत असल्याचें निश्चित करण्यांत आलें.

**४८. चरित्रांतील एक मनोरंजक प्रसंग :—**अमिराची दैनिक राहणी एकंदरींत व्यवस्थेची होती. रोजचें काम रोज केल्याविना त्याला चैन पडत नसे. प्रथमतः लिहितांवाचतां येणार नाहीं अशी त्याची समजूत होती. पण तरुणपणीं एकदां त्याला त्याच्या वाङ्निश्चित वधूकडून एक पत्र आलें व तें दुसऱ्या कोणींही पाहूं नये अथवा त्याचें उत्तरही दुसऱ्यानें लिहूं नये अशी तिनें इच्छा प्रकट केली होती. त्यामुळें भावी अमीर मोठ्या बुचकळ्यांत पडला. लिहिणेंवाचणें लहानपणीं मशिदींत जात असतांना थोडेंसें तो शिकला असेल. पण पुढें समशेरीशींच सारखें लग्न लागल्यानें ‘ कलमा ’कडे लक्ष देतो कोण ? शिवाय, नंतर खर्डेघाशी करणारीं माणसें त्याकडे थोडीं नव्हतीं. म्हणून बालपणच्या विद्येवर तजेला चढविण्याची आवश्यकता भासली नाहीं. परंतु प्रेमपत्रिकेची जादू कांहीं और असते असें म्हणतात तें अफगाणिस्तानसारख्या

मागासलेल्या राष्ट्रांतलि अशिक्षित अबदुर रहमानच्या उदाहरणावरूनही सिद्ध व्हावें ही आश्चर्याची गोष्ट आहे खरी !

प्रेमपत्र आल्यावर तें वाचतां येईना किंवा त्याचें उत्तर लिहितां येईना म्हणून अबदुर रहमान एकसारखा रडूं लागला. त्या रात्रीं त्याला झोंप येईना ! अलोचन अशा स्थितींत निम्मी रात्र गेल्यावर एक तेजस्वी मूर्ति त्याच्या पुढें त्याला दिसूं लागली व तिच्या एकसारख्या आग्रहामुळें अमीर उठला व लिहूं लागला तों त्याला मुळींच अडचण वाटेना. मधूनमधून एकादा शब्द चुके. तो दुसऱ्या वाचनाचे वेळीं दुरुस्त करून घेई. अशा प्रकारें त्याचें ज्ञान जागृत झालें. त्यानें आत्मचरित्राचा बराच भाग लिहूनही ठेविला होता असें म्हणतात.

**४९. अमिराची योग्यता व त्याचा मृत्यु** :–खंदा लढवय्या म्हणून अमिराचें वेगळें वर्णन करावयास नकोच. इंग्लंडमध्यें आपला वकील रहावा परंतु काबूलमध्यें ब्रिटिश वकील राहणें इष्ट नाहीं, असा त्याचा आग्रह कोणत्या वृत्तीचें प्रदर्शन करितो ? क्रूर व शेंकडों वर्षे बेलगामी वर्तनास चटावलेल्या अधिकाऱ्यांस वठणीवर आणणाऱ्या अमिराची देशसेवा काय योग्यतेची ठरते ? देशांत सर्वत्र शांतता प्रस्थापित करणारा अबदुर रहमान–आपल्या वडील पुत्रास युरोपच्या यात्रेस धाडणारा अफगाण अमिर–तिजोरींत भक्कम शिल्लक ठेवणारा राजा, हीं सर्व विशेषणें ज्याला लागूं आहेत त्याच्या कर्तबगारीचें आणि श्रेष्ठतेचें वेगळें मोजमाप पाहिजे कशाला ?

ता. ३ ऑक्टोबर १९०१ रोजीं अमिर अबदुर रहमान संधिवाताच्या विकारानें पैगंबरधामास गेला ! यावेळीं अफगाणिस्तानाचें लष्करी बळ किती होतें याचा तज्ज्ञांनीं अंदाज केला, तोच खालीं दिला आहे.

| | |
|---|---|
| लढाईसाठीं तत्काळ तयार | १,००,००० सैन्य<br>२,००,००० लेव्ही |
| सर्व देशभर पसरलेलें | ५०,००० सैन्य<br>१,००,००० लेव्ही |

म्हणजे सुमारें साडेचार लाख सैन्य अफगाणिस्तानांत सदैव सिद्ध होतें ! ‡

अमीर अबदुर रहमानचा दरारा सर्वत्र फारच बसला होता. त्याचें नांव घेतलें कीं, ते कडवे अफगाण कांपत. अमिराची प्रेतयात्रा निघाली तेव्हां कोणीही

‡ *The Indian Year Book–1929*. (Times of India).

बाहेर पडलें नाहीं कीं, कोणी कांहीं बोललें नाहीं. प्रत्येकाला संशय असा येई कीं, आपल्या पश्चात् आपणांविषयीं प्रजा काय बोलते हें पाहण्यासाठींच अमिरानें हें मरणाचें सोंग घेतलें आहे. त्यामुळें १०–१५ दिवस अमीर निधन पावला यावर तद्देशियांचा मुळीं विश्वास बसेना! " मी मेलों तरी पुढें तीस वर्षेपर्यंत अंतस्थ यादवी होणार नाहीं. " असा आमिराला आत्मविश्वास होता तो जवळजवळ खरा ठरला. फक्त १९२८ मध्येंच महत्त्वाची बंडाळी अफगाणिस्तानांत झाली तिचा परिणाम यथाक्रम पुढें येईलच.

**५०. हबीबुल्ला अमीर होतो:**—अफगाणांच्या इतिहासांत अपूर्व व आश्चर्य करण्यासारखा प्रसंग कोणता घडला असेल तर तो हबीबुल्ला अमीर-पदारूढ होण्याच्या वेळीं राज्यासाठीं झगडे मुळींच झाले नाहींत हाच होय! अमिराचीं पोरें डझनावारीनें असावयाचीं, आणि त्यांनीं सत्तेसाठीं आपसांत भांडावयाचें, हा जसा कांहीं नियमच ठरून गेला होता. परंतु १९०१ सालीं हबीबुल्ला गादीवर आला तेव्हां कोठेंच झगडे झाले नाहींत, किंवा दुसऱ्या कोणीं अमीरपदावर हक्क सांगितला नाहीं याचें कारण कदाचित् मृत आमिराचा कडवा अमल व बसलेला दरारा हें असूं शकेल. दुसरेंही एक कारण संभवतें. अबदुर रहमाननें आपल्या मागून वारस कोण हें शेवटपर्यंत ठरविलें नव्हतें. हबीबुल्लाचा अधिकार गादीवर खरें पाहिलें तर पोहोंचत नव्हता. कारण त्याची आई ही उच्च घराण्यांतली नव्हती. अबदुर रहमानची पट्ट अमीरीण दुसरीच होती आणि तिच्या पोटीं आलेला मुलगा काबूलकंदाहारचा अधिपति व्हावयाचा. परंतु ' बडे बापके बेटे ' यापलीकडे त्यास कांहींच मान नव्हता. धड शिक्षणही पुरें झालें नसून लोकांवर हुकमत चालविण्याचें काम त्याच्या हातून काडीमात्र झालें नसतें. त्यांनीं हक्क सांगितला नाहीं हेंच त्याचें शहाण-पण. हबीबुल्लाची गोष्ट तशी नव्हती. त्यानें राज्यकारभाराचें काम पाहिलें होतें. त्याचा धाकटा भाऊ नासिरुल्लाखान हा युरोपची यात्रा करून आल्यानें थोडा महत्त्वाकांक्षी बनला होता. परंतु हबीबुल्लाच्या पश्चात् गादीवर ' तुझीच मालकी राहील ' असें आश्वासन मिळाल्यानें त्यानें कांहीं गडबड केली नाहीं.

**५१. अंतर्गत राज्यकारभारांतील सुधारणा:**—गादीवर येतांच राज्यव्यवस्थेसाठीं दोन मंडळें हबीबुल्लानें नेमिलीं. राज्यकारभाराची

निरानिराळीं खातीं करून तत्संबंधीं नियम व कायदे करण्याचें काम एका मंडळाकडे सोंपविलें. महत्त्वाच्या राष्ट्रीय प्रश्नांची चर्चा करण्यासाठीं उमरावांचें असें दुसरें मंडळ त्यानें नेमलें होतें. अमानुल्लानें भावी काळांत ज्या सुधारणा घडवून आणिल्या त्याचा पाया हबीबुल्लाच्या राज्यांतच घातला गेला हें वरच्या व पुढें येणाऱ्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

अमीर हबीबुल्लानें आपला झनानखाना कमी करून म्हणजे चारच (?) बायका आपणांसाठीं राखून बाकीच्यांना काडीमोड करून दिली (१०–२-१९०३), असें एका इंग्रजी संदर्भग्रंथांत नमूद आहे. त्याच वेळीं ही झनान-खान्याची पद्धत मोडण्याचें फर्मानही त्यानें काढिलें होतें असें म्हणतात. पण दुसरे एक "चक्षुर्वैसत्यम्" माहिती असलेले ग्रंथकार (डॉ. गनी) अमीर हबी-बुल्लाची झनानखान्यांतील विलासप्रियता किती होती व पुढेंपुढें राज्यकारभारा-कडील त्याचें लक्ष उडून अंतःपुरांतच कसें रमलें याचें वर्णन देतात (डॉ· गनी, पृ. ७८–७९). तेव्हां यांतील खरें कोणतें तें कळणें कठीण आहे.

अमिराला काबूलमधील बंदुकींच्या कारखान्याचा लहानपणापासून नाद असे. नाद म्हणजे काय तर तेथें जाऊन सर्व प्रकार रोज पाहिल्याशिवाय त्याला चैन पडत नसे. त्याच्या लष्करी आवडीचें दुसरें दृश्य फल म्हणजे त्यानें एक लष्करी शाळा तुर्की अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं चालविली होती. तसेंच बौद्धिक शिक्षणाचीही सोय करण्यासाठीं त्यानें एक शाळा काढिली होती· प्राथमिक शिक्षणाच्या शाळाही उघडण्यांत आल्या आणि आपली प्रजा सुशिक्षित व्हावी म्हणून त्यानें पुस्तकांचीं भाषांतरें करण्यासाठीं हिंदुस्थानांतील मुसलमान तज्ज्ञांची नेमणूक केली होती.

**५२. हबीबुल्लाची हिंदुस्थानास भेट:--लॉर्ड कर्झन** यांच्या मनांतून अमीर हबीबुल्लास हिंदुस्थानांत भेटीस बोलावण्याचें फार होतें. त्यांचा हेतु अमिरानें ओळखिला कीं काय तें समजत नाहीं. पण वरचेवर निमंत्रण आलेलें अमीर एकसारखा नाकारी. शेवटीं निरुपायानें त्यानें आपल्या इनायतुल्ला नामक पुत्रास ऑक्टोबर १९०४ मध्यें हिंदुस्थानांत पाठविलें.

स्वतः अमीर नंतर १९०७ मध्यें हिंदुस्थानच्या प्रवासास निघाला. २ जानेवारीस लंडीखान्यास तो पोहोंचला. पेशावर, आग्रा, अलीगड, ग्वाल्हेर, दिल्ली, कलकत्ता, मुंबई या शहरांस त्यानें भेट दिली. मुंबापुरींत त्याचा मुक्काम

१२ ते १५ फेब्रुवारीपर्यंत असल्यानें तेवढ्यांत तो कदाचित् पुण्यासही आला असण्याचा संभव आहे. *

इंग्रजांच्या दृष्टीनें या अमिराचें व त्याच्या कारकीर्दीचें महत्त्व विशेष आहे. हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांनीं हबीबुल्लाची मुक्तकंठानें स्तुति केली. याचें कारण युरोपीय महायुद्धांत त्यानें बजावलेली कामगिरी. तसें म्हटलें तर हबीबुल्लाकडे एकादी विशिष्ट मोहीम सोंपविली होती असें नव्हे. शत्रुपक्षाला न मिळतां केवळ तटस्थ अथवा उदासीन वृत्ति स्वीकारावी हीच त्याजवर टाकलेली जबाबदारीची कामगिरी. आणि ती त्यानें अत्यंत प्रामाणिकपणानें पार पाडिली हें कोणासही कबूल करावें लागेल.

**५३. महायुद्धकालीं अमिराची तटस्थ वृत्तिः—** तुर्की साम्राज्यानें जर्मनीची बाजू घेतल्यामुळें "दोस्तांनीं" तुर्कांवर शस्त्र उचललें. तुर्कांच्या वतीनें बंधुवृत्तीची विनंति करून इराण व अफगाणिस्तान आपल्या बाजूस आले तर पहावें, अशा मतलबानें कैसरचे, तुर्कांचे व ऑस्ट्रियाचे वकील काबूलमध्यें अमिरास भेटावयास आले. त्यानें सर्वांचें म्हणणें ऐकून घेतलें; पण ब्रिटिश वकिलास मात्र अफगाणिस्तानांत प्रवेश करूं दिला नाहीं. गुप्तपणें इंग्रज अधिकाऱ्यांस निरोप पाठविला कीं, " तुमच्याशीं वितुष्ट येणें शक्य नाहीं. तुम्ही नुसती गंमत तर पहा. " आणि खरोखरीच अमिरानें तसें केलें. "दोस्त" राष्ट्रांच्या शत्रूंच्या मनांत अफगाणिस्ताननें हिंदुस्थानावर हल्ला करून इंग्रजांना शह लावावा असें होतें. अमीर म्हणे, " तुमची कुमक मला होणार–तेव्हां तुर्कांचें किंवा जर्मनांचें सैन्य तर येऊं द्या–त्याशिवाय मी कसा हल्ला करूं ? " या गोष्टी शक्य नसल्यानें अफगाणिस्तान हिंदी सरकारचा सखाच राहिला ! कोणत्याही प्रकारें अमिरानें ब्रिटिशांना त्रास दिला नाहीं. मनांत आणता तर सिंहाला जेरीस आणणें कांहीं कठीण नव्हतें. कारण त्या वेळीं हिंदी फौज सर्व ठिकठिकाणीं गुंतली होती. आणि हिंदुस्थानांत लष्करी संख्याबल फारच कमी होतें.

---

* तसें असेल तर इनायतुल्लानें २५ जून १९२९ रोजीं पुण्यास पायधूळ झाडली अशी बातमी ज्ञानप्रकाशनें छापली. तेव्हां भेटीचें दिलेलें कारण बरोबर दिसतें. वडिलांच्या इच्छेनुसार मी पुण्यास आलों असें इनायतुल्लाखान म्हणाले, असें २७ जून १९२९ चा ज्ञानप्रकाश म्हणतो.

**५४. विचारप्रवर्तक सरदार तार्झी** :—अमिराच्या मनांत ब्रिटिशांची दोस्ती कायम राखावयाची होती. पण प्रजेचें अंतरंग वेगळ्याच मनोराज्यांत रंगलें होतें. " खलिफावर फिरंगी हल्ला करितात ! खलिफा तर खुद्द खुदाचा अंश ! तेव्हां अशा काफिरांवर आपण शस्त्र नाही चालवावयाचें तर कोणावर ? आणि हिंदुस्थानावर स्वारी ! लूट ! चंगळ ! ! सुबत्ता ! ! ! " हा सर्व मागील इतिहास त्यांना आठवल्यास आश्चर्य नव्हे. परंतु त्यांचा अमीर प्रजानिष्ठ नसून इंग्रजनिष्ठ पडला. त्यामुळें त्यांच्या सर्व आकांक्षा जागच्या जागींच राहिल्या.

याहीपेक्षां वेगळ्या प्रकारचे विचार अफगाण प्रजेच्या मनांत या वेळीं खेळत होते. आणि ते खेळविणारा गृहस्थ म्हणजे भावी अमीर अमानुल्लाचा सासरा होय. **सरदार महमद बेग तार्झी** हें त्याचें नांव. राणी **सूरय्या** त्याचीच कन्या. त्याला अमिरानें एक वर्तमानपत्र चालविण्यास सांगितलें. अमिराची वर्तमानपत्राची कल्पना मुळांत स्वार्थी होती. म्हणजे सचित्र नियतकालिकांतील निरनिराळ्या राजांचीं चित्रें पाहून आपलेही फोटो असे छापून प्रजेच्या हातीं पडावे असें अमिरास वाटलें. स्वतः त्याला फोटोग्राफीची विशेष आवड असल्यानें ही इच्छा कांहीं वावगी नव्हे. शिवाय इच्छा चांगली का वाईट, स्वार्थी का लोकोपयोगी इत्यादिकांची चर्चा न करितां जर परिणामाकडे लक्ष दिलें तर हा नवा उपक्रम अफगाण इतिहासांत नव्या युगाचा उदयच होय असें म्हणतां येईल. मागासलेल्या, अशिक्षित देशांत आणि एकतंत्री राज्यकारभारपद्धतींत राजे महाराजांना स्वतःची बढाई व्हावी म्हणून तरी वर्तमानपत्र काढण्याची प्रेरणा झाली हें महदाश्चर्यच म्हणावयाचें. वर्तमानपत्र काढण्याची अमिराची लहर आणि ती राष्ट्रहिताच्या दृष्टीनें यथायोग्य पार पाडणारा

**नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता**

असा संपादक अमिरास मिळाला हा योगायोग अपूर्वच म्हटला पाहिजे.

**५५. तार्झींची कामगिरी व सिराझचें महत्त्व** :—तार्झींचें शिक्षण **दमास्कस** येथें तुर्की सत्तेखालीं झालें असल्यानें युरोपमधील नव्या वातावरणांत ते मुरलेले होते. तरुण तुर्कांची चळवळ निघाली कशी, तिनें काय कार्य केलें, तिचा उपयोग किती आहे इत्यादि गोष्टी त्यांनीं प्रत्यक्षच पाहिलेल्या. शिवाय जन्मतः अफगाण असल्यानें आपल्या देशास यापासून काय धडा घेतां येईल हेंही त्यांनीं विचारांतीं ठरविलें होतें. या संपादकमहाशयांनीं निद्रिस्त

अफगाणांना जागें केलें. आणि अशा प्रसंगीं तरुणांशिवाय दुसरे कोण जागृत होणार ? तरुण तुर्कांप्रमाणें अफगाण युवकही स्वदेशोद्धारार्थ बद्धपरिकर झाले. जिकडे तिकडे जातिवंत जिवंतपणा दृग्गोचर होऊं लागला.

"**सिराज-अल-अखबार**" मध्यें प्रसिद्ध होणाऱ्या लेखांची तेजस्वी भाषा इराणी–फार्सी–असल्यानें वाचकांना तिची चवही दाखवितां येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. पण पुढें यथावकाश त्या लेखांचा घडून आलेला परिणाम सांगावयाचा आहे. त्यावरूनच त्या लेखनाची योग्यता ठरवितां येईल.

सरदार महमद बेग तार्झी यांचें फार्सी भाषेवर प्रभुत्व असल्यानें त्यांचे लेख सर्वांनाच आवडले. अमिरानें तर " अफगाण भाषापटु " असा किताब देऊन त्यांचा गौरव केला. पुढें पुढें व्याजोक्तीनें पण मोठ्या कौशल्यानें अमिराचे कान उपटणारे लेख **सिराजमध्यें** येऊं लागले. अमीर गुणग्राही होता का तार्झीला शिक्षा करणें त्याच्या हातांत नव्हतें, हें ठरविणें कठीण जाईल. आपल्या दोन्ही मुलांस–इनायतुल्लास आणि अमानुल्लास–तार्झींच्या दोन कन्यका करून घेतल्यानें अमिराचें व संपादकमहाशयांचें व्याह्यांचें नातें जडलें होतें. शिवाय त्यांचें लेखनच इतकें कौशल्यपूर्ण असे कीं मोठमोठ्या कायदेपंडितांना देखील त्यांतून राजद्रोह काढणें अशक्य वाटावें !

नुसती जागृति करण्यासाठींच संपादकांचें कलम कुरकुर वाजत नसे. त्यांचे इंग्रज राजनीतिविषयक लेख असले कीं लेखणीला स्फुरण चढे आणि अत्यंत कडक रीतीनें ते ब्रिटिशांच्या धोरणावर टीका करीत. त्यांच्या या लेखांमुळें कांहीं अंक हबीबुल्लानें जप्त केले. मात्र खुद्द **सिराजवर** कधींही धाड आली नाहीं यावरून काय समजावयाचें ? इंग्रजांची व अफगाणिस्तानची अव्याहतपणें दोस्ती चालू आहे तींत बिघाड करणारे लेख ज्या अंकांत होते तेवढच अंक अमिराला आक्षेपार्ह वाटले व तेच त्यानें जप्त केले !

राजाच्या मर्यादित अधिकाराखालीं राहून प्रजेनें आपले हक्क कसे बजावून घ्यावे याचें परिणामकारी शिक्षण अफगाणांना **सिराजमधून** मिळूं लागलें. गुप्त संस्था निघाल्या. पुढें काय ? यासंबंधीं चोरून खलबतें करण्यांत ठिकठिकाणचे युवकसंघ ( ? ) दंग होत. " या वृद्ध मूर्खांचें काम आम्ही लीलया पार पाडूं–यांच्यापेक्षां चांगल्या प्रकारें आम्हांला काम करितां येईल" अशीं वचनें मुलांच्या तोंडून निघत. अमिराला या गोष्टी कळत नसत असेंच म्हणावें लागतें. त्याचें

राज्यव्यवहाराकडील लक्ष कमी होऊं लागलें असें पाहतांच निनांवी पत्रें त्यास येऊं लागलीं. " तुमच्या हातून राज्यकारभार नीट होत नाहीं, विनाकारण रयतेच्या पैशाची उधळपट्टी करूं नका. इकडे लक्ष न द्याल तर परिणामासाठीं तयार रहा." अशा आशयाचें पहिलें पत्र होतें.

**५६. तरुण अफगाणांतील जागृति** :—युरोपियन महायुद्धास प्रारंभ होतांच तरुण अफगाणांच्या मनांत विचार कोणते आले ते वर दिलेच आहेत. परंतु अमिरानें त्या अंतस्थ ऊर्मींना बाहेर पडूं दिलें नाहीं. या वेळींही त्याला निनांवी पत्रें आलीं आणि लोकांचें हृद्गत त्याला कळून चुकलें. अमीर दृढ-निश्चयी दिसला. तुर्कस्तानचे पुढें हाल झाले त्याची जबाबदारी पर्यायानें अफगाण अमिरावरच युवकसंघ टाकूं लागले आणि अशा अमिराचा " बंदोबस्त " करण्याची भाषाही ऐकूं येई.

१९१८ च्या अमिराच्या वाढदिवशीं राजनगरींत आपल्या मोटारींतून तो हिंडत असतां रिव्हॉल्वरमधून एक गोळी येऊन पडली. अमीर बचावला, पण गोळी कोठून व कोणीं झाडिली याचा पत्ता लागेना. काबूलच्या कोतवालांनीं आपली शिकस्त केली, पण खरा आरोपी हातीं आलाच नाहीं. हिंवाळ्यांत राहण्यासाठीं अमीर जलालाबादेस गेला. तेथेंही एक निनांवी पत्र त्याला आलें. पूर्वीची सौम्य भाषा बदलून त्या ठिकाणीं स्पष्ट उल्लेख व कडक शब्द आलेले पाहिले तरी अमिरानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. आपल्या चैनीच्या कार्यक्रमांत त्यानें काडीमात्र फेरफार न करितां रोजच्याप्रमाणें सर्व गाडा चालविला. पण त्याचे दिवस भरले होते हें त्याला कसें समजावें ?

जलालाबादेस आल्यावर शिकारीस जाण्याचा अमिराचा शिरस्ता होता. तो स्वतः शिकार करी. एकदां शिकारीसाठीं हिंडतां हिंडतां स्वच्छोदकाच्या शीतल झऱ्यापाशीं तो आला, आणि त्यांत स्वछंदानें जलक्रीडा करणारे लहानलहान मासे पाहून त्याला अतिशय आनंद झाला. बराच वेळ तेथें माशांची गंमत पाहून कांहीं मासे मेजवानीसाठीं त्यानें पकडले. पाण्याबाहेर येतांच ते जलचर तडफडून मरून गेले ! अमीर मनाशींच म्हणाला कीं, " काय हें चंचल जीवित आहे ! मृत्यूचे पाश मानवावर पडले म्हणजे त्याचीही अशीच असहाय्य अवस्था होते !" भविष्यकाळांतलि अनर्थाची सूचना तर ह्या कल्पनेंत नसेल ना ?

**५७. हबीबुल्लाचा खून:**—स्वतः खपून मिळविलेल्या मत्स्यान्नावर यथेच्छ ताव मारून अमीर आपल्या तंबूंत निद्रासुख अनुभवीत होता. कांहीं वेळानें तेथें एक व्यक्ति आली. तिच्या हातांत भरलेलें पिस्तुल असून मनांत उडालेल्या खळबळीचें स्पष्ट चिन्ह अंधारांतही तिच्या चेहऱ्यावर दिसत होतें. मनांतले विचार जाणण्याचें एकादें यंत्र एडिसनूनें तयार केले असतें किंवा हृत्कपाटास दारें ठेऊन आंतील फलकावर लिहिलेले विचार मानवी चक्षूंस वाचतां आले असते तर खालील वाक्यें आपणांस त्यांत दिसलीं असतीं:—

"अल्ला, माझ्या अंतस्थ हेतूंची जाणीव तुलाच असूं शकेल. खरोखर अफगाण
"जनतेच्या हितास्तवच मी हें कर्म करण्यास उद्युक्त झालों नसेन, तर मग ही
"गोळी माझ्याच हृदयांत शिरूं दे. माझ्या हृदयाची तळमळ खऱ्या कळकळीची
"असेल, तर ती तुझीच इच्छा नव्हे का ? तुझ्याच प्रजेचें तें सौख्य आहे ना?
"तर मग ही गोळी राजशकर्त्याच्या गाभाऱ्यांतील हृदयांतून पार जाऊं दे.
"आणि जनतेची त्याच्यापासून सुटका होऊं दे. अल्ला हु अकबर. (अल्ला, तूंच
"श्रेष्ठ आहेस.)"

रिव्हॉल्वरच्या घोडयावर बोट ठेऊन वरती डोळे करून पाहणाऱ्या त्या व्यक्तीच्या हृदयांतील विचारांचा हा फलक आपल्या डोळ्यांपुढें हालतो, तोंच एक गोळी सणसण करीत निघाली आणि तिनें आपलें उद्दिष्ट कार्य साधिलें ! निद्रिस्त आमिराच्या डाव्या कानशिलांतून गोळी गेली आणि तत्काळ अमीर निश्चेष्ट झाला (२० फेब्रु. १९१९). ज्या जिवंत माशांचे प्राण त्यानें कांहीं तासांपूर्वीच हिरावून घेतले होते त्यांचाच शाप त्याला बाधला नसेल ना ?

× × × ×

अमीर मृत झाला, ही बातमी जिकडे तिकडे पसरण्यास वेळ लागला नाही. जलालाबादेस त्याचें प्रेत नेण्यांत आलें. सर्व कुटुंबी मंडळी जमली, राजदरबारी लोक आले; पण खुनी इसमाचा पत्ताच लागेना. अबदुर रहमानचे वेळीं त्याच्या मृत्यूवर कोणाचा विश्वास बसेना तर, हबीबुल्लाचा खून झाला यांत त्यांना आश्चर्य वाटेना ! उलट इतके दिवस तो बचावला कसा असेंच ते म्हणत. दोन्ही अमिरांच्या राजवटींतला फरक तो हाच !

× × × ×



अमानुल्लाखान ( राष्ट्रीय पोषाखांत )

अमीर हबीबुल्लाचा खून झाला तेव्हां दुखवट्याच्या ठरावांची रेलचेल उडाली कीं नाहीं तें कळण्याचीं साधनें उपलब्ध नाहींत. पण खालील प्रकारचें बोलणें मात्र वरचेवर उघडपणें ऐकूं येत असे:—

" स्वार्थी आणि स्वैर वर्तनाची अठरा वर्षांची अरेरावी कारकीर्द अशी संपली तर !
" अनियंत्रित राजसत्ता आमचेकडे अद्याप चालू आहे अशी बढाई ( ? )
" मारणारा एकच देश पृथ्वीवर होता व तो अफगाणांचा. बरें झालें, अमीर
" हबीबुल्लाबरोबर ती सुलतानशाही राज्यपद्धतीही थडग्यांत गाडून टाकली
" गेली. खून झाला तो हबीबुल्लाचा नसून लक्षावधि लोकांवर एकाचीच
" अनियंत्रित सत्ता केंद्रीभूत करण्याचा जो हक्क अमीर आपला आहे असें
" सांगतात त्या हक्काचाच खून झाला. हा अधिकार सर्व मानवजातीला दूषणा-
" स्पद होय. कारण त्यायोगें प्रगतीचा मार्ग खुंटतो. समाजाचा घटक म्हणून
" मनुष्याचें वारंवार पुढें पाऊल पडावयाचें तें पडत नाहीं. ह्मणून या राज-
" सत्तेला-हबीबुल्लाला नव्हे-गोळी घालून ठार केले हें उत्तमच. ज्या मनुष्यानें
" हें कृत्य समाजहितासाठीं केलें त्याची अखिल मानवजात ऋणी राहील !
" प्राणांतक मारा करणाराची धन्य असो ! समाजसत्तावाद्यांनीं त्याची पूजा
" केली पाहिजे. "§

**५८. अमानुल्ला अमीरपद बळकावतो:**—हबीबुल्ला जलालाबादेस गेला तेव्हां काबूलची सुभेदारी अमानुल्लाकडे सोंपविली असून आळीपाळीनें आपल्या तीनही मुलांना अमीर या राज्यकारभाराचें काम सांगत असे. अमानुल्लाची मुदत संपून **हयतुल्लाखान** ती जागा घेणार होता. म्हणून अमानुल्लाचे हे वडील बंधु जलालाबादेहून कामावर रुजू होण्यासाठीं निघाले आणि वाटेंत मोटार बिघडली म्हणून त्यांना काबूल वेळेवर गांठतां आलें नाहीं. इकडे हबीबुल्लाचा खून झाल्याची बातमी अमानुल्लास कळतांच आपण अमीर होणार अशा बंदोबस्तानें तो राहूं लागला. कारण काबूलच्या सुभेदाराकडेच मुख्य तिजोरी, बंदुकांचा कारखाना आणि सैन्य यांचा मुख्य अधिकार असतो. इतकें हातीं असल्यावर अमीर होण्यास आणखी काय पाहिजे ?

---

§ A. Gani : *Review of Political Situation in Central Asia.*
ह्या मध्यंतरींच्या इतिहासाला आधारभूत ग्रंथ डॉ. गनींचाच आहे.

**५९. हबीबुल्लाच्या खुनाचीं कारणें:**—महायुद्धांत ब्रिटिशांच्या मतें अमूल्य कामगिरी करून हिंदी साम्राज्य वांचविलें त्याचा मोबदला पदवीरूपानेंच हबीबुल्लास मिळाला असता. पण तोही उपभोगण्यास अमीर जिवंत राहिला नाही. नोव्हेंबर १९१८ मध्यें लढाई थांबली आणि २० फेब्रुआरी १९१९ रोजीं हबीबुल्ला मारला गेला. त्याच्या खुनाचीं कारणें अशीं सांगतां येतील:—

१. अफगाण जनमताविरुद्ध त्यानें तुर्कांस, खलिफास सहाय्य दिलें नाहीं; इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानावर हल्लाही केला नाहीं ! इंग्रजांशीं तो विशेष सलगी दाखवी. मग ते त्याचे नोकर असोत वा इतर कोणी असोत. स्वतंत्र अफगाणांना हें कसें रुचावें ?

२. राज्याकडील त्याचें लक्ष कमी होऊन स्वारी विलासांत दंग होऊं लागली. तरुण अफगाण पक्ष दिवसानुदिवस बळावत चालला होता, तिकडे अमिरानें दुर्लक्ष केलें.

३. अमीर अबदुर रहमाननें तिजोरी भरून ठेवली होती तर हे अमीर चैनीच्या बाबींसाठीं ती शिल्लक उधळूं लागले. हबीबुल्लानें गंगाजळी कांहीं वाढविली तर नाहींच, पण पहिली होती ती बरीच कमी केली.

**६०. हबीबुल्लाची योग्यता :**—कांहींही कारण असो, अफगाणिस्तानांतील नव्या पक्षाला अमीर नष्ट करावा असें वाटलें व त्यानें तसें केलेंही. अठरा वर्षांच्या कारकीर्दींत हबीबुल्लानें राजकीय दृष्ट्या एकच गोष्ट साध्य केली. ती म्हणजे ब्रिटिशांकडून पत्रव्यवहारांत व इतर प्रसंगीं आपणांस " हिज मॅजेस्टी " असें बरोबरीच्या नात्यानें संबोधून घेण्याचा सन्मान ही होय ! पूर्वी केवळ ' हिज हायनेस दि अमीर ' असा प्रयोग होत असे तो बदलून ' हिज मॅजेस्टी दि किंग ऑफ अफगाणिस्तान ' असा निर्देश होऊं लागला. नंतर दुसरीं जीं कृत्यें अमिरानें केलीं त्यांत युरोपीय युद्धांत तटस्थपणा राखणें हें महत्त्वाचें आहे.

अमीर युद्धप्रिय नव्हता; का त्याला इंग्रज सिंहाची भीति वाटली; अथवा आपल्या विलासांत व्यत्यय नको होता; किंवा आपल्या देशाचा काडीमात्र लाभ होणार नाहीं ही गोष्ट अगोदर कळून चुकली होती; का मैत्रीचे तह तोडणें त्याला इष्ट वाटलें नाहीं; किंवा आणखी कांहीं वेगळेंच कारण या तटस्थ वृत्तीच्या बुडाशीं होतें तें सांगतां येत नाहीं. परंतु हबीबुल्ला तटस्थ राहिला हेंच शहाणपणाचें झालें. अमिराचें सैन्य कितीही उतावळें झालें तरी त्यांचा इंग्रजी शिस्ती-

पुढें किंवा विमानांच्या माऱ्यापुढें काय टिकाव लागणार आहे ? बरें, अफगाण सैन्याची सरशी होऊन त्यांना पेशावर प्रांत मिळाला असता असें मानलें, तर तो काय त्यांचे हातीं टिकला असता ? दुसरें असें कीं, अमिराची फौज पडली डोंगराळ प्रदेशांतली—गनिमी काव्यानें लढणारी. लुटालूट, दरोडे, इत्यादिकांतच तिनें आपला पराक्रम गाजवावा. मुद्दाम एका प्रबल शत्रूला डिवचून त्याचा प्रांत काबीज करण्याची आशा अफगाणांनीं करणें म्हणजे जलचर माशांनीं—मग ते कितीही मोठे असोत—समुद्रकिनाऱ्यावरील झाडातल्या पक्ष्यांच्या घरट्यांचा अभिलाष धरण्यासारखेंच आहे. डोंगराळ प्रदेशाच्या बाहेर निघाले म्हणजे अफगाण, माशांप्रमाणें तडफडून मरतील असा या म्हणण्याचा अर्थ नव्हे. फल-ज्योतिषांत ज्याप्रमाणें ग्रह स्वगृहीं असला तरच तो शक्तिमान ठरतो, अन्यगृहीं गेल्यास त्या ग्रहाचें सामर्थ्य कांहींच रहात नाही—तशीच गोष्ट अफगाणांची आहे. त्यांना स्वदेशचें राज्ययंत्र सुरळीत चालविण्याची परंपरा ठाऊक नाही. मग परदेश पादाक्रांत करून तो आपल्या अंमलाखालीं आणण्याची हांव धरणें वेडे-पणाचेंच होईल. शिवाय शत्रू म्हणजे ब्रिटिशांसारखा जगभर पसरलेला !

अफगाणिस्तानला महत्त्व केवळ भौगोलिक रचनेमुळें प्राप्त झालें आहे. तेव्हां नेहमीं ' झांकली मूठ सवा लाखाची ' असेंच वर्तन ठेवणें तेथील राज्य-कर्त्यांस इष्ट आहे. अशा वृत्तीनें राहतील तरच शेजारचीं राष्ट्रें अफगाणांची खुशामत करतील. नाहीं तर एकदां किंमत कळली कीं मग कोण विचारतो ? बाजारांत आपली पत असते ती नेहमी तशीच ठेवावयाची किंवा वाढवावयाची असेल तर कधींही तिचा प्रत्यक्ष उपयोग करूं नये. जोंपर्यंत ती पत अनुप-भुक्त आहे तोंपर्यंतच तिची थोरवी. तिच्यावर विश्वासून कर्ज काढण्यास एकदां सुरुवात झाली, कीं पहिल्या ऋणाबरोबरच पत उतरेल. तीच बाब आंतरराष्ट्रीय पतीसंबंधानें अफगाणिस्तानला लक्षांत ठेवली पाहिजे. बुद्धि-बळाच्या डावांत राजा सहसा कोणावरही चाल करून जात नाहीं. राजास मार्गे ठेवून मोहरीं किंवा प्यादीं पुढें ढकलणें व त्यांस राजाकरवीं जोर देणें हेंच योग्य ठरतें. अफगाणिस्तानच्या राजाला बुद्धिबळाच्या डावांतील राजा म्हणतां येईल. अफगाणिस्तान कोणतीही चढाईची हालचाल करीत नाहीं तोंवरच इंग्लंड काय किंवा रशिया काय, अफगाणिस्तानांत लक्ष घालील. स्वतःचें घर संभाळून व्यवस्थितपणें राहणें व परक्यांच्या भुलथापांना बळी न पडणें हेंच अफगाणि-

स्तानचें योग्य कर्तव्य आहे. देशाक्रमणाची इच्छा असणें वाईट नसलें तरी योग्यता असल्याविना त्या इच्छेचा काय उपयोग होणार आहे ? अफगाणिस्तानच्या राष्ट्रीकरणास आरंभ होऊन अजून दोन शतकेंही पुरीं झालीं नाहींत. त्यांना धड ना इतिहास, ना संस्कृति, ना परंपरा. मग त्यांची आक्रमणाची इच्छा पुरी व्हावी कशी ? शेजारीं एका बाजूस रशिया, दुसऱ्या बाजूनें इराण, आणि हिंदुस्थानकडे अट्टल कारस्थानी इंग्रज, अशांनीं वेढलेल्या जागीं अफगाणांना मुलुख कसा मिळावा ? नुसती आपली जय्यत तयारी ठेऊन इतर शेजाऱ्यांना आपली हांजी हांजी करण्यास अफगाणिस्तानास भाग पाडतां येईल. व याच परिस्थितीचा फायदा घेऊन अफगाणिस्तानास आपली उन्नति करून घेतली पाहिजे. या सर्व बाजूंनीं विचार केल्यास हबीबुल्लानें स्वीकारलेलें धोरण युक्त दिसतें. मात्र अमिरानें इतक्या गोष्टींचा विचार केला होता कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. चुकूनदेखील कधीं कधीं योग्य आचरण घडतें तशांतलीच ही गोष्ट असावी.

हबीबुल्लाला राज्यकारभाराची मुळींच आवड नसावी असें दिसतें. प्रथमपासूनच त्याचा कल ललितकलांकडेच विशेष होता. फोटोग्राफीचा तर त्यानें अभ्यास केला असून संगीत आणि चित्रकला यांतील गुणग्राहकता त्याचे आंगीं होती. आपण अमीर—राजे—तेव्हां राजदरबारांतील शिस्त व निर्बंध बिनचूकपणें पाळले जावे असा त्याचा कटाक्ष असे. एखादी क्षुल्लक बाबही राजसभेच्या निर्बंधांपैकीं तो विसरत नसे. पोषाखाच्या बाबतींत तर तो जसा कांहीं नुकताच विलायतच्या "बोटीवरून उतरला" आहे असें वाटे. घरच्या बायकामुलांनाही त्यानें युरोपियन वेष दिले होते आणि बदलत्या फॅशनचे कपडे जनानखान्यांतील स्त्रियांना घालून त्यांचेकडे कौतुकानें पहात राहण्यांत त्याचे तासनूतास निघून जात असें म्हणतात. शिकारीची हौस त्याला होती, पण अगदीं आवडीची करमणूक म्हणजे स्वयंपाक करण्याची ! राजेसाहेबांना सर्वतोपरी अयोग्य अशी आवड असेल तर ती हीच. इतर कोणतेही गुण कसे तरी क्षम्य ठरले असते; पण सर्व प्रजेचें पालन करणाराला पाकशास्त्रसंपन्न व्हावें असें वाटणें हें अत्यंत विचित्र. राजकारणी आखाड्यांत "बुद्धिबला"चे डाव खेळण्याचें सोडून एखादा राजा चूल मांडूं लागला, तर त्याचें कौतुक दरबारच्या भाटांनीं आणि खुषमस्कऱ्यांनींच करावें.

---

## प्रकरण सहावें

# अमीर अमानुल्ला : तिसरें अँग्लो-अफगाण युद्ध

**६१. अमानुल्लाची प्रतिज्ञा :—** हबीबुल्लाचा खून झाल्याची बातमी अमानुल्लाला कळतांच त्यानें आपण अमीर होण्याचें ठरविलें. त्याची आई मोठी धोरणी, महत्त्वाकांक्षी आणि कारस्थानी बाई असून अमानुल्लाची योग्यता तिनें ओळखली होती. म्हणूनच अमानुल्लास तिनें अमीरपद बळकावण्यास उद्युक्त केलें असावें असें म्हणतात. दुराणी लोकांवर तिचें फार वजन असल्यानें व दरबारी कामकाजाची तिला माहिती होती म्हणून अमीरउमराव व इतर मंत्री यांचीं मनें तिनें अमानुल्लास अनुकूल करून घेतलीं. त्यांनींही अमानुल्लानेंच अमीर व्हावें असें ठरविलें. इतक्यांत घोड्यावर स्वार होऊन अमानुल्ला लष्करी ठाण्यावर गेला आणि सर्व फौज जमवून त्यानें तेथें एक परिणामकारी भाषण केलें. डोळ्यांत आंसवें आणून त्यानें आपल्या परमपूज्य पित्याचा कपटघात झाल्याचें वर्तमान हजर असलेल्या सर्व सैनिकांस सांगितलें आणि मोठ्या कारुणिक वाणीनें "आतां काय करावयाचें ?" असा प्रश्न त्यानें श्रोत्यांस केला. वेळच मोठी आणीबाणीची. मृत्यूचा प्रसंग, अश्रूंनीं डबडबलेले डोळे आणि मृत अमिराचा मुलगा "काय करूं ?" असें आपणांस विचारतो, तेव्हां कोणतीं अंतःकरणें विरघळून जाणार नाहींत ? अफगाण क्रूर असले तरी ते लवकर विकारवश होतात. अमानुल्लाचें कारुण्यपूर्ण बोलणें ऐकून एकमुखानें सैनिकांनीं उत्तर दिलें:—

"आपले वडील आपणांला सोडून गेले. तशीच आमचीही गत झाली
" आहे. त्यांच्या आत्म्याला शांति मिळो ! अतःपर आपणच आमच्या
" पितृस्थानीं आहांत; आमचे अमीर व्हा आणि आमचा सांभाळ करा."

झालें ! लोकांस खूष करण्यासाठीं अमिरानें पगारांत बढती जाहीर केली; त्यांचे आभार मानले; पूर्वी १२ रुपये पगार असे तो २० पर्यंत वाढविला. मग सैनिक खुशालले तर आश्चर्य कसचें ?

" वडिलांचा खून करणारा इसम सांपडल्याविना आणि ब्रिटिशांच्या
" दास्यांतून अफगाणिस्तान मुक्त केल्याशिवाय ही माझी समशेर मी म्यान
" करणार नाहीं "

अशी नंगी तलवार हातीं घेऊन सैनिकांपुढें प्रतिज्ञा करून अमीर निघून गेला.

**६२. इतर वारसांची निल्हवाट** :—पूर्वीच्या समजुतीप्रमाणें अमानुल्लाचा काका, नासिरुल्लाखान, गादीवर यावयास पाहिजे होता. पण हबीबुल्लाचे मृत्यूच्या वेळीं तो जलालाबादेस होता. अमानुल्लाचा भाऊ इनायतुल्लाखान म्हणून होता. त्यानेंही आपण अमीर आहों असें प्रथम जाहीर केलें होतें. म्हणजे एका गादीसाठीं **अमानुल्ला, नासिरुल्ला** आणि **इनायतुल्ला** असे तीन उमेदवार पुढें आले प्रत्येकाचा हक्क आपापल्या परीनें रास्त होता. कारण जेथें परंपराच मुळीं नाही तेथें वारस खरा कोण हें ठरवावयाचें तरी कसें ? " ज्याच्या हातीं सत्ता तो पारधी " हा न्याय त्या प्रदेशांत नेहमीं लागू पडत असल्यानें जो गादी बळकावूं शकेल व इतरांना गप्प बसवील, तोच अमीर म्हणावयाचा !

जलालाबादेस मृत अमिराचे दफनविधी चालू असतांना इनायतुल्लानें आपल्या काकासाठीं अमीरपदाचा हक्क मागें घेतला. पण अमानुल्लाचा निश्चय कायमच होता. जलालाबादेस असणाऱ्या शिपायांना अमानुल्लानें काबूलच्या सैन्यास पगारवाढ दिली अशी बातमी कळतांच त्यांनींही अमानुल्लाचाच पक्ष घेण्याचें ठरविलें. शिवाय हबीबुल्लाच्या मारेकऱ्याचा तपास लागला नसल्यानें राजवंशांतील हजर मंडळींचे त्यांत अंग असावें असा संशय त्यांना येऊं लागून तेथील राजपुत्र व इतर आप्तवर्ग यांचेविषयीं त्यांचें मन कलुषित झालें. लगेच त्यांनीं एकमतानें काबूलला निरोप पाठविला. "आम्ही अमीर अमानुल्लांनाच मानतों, नासिरुल्ला, इनायतुल्लांना आम्ही जाणीत नाही." असें कळवूनच ते थांबले नाहींत, तर त्यांनी अमानुल्लाला विरोध करणारे जे पुढारी होते त्या सर्वांना बंदिस्त करून नव्या अमिराच्या आज्ञेची ते वाट पहात राहिले. यावरून अमानुल्ला प्रथमपासूनच अत्यंत लोकप्रिय होता असा मात्र कोणी तर्क काढल्यास तो चुकीचा ठरेल. हें आनुकूल्य अमानुल्लास मिळण्याचें कारण स्वतः अमीर नव्हे,

तर त्याच्या छापाचे चांदीचे तुकडे मिळणार हें होय ! १२ रुपयांच्या ऐवजीं वीस मिळणार अशी त्यांना आशा लागली. अफगाणांना पैशाची विशेष हांव आहे. अमानुल्लानें वीस रुपये देण्याचें जाहीर केलें तसेंच तिसरा उपटसुंभ येऊन त्यानें विसाचे एकवीस केले असते तर सर्व सैनिक त्याच त्रयस्थाला मिळाले असते !

**६३. ब्रिटिशांना पहिली सलामी :**—अमानुल्ला गादीवर आला. इतर लोकांची, सैन्याची आणि अमीर सरदारांचीही त्यालाच मदत असल्यानें त्याचा काका नासिरुल्लाखान व वडील बंधु इनायतुल्ला यांनीं आपापले हक्क परत घेतले व विरोधकांनींही अमानुल्लाच्या अमीरपदास मान्यता दिली. गादीवर येतांच त्यानें शेजारच्या इंग्रजसिंहाच्या दाढीमिशा उपटण्यास प्रारंभ केला. ता. ३-३-१९१९ रोजीं त्यानें व्हाइसरॉयांचे नांवें एक खलिता पाठविला. त्यांतील मुख्य भाग असा:—

" ...... अफगाणिस्तानांतील जनतेनें मला अमीर व राजा म्हणून
" मानिलें आहे. आपणांमधील मागील स्नेहसंबंध लक्षांत घेतां—हा स्नेह
" भावी काळांतही कायम राहील—माझ्या दोस्ताला हें कळविण्याचा मोठा
" मान मजकडे घेणे भाग पडलें. ......
" आपणा दोघांतील दोस्ती टिकावी म्हणून जे कांहीं तह किंवा करार
" करावे लागतील ते करण्यास आमचें स्वतंत्र अफगाण सरकार सर्वकाल
" सिद्ध आहे हें आमच्या दोस्तानें नजरेआड करूं नये. इंग्लंडच्या बल-
" शाली सरकारशीं केलेले हे तह अथवा करार व्यापाराला उपयोगी पड-
" तील अशासाठीं व दोन्ही सरकारांना फायदेशीर असेच असतील. " ‡

**६४. अफगाण स्वातंत्र्याचा जाहीरनामा:**—त्याच सुमारास अमिरानें एक जाहीरनामा अफगाण जनतेंत वांटण्यासाठीं काढला. त्याचा मात्र कांहींही उल्लेख व्हाइसरॉयांच्या पत्रांत केला नाहीं. इंग्रजांचा गुमास्ता काबुलीं होताच. त्याचेकडून या अन्य उपायांनीं तो जाहीरनामा गव्हर्नर जनरलच्या हातीं येतांच लंडनमधील स्टेट सेक्रेटरीस तारेनें त्याचें भाषांतर रवाना झालें. त्यांतील महत्त्वाचा भाग असा:—

" हे स्वाभिमानी राष्ट्रा, अहो शूर सैनिकांनो !
" परमेश्वराची अशी कायमची इच्छा आहे कीं, आपल्या राष्ट्रावरील आपत्ति

‡ Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

" आणि जुलूम नाहींसा व्हावा व अफगाणिस्तानचें इतरांच्या लीलांपासून
" संरक्षण व्हावें. सैनिकांनो, सर्व देशानें जेव्हां माझ्या मस्तकीं अमिराचा
" मुकुट ठेवला तेव्हां दोन अटींवरच मी तो स्वीकारण्याचें स्पष्टपणें जाहीर
" केलें होतें. आपणा सर्वांचें माझ्या कार्यांत सहकार्य पाहिजे आहे. त्यासाठी
" मी ज्या अटी सांगितल्या होत्या त्यांचा सारांश पुनः सांगतों.
" हें राष्ट्र स्वतंत्र व्हावें. म्हणजे कोणाही व्यक्तीवर दुसऱ्या कोणांकडून
" कसल्याही प्रकारची सक्ती अथवा जबरदस्ती केली जाऊं नये. मात्र राज्या-
" धिकाऱ्यांचे लष्करी अथवा मुलकी कायदे नीटपणें पाळले पाहिजेत. ...
" अफगाणिस्तान हें अंतस्थ व बाह्य बाबतींत अगदीं स्वतंत्र म्हणजे इतर
" स्वतंत्र राष्ट्रांच्या तोडीचें रहावें.
" ...... याची पहिलीच तयारी म्हणून 'वेठ बिगारीची' पद्धति मी रद्द
" करितों. * —अमीर अमानुल्ला."

**६५. अमिराला चुचकारण्याची ब्रिटिशांची खटपट :—** व्हाइसरॉयांना अमिरानें पाठविलेल्या पत्रास उत्तर सुमारें ४० दिवसांनीं गेलें. दिल्ली व पेशावर यांमधील टपालाची सोय आधुनिक प्रकारची असल्यानें इतका अवधि कां लागावा हें समजण्यास तें पत्रच वाचलें पाहिजे. त्यांतील विषय वादग्रस्त नसला तरी उत्तरीं पत्र लिहितांना लाटसाहेबांस बरेंच डोकें खाजवावें लागलें असलें पाहिजे हें उघड आहे. कारण " आमचा जुना दोस्त " म्हणून इंग्रजांना अमीर संबोधितो त्याच पत्रांत " अफगाणिस्तान अंतस्थ व परराष्ट्रीय बाबींत स्वतंत्र झालें " असें जाहीर केलें आहे. अफगाणिस्तान स्वतंत्र याचा अर्थ इंग्रजांचें तेथील वर्चस्व नष्ट झालें असें असल्यानें, बाह्यात्कारीं स्नेहाचा आव आणून, पण वस्तुतः ब्रिटिशसिंहास त्याच्याशीं असलेलें आपलें बरोबरीचें नातें जाणविण्यासाठीं अमिरानें लिहिलेलें हें अपमानास्पद पत्र इंग्रजांना कितपत रुचलें व तें वाचून त्यांचे काय विचार झाले हें पाहिलें पाहिजे. अमिराचें पत्र व्हाइसरॉयांच्या हातीं पडतें न पडतें तोंच त्याच्या जाहीरनाम्याची नक्कलही त्यांना मिळाली, त्यावरून वारा कसा वाहतो हें तर कळून चुकलेंच. पण नव्या अमिराची पहिलीच " सलामी " कशी खुबीची होती हेंही त्यांच्या गळीं उतरलें.

---

* Parliamentary Papers: *III Afghan War, 1919.*

अबदुर रहमान किंवा हबीबुल्ला यांपेक्षां अमानुल्लाचें पाणी अगदीं निराळेंच होतें, हें चाणाक्ष ब्रिटिश मुत्सद्यांच्या मनांत बिंबण्यास अर्थात्च अवधि लागला नाहीं.

आतां व्हाइसरॉयांचें अमिरास उत्तर पहा.

" ...... आपल्या पूर्वापार चालत आलेल्या स्नेहास अनुसरून-तो
" स्नेहभाव पुढेंही तसाच राहील-आपण पाठविलेली माहिती वाचून समा-
" धान वाटलें. अमीर अबदुर रहमानांनीं ठरविलेल्या आणि अमीर हबी-
" बुल्लांनीं मानलेल्या करारमदारांवरच हा आपला स्नेहसंबंध अवलंबून
" आहे. तुमचें पत्र आलें त्यावरून मी असें समजतों कीं, अफगाणिस्तानचें
" सरकार आजपर्यंत वागत आलें तसें पूर्वींच्याच करारमदारांप्रमाणें वागण्यास
" तयार आहे. " ¶

ता. १३ एप्रिल १९१९ रोजीं अमिरानें काबूलमध्यें दरबार भरविला आणि अफगाणिस्तान सर्वतोपरीनें स्वतंत्र असल्याचें जाहीर केलें. "अफगाण-स्वातंत्र्य-दिन " म्हणून दरवर्षी हा समारंभ साजरा होत असे.

**६६. अफगाणांची मनःस्थिति :**—युद्धकालीन परिस्थितीनें व विशेषतः तुर्कस्तानच्या हलाखीनें अफगाणांच्या मनांत लढाईचें वारें कसें शिरलें होतें आणि इंग्रजनिष्ठ अमिरानें त्यांच्या फुरफुरणाऱ्या बाहूंना बंध कसे घातले हें आपण पाहिलें आहेच. नवा अमीर गादीवर येतांच त्यानें प्रथमतः इंग्रजांचा सासूबाईपणा झुगारून दिला आणि अफगाणिस्तान स्वतंत्र आहे असें जाहीर केलें. स्फुरण पावणाऱ्या बाहूंचीं बंधनें तुटलीं इतकेंच नव्हे तर, अधिक स्फुरण येईल अशीं भाषणें व कालस्थिति आली. युद्धासाठीं प्रत्येक अफगाण बद्धपरिकर झाला. फक्त अमिराच्या हुकुमाचाच काय तो अवकाश होता.

इंग्रजांचा परराष्ट्रीय बाबतींतला वरचष्मा झुगारून दिल्याबरोबर अमानुल्लानें रशियाकडे एक मंडळ रवाना केलें. अपमान झालेला सिंह गर्जना करून कदाचित् हल्ल्याचा आव आणील ही भीति होती, म्हणून हिंदुस्थान-कडील सरहद्दीची डागडुजी व बंदोबस्त त्यानें चालविला. रक्षक वगैरे नवे विश्वासु अधिकारी नेमले. कारण अफगाणप्रांतीं राजनिष्ठा वा स्वामिनिष्ठा—आपल्याकडे पाळतात तितक्या कडक रीतीनें—पाळली जात नाहीं. राजाच मुळीं एका घराण्यांतला नेहमीं नसतो. मग स्वामिनिष्ठा तिकडील लोकांना अजिबात

¶ **Parliamentary Papers :** *III Afghan War, 1919.*

ठाऊक नसली तर कसलें आश्चर्य ? नवा अमीर पदारूढ झाला कीं, त्याला सर्व मुख्यमुख्य अधिकारी आपल्या विश्वासांतलेच नेमावे लागत. आणि त्या दृष्टीनें हिंदुस्थानकडील सरहद्दीचें महत्त्व व बिघडलेली परिस्थिति लक्षांत घेतां त्या दिशेस बंदोबस्त करणें क्रमप्राप्तच होतें.

**६७. हिंदुस्थानांतील तत्कालीन खळबळ :—जालियनवाला बाग प्रकरण व रौलॅट** ॲक्टविरुद्ध हिंदी जनतेनें केलेली चळवळ हीं हिंदुस्थानांत जोरानें चालू असतांनाच अमानुल्ला अमीर झाला. त्याचे हस्तक हिंदुस्थानांत आले होते, किंवा तत्पूर्वी हिंदी मुसलमानांनीं हिंदुस्थानवर स्वारी करण्याची विनंति अफगाणाधिपास केली होती तें निश्चितपणें ठरविण्यास पुरावा हातीं नाहीं. पण त्यांच्या कित्येक (बे) जबाबदार पुढाऱ्यांनी–अर्थात् त्यांच्या मनांत दिल्ली ही इस्लामी सम्राटाची राजधानी असावी अशी आकांक्षा उद्भवली होती–अमानुल्लाला हिंदुस्थानवर आक्रमण करण्यास पाचारण केलें होतें, ही गोष्ट खरी ! अमानुल्लानें खडा टाकून पाहण्यासाठीं आपले गुप्त वकील हिंदुस्थानांत रवाना केले. इंग्रजांविरुद्ध लोकमत किती तीव्र आहे याचा आणि अफगाण अमिरास तें अनुकूल आहे कीं कसें याचाही बारकाईनें छडा लावण्याचें काम त्यांचेकडे सोंपविलें होतें. पंजाबांतील **डायर-ओड्वायर** यांच्या अविस्मरणीय प्रतापांमुळें हिंदी जनता प्रक्षुब्ध झाली होती. त्या वेळीं हिंदी राजकारणाच्या आखाड्यांतील अद्वितीय मल्ल **लोकमान्य टिळक** स्वर्गवासी झाल्यानें असहकार चळवळीस जोर आला होता. आणि जनतेचा जुना पुढारी एकाएकीं नाहींसा झाल्यानें महात्मा **गांधींस** एकदम अग्रेसरत्व दिलें गेलें. खिलाफतीच्या नव्या स्वरूपानें मुस्लीम जनता फारच चिडली होती आणि हिंदुमुसलमानांची एकी ही इंग्रजसरकारला पाहवेना इतकी दृढ झाली होती. काबूलला जाणाऱ्या व्यापारी काफिल्यांनीं हिंदुस्थानांतील परिस्थितीचें–विशेषत: जनतेंतील असंतोषाचें–रसभरित **वर्णन** अफगाण प्रजेस सांगितलें.

**६८. मुसलमानी पुढाऱ्यांचीं मनोराज्यें :—**प्रचलित राज्यपद्धतीविरुद्ध एकाद्या प्रजेंत असंतोष माजला, म्हणजे शेजारच्या शत्रूंना आक्रमण करण्याची ती योग्य संधीच होय ! त्यांत कांहीं मुसलमानांनीं एकीकडे हिंदु लोकांच्या गळ्यांत 'भाई' म्हणून गळा घालून अंतस्थ रीत्या 'मुस्लीमस्थाना'चीं मनोराज्यें चालविलीं. "तुम्ही याच वेळीं हिंदुस्थानवर स्वारी करा–द्रव्य आणि

मनुष्यें देऊन आम्ही तुम्हांस कुमक करूं–लोक सर्वत्र बिथरले आहेत. दिल्लीच्या तख्तावर तुम्ही कधीं बसाल, आणि आम्ही तुम्हांस * ' पांच कुर्निसात आणि सात सलाम ' केव्हां करूं असें झालें आहे." अशा अर्थाचीं कितीतरी पत्रे हिंदुस्थानांतील मुसलमानांकडून गेलेली काबूलमधील भावी इतिहाससंशोधकांस मिळतील. अमिरानें आपले हस्तक हिंदुस्थानांत पाठविले होते त्यांनीं कांहीं चौकशी केली; कांहीं पुढाऱ्यांच्या गांठीं घेतल्या; सैनिकांची नाडी तपासली; पण हिंदी मुस्लीमांइतकी अंध दृष्टि त्यांची झालेली नव्हती. त्यांनीं आपलें मत–हिंदुस्थानांतील वास्तविक परिस्थिति–तिकडे लिहून कळविली. पण......

**६९. युद्धाला तात्कालिक कारण :**—पेशावर येथें अफगाणांचा एक पोष्टमास्तर होता. त्यानें बराच उपद्व्याप केला. हिंदुस्थानांत जो असंतोष पसरला होता. तो पंजाबमध्यें विशेष असल्यानें त्याचीं तिखटमीठ लावून केलेलीं वर्णनें तो काबूलला पाठवीत असे आणि "या–या" "हीच वेळ आहे" "अशी संधि पुन: यावयाची नाहीं" इत्यादि प्रकारें पत्रें लिहून अफगाणांच्या तोंडाला पाणी सुटेल अशी त्यानें कामगिरी चालविली.

या पोष्टमास्तरच्या पत्रांमुळें, का अमानुल्लाच्या शिकवणीनें, का स्वयंप्रेरणेनें कोण जाणे, **झरशहा** नामक एक पठाण जलालाबाद–पेशावर यांमधील प्रांतांतील स्वतंत्र रानटी लोकांना "इंग्रजांविरुद्ध लढा" असा उघड उपदेश करीत भटकत होता. अमिराच्या शिक्क्याचीं कांहीं फर्मानेंही त्याच्याजवळ सांपडलीं असें म्हणतात. "आपण आतां स्वतंत्र झालों आहों, इंग्रजांना मानतां कशाला? त्यांना आपण मागें कसें चिरून काढलें?" इत्यादि प्रकारचें इंग्रजांच्या दृष्टीनें मित्रद्रोही पण अफगाणांच्या दृष्टीनें स्वदेशप्रीतीचें वारें रानटी लोकांत तो पसरवीत होता. इंग्रजी हेरांनीं तत्संबंधीं बातमी सरकारास कळविली तेव्हां व्हाइसरॉयांनीं अमिरास लिहून झरशहाला कैद करा असें फर्माविलें. पण अमीर हबीबुल्लाचे जागीं आतां अमीर अमानुल्ला आला होता. त्यानेंही लांबलचक खलिता पाठवून सूचना मान्य करण्याचें नाकारिलें. अफगाणिस्तानला नरम आणलेंच पाहिजे या ईर्षेनें इंग्रजांनीं चढाईची तयारी चालविली.

---

* मुसलमानी पद्धतिप्रमाणें तख्ताला अथवा तख्तनशीनाला "पांच कुर्निसात आणि सात सलाम" करावयाचे असतात. भूमीपर्यंत मस्तक लववून वंदन करणें म्हणजे कुर्निसात करणें. सलाम तर सर्वांच्या परिचयाचा आहेच.

**७०. तिसऱ्या अँग्लो-अफगाण युद्धाची सुरुवात :—** अमानुल्लाच्या वर्तनामुळें प्रथमपासूनच इंग्रजांना वैषम्य वाटूं लागलें होतें. त्यांत त्याच्या भाषणांचे, जाहीरनाम्यांचे व इतर हालचालींचे रिपोर्ट येत, त्यानें भर पडे. सरहद्दीकडे सैन्याची हालचाल काय हेतूनें अमानुल्लानें चालविली आहे याची चौकशीही न करितां ती हिंदुस्थानवर हल्ला करण्याच्या तयारीचीच आहे अशी गैरसमजूत करून घेऊन व आपल्या सैन्याला तयार राहण्यास हुकूम सोडून व्हाइसरॉयसाहेबांनीं अफगाणिस्तानविरुद्ध लढाई जाहीर केली. एकदां संशयानें दृष्टि बिघडली कीं, कावीळ झालेल्या माणसाप्रमाणें सर्वच जग पिवळें दिसूं लागतें. अमीर आपल्या हातांतला सुटला ही भावना होतांच, आतां तो रशियनांच्या तंत्रानें चालणार–हिंदुस्थानवर स्वारी होणार–आपल्या एवढ्या अवाढव्य साम्राज्यांतील महत्त्वाच्या देशाला धक्का पोहोंचणार–आपली इभ्रत आंतरराष्ट्रीय व्यवहारांत कमी होणार, इत्यादि भीतिजन्य कल्पनांनीं साम्राज्यवादी मुत्सद्यांच्या मनांत खळबळ उडवून दिली. या कल्पना वस्तुस्थितीला धरून आहेत की नाहींत, इतकें द्रव्यबळ, मनुष्यबळ, किंवा युद्धसामग्री अमिरानें कोठून जमविली, आपल्या सैन्याच्या शिस्तीपुढें आणि सुधारलेल्या विध्वंसकांपुढें अमिराचा पाड किती, याचा लष्करी अदमास न करितां केवळ कल्पनेचाच खेळ माजवून हिंदी सरकारनें युद्ध पुकारण्याची घाई केली. हिंदुस्थानांत त्या वेळीं महायुद्धासाठीं **मेसापोटेमिया, आफ्रिका** इकडे जाऊन आलेले सैनिक परत "घरीं" जाण्यासाठीं उत्सुक होऊन बसले होते. त्यांनाच शेवटीं वायव्य सरहद्दीवर न्यावें लागलें. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें निर्वाणीचा खलिता किंवा दरबारी भाषेंत खुलासा न विचारतां हिंदुस्थानसरकारनें युद्ध पुकारलें ! या बाबतींत इतकेंच लक्षांत ठेवावयाचें आहे कीं १९१९ चें तिसरें अफगाण युद्ध पुकारतांना इंग्रज अधिकाऱ्यांनींच प्रारंभ केला आहे ! पहिली गोळी इंग्रज बंदुकींतूनच ९ मे १९१९ रोजीं निघाली. ‡

**७१. तीन युद्धक्षेत्रांवरील परिस्थिति :—** आपणांवर गोळी चालली तेव्हां स्वसंरक्षणासाठीं तरी प्रत्युत्तर देणें आवश्यक होतें; म्हणून अफगाणिस्तानच्या अधिकाऱ्यांनींही युद्धास तोंड दिलें. **जलालाबादे**कडून खैबर घाटांत, वझिरिस्तानांतून **पाराचिनार, थळ** या बाजूस आणि बलुचिस्तानांत

‡ **Toynbee** : *Survey of International Affairs, 1920–23.*

**चमन-क्वेट्टया**च्या रोखानें हल्ला करण्यास अफगाणांचे तीन सेनाधिकारी तयार होते. ब्रिटिशांनीं आपली शक्ति खैबर घाटांत जास्त एकवटली होती. त्यांना कदाचित् अफगाणांची त्या बाजूस तयारी नसावी हें अगोदर कळलें असावें. कारण, नेमक्या कमजोर भागावर हल्ला करण्याचें हें काम काकतालीय न्यायानेंच घडून आलें असें मानतां येत नाहीं. अफगाणिस्तान युद्धाची तयारी करीत असावें; नाहीं असें मुळींच नाहीं. पण अमिराला पूर्ण तयारी करण्यास अवसर न देतां त्याचा पराभव करणें हेंच लष्करी दृष्ट्या ब्रिटिशांस हिताचें झालें असतें. आणि तेंच त्यांनीं अर्धवट केलें. " अर्धवट " कां म्हटलें हें पुढें कळेल. पेशावरमार्गें निघालेलें इंग्रज सैन्य खैबर घाटांतून पुढें **डाक्या**पर्यंत गेलें. व अफगाणांचा पराभव होऊन डाका इंग्रजांचे ताब्यांत देखील आलें. विमानांचा उपयोग करून अफगाणांचा तोफखाना–त्यांत फक्त दोनच तोफा होत्या–इंग्रजांनीं थंड पाडला! काबूल व जलालाबाद येथें विमानांतून बाँब टाकून अफगाणांना घाबरविण्याचें पुष्कळ कामही इंग्रज विमानांनीं केलें! पुढें जलालाबादही हस्तगत करावें अशी इंग्रजांची इच्छा होती, पण वाहतुकीच्या साधनाभावीं ती सफल झाली नाहीं. त्या वेळीं खैबर घाटांत रेल्वे नव्हती. इंग्रज अधिकारी डाक्यास तळ देऊन राहिले. शीख पलटणींचा या युद्धांत खैबर घाटांत उपयोग केला होता.

वझिरिस्तानकडे अफगाण सेनापति **नादिरखान** ( हल्लीं अफगाणिस्तानचा अमीर ) होता आणि त्यानें इंग्रजांचा पराभव करून **थळ**पर्यंत अघाडी मारली होती. बलुचिस्तान कडील **कुदुसखान** यानें तर चमन अगदीं काबीज करण्याचा आव आणला होता! इंग्रजांनीं बगलेच्या बाजूनें सरहद्दीवरील एक अफगाण खेडें हस्तगत केलें तरी तिकडे त्यानें लक्षच दिलें नाहीं. चमनच्या रोखानें कुदुसखानाचा मारा चालू होताच.

**७२. युद्धाची हौस थोडक्यांत फिटली :**—अशी परिस्थिति होती तरी काबूलमध्यें अमिराला आपणांवर इंग्रजांनीं युद्ध कां पुकारलें, लेखी खलिता वगैरे न पाठवितां एकदम हल्ला कां झाला, याचें कारण ठाऊक असलें तरी कारवाईला निमित्त मिळालें! शिवाय अफगाणांच्या भ्रामक कल्पना होत्या त्या खऱ्या ठरल्या नाहींत. हिंदुस्थानांतून बंडें झाल्याची बातमी येईल अशी वाट पाहणारे अफगाण कमी नव्हते. परंतु सर्वांचीच अटकळ चुकली! हिंदुस्थानांतील लोक आपणांस साहाय्य करणार, या आशेनें अफगाण लढाईला उद्युक्त

झाले आणि रशियनांच्या चिथावणीनें अफगाण हिंदुस्थानावर हल्ला करतील या भीतीनें इंग्रजांचें धाबें दणाणलें! पण दोन्हीही राष्ट्रांची ही कल्पना निराधार–सर्वस्वीं नसली तरी बव्हंशीं–होती हें खास.

विमानांतून बाँबचा मारा झाल्यानें आणि एका वेळीं तीन रणभूमी झुंजविण्याची जबाबदारी पडल्यानें अफगाणांना काय करावें हें सुचेना. लुटारूपणांत किंवा वाटसरूंना लुबाडण्यांत वा दरोडे घालून ज्ञातिज्ञातींतील कलह वाढविण्यांत त्यांचा हात धरणारे लोक दुसरे कोणी आढळणार नाहींत ही गोष्ट खरी असली, तरी एकाच वेळीं तीन ठिकाणीं शत्रूंशी सारखें तोंड देत राहणें त्यांना साधणार कसें? त्यांच्याजवळ दारुगोळा इतका भरपूर असणार कोठून? अफगाणिस्तानांत युद्धसामग्रीचा पुरवठा व्हावा कसा? रशियाकडून त्या वेळीं अशा दारुगोळ्याची अपेक्षा करणेंच मूर्खपणाचें ठरलें असतें. कारण राज्यक्रांतीच्या धडपडींतच तें सबंध राष्ट्र गुरफटलेलें होतें. त्यास इतक्या दूरच्या अफगाणांना, ते केवळ इंग्रजांविरुद्ध लढतात म्हणून सहाय्य करणें मनांत असलें तरी शक्य नव्हतें. काबूलमध्यें व अन्यत्र गोळ्यांचे कारखाने होते खरे. पण त्यांची उडी किती असणार? जर्मनीनें गेल्या महायुद्धासाठीं तयारी किती तरी वर्षांपासून चालविली होती हें लक्षांत घेतां, अशा तुटपुंज्या सामग्रीच्या जोरावर अफगाण लढूं लागले ही कौतुकाची बाब का वेडेपणाचें प्रदर्शन हें कळेनासें होतें!

**७३. युद्ध लवकर थंडावण्याचीं कारणें :**—अफगाणांना लढाई अशी गेल्या ४० वर्षांत ठाऊक नव्हती. तेव्हां इंग्रजांशीं वैरभावानें राहिलेली व इंग्रजांच्या युद्धनीतीस तोंड दिलेली अशी पिढी १९१९ सालीं अफगाणिस्तानांत कशी असणार? आणि असली तरी "वृद्धांकडे" कोण पाहणार? अफगाणांची युद्धपद्धति नेहमींची गनिमी काव्याची. त्यांचे आंगीं समोरासमोर राहून लढण्याचें कौशल्य आणि सामर्थ्य नाहीं. त्यांच्या सेनानींना शिस्तबाज शिपायांशीं लढतांना काय हिकमती योजाव्या लागतात याची कल्पना नाहीं. इंग्रजांच्या लढाईच्या खुब्या ओळखणारा कोणी वृद्ध सल्ला देणारा नाहीं. उलटपक्षीं, जर्मन युद्धांत अनेक ठेंचा खाऊन वस्ताद झालेले आणि मुरलेले सेनाधिकारी इंग्रजांकडे होते, त्याची कल्पनाही अफगाणांना नव्हती. विमानें तर तत्पूर्वी अफगाणांनीं पाहिलींही नसावींत. युरोपियन युद्धांत त्यांचा उपयोग मनस्वी झाला इतकेंच त्यांनीं ऐकलें असावें. अशा विषम परिस्थितींत इंग्रजांशीं लढण्यांत अफगाणाधिपानें अदूरदृष्टि

दाखविली असें म्हणावें लागतें. परंतु त्याचाही कांहीं इलाज चालण्यासारखा नव्हता. तो प्रजानुरंजनी राजा पडला !

अशा परिस्थितींत लढाई फार दिवस चालली नाही. अफगाण रणांगणांवर दारुगोळ्याची टंचाई भासूं लागली. इकडे इंग्रजांच्या सैनिकांस सरहद्दीवरील प्रखर उन्हाळा होरपळून काढीत होता. त्यांनाही आतां लढण्याची हौस कांहीं उरली होती अशांतला प्रकार मुळींच नव्हता जगज्जिगीषु जर्मनीनें युद्ध खेळ-ण्याची इच्छा पूर्णपणें तृप्त होईपर्यंत सर्व दोस्तांशीं सामना दिल्यानें, लढाई संपून विश्रांति कधीं मिळेल, असेंच मुत्सद्यांना व योद्ध्यांनाही वाटत होतें. तेव्हां अफगाणिस्तानवर फार चढाई न करितां ते स्वस्थ राहिले.

**७४. युद्धाला प्रारंभ कसा झाला ? :—** इकडे अमानुल्लानें तहाचें बोलणें लावलें ! म्हणजे आमच्यावर तुम्ही हल्ला कां केलात असा खुलासा हिंदुस्थानसरकारला विचारला. १४ मे १९१९ रोजीं युद्ध थांबविण्याची पहिली विनंति आली. लष्करी सांप्रदायांत बोलावयाचें तर अफगाणांनीं पांढरें निशाण दाखविलें असें म्हणतां येईल. परंतु, एवढ्यावरून गाफील राहण्याइतके इंग्रज सेनानी दुधखुळे नव्हते. अफगाणांना सत्याची चाड, शब्दाची किंमत किंवा वचनाचें महत्त्व कितपत कळतें आणि त्यांच्यावर विश्वास किती ठेवावयाचा हें त्यांना इतिहासावरून कळून चुकलें होतें. प्रत्यक्ष लढाई थांबविली तरी सदैव सिद्ध असेच ते राहिले !

अमिराच्या पत्राला लढाई सुरू कशी झाली यासंबंधीं खुलासा करितांना व्हाइसरॉयांनीं उत्तर दिलें कीं, "झरशहाला कैद करण्यास तुम्हांस सांगितलें असतां तुम्ही कैद केलें नाहीं, म्हणून आम्हांला कडक उपाय योजावे लागले." अमिरानेंही याला स्पष्ट भाषेंत स्वाभिमानपूर्वक उत्तर दिलें. व्हाइसरॉयांनीं अमिराचें तें पत्र स्टेटसेक्रेटरीस तारेनें पाठविलें ( २३-५-१९१९ ). उत्तर वाचनीय आहे:—

"झरशहाला पकडण्याविषयीं आपण लिहितां, पण मला या वेळीं
" तसें करतां येत नाहीं, हें कळविण्यास खेद वाटतो. हिंदुस्थानांतील सर्व
" प्रजानन–हिंदु व मुसलमान–तेथील सरकारनें लादलेल्या दडपशाहीच्या
" कायद्यामुळें क्षुब्ध झालेले आहेत आणि आमच्या थोर राज्यांतील प्रजा-
" जनांना–हिंदु व मुसलमानांनाही–त्यांच्याविषयीं सहानुभूति वाटते. विशे-

" षत: सरहद्दीवरील लोकांना तर त्यांविषयीं फारच आपलेपणा आहे.
" धर्माचें साधर्म्य तर त्याला कारण आहेच, पण निकटवास हेंही एक
" कारण या सहानुभूतीच्या बुडाशीं आहे. त्यामुळें हिंदी बंधूंना जाऊन
" मिळावें, त्यांच्या दुःखांत अंशतः भागी व्हावें अशी आमच्या प्रजाजनांची
" इच्छा असतांना अशा प्रसंगीं झारशहाला कैद करणें इष्ट तर नाहींच, पण
" तें शक्यही नाहीं !......अफगाणांच्या रानटी जातींत जागृति करण्याचा
" माझा हेतु व्हाइसरॉयांना वाटतां तसा मुळींच नाही. त्यांनीं संघटित होऊन
" परस्परांच्या सहाय्यानें स्वतःच्या देशाचा कारभार नीटपणें पाहून स्वातंत्र्य
" भोगावें, भावी परचक्राच्या वेळीं अफगाणिस्तानची सरहद्द उत्तम प्रकारें
" राखून अफगाण राष्ट्राचें संरक्षण करावें आणि सीमाप्रांतांत शांतता राखावी
" याच हेतूंस्तव माझी खटपट चालू आहे......
" अफगाणिस्तानची भौगोलिक व राजकीय परिस्थिति लक्षांत घेतां
" व्हाइसरॉयांनीं आमच्या सरकारचें स्वातंत्र्य पूर्णपणें मानावयास पाहिजे
" होतें. आमचे तुमचे दोस्तीचे तह होतील अशा आमच्या आशा पार लयास
" गेल्या म्हणून हजार वेळां खेद होतो ! आमचे जुने दोस्त (व्हाइसरॉय)
" मोठ्या सावधगिरीनें आणि दक्षतेनें वागून हे दडपशाही कायदे रद्द करतील
" आणि आमचें पूर्ण स्वातंत्र्य मानतील, तर आवश्यक असलेले तह आणि
" करारनामे करण्यास आम्ही तयार आहों. नाहीं तर जगांत दुःखें व आपत्ती
" माजतील. स्वतःच्या हक्काची मागणी करणें हें केव्हांही न्याय्य आहे आणि
" अन्याय्य कारणासाठीं रक्तपात करणें हें केव्हांही रास्त नाहीं. *

—अमानुल्ला."

**७५. अफगाण अमिराचा खुलासा :**—यावरून काय अंदाज करावयाचा ? लढाई करण्याचा बेत अमिराचा नव्हता कीं काय ? त्यानें तयारी न करतां एकदम हल्ला केला असेल हें संभवत नाहीं. परंतु तें कसेंही असो; लढाई सुरू झाली व पुढें लगेच ती बंदही करण्यांत आली. लढाई बंद करण्याचे हुकूम अमिरानें आपल्या तीनही सेनाधिकाऱ्यांस दिले व त्यांच्या नकला व्हाइसरॉयांकडे पाठविल्या आणि विनाकारण रक्तपात करण्याची इच्छा नसल्याचें कळविलें. मग युद्ध सुरू तरी कां झालें ? व पहिली गोळी कोणीं झाडली ?

---

* **Parliamentary Papers** : *III Afghan War, 1919.*

त्याची चर्चा दरबारी कागदपत्रांतून होऊं लागली. अमीर अमानुल्लाचें पुढील पत्र वाचूनच काय तो बोध होईल. व्हाइसरॉयांनीं हें पत्र येतांच ते स्टेट सेक्रेटरीकडे तारेनें धाडलें ( १–६–१९१९ ).

" खुद्द पेशावर येथील हिंदु–मुसलमानांनी भरविलेल्या सभांचा व मिरव-
" णुकीचा फार मोठा परिणाम आमचे प्रजाजनांवर झाला. आमच्या राज्यां-
" तील हिंदु-मुसलमानांचा पेशावरच्या नागरिकांशीं देवघेवीचा व्यवहार
" नेहमी असतोच. त्यामुळें आम्हांस आमच्या सरहद्दीचें संरक्षण करण्यासाठीं
" आणि हद्द नीट आंखून ठेवण्याकरितां कांहीं विश्वासू अधिकाऱ्यांच्या
" हाताखाली थोडेसे सैनिक ठेवावे लागले.........सिफासालेरसाहेब
" ( सेनाध्यक्ष ) पौर्वात्य सरहद्दीकडे बचावासाठी कांहीं तयारी करूं लागले होते
" कारण तसें करणें आवश्यक दिसलें. ही तयारी करण्याचें दुसरें एक कारण
" म्हणजे ता. ९ मे १९१९ रोजीं ( ८ शाबान १३३७ हिजरा ) तुमच्या
" विमानांनीं आमच्या प्रदेशावर फेरी केली आणि धमकावण्याही दिल्या.
" आमच्या खलित्याचें उत्तर येण्यासही विलब लागला. कोणत्याही प्रकारचा
" खलिता न पाठवितां–किवा लेखी सूचना न देतां–तुम्ही एकाएकीं विमानी
" हल्ला आमचेवर केला व बॉब फेकले ! त्यामुळें आमचे मुख्य सेनाध्यक्ष
" जाया झाले. तुमच्या सैनिकांनीं आमच्या प्रदेशांत प्रवेश केला–आणि
" साहजिकच आम्हांस युद्ध पुकारावें लागलें !.......मध्यंतरीं आमचा वकील
" श्री. **अबदुर रहमान** काबूलला परतला. तुमच्या परराष्ट्रीय सेक्रेटरींनीं
" त्याला आपसांतील वैमनस्य पुरें करण्याची विनंति केली असल्याचें कळतें.
" यावरूनच असें दिसतें, की लढाई सुरू झाली ती चुकून झाली आणि ती अनिष्ट
" होती. आमचा वकील पुन: तुमचेकडे पाठवून रक्तपात व युद्ध थांबविण्याचा
" आमचा मनोदय होता. आमचा वकील जाऊन एक दिवस झाला असेल
" नसेल, इतक्यांत तुमचें विमान काबूलवर फेरी करण्यास आलें. व त्यानें
" राजप्रासादावर बॉंब टाकले. विमानांतून आमच्या पूज्य आजोबांच्या
" (अमीर अबदुर रहमानच्या ) थडग्यावर बॉंब फेकण्यांत आले...जलाला-
" बादेसही आमच्या परमपूज्य तीर्थरूपांच्या कबरस्थानावर व आमच्या
" राहण्याच्या इतर खाशा इमारतींवरही बॉंब सोडले गेले. झेपेलिन्समधून
" लंडनवर बॉंबचा भडिमार झाला, तेव्हां अशा कृत्यांचा अत्यंत रानटी

६

" म्हणून निषेध झाला होता. त्या वेळीं, पूज्यस्थानांवर व उपासनामंदिरांवर
" बाँबचा भडिमार करणें तर कमालीचें तिरस्करणीय कृत्य मानलें गेलें
" होतें. परंतु आज आम्हांस प्रत्यक्ष अनुभवानें कळून आलें कीं, अशा
" प्रकारचीं गर्हणीय व रानटी कर्में करण्याची चालच सर्व पाश्चिमात्य राष्ट्रांत
" पडली आहे!......शेंकडों वर्षें चाललेली आपली दोस्ती मोडावी व
" रक्तपात व्हावा अशी आमची मुळींच इच्छा नाहीं. एकदां का या युद्धास
" आणि रक्तपातास प्रारंभ झाला कीं कायमचें हाडवैर व वैरभाव माजेल;
" आणि ती मनोवृत्ति बदलणें अशक्यप्राय होईल. कारण आमच्या लोकांची
" सूड घेण्याची भावना जागृत झाली म्हणजे " मरूं कीं मारूं " या ईर्ष्येनें
" ते लढतील आणि त्यांना आवरणें शक्य होणार नाहीं.*

—अमानुल्ला."

**७६. व्हाइसरॉयांचें आत्मसमर्थन :—**वर दिलेल्या अमिराच्या पत्राला व्हाइसरॉयांचें उत्तर गेलें तें साम्राज्यशाहीच्या गुर्मींत लिहिलेलें आहे. डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या 'अज्ञानी' अमिरानें युरोपांतील परिस्थितीचें ज्ञान किती ताजें ठेवलें होतें आणि इंग्रजांना वर्मी बसणारा असा नेमका दृष्टांत देऊन त्यानें विमानांच्या कामगिरीचा निर्देश कसा खुबीनें केला होता इत्यादि सर्व मर्में वाचकांनीं जाणलीं असतीलच. परंतु व्हाइसरॉयही कांहीं कमी वस्ताद नव्हते. त्यांनीं उत्तर दिलें तें अगदींच वेगळ्या रोखानें व अमिराला वळविण्याच्या उद्देशानें! ता. ३ जून १९१९ ला स्टेट सेक्रेटरींना त्या पत्राची नक्कल तारेनें गेली. तें पत्र असें:—

" ......आमच्या मनांत तर कसलाच गैरसमज झालेला नाहीं. तुमची
" गैरसमजूत जर कांहीं झाली असेल तर ती हिंदुस्थानांतील राजकीय परि-
" स्थितीबद्दलची होय! तुमच्या बातमीदारांनीं या बाबतींत तुम्हांला सर्वस्वीं
" चकविलें. त्याजबरोबर ब्रिटिश सरकारच्या सत्तेबद्दल आणि स्वभावाबद्दल
" तुम्हांस भ्रम झाला असावा......मी तुम्हांस झरशहास अटक करण्यास
" लिहिलें. तुम्हांला तें अनिष्ट वाटलें. खरी गोष्ट अशी आहे कीं, पहिली गोळी
" सुटण्यापूर्वींच हिंदुस्थानवर हल्ला कसा करावा यासंबंधींचीं खलबतें काबूल-
" मध्यें चालू होतीं. माझ्या हातीं असलेल्या अनेक पुराव्यांपैकीं मी एकच

* Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

" तुम्हांला सांगतों. सिमल्यांतील तुमच्या वकिलाजवळ तुमच्या परराष्ट्रीय
" मंत्र्याचें एक पत्र सांपडलें. त्यावर २९ एप्रिल १९१९ ( २७ रजब
" १३३७) अशी तारीख असून त्यांत हिंदुस्थानांतील हिंदु-मुसलमान पुढाऱ्यां-
" कडून दोस्तीचे करारनामे घेण्याबद्दल त्यास हुकूम दिला होता. तसेंच
" वर्तमानपत्रांतून लोकांना चिथविणारे लेख लिहिण्याबद्दल त्यांना उद्युक्त
" करावें, कारण सुवर्णसंधि जवळ येत आहे, असें त्यांना कळविण्यास
" सांगितलें होतें. सेनाध्यक्ष सरदार नादिरखान यांच्याशीं त्यांचा
" पत्रव्यवहार नेहमीं चालू ठेवावा असेंही त्यांत सुचविलें होतें.

" युद्धाचा शेवट होईल तसा करण्यासाठीं सबळ कारणें विपुल असतांही,
" मी तुमच्या मागण्यांचा स्नेहपूर्वक विचार करण्यास तयार आहें. कारण
" तुम्ही तरुण व अननुभविक आहांत हें मी जाणून आहें. तुमची दिशाभूल
" झाली हें मला ठाऊक आहे. म्हणून रक्तपात टाळण्याची तुमची व माझी
" इच्छा एक आहे. यास्तव मी तुमच्या मागणीचा स्नेही दृष्टीनें विचार करीत
" आहें. तुमच्या वडिलांशी असलेला ऋणानुबंध मी अद्याप विसरलों नाहीं.
" तुमचे वडील केवळ आमचे विशेष दोस्तच होते असें नव्हे, तर ब्रिटिशांचे
" सहाय्यक असून मोठे देशसेवकही होते. उज्वल स्वदेशप्रीतीस धूर्त मुत्सद्दे-
" गिरीची जोड होती म्हणूनच आटोकाट प्रयत्न करून त्यांनीं अफगाणि-
" स्तान युद्धांत न पाडतां सांवरून धरलें. ह्यांत त्यांना जारीनें विरोध झाला.
" पण युद्धांत अफगाणिस्तानचा फडशा निश्चित पडला असता ! त्यांचें पुण्य-
" स्मरण झालें म्हणजे अफगाण लोक व अफगाणिस्तान यांकडे अगदीं सौम्यतेनें
" पहावें असें मला वाटतें. कारण या दोन्हींवरही त्यांचें उत्कट प्रेम होतें ! ‡

—व्हाइसरॉय. "

**७७. तात्पुरत्या तहाच्या अटी** :—युद्धाला प्रारंभ कां व कसा झाला यासंबंधीं व्हाइसरॉय व अफगाण अमीर यांचे दरम्यान पत्रव्यवहार चालू होता. तेव्हां दोन्ही पक्षांकडे शांतता नांदत असली तरी दोन्ही बाजूंस सैन्याची जय्यत तयारी दिसे. शेवटीं तहाची 'प्रस्तावना' म्हणून व्हाइसरॉयांनीं अमानुल्लास अटी कळविल्या त्या ह्या होत :—

‡ Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

१. ब्रिटिश सैन्याच्या तळापासून वीस मैलपर्यंत अफगाण सैन्य फिरकूं नये. ( म्हणजे अफगाण सैन्यानें वीस मैल मागें हटावें. )
२. ब्रिटिश सैन्य सध्यां आहे तेथेंच रहावें.
३. ब्रिटिश विमानांना अफगाण मुलखावर टेहेळणी करण्याची मुभा असावी. पण तीं बाँबचा भडिमार करणार नाहींत.
४. अफगाण हद्दींत पळून गेलेल्या कोणत्याही गुन्हेगारास पकडण्याचा अधिकार ब्रिटिशांस असावा.

अमानुल्लानें या अटी जशाच्या तशा न मानतां पुढील अटी सुचविल्या.

१. दोन्ही पक्षांच्या सैन्यांनीं दहा दहा मैल माघार घ्यावी.
२. विमानांना अंतस्थ मुलखांवर फिरकूं दिलें जाणार नाहीं.
३. दोन्ही देश स्वतत्र राहतील.
४. आमच्या हद्दींत आलेल्या कोणाही प्रजाजनास अटक करतां येणार नाहीं. कारण शरणागताला अभय देणें हें मानवी कर्तव्य आहे.‡

इतकेंच लिहून अमानुल्ला थांबला नाहीं, तर भलत्याच अटी लादल्या म्हणून व्हाइसरॉयांच्या खऱ्या हेतूंबद्दल शंकाही त्यानें प्रदर्शित केली !

**७८. व्हाइसरॉयांचा सबळ पुरावा** :–अमानुल्लानें सुचविलेल्या अटी मान्य करून युद्ध तात्पुरतें थांबलें. पहिल्या दोन अफगाण युद्धापेक्षां त्या वेळीं इंग्रजांनी अगदीं निराळी अशी वृत्ति कां दाखविली आणि रानटी अमिराला वठणीवर आणण्याचें सोडून, " युद्धाचा शेवट होईल तसा करण्यासाठीं सबळ कारणें विपुल असतांही अफगाण मागण्यांचा स्नेहपूर्वक विचार करण्यास " व्हाइसरॉय कां तयार झाले हें पाहिलें पाहिजे. इतका उदार भाव ब्रिटिश मुत्सद्यांच्या अंतःकरणांत उद्भवला तो रशियन बागुलबोवामुळेंच. अफगाणिस्तानच्या अमिरानें आपण गादीवर येतांच स्वातंत्र्य जाहीर केलें हाच ब्रिटिशांच्या सत्तेला मोठा धक्का बसला. त्यांत रशियाकडे वकीलमंडळ पाठवून दोस्तीचें बोलणें लावलें, म्हणून इंग्रजांचा अमिरावर साहजिकच घुस्सा झाला. युद्ध पुकारण्याचीं कारणें देतांना व्हाइसरॉयनी " माझ्या हातीं अनेक पुरावे आले " असल्याची ग्वाही वरील पत्रांत दिली आहे. त्यांपैकीं एक दोन पुरावे जसेच्या तसेच वाचकांसाठीं सादर करण्यांत होत असलेल्या विषयांतराबद्दल क्षमा करावी.

‡ Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

**ताश्कंद** ह्या रशियन शहरांतून मॉस्को येथील मध्यवर्ती अधिकाऱ्यांस कांहीं गुप्त संदेश बिनतारी संदेशवाहकानें पाठविण्यांत आले. हिंदी सरहद्दीवरील किंवा इतरत्र कोठील तरी चाणाक्ष हेरानें ते फोडून व्हाइसरॉयांना कळविले. आणि त्यांनींही घाबऱ्या घाबऱ्याच लंडनमधील स्टेट सेक्रेटरीस तार पाठविली. ( २३-५-१९१९ ). ती अशी:—

" ताश्कंदच्या वायरलेस स्टेशननें काल रात्रीं दोन तारा पाठविल्या. एक लेनि-
" नला व दुसरी परराष्ट्रीय मंत्र्याला. तारेंतील मजकूर असा होता:—'काबूल-
" ' हून शिक्कामोर्तबानिशीं ता. ७-४-१९१९ चीं दोन पत्रें आली आहेत.
" ' तीं दोन्ही रशियन रिपब्लिकच्या अध्यक्षांच्या नांवचीं असून एक अमीर
" ' अमानुल्लाचें आहे व दुसरें त्याच्या परराष्ट्रीय मंत्र्याचें आहे...... अमा-
" ' नुल्ला म्हणतो, ' आजच्या माझ्या राज्यारोहणादिवशीं मी लोकशाही
" ' ' रशियाला असें घोषित करूं इच्छितों कीं, सर्व जनतंत ममता असावी
" ' ' आणि अखिल जनांची एकी होऊन सर्वत्र शांतता नांदावी असेंच
" ' ' माझें दृढ मत आहे. बोल्शेव्हिजमचें निशाण उभारून रशियानें सर्व
" ' ' जगावर उपकार करून ठेविले आहेत. स्नेहभावानें पाठविलेल्या
" ' ' माझ्या या शुभचिंतनाचा, रिपब्लिक रशियाचे अध्यक्ष अव्हेर
" ' ' करणार नाहीत अशी आशा करणारा आपला स्नेही अमानुल्ला. '
" ' दुसऱ्या तारेंतील आशय:—**बरकतुल्लानें** अभिवचन दिल्याप्रमाणें
" ' कुराणांतील बोल्शेव्हिजमसंबंधींचें एक पत्रक लिहिण्याची त्याला आठवण
" ' द्यावी. हें काम शक्य तितक्या तांतडीनें उरकून घेऊन त्याच्या एक लक्ष
" ' फार्सी व हिंदुस्थानी प्रती छापवून घेऊन त्या एका खास जासुदाबरोबर
" ' रवाना करण्याविषयीं ब्रेव्हिननें ईस्टर्न प्रोपॅगँडा डिपार्टमेंटला तार
" ' पाठविली आहे. ' " †

तशीच दुसरीही एक बातमी हेरांनी फोडली. ता. २२ मे रोजीं **जुतोघ** येथील बिनतारी संदेशवाहकावर ती ऐकूं आली. **कुश्क** येथून सर्व पौर्वात्य ठिकाणांस ती पाठविली असावी. तिच्यांतील मजकूर:—

" मॉस्कोहून आलेल्या नं. १४७३ च्या तारेप्रमाणें : काबूलहून अशी
" बातमी आली आहे कीं, अफगाणिस्तानचें नवें सरकार सरहद्दीवरील

† Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

" रानटी टोळ्या जमवून **कराची** बंदराच्या रोखानें चाल करून जात
" आहे. "‡

ह्या फोडलेल्या गुप्त बातम्यांचा परिणाम ब्रिटिशांचें अफगाण धोरण ठरविण्यांत झाला नाही असें कसें म्हणतां येईल ?

**७९. अमानुल्लाचें वैशिष्ट्य :**—ह्या तारा स्टेटसेक्रेटरींना पोहोंचल्या तेव्हांपासून इंग्रजांचें अफगाण धोरण एकदम बदललें असें दिसतें. लढाई करण्यास दोन्ही पक्षांची नाखुषीच होती. अफगाणांजवळ पुरेसें साहित्य नव्हतें. आणि इंग्रज लढाईला पुरे कंटाळले होते. दोघांनाही लढाई नको होती हें निश्चित. रशियाचें व अफगाण अमिराचें सख्य घडल्यास फार घोर परिणाम होतील हें तर पाताळयंत्री इंग्रज राजकार्यधुरंधरांना कळून चुकलेंच; पण दुसरें म्हणजे अमीर अमानुल्ला हा धूर्ततेंत आणि राज्यव्यवहारांत अबदुर रहमान किंवा हबीबुल्ला यांच्याहून अगदींच भिन्न होता हें त्यांना पूर्णपणें दिसून आलें. त्याचीं पत्रें, त्यांतील मर्मी बसणारे घाव आणि स्वाभिमानास यत्किंचितूही धक्का न लावण्याची त्याची वृत्ति या सर्वांचा त्यांवर परिणाम झाला. इंग्लंडला अफगाणिस्तानशीं यापुढे वागण्याचें धोरण बदलावें लागलें. मूळ हेतु कायमच होता, परंतु बाह्यत: अगदींच वेगळी बतावणी करणें भाग पडलें.

नवा अमीर जागतिक घडामोडींत विशेष लक्ष घालून सर्व प्रसंगांचें यथायोग्य महत्त्व ओळखीत आहे हें इंग्रजांच्या नजरेस आलें. हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयांना उद्देशून तो म्हणतो :—

" स्वातंत्र्याचें वारें सर्वत्र वाहूं लागल्यानें जगांतील सर्व ठिकाणचीं निराश
" झालेलीं आणि दडपून गेलेलीं मानवी अंत:करणें प्रफुल्लित होऊन झपाट्यानें
" विकास पावत आहेत. एका आश्चर्यकारक व अलौकिक शक्तीमुळें शांतता
" प्रस्थापित करणारे संघ उदयाला आले असून दुसऱ्या राष्ट्रांवर जुलूम व
" वर्चस्व गाजविण्याच्या हक्कांचें मरण ओढवलें आहे. " ‡

अमानुल्लानें हें पत्र पाठवितांच व्हाइसरॉय गरम झाले असल्यास नवल कसचें ? कालचें चिमुकलें राष्ट्र, त्यावरील ' अननुभवी व तरुण ' अमीर, एवढ्या मोठ्या, सातासमुद्रांपलीकडून येणाऱ्या सुधारलेल्या व जगांत अद्वितीय ठरलेल्या साम्राज्यसरकारास उपदेशाच्या लांबलांब गोष्टी सांगतो हें ब्रिटिशसिंहाच्या

‡ Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

इभ्रतीला कसें साजणार ? व्हाइसरॉयांचें पत्र पाहिल्यास त्यांचा क्रोधानल—नव्हे इभ्रतीचा पारा—किती चढला होता हें कळेल. व्हाइसरॉय म्हणतात:—

" अफगाणसरकारनेंच युद्धास तोंड पाडलें आहे ही गोष्ट तुम्ही विसरलां असें
" दिसतें. शिवाय तहाची मागणीही तुमचेकडून आली आहे हेंही विसरूं
" नका. आमच्या सरकारनें तात्पुरत्या तहाच्या शर्ती ठरविल्या त्या याच
" कारणासाठीं. झालेल्या प्रकारामुळें आमच्या साम्राज्यसरकारचा फार
" भयंकर अपमान झाला आहे, हें तुमच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं;
" आणि एवढ्या मोठ्या राष्ट्रावर तुम्ही अशा प्रकारें हल्ला चढविला म्हणून
" ब्रिटिश प्रजाजन फार चवताळले आहेत हें तुम्हांस कळलेलें दिसत नाहीं." ‡

**८०. तात्पुरता तह :**—लोकशाहीकडे झुकलेला अमीर साम्राज्य-मदाच्या ह्या 'धुंद' पत्रानें घाबरला असावा अशी कल्पना चुकीची ठरेल. आणखी बरीच "पत्रोपत्री" झाली आणि नंतर शेवटीं तहाच्या अटी निश्चित झाल्या त्या ह्या:—

१. सही झालेल्या तारखेपासून अफगाणसरकार आणि ब्रिटिशसरकार यांची दोस्ती होईल.

२. ही लढाई ज्या परिस्थितींत उद्भवली, त्यामुळें ब्रिटिशसरकार अफगाण-सरकारवर नाराज झालें असून अमिराला आजपावेतों दारुगोळा, बंदुका, हत्यारें इत्यादि सामान हिंदुस्थानांतून आयात करण्याची दिलेली सवलत काढून घेतली जात आहे.

३. अमिराला वार्षिक खंडणी मिळत असे ती अत:पर मिळणार नाहीं. आणि मागील देणें राहिली आहे ती रद्द केली आहे.

४. दोन्ही राज्यांत वसत असलेला जुना स्नेहभाव कायम रहावा अशी ब्रिटिश-सरकारची इच्छा असल्यानें, अफगाणसरकार समाधानकारक रीतीनें वागेल तर पुन: दुसरें वकीलमंडळ अफगाणिस्तानांतून सहा महिन्यांनंतर बोलविण्यांत येईल.

५. माजी अमिरानें मान्य केलेलीच हिंदी—अफगाण सरहद्द सध्यां नक्की ठरविली आहे. हल्लींची लढाई सुरूं झाली त्या भागाची—खैबरच्या पश्चिमेची बाजू—नक्की आंखणी करण्यासाठीं ब्रिटिश वकील ठरवतील ती हद्द मानण्यास अफगाण-सरकार तयार आहे. आणि ही आंखणी होईपर्यंत ब्रिटिश फौज सरहद्दीवरच राहील.

‡ Parliamentary Papers : *III Afghan War, 1919.*

या भटी ठरविण्यासाठीं अफगाणांचे ८ व इंग्रजांचे ६ असे एकूण १४ "शिष्ट" २६ जुलै १९१९ रोजीं रावळपिंडीस एकत्र बसले. ८ ऑगस्ट १९१९ रोजीं तहावर सह्या झाल्या. इंग्लंडचे मुत्सद्दी **सर हॅमिल्टन ग्रँट हे** ब्रिटिश मंडळाचे अध्यक्ष होते. अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य मानण्याखेरीज गत्यंतर नाही असें पाहून त्यांनी तोंडी कबुली दिली खरी; पण करारांत त्याचा निर्देशही नाहीं ! अफगाण अमिरानें या शिष्टमंडळाकडून एक लेखी पत्र घेतलें. "परराष्ट्रीय बाबतींत अफगाण राष्ट्र स्वतंत्र आहे. ब्रिटिश त्यांत ढवळाढवळ करणार नाहींत." असें लेखी लिहून घेतल्याविना अफगाण शिष्टमंडळ उठेचना. हॅमिल्टन ग्रँटनें ती मागणी मान्य केली ! इतके दिवस "सासूबाई" म्हणून नांदलेल्या इंग्रजसरकारला अमीर विचारीनासा झाला. इंग्रजांचें अफगाणिस्तानांतील वर्चस्व पार लयाला गेलें !

**८१. तिसऱ्या अफगाण-युद्धाची इष्टानिष्टता :**—९ मे १९१९ रोजीं ब्रिटिशांनीं युद्धाला तोंड पाडलें, आणि पांच दिवसांनींच म्हणजे १४ मे १९१९ रोजीं अफगाणांनीं तहाचे बोलणें लावलें.* चार वर्षे चाललेल्या युरोपियन युद्धाच्या मानानें हें युद्ध फार क्षुल्लक दिसतें. परंतु अफगाणिस्तानला सिंहाच्या कचाट्यांतून सोडविणारें, काबुलाधिपतीस स्वतंत्र दर्जा प्राप्त करून देणारें आणि इंग्रजी मुत्सद्यांच्या डोक्यांत तिडीक उठविणारें हें युद्ध कमी महत्त्वाचें कसें ठरेल? मध्य-आशियांतील राजकारणांत यानें बरीच खळबळ उडविली. रशियाचा 'हातोडा व विळा,' जर्मन 'गरूड,' आणि तुर्की 'चांदतारा' यांची 'परिषद' अफगाणिस्तानांत भरूं शकली; हिंदुस्थानकडे निरीक्षणाच्या दृष्टीनें या 'शत्रूं'ना पाहतां येऊं लागलें व आणखीही पुष्कळ गोष्टी याच युद्धामुळें घडून आल्या. परंतु या युद्धाची इष्टानिष्टता दहा वर्षांनंतर झालेल्या परिणामांवरून न ठरवितां तत्कालीन परिस्थितीच्या दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे.

हबीबुल्ला मेल्यानंतर—नव्हे त्याला जनतेनें मारल्यानंतर—अफगाणांना हाताची रग जिरविण्यासाठीं युद्ध पाहिजे होतें. बरेच दिवस शांततेंत घालविले—

---

*सरकारी रिपोर्टांत तिसऱ्या अफगाण युद्धाची मुदत ६ मे १९१९ ते ८ ऑगस्ट १९१९ अशी दिली आहे. प्रो. टॉयनबींच्या मतें ९ मे रोजीं युद्धास प्रारंभ झाला. १४ मे रोजीं आर्मिस्टिस करण्याची विनंति अफगाणांकडून आली; हें मागील पत्रव्यवहार पाहतां शक्य दिसतें.



अफगाण स्वातंत्र्य--विजयोत्सवार्थ उभारलेली कमान

चालोद्यान प्रेस, पुणें.

पाघमानमधील मशीद



अमानुल्लाच्या वाढदिवसाचा स्मारकस्तंभ उजवे बाजूस दिसत आहे

लूट मारण्याची संधि युरोपियन युद्धानें आणली होती तीही गमावली, धर्मावर हल्ला झाला त्याचा प्रतिकार आपण करूं शकलों नाहीं–इत्यादि विचारांनीं त्यांचे बाहु फुरफुरूं लागले. आणि नव्या अमिरानें हिंदुस्थानवर त्यांना हल्ला करूं दिला नसता, तर आपसांतच यादवी माजून ही युद्धप्रीति बाहेर पडली असती. अफगाणांकडे तयारी मुळींच नव्हती, दारुगोळा पुरेसा नव्हता, समोरासमोर शिस्तीनें तोंड देण्याची पद्धति त्यांना ठाऊक नव्हती, तरीही हें युद्ध कां सुरू व्हावें याचें कारण, जनतेची लढाई करण्याची उत्कट इच्छा हेंच होय!

तिसऱ्या अफगाण युद्धाची पहिली गोळी इंग्रज बंदुकींतून झडली ही गोष्ट खोटी नव्हे. अमीर तयारी करतो असा संशय येतांच त्याची सिद्धता पूर्ण होऊं न देतां अवचित घाला घालून शत्रूला चाकत करणें हें धर्मयुद्ध ठरेल! परंतु, आजपर्यंतचा शिरस्ता आणि इंग्रजांची सनदशीरपणाची बढाई लक्षांत घेतां अमिराला एका खलित्यानें तरी " युद्ध पुकारल्याची " खबर देणें रास्त ठरलें असतें. शिवाय महायुद्धांत आलेल्या अनुभवाचा आणि झालेल्या तयारीचा किंचित् जरी विचार केला असता, तरी अफगाणांचा पाडाव करण्यास हिंदुस्थानसरकारास फार आयास पडले नसते, हें स्पष्ट दिसलें असतें. परंतु अपमानानें क्रुद्ध झाल्यामुळें किंवा संशयित दृष्टीनें अफगाण परिस्थितीचें निरीक्षण केल्यानें एवढा विचारही इंग्रज अधिकाऱ्यांस राहिला नाहीं. चढाईची लढाई ही नेहमीं दोन हेतूंस्तव स्वीकारली जाते. आपल्या मुलुखांत युद्ध न होतां तें परकीयांच्या प्रांतांत व्हावें, व प्रदेशाचें नुकसान व्हावयाचें तें आपलें होऊं नये अशी नेहमींच कुशल सेनानीची इच्छा असणार. शत्रुपक्षाला तयार होण्यास अवधि न देतां तो गैरसावध असतांनाच त्यावर हल्ला केला, कीं आपली दहशत विरुद्ध सैन्यावर कायमची बसते आणि पुन: लढाई करण्यास ते सहसा धजत नाहींत. याच विचारांनी प्रेरित होऊन इंग्रजसरकारनें अफगाणांवर स्वारी केली आणि पांच दिवसांत त्यांना शरण यावयास भाग पाडलें!

**८२. अफगाण युद्धांची तुलना :**—पण इंग्रजांनीं हें युद्ध अर्धवटच कां सोडलें? अमिराला नामोहरम करून किंवा पूर्णपणें आपल्या कह्यांत घेतल्याविना तहाची बोलणीं कां लाविलीं? अथवा अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य तरी कां मानलें? इत्यादि प्रश्नांचा विचार अवश्य केला पाहिजे. पहिल्या दोन युद्धांच्या धोरणांत व या युद्धासंबंधींच्या धोरणांत मुख्य फरक तो हा, कीं

पहिल्या दोन्ही वेळेस इंग्रजांनीं अटी अमिरावर लादल्या, परंतु तिसरे वेळीं **अमिरानें आपलेंच म्हणणें इंग्रजांस मानावयास लावलें.** पहिल्या दोन्ही लढायांत इंग्रजांना कांहींना कांही तरी लूट मिळाली व नवीन प्रदेश अंमलाखालीं आले, तर तिसऱ्या युद्धानें फक्त अफगाण खंडणीची ' लूट ' मिळाली; आणि अमीर इंग्रजांच्या पंजांतून पूर्णपणें सुटला ! अमिराला दरवर्षी हिंदी तिजोरीतून मिळणारी खंडणी तिसऱ्या अफगाण युद्धामुळें बंद झाली म्हणून काबुलाधिपतीचा तोटा झाला असें मानल्यास तें चूक ठरेल. नुसता आर्थिक दृष्ट्याच विचार केला तरीही, अमिराचा तोटा झाला नाहीं असेंच आढळेल. कारण त्यानंतर त्याला रशियन तिजोरींतून तैनात सुरू झाली. रशियानें इंग्रजांप्रमाणें कोणतीही बंधनें लादलीं नाहीत हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**८३. युद्धासाठीं झालेली मनुष्य-व द्रव्यहानि :**—तिसऱ्या अफगाण युद्धानें इंग्रजांना खडबडून जागें व्हावें लागलें व सरहद्दीचें धोरणही बदलावें लागलें. केवळ मनुष्यसंहार व द्रव्यनाश यांचा विचार केल्यास इंग्रजांनीं अत्यंत अविचारानें केलेलें युद्ध तें हेंच असे उद्गार कोणाही सुज्ञाच्या मुखांतून येतील. पहिल्या व दुसऱ्या अफगाण लढायांत प्राणहानि बरीच झाली असली तरी प्रदेश आणि सत्ता यांच्या रूपानें ती भरून आली होती. तसें तिसऱ्या युद्धाचे वेळीं मुळीच झालें नाहीं. उलट मुठींत राहणारा अमीर डोक्यावर मिरीं वाटूं लागतो कीं काय ही भीति पडली ! एकंदर सैन्य सरहद्दीवर कसें विभागलें होतें तें पहा:—

काबूलच्या रोखानें खैबरघाटांत: --२,८०० घोडेस्वार; १६,५०० बंदुकधारी शिपाई व ११० तोफा.

गझनीच्या रोखानें वजिरिस्तानांत :–१,१०० घोडदळ; ९,१५० रायफलधर शिपाई व ६० तोफा.

बलुचिस्तानांतून कंदाहारच्या रोखानें : --४६० घोडेस्वार; ५,२५० रायफलवाले पादचारी व २४ तोफा.

सिंधूपार एकंदर ३,४०,००० माणसें आणि १,५८,००० जनावरें तिसऱ्या अफगाण युद्धाच्या वेळीं गुंतलीं होतीं. *

---

* Toynbee : *Survey of International Affairs, 1920–23.*

अफगाण सरहद्दीवरील हवामानासंबंधीं सविस्तर विवेचन पुढें येईलच. त्यामुळें लढाईत कामास आले त्यांपेक्षां अधिक सैनिक आणि अधिकारी इतर कारणांनीं रुग्णालयांत गेले आणि युद्धेतर कारणांनीं स्वर्लोकाप्रत गमन करते झाले ! तिसऱ्या अफगाण युद्धाचा खर्च किती झाला याचा अंदाज हिंदुस्थान-सरकारचे तत्कालीन फडणीस मि. हेले यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत १९२०-२१ चें 'फायनॅन्शियल स्टेटमेंट' सादर केलें तेव्हां सांगितला. एकंदर १,४७,३६,००० पौंड म्हणजे त्या वेळच्या हुंडणावळीच्या दरानें १४,७३,६०,००० रुपये होतात. ‡ परंतु दुसऱ्या एका सरकारी पुस्तकांत १९२१-२२पर्यंत अफगाण सरहद्दीवरील युद्धाचा खर्चाचा आंकडा ४,९८,००,००० पौंड (४९,८०,००,००० रु.) असा दिला आहे. यांतील दुसराच अधिक विश्वसनीय मानला पाहिजे. कारण त्यांत इतर युरोपियन युद्धकालीन खर्चाचे सर्व आंकडेही दिले आहेत. §

कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी इंग्रजांचा फायदा मुळींच झाला नाहीं. मग हें युद्ध अर्धवट कां मिटविलें ? अमिराचा पुरा बींमोड करून टाकण्यास त्यांनीं मागें पुढें कां पाहिलें ? त्याचें स्वातंत्र्य कां मानलें व त्याला परकीय राष्ट्रांशीं स्वतंत्र संबंध कां ठेऊं दिले ? युद्धाबद्दल जर्मनीकडून मात्र भरपूर खंडणी वसूल केली जात असतां अफगाणिस्तानकडून तशाच प्रकारचा 'दंड' कां उकळला गेला नाहीं ? अशा अनेक प्रश्नांना उत्तरें दिलीं पाहिजेत.

इंग्रजांचा फायदा झाला नाहीं ही गोष्ट खरी; त्यांचें त्या प्रदेशांतील वर्चस्व गेलें; इतर शत्रू तेथें सल्लागार म्हणून आले; त्यांच्या हाडवैऱ्यांशीं अमिरानें दोस्ती आरंभिली; इत्यादि अनिष्ट प्रकार पाहून इंग्रजांचा मानभंग तर झालाच; पण आपल्या राजकीय धोरणांत बदल करावयास पाहिजे हें त्यांना स्पष्ट दिसलें. अमानुल्लानें रशियाकडे शिष्टमंडळ पाठविलें असतां आपण त्याला आपल्या ताब्यांत ठेवणें इष्ट नाहीं-तो राहणारही नाही-हें ब्रिटिश मुत्सद्यांना कळून चुकलें. अफगाणिस्तानांत 'परकी' इंग्रज आहेत तोंपर्यंत दुसऱ्या परकीयांनाही आंत येण्यास मुभा आहे हें सर्वांनाच समजलें. आपण फार ताणून धरलें तर दोस्तीची दोरी तुटणार अशी भीति दोन्ही पक्षांस वाटत होती.

---

‡ Imperial Legislative Council Proceedings, 1-3-1920, pp. 1065 and 1074.

§ *India's Contribution to the Great War*, p. 160.

**८४. अफगाणिस्तान स्वतंत्र ठेवण्याचें कारण** :—बरें, अफगाणिस्तान जिंकून त्यावर तांबडा रंग फासणें इंग्रजांना अशक्य नसलें तरी इष्ट नव्हतें व नाहींही. रशियाचें भूत दंगा माजविण्यासाठीं टपून बसलें आहे. तें निदान दोन हात दूर ठेवण्यासाठी मधील अफगाणिस्तानचा अमीर बरा आहे. तो इंग्रजांच्या ताटाखालील मांजर झाल्यास ठीकच; नाहीं तर निदान शत्रु तरी होऊं नये. शत्रु झाला किंवा मित्र राहिला नाहीं तरी एक वेळ पत्करेल, पण त्यानें इंग्रजांच्या शत्रूंशीं–रशिया, तुर्कस्तान अथवा जर्मनी यांच्याशीं–सलगीनें राहूं नये ही इच्छा साम्राज्यसंरक्षणाच्या दृष्टीनें इंग्रजांची असणें अयोग्य नव्हे. हिंदुस्थानावर वायव्येकडून कोणाचाही हल्ला झाल्यास आघाडीला तोंडीं देण्यासाठीं अफगाणिस्तानचें स्वतंत्र " राष्ट्र " बरें आहे. धक्का बसला तरी तो जिरवणारी स्प्रिंग–" **बफर** "–म्हणजेच अफगाणिस्तान–अशा दृष्टीनें त्याकडे पहात असलेले इंग्रज मुत्सद्दी, अमीर काबूलसिंहासनाधिष्ठित रहावा असेंच म्हणत आहेत. अफगाणिस्तानास लाल रंग फासला गेला तर रशियाची व हिंदुस्थानची सरहद्द एकमेकांस भिडेल म्हणून भीति वाटते. युनियन जॅक फडकत राहण्यासाठीं नवे नवे प्रदेश नित्यश: आपल्या स्वामित्वाखालीं यावे अशी इच्छा असणारे आंखुड दृष्टीचे हपापलेले साम्राज्यवादी मात्र, हिंदुस्थानसरकारनें तिसरें अफगाण युद्ध अर्धवट सोडलें, अमिराला पूर्णपणें नमविलें नाहीं, म्हणून दोष देतात. परंतु इंग्रजांच्या जागीं दुसरा कोणीही दूरदृष्टि साम्राज्यवादी राज्यकर्ता असता, तरीही असेंच घडून आलें असतें. मात्र तह निश्चित करण्यांत केलेला कालक्षेप व अफगाणिस्तानबद्दल दाखविलेला अविश्वास पूर्णपणें समर्थनीय ठरणार नाहीं.

अमानुल्लानें व त्याच्या अनुयायांनीं तडफदार व बाणेदार आचरण–अविचारीपणा–केला त्याचें फल त्यांना मिळालें, तें युद्धास तोंड पाडल्यानें त्वरित मिळालें इतकेंच. एखादा धोरणी मुत्सद्दी हेंच फल अल्पायासानें " झांकली मूठ सवा लाखाची " ठेऊन केवळ कागदी घोडे नाचवून–दम भरून–प्राप्त करून घेता. पण फुरफुरणाऱ्या अफगाण बाहूंची रग जिरली नसती. थोडीशी अधिक तयारी करून अमानुल्लानें युद्ध पुकारलें असतें, तर लढाईचा शेवट इतक्या झटपट झाला नसता आणि अमानुल्लाला खंडणी कायम राहून स्वातंत्र्याची सवलत मिळाली असती. यापेक्षां अधिक मिळवावयाचें असें अफगाणाधिपतीस कांहींच नव्हतें. तेव्हां आपल्या सैन्याचा आत्मविश्वास मारण्यापलीकडे किंवा इंग्रजांच्या

रणपटुत्वाविषयीं त्यांच्या मनांत विशेष भीति उत्पन्न होण्यापेक्षां अमिराचा अधिक तोटा झाला नाहीं.

**८५. इंग्रजांची नवी विचारसरणी** :—परराष्ट्रीय संबंधांत मोकळीक देण्यानें आपलें विशेष नुकसान होईल अशी ब्रिटिशांना कल्पना नव्हती. रशियाचीच त्यांना फार भीति. परंतु रशियांत झारांचा अस्त होऊन तत्त्वनिष्ठ लोकशाहीचा अंमल प्रस्थापित झाला असल्यानें अमानुल्लाशीं त्यांचें मेतकूट जमेल असें इंग्रजांना मनापासून वाटलें नाहीं. कसेंही झालें तरी अमीर पडला राजा; आपला अधिकार प्रजेवर गाजविणें हें त्याचें कर्तव्य. हें तर बोल्शेव्हिक तत्त्वांच्या अगदीं विरुद्ध. तेव्हां काबूल व मॉस्को यांचें सख्य जमणार नाहीं असेंच इंग्रजांना वाटलें. शिवाय रशियन अफगाणिस्तानला महत्त्व देतात, तें केवळ हिंदुस्थानचें तें प्रवेशद्वार म्हणून. तेव्हां अफगाणिस्तान व रशिया यांची गट्टी इंग्लंडला जाचक होईल अशी भीति ब्रिटिश मुत्सद्यांना वाटत नव्हती. पुढें आपल्या सोईसाठीं तत्त्वनिष्ठेंत थोडासा बदल करून अफगाणिस्तानचा अमीर, इराणचा शहानशहा अशांशी देखील रशिया दोस्ती जमवूं लागला, तेव्हां मात्र ती भीति उद्भवली. सुमारें ४० वर्षें अव्याहतपणें अफगाणांचें परकीय धोरण इंग्लंडनें आपल्या हातांत ठेवलें होतें. तें परत मिळविण्याची आशा तीव्रतेनें अफगाणांना लागणें शक्य असल्यानें व तूर्त तरी त्यापासून आपल्या साम्राज्यइमारतीस धोका पोहोंचण्याचा संभव नसल्यानें, इंग्रजसरकारास अमिराचें सर्व बाबतींत स्वातंत्र्य मानावें लागलें.

**८६. या युद्धाचें समर्थन** :—इंग्रजांच्या अनेक चढाईच्या लढायांपैकीं समर्थनीय अशी ही तिसरी अफगाण लढाईच आहे. आर्थिक किंवा प्रादेशिक प्राप्ति कांहीं झाली नसली तरी इंग्रजांचें सैन्य, त्यांचा तोफखाना, शिस्तीचा भडिमार, वैमानिक दलाचें महत्त्व इत्यादि लष्करी वर्चस्वाच्या बाबी अफगाणांच्या मनावर अविस्मार्य अशाच प्रकारें बिंबल्या. अतःपर हिंदुस्थानवर हल्ला करण्याचा अविचार त्यांच्या हातून निदान २०—२५ वर्षें तरी होणार नाहीं. चिथविणारीं राष्ट्रें स्वस्थ बसणार नाहींत, अफगाणांना ते वरचेवर चेतना देतील; परंतु मानसिक आत्मविश्वास मारून टाकण्याचें काम जें इंग्रजांनीं आपल्या प्रभावानें तिसऱ्या अफगाण युद्धांत केलें त्याचा परिणाम तात्पुरता राहिला नाहीं. निदान त्या पिढींत तरी युद्ध करण्यास उद्युक्त होणारे सैनिक क्वचितच मिळतील. शिवाय सर्वसाधारण अफगाण जनतेंत राष्ट्रीय विचारसरणीचा पूर्ण अभाव आहे हें मागें सांगितलेंच आहे.

पहिलीं दोन्ही अफगाण युद्धें टाळतां येण्यासारखीं होतीं आणि तीं केलीं नसतीं तर इंग्लंडचें विशेष नुकसान झालें नसतें. तशी गोष्ट तिसऱ्या लढाईची नव्हती. ती अपरिहार्यच होती. अमिराला आपल्या लोकांना आवरणें जसें शक्य नव्हतें तसेच किंबहुना त्यापेक्षां अधिक अशक्य असें कार्य म्हणजे साम्राज्यसंरक्षक स्वाभिमानी हिंदुस्थानसरकारला थोपवून धरणें हें होतें. दोन्ही पक्षांच्या दृष्टीनें विचार करतां 'न्याय्य' असें हेंच युद्ध ठरतें. अशा प्रकारचीं न्याय्य युद्धें इतिहासांत नेहमीं आढळत नाहींत. 'केलॉग पॅक्ट' त्या वेळीं अंमलांत असता आणि हिंदुस्थान व अफगाणिस्तान या दोन्ही राष्ट्रांनीही त्यावर सह्या केल्या असत्या तरीही लढाईचा दोष कोणाकडे हें ठरवितांना निःपक्षपाती राष्ट्रसंघाच्या न्यायाधिशांना बरेंच डोकें खाजवावें लागलें असतें. असो.

**८७. पक्क्या तहाच्या वाटाघाटींत विघ्नें :**—*तिसऱ्या अफगाण* युद्धानें ब्रिटिशांचें व अफगाणांचें सख्य जुळलें असें आपण आतां म्हणतों. परंतु पहिला तात्पुरता तह, नंतरच्या तहाबद्दलची वाटाघाट, तहाचा मसुदा, दोन्ही सरकारांच्या त्यावर सह्या इत्यादि 'औपचारिक' बाबतींत पुष्कळ वेळ खर्च झाला. मध्यंतरीं तर हें सर्व फिसकटतें कीं काय अशी भीति पडली होती. ता. ८ ऑगस्ट १९१९ रोजीं रावळपिंडी येथें झालेल्या तात्पुरत्या तहान्वयें सहा महिन्यांनंतर पुनः दोन्ही देशांचे प्रतिनिधी एकत्र जमून खलबत करणार होते. पण सहा महिन्यांचे नऊ महिने झाले. १९२० मधील **मसूरीच्या** मुक्कामांत सर **हेन्री डॉब्स** यांनीं हिंदुस्थानच्या वतीनें अफगाण प्रतिनिधींशीं तहासंबंधीं चर्चा चालविली. ही वाटाघाट बरेच दिवस चालली. परंतु 'आंत' काय झालें याची वार्ताही बाहेर नव्हती. 'सर्व मुद्यांवर एकमत' झालें असल्याचें सांगण्यांत आलें आणि सर हेन्री डॉब्स्नें काबूलला पुढील बोलणीं करण्यासाठीं जावें असें ठरलें ! जानेवारी १९२१ मध्ये डॉब्स् काबूलमध्ये होते. परंतु नोव्हेंबर १९२१ पर्यंत तहावर सह्या कांहीं झाल्या नव्हत्या. मग मसूरीस एकमत झालें तें कसलें? डॉब्स्नें काबूलला जावें याच प्रश्नावर कीं काय ?

डॉब्स् काबूलमध्यें कालक्षेप कां करीत होते किंवा दोन्ही राष्ट्रांच्या मित्रत्वाच्या संधींत 'घोडें पेंड कोठें खात' होतें हें बरेच दिवस कळेना. **लॉर्ड कर्झन** यांनीं सोव्हियट सरकारला जो एक महत्त्वाचा खलिता धाडला त्यांतील मजकूर वाचल्यास डॉब्स्चें काबूलमधील काम कां रेंगाळत होतें तें कळून येईल.

"मार्च ( १९२१ ) मध्यें झालेल्या व्यापारी तहानुसार रशियानें इंग्रजां-
" विरुद्ध कोणतेही गुप्त कट करावयाचे नाहींत असें ठरलें असतां ब्रिटिशांच्या
" हितसंबंधांस विघातक अशी जोराची चळवळ मध्यआशियांत आणि लीव्हांट-
" मध्यें चालू असल्याचें आपणांस दिसून आलें आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश
" सत्तेवर घाला घालण्यासाठीं अफगाणिस्तानांत जोराची चळवळ चालू आहे.
" सोव्हिएट सरकारनें केलेल्या बऱ्याच गोष्टींपैकीं महत्त्वाची एक ही कीं,
" अफगाण अमिराला रशियन सरकारकडून सालीना पौंड १,००,०००
" (रु. १५,००,००० ) खंडणी मिळणार आहे. हिंदी सरहद्दीवर बॉंबचा
" कारखाना उघडण्याचें रशियानें ठरविलें आहे, आणि जेमालपाशाला सरहद्दी-
" वरील रानटी लोकांना चिथविण्यास पाठविलें आहे. "¶

**८८. रशियाशीं अफगाणिस्तानचा तह :—** डॉब्स् यांचें घोडें कोठें अडलें होतें तें आतां कळून येईलच. पण त्याहीपेक्षां स्पष्ट उल्लेख पाहिजे असेल तर, रशिया व अफगाणिस्तान यांच्यामध्यें झालेल्या गुप्त तहाच्या अटी पहाव्या. हा तह २८ फेब्रुवारी १९२१ रोजीं मुद्रांकित झाला. म्हणजे ब्रिटिश-सिंहाचा वकील काबूलमध्यें गेल्याबरोबर रशियाशीं अफगाणिस्ताननें दोस्ती केली. सिंहाची दाढी उपटल्यासारखें झालें! सिंह आपल्या राजनगरींत आहे याची यत्किंचित्‌ही क्षिति अमानुल्लानें बाळगली नाहीं. तह गुप्त असल्यानें त्याचीं कलमें बाहेर फुटण्यास कांहीं आठवडे लोटावे लागले.

रशिया व अफगाणिस्तान यांची दोस्ती 'बळकट' व्हावी आणि अफगाणिस्तानचें खरेंखुरें स्वातंत्र्य कायम रहावें यासाठीं ज्या शर्ती मान्य करण्यांत आल्या त्यांतील महत्त्वाच्याच खालीं दिल्या आहेत:—

१,३,५ आपसांत राजकीय वकिलाती असाव्या. काबूल येथें रशियन वकील व मॉस्को येथें अफगाण वकील रहावे.

२. राजकीय अथवा लष्करी करार तिसऱ्या कोणाशीं करावयाचा नाहीं.

६. रशियांत अथवा परदेशांत खरेदी केलेला अफगाणिस्तानचा माल रशियन हद्दींतून जातांना कोणत्याही प्रकारचा कर घेतला जाणार नाहीं.

८. पौर्वात्य राष्ट्रें स्वावलंबी व स्वतंत्र असावीं आणि लोकमताप्रमाणेंच राज्यकारभार चालावा असें आमचें दोघांचेंही मत आहे.

---

¶ *The Indian Year Book : 1923*, p. 197 ( The Times of India. )

९. रशियन सरहद्दीवर अफगाणांचा मुलुख अफगाणिस्तानास परत देण्यांत येत आहे.

१०. अफगाणिस्तानास लागणारी आर्थिक व इतर मदत देण्याचें रशियानें अंगिकारिलें आहे.

पुस्तीमध्यें मदतीची फोड केली आहे ती अशी :—

( अ ) तूर्त १० लक्ष सुवर्ण अथवा रौप्य रूबल्स् दरसाल दिले जातील.

( आ ) कुश्क, हिरात, कंदाहार व काबूल या मार्गावर तारायंत्राच्या तारा घातल्या जातील.

( इ ) यांत्रिक अथवा इतर वाकबगार तज्ज्ञ अफगाणिस्तानांत पाठविले जातील.||

**८९. रशियन तहाची छाननी :**—उपरोक्त रूसो-अफगाण तह इतका महत्त्वाचा आहे कीं, ब्रिटिशसाम्राज्यसरकारचे जागी स्वतंत्र हिंदुस्थान असता तरीही या दोन राष्ट्रांच्या दोस्तीकडे संशयित दृष्टीनें पहाणें भाग पडलें असतें. राजकारणाच्या आखाडयांत कोणी कोणाला विनाकारण सहाय्य करण्यास येत नसतो. पैशाची मदत एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला आपण होऊन देऊं लागतें, तेव्हां देणगी देण्यासाठीं पुढे आलेला हात " चोरी " करण्यास अथवा सांपडेल त्यावर " हात मारण्यास " मागेंपुढें पाहणार नाहीं, हें पक्कें लक्षांत घ्यावें. उपकार, दान, गरीब-अनाथांचें संरक्षण इत्यादि सत्कृत्यांचा समावेश मुत्सद्यांच्या कोषांत होत नाहीं. त्यांना एकच ध्येय दिसत असतें व तें म्हणजे **स्वा-र्थ.** स्वार्थ साधण्यासाठीं वाटेल त्या मार्गाचा अवलंब करावा अशी पाश्चात्त्यांचीच रीत आहे असें नव्हे, तर आर्य चाणक्यही त्याच मताचा आहे. हें कौटिलीयग्रंथराज वाचून कोणाच्याही लक्षांत येईलच.

आतां राजकीय अभ्यासकांच्या पूर्वग्रहरहित दृष्टीनें या रूसो-अफगाण तहाकडे पाहिलें तर काय दिसतें ? आठव्या कलमाप्रमाणें पौर्वात्य राष्ट्रें स्वतंत्र व स्वावलंबी असावीं असें मत आहे, तर दुसऱ्या कलमाचें बंधन कशासाठीं ? रशियांतील प्रजेला पिळून काढलेला पैसा दहाव्या कलमाप्रमाणे अफगाणिस्तानांत कां ओतावा ? पैसा किंवा द्रव्य हें झाडाला लागत असलें, तरी तें ज्या त्या देशांतच राहणें इष्ट आहे. केवळ राजकीय हेतूसाठी एका देशांत तें ओतण्यापासून काय फायदा आहे ?

|| Toynbee : *Survey of International Affairs, 1920-23*, p. 385.

व्यापारासाठींही परकी भांडवल दुसऱ्या देशांत गुंतविणें हा साम्राज्यशाहीचा चंचुप्रवेश होतो, तर अशी ही फुकटची देणगी कोणत्या अंतस्थ कारणासाठीं दिली जाते ? रशियानें अफगाणिस्तानला मदत करावी—नाहीं असें नाहीं. पण त्याबरोबर आपणच त्यांच्या देशांत तारायंत्रें घालण्याचें काम आपल्या खर्चानें कां पत्करावें ! जगाच्या व्यवहारांत अशा कृत्याला सदुपकार म्हटलें असतें, पण राजकारणी वातावरणांत उपकारच मुळीं नसतो. तेव्हां या प्रश्नाचाही विचार केला पाहिजे.

'स्वतंत्र व स्वावलंबी' राष्ट्रांना सल्ला आपण होऊन देण्याच्या भानगडींत कशाला पडावें ? हाही मुद्दा लक्षांत घेतला पाहिजे. त्यांनी सल्ला मागितला तर योग्य मोबदला घेऊन आपले तज्ज्ञ त्यांचेकडे पाठवावे. या तहाचा असाही एक अर्थ संभवतो, कीं ब्रिटिशादि साम्राज्यवादी, भांडवलशाहीच्या पांघरुणाखालीं आपलें वर्चस्व एखाद्या देशावर प्रस्थापूं इच्छितात, तर आपल्या तत्त्वाचा प्रसार करण्याची जबर इच्छा रशियांतील लोकांना असल्यानें "स्वातंत्र्य व स्वावलंबन" या गोड शब्दांनीं ते आपलें कार्य साधीत असावेत.

९०. **ब्रिटिशांची अफगाणांशीं मैत्री झाली** :—या रशियन-अफगाण दोस्तीचा परिणाम इंग्रजांशीं तह ठरवितांना फार झाला हें उघड आहे. इंग्रजांचा वकील डॉब्स् यानें निश्चित तह ठरविला तो रूसो-अफगाण तहाच्या वळणाचाच आहे. ता. २२ नोव्हेंबर १९२१ रोजीं तहाचें स्वरूप बाहेर आलें, तरी इंग्लंडमधून ६ फेब्रुवारी १९२२ पर्यंत मान्यता आली नाही. "बादशहांना" पसंत पडल्यावर तह नक्की होतो. तहाच्या अटींचा सारांश असा:—

१. अफगाणिस्तान अंतर्गत व बहिर्गत बाबतींतही पूर्णपणें स्वतंत्र आहे असें इंग्रज मानतात.

२. लंडन व काबूल येथें एकमेकांचे राजदूत रहावे.

३. अफगाणिस्तानांत व हिंदुस्थानांत परस्परांचे कॉंसल व व्यापारी एजंट रहावे.

४. लष्करी हालचालींचें अथवा नाकेबंदीचें काम करावयाचें असेल, तर परस्परांनीं एकमेकांस प्रथम सूचना द्यावी.

५. अफगाणिस्ताननें पूर्वीप्रमाणेंच दारूगोळा व हत्यारें हिंदुस्थानांतून आयात करावीं. त्यांवर कर घेतला जाणार नाहीं.

६. अफगाणिस्तान सरकारसाठीं लागणाऱ्या सर्व मालाची हिंदुस्थानांतून "रहदारी" होतांना त्यावर कोणताही कर बसविला जाणार नाहीं.

७. एकमेकांत टपालाची देवघेव इतर राष्ट्रांत होते तशी व्हावी.

याशिवाय लेखी अथवा तोंडी समजुती झाल्या त्यांत जलालाबाद, कंदाहार आणि गझनी येथें रशियन कॉन्सुलेट्स्ना परवानगी दिली जाणार नाहीं असें स्पष्ट म्हटलें आहे. डॉब्स्नें या मुद्यावरच विशेष आग्रह धरला. मात्र मुख्य तहाच्या कलमांत त्याचा समावेश नाहीं हें लक्षांत ठेवावें. तसेंच, अफगाण सरहद्दीच्या बाबतींत पाहिलें तर अमिरालाच प्रदेश मिळाला असल्याचें दिसतें. अफगाण हद्द हिंदुस्थनाकडे सरकली–मग ती कितीही थोडी असो–यांतच आमिराच्या वजनाचें व ब्रिटिशांनीं 'नमतें' घेतल्याचें गमक आढळतें.

तिसऱ्या अफगाण युद्धामुळें पेटलेल्या वणव्याची झळ वायव्य सरहद्दीवरील "स्वतंत्र" जातींनाही लागली आणि तत्संबंधींचें हिंदुस्थानसरकारचें धोरण बदललें, इत्यादि विवेचन स्वतंत्र विभागांत येईल. इंग्रजांचा व अफगाणांचा हा तह झाल्यानें तिसरें अफगाण युद्ध याच वेळीं समाप्त झालें असें म्हणतां येतें. युद्ध चाललें फार फार तर ५-७ दिवस आणि कच्चा तह, तात्पुरता तह, पक्का तह या प्रकारास ३१ महिने लागले ! इभ्रतवाल्या सरकारला किती खालीं यावें लागलें हें तर यावरून दिसून येतेंच; पण अफगाणिस्तानसंबंधीं अविश्वास व संशय दाखवून आणि विनाकारण कालापहरण करून होती नव्हती ती सहानुभूतीही ब्रिटिशांनीं गमावली हेंही स्पष्ट होतें.

ह्या तहासाठीं हिंदी तिजोरीवर बराच मोठा बोजा पडला. १८ डिसेंबर १९२० ते ३१ डिसेंबर १९२१ पर्यंत एकंदर ३,८५,५९४ रुपये खर्च झाले असें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें सांगण्यांत आलें. परराष्ट्रीय सेक्रेटरींनीं, "या रकमेचा तपशील असेंब्लीच्या सभासदांपुढें ठेवणें हें सार्वजनिक हितास बाधक असल्याचेंही" सांगितलें. ‡

---

‡ Legislative Assembly Debates, Vol. II-2, pp. 1369–70.

## प्रकरण सातवें

# अमीर अमानुल्ला : राजकीय व सामाजिक सुधारणा

**९१. राज्यकारभाराची घटना व मंत्रिमंडळ :—** गादीवर येतांच अमानुल्लानें राजकीय व्यवस्थेंत पुष्कळच फेरबदल केला. त्या फेरबदलास सुधारणा असें आपण पाहिजे तर म्हणूं. परंतु अफगाणिस्तानांतील बहुजनसमाजाच्या दृष्टीनें या सुधारणा घडवून आणणें इष्ट नव्हतें असा निष्कर्ष लोकसंग्रह करणारा काढूं शकेल. तेव्हां या घटकेस त्यांना सुधारणा असें न म्हणतां नवीन प्रयोग असें म्हणतां येईल.

अमानुल्लापूर्वी राज्यव्यवस्था राजाच्या 'ईश्वरदत्त' नियमांनीच चाललेली होती. असे ईश्वरी अधिकार सामान्य मानवाला नियमबद्ध करतां येणें अशक्य समजलें जाऊन अमीर करील तेंच न्याय्य, योग्य आणि आवश्यक मानलें जाई. पण अमानुल्लानें राज्यघटना लिहून काढली आणि त्या लिहिलेल्या नियमांनुसार राज्यकारभार होईल असें त्यानें जाहीर केलें.

या ७३ कलमी घटनेंतील मुख्य भाग असा :—

१. अमीर हा अफगाणिस्तानचा अनियंत्रित राजा राहील.

२. इस्लाम हा राजधर्म म्हणून मानला गेला तरी यहुदी व पारशी यांना धर्मस्वातंत्र्य मिळेल.

४. अमिराच्या वारस पुत्राकडे हें राज्यपद चालू राहील.

५. राजा धर्मसंरक्षक असला पाहिजे.

७. राजाचें नांव प्रार्थनेंत ग्रथित केलें जावें.

१०. गुलामगिरी कायद्यानें अन्याय्य ठरविली आहे.

२७. मंत्रिमंडळानें शिष्टसमाजास ( असेंब्ली ऑफ नोटेबल्स ) आपल्या कामाचा वृत्तांत सादर करावा.

३९-४९. सल्लागार मंडळांची निवडणूक होऊन त्यांनीं आपल्या खात्याच्या कामांत सुव्यवस्था होईल असे उपाय सुचवावेत.

६८. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचें व्हावें. ‡

मंत्रिमंडळास 'नाझारती' असें म्हणतात. अमानुल्लाचें पहिलें मंत्रिमंडळ असें होतें :—

| | | |
|---|---|---|
| १. सद्र–इ–अझम | मुख्यमंत्रि | सरदार अबदुल कुदुसखान. |
| २. नझीर–इ–खरिजया | परराष्ट्रमंत्रि | सरदार महमद बेग तार्झी ( अमानुल्लाचे श्वशुर ) |
| ३. ,, ,, मालिया | मुल्की दिवाण | मिर्झा महमूदखान |
| ४. ,, ,, तजारत | व्यापारमंत्रि | मुल्ला गुलाम महमदखान |
| ५. ,, ,, आदलिया | न्यायमंत्रि | महमद इब्राहिमखान |
| ६. ,, ,, हरबिया | युद्धमंत्रि | सरदार महमद नादिरखान ( हल्लींचे अफगाण अमीर ) |
| ७. ,, ,, माऽअरिफ | शिक्षणमंत्रि | सरदार महमद सुलेमानखान. |
| ८. ,, ,, दखिलिया | गृहमंत्रि | अली अहमदखान. |
| ९. ,, ,, झरऽत | कृषिमंत्रि | अजिमुल्लाखान. |

मंत्रिमंडळाचे सभासद आणि इतर कांहीं निवडक अधिकारी अथवा प्रजाजन यांचें एक कौन्सिल बनविलें होतें व जेव्हां एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करावयाचा असे तेव्हां त्या कौन्सिलची बैठक भरविण्यांत येई. विषय जसा महत्त्वाचा असेल तसे अधिक सभासद समाविष्ट केले जात. म्हणून मंत्रिमंडळ, व राजेसाहेबांची निकटवर्ती अधिकारी माणसें तेवढीच कायमची व ठरलेली मंडळी होती. बाकीच्या सभासदांची संख्या निश्चित नसे.

**९२. अधिकारमर्यादा ठरविण्याचें कार्य** :—प्रत्येक अधिकाऱ्याच्या अंमलाची मर्यादा ठरवून टाकून पूर्वीपासून चालत आलेल्या लांचलुचपतीस अमानुल्लानें पुष्कळच आळा घातला. राज्यकर्ता कितीही शक्तिमान् असला किंवा

‡ Toynbee : *Survey of International Affairs, 1925, Vol. I*, p. 566.

त्याची व प्रजेचीही सदिच्छा अन्याय्य प्रकार नष्ट व्हावे अशी असली तरी पिढ्यान्-पिढ्या आंगीं मुरलेली संवय एकदम नाहींशी होणार कशी? अधिकाराची जागा मिळविण्यासाठी लोक हपापलेले असत आणि वाटेल तितका पैसाही खर्च करण्यास त्यांची तयारी असे. जागा मिळाली कीं आपण केलेला खर्च सव्याज भरून काढूं, हा त्यांचा आत्मविश्वास असल्यानें कशाचीच पंचाईत नसे. अधिकारी वर्गातली ही वृत्ति नाहीशी करून ज्यानें त्यानें आपापल्या अधिकाराप्रमाणें वागावें, दुसऱ्याचा अधिकार लुबाडूं नये अथवा दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळही करूं नये म्हणून अमानुल्लानें कडक उपाय योजले. ताझींच्या सूक्ष्म निरीक्षणांतून कोणतीही बाब सुटणें शक्य नव्हतें. अर्थात् ज्या ज्या अधिकाऱ्यांच्या "पूर्वापार चालत आलेल्या परंपरेस" या श्वशुरजामातांनीं व्यत्यय आणला, त्यांचीं मनें राजाविरुद्ध खवळून गेलीं तर आश्चर्य कसलें?

परंतु हबीबुल्लासारख्या सुलतानाचा खून झाल्यानें, नव्या अमिरानें गादीवर चढण्यापूर्वीच पगारांत वाढ दिल्यामुळें, आणि अफगाणिस्तान स्वतंत्र आहे असें जाहीर केल्यामुळें सर्वच जनता-अधिकारी वर्ग सोडून-खूष होती. अधिकाऱ्यांची सत्ता कमी करणें याचा अर्थ राजरोस दरवडे घालण्याची त्यांस बंदी करण्यासारखें होतें. त्यापासून प्रजेचाच फायदा असल्यानें या प्रगतीस तिचा पाठिंबा होता.

**९३. अधिकाऱ्यांच्या सत्तेला पायबंद घातले :—**अमानुल्लाच्या सुधारणांचें क्षेत्र एवढ्यानेंच संपलें नाहीं. सारापद्धतींत त्यानें सुचविलेली व तत्काळ अमलांत आलेली योजना बहुतेक रयतेला प्रथमतः तर जाचकच वाटली. जमिनीची आंखणी, नोंदणी किंवा मोजणी अफगाणिस्तानांत अमानुल्ला येईपर्यंत झालीच नव्हती. हे प्रकार अमानुल्लानेंच सुरू केले. तरी एकदम सर्व प्रदेश मोजून होईल कसा? त्याला लागणारा खर्च आणावा कोठून? हेही महत्त्वाचे प्रश्न असल्यानें त्या दिशेचे प्रयत्न हळुहळूच झाले. पूर्वी सारा ठरविण्याची रीत "बियाणें, नांगर आणि पाणीपुरवठा" यांवर अवलंबून असे. सारा भरावयाचा तो पिकाच्या रूपांत किंवा कांहीं पीक, कांहीं पैसे, असा अनिश्चित होता. स्थानिक अधिकाऱ्यांना शेतकऱ्यांची स्थिति पाहून "सूट" देण्याचा अधिकार असे. या दोनच बाबींमुळें अधिकाऱ्यांस लांचलुचपत खाण्यास अवसर होता.

ठिकठिकाणीं सारा म्हणून आलेलें धान्य सांठविण्याच्या सरकारी कोठ्या व त्यांचे अधिकारी असत आणि पैसा गोळा करणारे अधिकारी वेगळे असल्यानें तिजोऱ्याही ठेवाव्या लागतच. हे दोन "राहू आणि केतु" प्रजेला किती गांजीत असतील याची कल्पनाच करावी लागेल.

अमानुल्लानें सर्वच सारा पैशांत भरावा असें ठरविलें. ही सुधारलेल्या जगानें सुधारणा म्हणावी, पण अफगाणांना ती कडक शिक्षाच वाटली. कारण धान्यविक्रीची योग्य व्यवस्था असल्याविना पैसा भरणें म्हणजे त्यांस एक जुलूमच वाटला. तरी पण प्रजेनें तो निमूटपणें सोसला.

"शिंगोटी" चीही नवीन योजना अमलांत येऊन दरवर्षीं कर नाण्याच्या रूपानें वसूल होऊं लागला. मेंढपाल, उष्ट्रपाल आणि 'पशु-पाल' यांच्या-वर राज्य करणारास शिंगोटीसारखेच कर बसवावे लागतात. *

पूर्वी अफगाण सरकारचा एक मोठा तबेला असून त्यांत नेहमीच्या उप-योगासाठीं लागणारी गुरें ढोरें सरकारी खर्चानें पोसलीं जात. "शिंगोटी" घेतांना मोठमोठ्या कळपवाल्यांकडून गुरेंच घेतलीं जात. कारण गुरें विकून त्यांचे पैसे करणें आणि ते सरकारी तिजोरींत भरणें हें, सदैव प्रवासांत राहणाऱ्या त्या मेंढपाळांना शक्य कसें असणार ? परंतु शक्याशक्यता, इष्टानिष्टता, सोय गैरसोय हें न पाहतां नव्या अमिरानें सर्व प्रकारचे कर नाण्यांतच दिले पाहिजेत असें फर्मा-विलें. त्यानें प्रजेच्या दृष्टीनें त्याचा विचार केला नव्हता. केवळ अधिकारी वर्गाची सुधारणा करण्यासाठीं, त्यांना लांचलुचपत खाण्यास अवसर मिळूं नये म्हणून, नवे उपाय योजले खरे; परंतु प्रजेचें त्यामुळें किती नुकसान झालें इकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. या खोल परिणामाचें आकलन त्याला करतां आलें नसेल, म्हणून ते परिणाम व्हावयाचे थांबले नाहींत.

व्यापारी करांचीही अशीच अवस्था झाली. निर्गत मालावर जकात ठेवणें आवश्यक होतें. कारण, मुख्य व्यापार ताजीं किंवा सुकीं फळें, गालिचे, लोंकर वगैरे तद्देशीय माल, बाहेर देशांत पाठविण्याचाच असे. आयात होणारा माल आवश्यक असल्यानें त्यावर फार जकात ठेवतां येत नसली तरी चैनीच्या वस्तूंवर-

* उंटांना, गाढवांना वा घोड्यांना शिंगें नसलीं तरी त्यांच्यावरील कराला 'शिंगोटी' म्हणण्याचा प्रघात आहे. 'शेंपूटपट्टी' हा अर्थहानि न करतां दुसरा पर्यायशद्ब वापरतां येईल.

सुगंधी तेलें, तलम रेशमी कापड, साबण, वगैरे विलासी पदार्थावर—कर अधिक ठेवणेंच इष्ट होतें. अशा जिनसांची चटक तत्काळ लागते आणि विनाकारण परदेशांत संपत्तीचा ओघ जात राहतो, म्हणून अमानुल्लानें ही व्यवस्था उत्तम केली. परंतु कोठेंही प्रजेस त्रास पोहोंचूं नये अशी त्याची इच्छा असली, तरी सर्वत्रच कर नाण्यांत घेण्याचा कायदा झाल्यानें रयतेस पावलोंपावलीं तो नडूं लागला. योग्य धारण येईना म्हणून नुकसान सोसावें लागलें आणि अशीच परिस्थिति कांहीं वर्षे चालू असती तर शेतकरी वर्गाची हलाखी होऊन पैसेवाले सावकार चांगलेच गबर झालेले आढळले असते. पण ९-१० वर्षांपेक्षां जास्त काल हा प्रयोग चालूं शकला नाहीं ! *

**९४. इतर कांहीं सुधारणाः**—वेठबिगार बंद केल्याचें आपल्या पहिल्या जाहीरनाम्यांतच अमानुल्लानें सांगितलें होतें ( पृ.७२ ). तसेंच तबेलेही कमी करून सरकारी कामासाठीं लागतील तेव्हां वाहनें व जनावरें भाडोत्री घ्यावीं असा कायदा केला. प्रजेचें यांत हित असलें तरी अधिकाऱ्यांच्या हातून तदनुसार अंमलबजावणी होण्यास पुष्कळच अडचणी होत्या. म्हणून त्याचा फायदा प्रजेस तत्काळ दिसून आला नाहीं.

राजघराण्यांतील मंडळींस तैनात असे, त्यांना हुजूरकोठींतून रोजची शिधा, सामग्री पोहोंचवावी लागे; कांहींची तर कायमचीच वर्णी खाशा पंक्तींत लागलेली होती. प्रजेवर अप्रत्यक्ष रीत्या पडणारा हा खर्च कमी व्हावा म्हणून अमानुल्लानें सर्वांच्या पूर्वींच्या "सवलती" रद्द केल्या. " मोफत मदत कोणासच मिळावयाची नाहीं " असें त्यानें ठरवून टाकलें आणि कोणाकडून कामही मोफत करवून घ्यावयाचें नाहीं असा त्याचा कायदा होता. वंशपरंपरागत चालत आलेल्या अधिकाराच्या जागा केवळ पात्रतेनुसारच दिल्या जाव्या असें ठरवून त्यानें वाशिल्याच्या तट्टांची भरती थांबविली.

---

*अमानुल्लाच्या कारकीर्दीत जमिनीवरील सारा तिप्पट चौपट वाढला. एका लहान जनावरावर पूर्वी सात पूल ( एक काबुली रुपाया = साठ पूल = हिंदी ८–१० आणे ) घेतले जात तर हल्लीं तीस पूल द्यावे लागतात. मोठ्या जनावरांवरील कर वीस पुलांवरून साठ पुलांवर चढला. घोड्यांवरील कर चौपट वाढला, तर खेचरांवरचा पांचपट झाला, इत्यादि वर्णन " एशियाटिक रिव्ह्यू " च्या जुलै १९२९ च्या अंकांत आलें आहे.

" औकाफ " म्हणजे धार्मिक संस्थां(नां)चें उत्पन्नही मर्यादित करण्याची नवी योजना त्यानें काढली. मशीद, दर्गा, मदरसा इत्यादि ठिकाणीं वार्षिक तैनात त्या त्या गांवांतून अथवा सरकारी तिजोरींतून मिळत असे. तेथील धर्माधिकारीच त्या रकमेचे कुलमुखत्यार होते. आपल्याकडे धार्मिक संस्थांच्या पैशाचा दुरुपयोग जसा होतो तसाच अफगाणिस्तानांतही होऊं लागलेला होता. म्हणून अमिरानें सर्वच उत्पन्नें जप्त केलीं. सार्वजनिक द्रव्याचा विनियोग करण्याचा अधिकार धर्माध्यक्षांस नाहीं असें अमानुल्लानें जाहीर केलें आणि लक्षावधि रुपयांची बचत केली. अर्थात्च धर्मगुरूंचें पित्त खवळणार; व ते खवळलेंही.

लष्करी खात्यांतील शिक्षण सक्तीनें तरुणांस देण्याची योजना अमलांत आणण्यास अमीर अमानुल्लाच कारणीभूत झाला. हृष्त-नफरी म्हणजे " आठ तरुणांपैकीं एक " लष्करांत भरती झालाच पाहिजे अशी त्यानें सक्ती केली. अशा तरुणांना दोन वर्षें लष्करी शिक्षण घ्यावें लागेल आणि नंतर जेव्हां लागेल तेव्हां त्यांनीं देशाच्या हांकेला " ओ " देऊन संरक्षणाचें वा लढण्याचें काम त्यांनीं अंगावर घेतलें पाहिजे, असें त्यानें ठरविलें. खुद्द काबूलमध्यें त्यानें एका तुर्की लष्करी तज्ज्ञाच्या देखरेखीखालीं एक मिलिटरी कॉलेज काढलें व तेथेंच लष्करांतील अधिकाऱ्यांच्या शिक्षणाची व्यवस्था केली.

हिशेबखात्यांत बऱ्याचशा सुधारणा करणें आवश्यक होतें. शेरअलीच्या काळीं हिशेब सुट्या कागदावर लिहीत आणि एकाला दुसरा, त्याला तिसरा अशी पुस्ती जोडून लांबलचक हिशेबाच्या कागदांची मालिका तयार होई. अबदुर रहमाननें बांधीव वह्यांची सुधारणा केली. पण मुख्य सुधारणा करण्याचें श्रेय अमानुल्लानेंच घेतलें. आंकडे लिहितांना विशिष्ट खुणांचा उपयोग करण्याची वहिवाट पहिल्यापासून अफगाणिस्तानांत आहे. आंकड्यांचा उपयोग हिशेबांत क्वचित्च करीत. संस्कृतमध्यें पृथ्वी=१, धन्वंतरी=२, राम=३, वेद=४, अशा सांकेतिक खुणा ठरलेल्या आहेत; तशाच प्रकारच्या कांहीं खुणा अफगाणांच्या असत. हा प्रघात कां व कसा पडला तें सांगतां येत नाहीं. हबीबुल्लाच्या मनांत सर्व हिशेब आंकड्यांतच लिहिला जावा असें होतें व म्हणून त्यानें आपली इच्छा अधिकाऱ्यांना बोलून देखील दाखविली. " सर्व हिशेबाचा घोंटाळा माजेल " अशी सबब हजरजबाबी अधिकाऱ्यांनीं हबीबुल्लाला सांगितली व त्यानें ती लगेच मानलीही. पण अमानुल्लापुढें तसें कांहीं चालणारें नव्हतें. त्यानें प्रथमतः कांहीं

दिवस नवी आंकडेपद्धति लोकांच्या हातीं बसावी म्हणून शाळा घातल्याप्रमाणेंच केलें. त्यामुळें कोणत्याही प्रकारचा घोंटाळा न उडतां सर्व हिशेब व्यवस्थेशीर होऊं लागले. ही नवी हिशेबाची पद्धत तुर्की वळणाची होती.

**९५. न्यायदानाची नवी व्यवस्था** :—पण याहीपेक्षां महत्त्वाची योजना कायदेमंडळासंबंधींची होती. पूर्वी अफगाणिस्तानांत कोणतेही सनदशीर निर्बंध किंवा कसलीही व्यवस्थित राजकीय घटना नव्हती. अमीर बोलेल किंवा काजी सांगेल तेंच वेदवाक्य अथवा कायदा मानला जाई. परंतु अमानुल्लापुढें तुर्कस्तानचें उदाहरण होतें. तार्झीचा सल्ला त्याला वरचेवर मिळत असे. एक "मऽफल—इ—कानून" (कायदेमंडळ) त्यानें निवडून त्यास निरनिराळ्या खात्यांची कामें ठरविण्याचें व न्यायदानासाठीं कांहीं नवीन कायद्याचें "कोड" तयार करण्याचें काम दिलें.

" शरा "प्रमाणें न्याय देण्यापलीकडे काजीचें काम नसे. आणि बहुतेक खेपेस मनाला वाटेल तोच निर्णय ते देत. कारण सबंध "शरा" तरी त्यांनीं कोठें वाचला होता ? शिवाय सर्वच न्यायदानाचे अधिकार योग्यता नसतां मुल्लांचे माथीं मारणें इष्ट नव्हतें, न्याय्य नव्हतें व योग्यही नव्हतें. म्हणून अमानुल्लानें मुल्ला व काजी यांचे अधिकार कमी करण्याचा यत्न केला. नांवापुरते कांहीं अधिकार काजींकडे ठेवून बाकी सर्व न्यायदान खास नेमलेल्या न्यायाधिशांकडे सोंपविलें गेलें. अबदुर रहमाननें जिल्हाधिकाऱ्यांसच न्यायदानाचें काम दिलें होतें; पण कायद्याचें पुस्तक वेगळें असें नसल्यानें आपल्या तर्कबुद्धीवरच त्यांना अवलंबून रहावें लागे. एक " ६८ " कलमी चोपडें साधारण मार्गदर्शक म्हणून अबदुर रहमाननें करून दिलें होतें. स्वतंत्र " कोडा "ची बरोबरी त्यानें कशी होणार ? म्हणून " कोड " तयार करणें, गांवांतील " पाटला " पासून तों जिल्ह्याच्या कलेक्टरापर्यंत व नंतर प्रांताधिकारी गव्हर्नरापर्यंत प्रत्येकाची कामें ठरविणें, त्यांच्या कार्याची दिशा निश्चित करणें इत्यादि कार्यासाठीं अमानुल्लानें एकवीस तज्ज्ञांचें एक मंडळ नेमलें. *

**९६. सुधारणांचे बरेवाईट परिणाम** :—गादीवर येतांक्षणींच आनंदाच्या भरांत, ज्वानीच्या उमेदींत, सत्तेच्या मदांत केलेल्या या सर्व गोष्टी

* ह्या माहितीस आधार मुख्यतः डॉ. गनींच्या पुस्तकाचा आहे.
A. Gani : *Review of Political Situation in Central Asia.*

सद्धेतूनें प्रेरित होत्या असें अमानुल्लाचे शत्रूही मान्य करतील. परंतु नुसत्या सद्धेतूनें वागून जगांत चालत नाहीं. काल, स्थल व परिस्थिति यांचा परिणाम लक्षांत घेणें आवश्यक असतें. लौकिक परिस्थितीच अशी होती कीं, केवळ हेतूंच्या उच्चत्वामुळें अमानुल्लास यश येणें कठीण होतें. केवळ तो अयशस्वी ठरला म्हणूनच आपण असें म्हणतो असें नव्हे. त्याचें अंगीकृत कार्यच इतकें अवघड होतें, कीं यशाची अपेक्षा करणें म्हणजे अविमर्शी आशावादीपणाच ठरणार होता. अमानुल्लाच्या नव्या सुधारणांची छाननी थोडक्यांत करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

अधिकाऱ्यांची सत्ता मर्यादित करणें म्हणजे त्यांचे स्वेच्छाचाराचे पंख तोडून त्यांस एके ठिकाणीं जखडून टाकल्याप्रमाणेंच झालें. सत्तेची हाव परमेश्वरालाही आहे म्हणतात आणि मनुष्य तर सत्ता सोडण्यास किती नाखूष असतो हें कोणांस सांगावयास नको. अमानुल्ला सत्ताधारी होतांच आपल्या अधिकारास कात्री लागली हें कोणाही जुन्या अंमलदारांना पटलें नाहीं. विशेषतः " हा आपल्यापैकींच राजा आहे, आपणांस चंगळ करावयास मिळणार " या आशेनें ते त्याजकडे पहात असतां त्याजकडून आगली होती तीही सत्ता कमी होऊं लागली, हें पाहून ते नव्या अमिरास प्रतिकूल झाले अमानुल्लाच्या कृत्यामुळें शेवटीं फायदा आपलाच आहे, आपल्या राष्ट्राची अशानें प्रगति होईल, आपला नांवलौकिक वाढेल, इत्यादि राष्ट्रीय आकांक्षांचें आकलन करण्यास दूरदृष्टीची दुर्बिण लागते. ती या गतानुगतिकांजवळ कोठून असणार ?

करांची आकारणी नव्या पद्धतीनें म्हणजे जमीन मोजून, गुरें मोजून, " सुधारलेल्या " जगांतील रीतीप्रमाणें करण्याचा अमानुल्लाचा प्रयत्न अत्यंत अदूरदर्शी होता असे अफगाण परिस्थिति लक्षांत घेतल्यावर म्हणावें लागतें. प्रजेनें राजाला कर द्यावे हें तत्त्व राजसंस्था अमलांत आल्यापासूनचें असलें, तरी प्रजेला दुखवून कर वसूल करावे यांत हित नाहीं. उलट कर देणें आपल्याच हिताचें आहे, अशी खात्री प्रजेची झाली पाहिजे. संगिनींच्या जोरावर कर वसूल करणें अगर करावा लागणे म्हणजे राजसत्तेच्या मुत्सद्दिगिरीस काळिमाच होय.

कर, धान्य अथवा पिकाच्या रूपानें भरण्यापेक्षां नाण्यानें भरणें हें लोकांच्या सुधारणेचें लक्षण ठरतें; आणि त्यानें अधिकाऱ्यांना " हातचलाखी " करण्यास सवड मिळत नाहीं. ( हातचलाखी करण्याची संवयच जडलेली असली म्हणजे मग वाटेल ते प्रयत्न केले तरी ती थांबवितां येत नाहीं. ) ह्या दोन मुख्य फायद्याच्या

बाबी असतांना देखील अमानुल्लानें " कर नाण्यांत वसूल केला जावा " असा कायदा केला ती मोठीच चूक झाली. कारण अफगाण मनोवृत्ति अशी आहे कीं, तिला कोणत्याही प्रकारचें नवें बंधन नको असतें. इतकेंच नव्हे तर अशा बंधनाच्या पुरस्कर्त्यांचा नायनाट केल्याविना ती कधीं थांबणार नाहीं. धान्य किंवा फळें अथवा गुरेंढोरें विकून त्यांचा पैसा करावयाचा व नंतर तो सरकारी कचेरींत भरावयाचा असा अमानुल्लाच्या राजवटींतील नियम. तेव्हां अशा रानटी लोकांना—पैशाशिवाय केवळ वस्तूंच्या परस्पर विनिमयावरच ज्यांचा जीवनक्रम पिढ्यान्‌पिढ्या चालत आला अशांना—हें नवें बंधन जाचक झालें; आणि विद्यमान राज्यपद्धतीविरुद्ध तिटकारा उत्पन्न होण्यास तें एक कारण झालें.

बलुचिस्तानांतील कांहीं भागांत ब्रिटिश अधिकारी आजमितीसहि जमीन-सारा धान्यरूपानें घेतात हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. व्यापाराची वाढ झाल्या-खेरीज किंवा नाण्याची व्यवस्था नीट असल्याविना सर्वच व्यवहार नाण्यांत व्हावे अशी सक्ती करणें किती त्रासदायक व आर्थिक दृष्ट्या हानिकारक होतें याची कल्पनाच केली पाहिजे. तेव्हां अशा लोकांवर सक्तीनें कोणत्याही सुधारणा लादणें म्हणजे पर्यायानें त्यांना आपणांविरुद्ध बंडास उद्युक्त करण्यासारखेंच होतें.

अफगाणांची मनोवृत्ति कोणत्या प्रकारची आहे याचें वर्णन वेळोवेळीं येऊन गेलेंच आहे. निर्बंध असा त्यांना मुळींच खपत नाहीं. कसल्याही प्रकारचें बंधन म्हणून त्यांना आवडत नाहीं. आणि आतांपर्यंतच्या इतिहासांत त्यांनीं कोणा सत्ताधीशापुढें डोकें नमविलें असेल तें केवळ तो अधिक शक्तिमान् होता यासाठींच. जमिनीची नुसती मोजणी केल्यानें त्या अडाणी रानटी लोकांचें कांहीं नुकसान होत नसलें, तरी " जमीन मोजणारा हा तिरशिंगराव कोण ? "—"अमीर झाला तरी त्यानें हें नवें वेड कशाला काढावें ?"—अशा कल्पना काढणारे अफगाण लोक आहेत. तबेल्यांतील जनावरें कमी करून पुष्कळसा खर्च अमानुल्लानें वांचविला. तसेंच मुदपाक-खान्यांतही कांटकसर करून फुकट भोजन झोडणारांची वर्णी बंद केली. त्यामुळें जनतेच्या मनावर काय परिणाम झाला हें पाहिलें पाहिजे. आपल्याकडेही अद्यापि " गुरेंढोरें " पाळणें म्हणजे चांगलें लक्षण समजतात; गुरेंढोरें दारीं असणें हें वैभवाचें चिन्ह मानलें जातें आणि पाळीव जनावरें कमी करण्याची पाळी येणें ही लक्ष्मीच्या विन्मुखतेची प्रस्तावना मानतात. " पशू " म्हणजेच " पैसा " अशी जेव्हां व्याख्या होती त्या काळीं सर्वच जनतेच्या भावना अशा प्रकारच्या होत्या.

अफगाण लोक अद्याप त्याच पौराणिक काळांत नांदत आहेत याबद्दल दुमत नाहीं. म्हणून अमानुल्लानें गुरेंढोरें कमी केलीं तें तेथील लोकांस पसंत पडलें नाहीं. अमिराला ही कुबुद्धि कोठून झाली असें त्यांना वाटलें.

तीच बाब शिधासामग्रीची, पंक्तीस बसणाऱ्या फुकट्यांची आणि तैनात खाणाऱ्या ऐद्यांची. राजाचें वैभव ठरविण्याचें साधन म्हणजे त्याच्या संपत्तीवर विनाकारण पोसल्या जाणाऱ्या आश्रितांची संख्या. बरें, या आश्रितांचा कांहीं उपयोग म्हणावा तर खुषमस्करीपलीकडे यत्किंचित् नाहीं. पण त्यांस किंचित् नाखूष करावयाचा अवकाश कीं, त्याचा सूड उगविण्यासाठीं नसतीं कुलंगडीं उपस्थित करून चालत्या गाड्याला खीळ ते कशी घालतात तें पाहण्यासारखें असतें. हा अनुभव अमानुल्लाच्या अफगाणिस्तानांतच आला असें नव्हे. चहूंकडील राजेरजवाड्यांचा व अमीरउमरावांचा अनुभव तोच आहे. असो, या आवश्यक, इष्ट, योग्य व सर्वथैव समर्थनीय अशा काटकसरीमुळें अमानुल्लाविरुद्ध बरीच चळवळ व्हावी ही चमत्कारिक बाब असली तरी ती साह-जिक होती; मानवी स्वभावानुसारच ही घटना आहे.

याही पुढें जाऊन धार्मिक संस्थांचीं वतनें जप्त करण्यांत अमानुल्लानें आपल्या विरुद्ध कारवाईस विशेष प्रोत्साहन दिलें असें म्हणावें लागतें. मशिदींतील काजी व मुल्ला सगळे आळशी व परजीवोपजीवी असून विनाकारण प्रगतीच्या मार्गांत व्यत्यय आणीत होते, हें सर्व खरें; परंतु त्यांना सन्मार्गावर आणण्याचा अमानुल्लानें योजिलेला मार्ग बरोबर नव्हता. व्यवहारांत—

"यद्यपि सत्यं लोकविरुद्धं।-नाचरणीयं नो करणीयम्"

हा उपदेशच उपयुक्त ठरतो. विशेषत: राजधर्मांत याचेंच श्रेष्ठत्व अधिक आहे. अफगाणांना मुल्ला म्हणजे देवाच्याही–देव तर त्यांच्यांत नाहींतच–प्रत्यक्ष पैगंबरा-च्याही पलीकडचे वाटतात. कुराणाला ते एक वेळ मानणार नाहींत. पण कुराणाचा अर्थ सांगणाऱ्या मुल्लांची प्रतिष्ठा तेथें अधिक. न्यायदानाचें सर्व काम त्या मुल्लांच्या हातीं. म्हणजे लोकांना त्यांनीं सक्तीनें आपल्या कच्छपीं लावलेलें. अशांना एकाएकीं नाखूष केल्यानें खळबळ किती उडाली असेल? शिवाय सर्वांचींच वतनें जप्त झालेलीं! मग काय विचारावें? हे सर्व चेवलेले लोक एक-वटून राजशक्तीविरुद्ध तुटून पडले!

'लष्करी शिक्षणाबद्दल अफगाण नाखूष नसावेत; कारण ते जात्याच लढवय्ये पडले' अशी जर कोणी विचारसरणी लावूं लागला तर ती चुकीची ठरेल. कारण लढण्याची, खून करण्याची व नेमबाजीची त्यांना जन्मापासून संवय असली तरी, सक्तीनें लष्करांत जा म्हणून सांगितलें, कीं घोडें अडतेंच. सर्वच लोकांचें तसे असतें. सक्ती म्हटली, कीं त्याला विरोध आलाच! अफगाणांना लढाईची हौस कितीही असली तरी सरकारनें निर्बंध लादल्यावर ते लढाईचें शिक्षण घेण्यास जाणार नाहींत! त्यांची लढाईची हौस म्हणजे तरी काय? कोणाच्याही तंत्रानें न चालतां आपणांस वाटेल त्याला ठार करणें, लुबाडणें, हाच त्यांचा लढवय्येपणा होय!

लष्करी शिक्षणाची सक्ति अफगाणांना आवडली नाहीं. मुल्लांचे हक्क काढून घेतल्यामुळें व त्यांचीं वतनें जप्त केल्यामुळें ते खवळले. आणि राजदरबारांतील 'बडे बापके बेटे' बरेचसे कामाला लावल्यामुळें ते नाखूष झाले. शेतकरी व कामगार लोकांची दैना सांगावयास नकोच. त्यांची आर्थिक परिस्थिति खालावत चालली, आणि अनेक दृष्टीनें नवे कायदे त्यांस जाचक वाटूं लागले. मग अमानुल्लाविरुद्ध तत्काळ बंडें कां उद्भवलीं नाहींत? किंवा लोकांचा असंतोष ताबडतोब दृश्यमान कसा झाला नाहीं? आणि झाला असल्यास अमानुल्लाच्या कोणत्या उपायांनीं तो निवारला गेला हें पाहिलें पाहिजे.

अमानुल्लाच्या सुधारणांचें महत्त्व आकलन करण्याची शक्ति ज्या फारच थोड्या शिकलेल्या लोकांत होती त्याच सर्वांना नव्या योजनेखालीं अधिकाराच्या जागा व हुद्यांची कामें मिळालीं. केवळ वंशपरंपरेशिवाय दुसरें शिफारसपत्र ज्यांचेजवळ नव्हतें, अशांना अर्थातच नोकरीस पारखें व्हावें लागलें. तेव्हां ज्या थोड्या लोकांना नवीन अधिकार मिळाले त्यांनीं—स्वार्थामुळें नव्हे तर, देशाचें अंतिम कल्याण व्हावें म्हणूनच—अमानुल्लास दुजोरा दिला. दुसरे कांहीं सरदार सरंजामदार होते. नव्या अंमलाखालीं त्यांच्या सावकारी उद्योगधंद्याला तेजी आली. अशा सरदारदरकदारांचा उद्योग तो कसला असणार? सावकारी, जमिनदारी, व्याज उकळणें आणि रयतेकडील कर वसूल करून स्वतःच्या पोतडींत भरणें हाच होय. कर नाण्यांत भरण्याचा नवा कायदा केल्यानें धान्य, पीक अथवा गुरंढोरें जरूर पडेल तशीं विकावीं लागत. आणि विकत घेणार कोण? तर असे पैसेवाले मानकरी. पूर्वीच्या जमिनदारी वा सरंजामदारीच्या जोडीला

भांडवलशाहीचा प्रताप गाजविण्याची संधि 'राज'कृपेनें त्यांना आयतीच मिळाली. तेव्हां त्यांनींही दूरदर्शीपणानें अमानुल्लाच्या सुधारणांस उचलून धरलें. हे सर्व स्वार्थी हेतूनें प्रेरित झालेले होते हें सांगण्याची आवश्यकताच नाहीं.

साधारण जनतेची फसगत झाली असें सांगितलें, तर आश्चर्य वाटण्याचें किंवा त्यांच्या अज्ञानाची कींव करण्याचें कारण नाहीं. राज्यक्रांति झाली, नवा अमीर आला या गोष्टींमुळें अफगाण दिपले नाहींत. कारण राजनिष्ठा हा गुण अद्यापि त्यांच्या सृष्टींत यावयाचा आहे. ज्यांचे हातीं सत्ता त्याला मानावयाचें इतकेंच त्यांचें शहाणपण. अमानुल्लाबद्दल त्यांना इतका आदर व पूज्यभाव वाटे तो त्यानें "फिरंग्यां"चा संबंध तोडला म्हणून, युद्ध करून लढाईची रग जिरविली म्हणून आणि राज्यांतील अधिकार वंशपरंपरा न ठेवितां योग्यता दर्शविणाऱ्या खेडवळाच्याही ते आटोक्यांत आणले म्हणून. गादीवर येतांच लष्करी फौजेचा पगार वाढवून-वाढविल्याचें जाहीर करून-त्यांचीं मनें आकर्षून घेतलीं, तेव्हां त्यांच्याकडून त्याला विरोध झाला नसला तरी त्यांच्यावर कितपत विसंबून राहतां येत होतें याचा विचार करावयास हवा होता.

**९७. अमानुल्लानें दुर्लक्ष केलेल्या बाबी** :—कोणतीही इष्ट पण क्रांतिकारक सुधारणा जनतेवर लादावयाची झाल्यास प्रतिकूल परिस्थितीशीं सामना देण्याची तयारी टेवावी लागते. विरोधकांना दहशत वाटावी म्हणून सैन्यबल इतकें जय्यत तयार पाहिजे, कीं केवळ नाममात्रेंच—तोंडी धमकावणीनेंच—काम व्हावें. क्रॉम्वेलनें "आयर्न् साईड्स्"च्या बळावर पार्लमेंट बरखास्त केलें होतें, तें नुसत्या तोंडी धमकावणीनेंच! पण आपणाला इतका विरोध व्हावयाचा नाही हीच अमानुल्लाची पूर्वीपासून समजूत असल्यानें त्याचे पुढील बेत ढांसळत चालले. प्रख्यात योद्धा नेपोलियन बोनापार्ट नेहमीं म्हणे कीं, लढाईच्या वेळीं जय मिळाल्यास काय करावयाचें हें तर मी ठरवून ठेवीत असतोंच, पण पराजय झाल्यावर काय करावयाचें याची तरतूदही मी पूर्वींच केलेली असते. अंगीकृत कार्यांत पूर्ण यश येईल असा आत्मविश्वास ठेवणें इष्ट असलें, तरी विपरीत परिणाम भोगण्यासाठीं तयारी असावी लागते. तशी अमानुल्लाची नव्हती असें दिसतें. मुस्ताफा केमाल जसा यशस्वी झाला तसेंच आपण होऊं ही भरज्वानींतील कल्पना अमानुल्लाच्या मनांत घोळत असावी. विशेषत: पुढील हकीकतींवरून अमानुल्लाचे ठायीं युद्धकौशल्य कमी होतें असें म्हणावें लागतें. अफगाणिस्तानचा अमीर होणें हें

काम-योद्ध्यांचेंच. शांततावादी राजा तेथील आसनावर कांहीं काल राहिला, तरी टिकूं शकणार नाहीं हें तेथील परिस्थितीवरून स्पष्ट दिसतेंच आणि इतिहासाचा त्याला दुजोराही आहे. अफगाणिस्तानसारख्या प्रदेशांत अशा हुकुमी सैन्यबलाचें महत्त्व विशेष आहे. आजही जगतीतलावर आग्रही पण सैन्यबलान्वित देशोद्धारक वीर कमी नाहींत. चालत आलेल्या परंपरेस लाथाडून, बहुजनसमाजाला दुखवून, " पोक्तपणाचा " सल्ला झिडकारून, स्वदेशहितासाठीं अरेरावी सुलतानशाही गाजविणारे वीर आज कितीतरी आहेत. पण त्या सर्वांनीं प्रथमतः ' सेनाबल ' संपूर्णतेनें प्राप्त करून घेतल्यावरच आपल्या सुधारणांचा हत्ता जनतेवर दडपला. मुसोलिनी, मुस्ताफा केमाल आणि रेझा पेहेलवी ह्यांची बहुतेक भिस्त स्वतःच्या हाताखालील सैन्यावरच आहे. रशियावर सर्व साम्राज्यवाद्यांचा डोळा आहे; पण एवढया मोठ्या अवाढव्य राज्यांत नवीन तत्त्वें, व नवीन कडक नियम लादूनही त्या लोकांना पूर्णपणें कह्यांत ठेवण्यासाठीं बोल्शेव्हिकांचें सैन्यबलच उपयोगी पडलें आहे, पडत आहे. मग अमानुल्लासही तसें करावयास नको होतें काय ? तें त्यानें केलें कीं नाहीं ? अथवा त्याच्या लक्षांत ही गोष्ट आलीच नाहीं ?

अफगाण मनोवृत्ति लक्षांत घेतां अमानुल्लास त्याच्या मनांत असतें तरी सैन्यावर विसंबून राहतां येणें शक्यच नव्हतें. स्वामिनिष्ठा किंवा राजनिष्ठा, देशसेवा, राष्ट्रप्रेम इत्यादि सद्गुण अफगाण बहुजनसमाजाला आकलन करतां येत नसतां, त्यांचे करवीं काय साध्य करतां आलें असतें ?

**९८. अमानुल्लानें केलेल्या शैक्षणिक सुधारणा :—** तिसरें अँग्लो-अफगाण युद्ध थांबल्यानंतर अमानुल्लास शांतता मिळाली व तात्काळ त्यानें शिक्षणक्रमाविषयींच्या योजना हातीं घेतल्या. अफगाण विद्यार्थी परदेशांत विद्यार्जनासाठीं पाठवावयाचे म्हणजे त्यांना अगोदर परकीय भाषा शिकविली पाहिजे. म्हणून प्रथमतः भाषापंडितांची योजना झाली. फ्रेंच व जर्मन शैक्षणिक शिष्ट-मंडळांना बोलावून काबूलमध्यें शिक्षणाची काय व्यवस्था करितां येईल याचा खल झाला. त्यांच्या मतें, काबूलमध्येंच विद्यार्थ्यांचें शिक्षण अगोदर पार पाडावें व नंतर उच्च अभ्यासासाठीं निवडकच विद्यार्थी परदेशीं पाठवावे असें होतें. तें अमानुल्लास पटलें. कारण त्यायोगें खर्च कमी येणार असून फक्त लायक इसमांनाच संधि मिळणार होती.

फ्रेंच शिष्ट-मंडळाशीं करारमदार झाले. अमुक एका फ्रेंच विद्यापीठाच्या ठराविक पदवीसाठीं निश्चित कालांत अमुक विद्यार्थी फ्रेंच व अफगाण शिक्षकांच्या सहाय्यानें तयार करावे, असें १९२३च्या अखेरीस ठरल्यानंतर " **मक्ताब-ए-अमानिया** " ( अमानुल्लाची शाळा ) स्थापण्यांत आली. परीक्षा काबूलमध्येंच व्हावयाच्या होत्या. यशस्वी विद्यार्थ्यांना फ्रेंच विद्यापीठांत विनाहरकत व विना-परीक्षा प्रवेश मिळावा अशी अटच होती. शिक्षणक्रम बारा वर्षांचा नेमला होता. तरी पहिली विद्यार्थ्यांची टोळी पांच वर्षांत फ्रान्सला गेली पाहिजे असा विशेष आग्रह अमानुल्लानें धरला व फ्रेंच शिक्षणाधिकाऱ्यांनीं तो मान्यही केला.

या शाळेसाठीं काबूलच्या नगरसभेनें इमारत दिली. शाळेस लागणारें सामान व शास्त्रीय उपकरणीं, शालेय पुस्तकें, विद्यार्थ्यांचा गणवेष (युनिफार्म) व 'साहेबी' टोप्या इत्यादि सर्व नवें नवें सामान सरकारी खर्चानें विद्यार्थ्यांस मिळूं लागलें. तेथें लष्करी शिस्त असून 'घम् घम् विद्या आणणाऱ्या' छडीचा उपयोग क्वचित् प्रसंगींच केला जाई शाळेची वेळ सकाळीं आठ ते दुपारीं बारा अशी ठेवली होती. पहिल्या सहा वर्गांत विषय फार्सीमधून शिकविले जात, तर बाकीच्या सहा वर्गांमध्यें अरबी, फार्सी, अफगाण इतिहास व धर्मशिक्षण हे विषय वगळून बाकीचे शिकवितांना फ्रेंच भाषा माध्यम म्हणून वापरण्यांत येई. दर तीन महिन्यांनीं परीक्षा घेण्यांत येत. मुल्लांकडे धर्मशिक्षणाचें काम असे आणि प्रत्येक दिवशी शेवटचा तास कुराण-पठनासाठी राखून ठेवीत. युरोपियन प्रोफेसरांचा दर्जा मुल्लांना साहजिकच प्राप्त होई. पण बिचाऱ्या विद्यार्थ्यांचे मात्र हाल होत. कुराणांतील वचनें प्रमाण मानणाऱ्या दाढीदीक्षितांनीं दुनिया 'सपाट' असल्याचें अल्लाच्या शपथेवर सांगावें, तर भूगोल शिकविणारा फ्रेंच प्रोफेसर पृथ्वी नारिंगासारखी गोल असल्याचें विधान सप्रमाण करी आणि पटण्यासारखीं कारणें देई. तेव्हां खरें कोणाचें व तें कां ? अशी संदेहवृत्ति विद्यार्थ्यांच्या मनांत एकसारखी उत्पन्न होई. अरबी, फार्सी, लिहितांना त्यांना उजवीकडून डावीकडे टांक अथवा पेन्सिल न्यावी लागे, तर फ्रेंच लिहितांना त्याच्या अगदीं उलट ! नेहमींच्या संवयीप्रमाणें तीं अफगाण मुलें फ्रेंच पुस्तकें उघडूं लागलीं कीं, त्यांना पुस्तकाचा शेवटच आढळे. कारण अरबी व फार्सी पुस्तकांचा प्रारंभ आपण जेथें पुस्तक संपवितों तेथून होतो. इतक्या अड-चणी असून देखील त्यांची शिक्षणासक्ति कमी झाली नाहीं. नव्या पोषाखाची तर मौज त्यांना वाटलीच; पण आपल्या वाडवडिलांना जें शिकावयाला मिळालें

नाहीं तें आपण शिकत आहोंत, या स्पर्धेनें ते शाळेस जात. नवीं उपकरणीं, नवी भाषा, मनोरंजन व प्रत्यक्ष व्यवहारांत आढळणाऱ्या गोष्टींची शास्त्रीय चर्चा, चित्रें, नकाशे इतक्यांचा मोह थोडाथोडका नव्हता. नुसत्या नव्या पोषाखाच्या आकर्षणामुळें बरींच मुलें शाळेंत जाऊं लागलीं होतीं. साहेबी कपड्यांची त्यांची आवड अल्पावधींतच इतकी वाढली, कीं जुन्या पद्धतीनें डोक्यास 'मुंडासें' गुंडाळलेल्या माणसाकडे पाहून ते हंसूं लागत व "पागोट्यांत डोकें बांधून घेणारा 'नफर' (मनुष्य)" म्हणून त्याची चेष्टा करीत.

९९. **अमानुल्लानें स्थापिलेल्या शाळा**:—जर्मनीचे शिक्षणविषयक तज्ज्ञ काबूलमध्यें आल्यानंतर त्यांनींही फ्रेंच पद्धतीवरच "**मक्ताब-ए-अमानी**" ही दुसरी शाळा काढली. तींतही फ्रेंच शाळेप्रमाणेंच व्यवस्था होती. मात्र फ्रेंच भाषेऐवजीं जर्मन भाषा शिकविली जाई आणि यांत्रिक व रासायनिक शिक्षणाकडे विशेष लक्ष असे. या दोन महत्त्वाच्या शाळांखेरीज अमानुल्लानें नवीन स्थापलेल्या शाळा पुढें दिल्या आहेत.

१. "**मक्ताब-ए-हुकूम्**" म्हणजे राज्यकारभारासाठीं लागणारे अधिकारी तयार करण्याची शाळा.

२. "**दार-उल्-मुऽआलिमीन**" ही शिक्षकांना शिकवण्याची शाळा (टीचर्स ट्रेनिंग स्कूल).

३. "**मक्ताब-ए-लिसेन**" म्हणजे भाषा-शाला. फ्रेंच, तुर्की, इंग्रजी, रशियन, इत्यादि परकीय भाषांचें ज्ञान येथें दिलें जात असे. दुभाषी, परराष्ट्रीय मंत्रि, वकील, कॉन्सल् वगैरे अधिकारी तयार करण्याचा हा आखाडाच म्हणावा.

४. **मक्ताब-ए-नाजरा**—सुतारीची शाळा.

५. ,, ,, **तलिग्राफ**—तारखात्याची शाळा, 'तार मास्तर' तयार करण्यासाठीं

६. ,, ,, **झरियात**—शेतकीविषयक शाळा.

७ ,, ,, **मस्तुरात**—मुलींची शाळा. यांत उच्च-नीच असा भेदभाव न राखतां सर्व मुली, राजकन्या देखील, जात असत.

८. **मक्ताब-ए-इदायिया**—या शाळेला हायस्कूल, कॉलेज अथवा युनिव्हर्सिटीही म्हणावें. कारण तिच्या वरची शिक्षणसंस्था अफगाणिस्तानांत दुसरी

नाहीं. १९ ते २२ वयाचे विद्यार्थी यांत घेतले जात, व त्यांना आपल्याकडील हायस्कुलांतले सर्व विषय शिकविले जात. मात्र धर्माचे धडे तेवढे आपल्या शाळांत नसतात ते तिकडे होते आणि कुराणाखेरीज दुसरा धर्म आहे असें म्हणण्यास कोणता मुसलमान तयार होईल ? तेव्हां कुराणांतील कंटाळवाणे धडे विद्यार्थ्यांना रोज मनांत नसतांना ऐकावे लागत ! इंग्रजी व गणित विषयांवर विशेष लक्ष दिलें जाई आणि दर आठवड्यांत या प्रत्येक विषयास नऊ तास दिलेले असत.*

**१००. प्रतिक्रियेस प्रारंभ झाला** :—अमानुल्लाच्या सर्व सुधारणा सद्धेतूंनीं प्रेरित असल्या तरी त्यांचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. अशा सुधारणांमुळें पसरणारा असंतोष, बिघडणारी व्यवस्था अथवा बंडाळीला अनुकूल होणारें वातावरण इत्यादिकांचा विचार करून सुधारणा एकदम न लादतां आस्ते कदम जाणेंच सावधागिरीचें ठरलें असतें; किंवा भाडोत्री सैनिक बरेचसे ठेऊन त्यांच्या हुकमी बळावर आपल्या नव्या कल्पना अंमलांत आणणें इष्ट झालें असतें. परंतु असें कांहींच न करतां आपल्या दगलबाज सैन्यावर, नव्या दमाच्या सुशिक्षित पण मूठभर अनुयायांवर आणि स्वत:च्या सद्धेतूंवरच भरंवसा टाकून अमानुल्लानें ही सुधारणांची नौका जनतेच्या महासागरांत तर लोटली. प्रथमतः कांहीं दिवस अडचण न येतां तिचा प्रवास झाला खरा; पण सुमारें चार वर्षांनीं मात्र वादळें उद्भवूं लागलीं.

कंदाहारच्या वायव्येस **जमिन्दावर** म्हणून एक जिल्हा आहे. त्यांत राहणाऱ्या **अलीझी** लोकांनीं अमानुल्लाच्या सुधारणेस विरोध करण्यासाठीं बंडाचें निशाण उभारलें ( एप्रिल–मे १९२३ ). " आम्हांला लष्करी नोकरी करण्याची सक्ती नसावी. " हें तर त्यांचें मुख्य गाऱ्हाणें होतेंच. पण सारा वसूल करण्यांतही आमचेवर फार जुलूम होतो असें त्यांचें म्हणणें होतें. अमानुल्लाच्या सैन्यानें बंडखोरांना शांत केलें. ती आग फार पेटली नाहीं. पण पुढें मार्च १९२४ मध्यें खोस्त विभागांतील **जद्रैन** व **मंगल** जमातींनीं बंड पुकारलें. **सुलेमान खेलही** ( खेल = जाति, जमात ) त्यांना मिळाल्यामुळें बंडाला विशेष महत्त्व प्राप्त झालें. त्याच वेळीं हिंदुस्थानसरकारच्या " कैदेंत " असलेले **याकुबखानाचे** दोन

---

* ही सर्व माहिती विश्वभारतीच्या एप्रिल–जुलै १९२९ च्या अंकांत आहे.
F. Benoit : *Vishvabharati* (April–July 1929), pp. 50–59.

मुलगे देहरादूनहून पळून अफगाण बंडखोरांना सामील होण्यासाठीं निघाले. परंतु अफगाण अमिरांची व हिंदुस्थानसरकारची दोस्ती फार 'पुरातन' व विशेष सलगीची पडली ! अमिराविरुद्ध लढण्यास हीं "मुलें" जातात हें पाहून हिंदुस्थानसरकारनें त्यांना पाराचिनार येथें अडकवून धरलें आणि अमिरावर "उपकार" करण्यासाठीं त्यांना परत आणून "पूर्ववत्" आपल्या "कडक" बंदोबस्तांत ठेवलें ( मे १९२४ ).

—हबीबुल्लाचा **अबदुल करीम** म्हणून एक दासीपुत्र होता. तो जरा महत्त्वाकांक्षी असल्यानें त्यालाही ब्रिटिशांनी **बनारस** येथें पेन्शनबद्ध करून ठेवला होता. अर्थात्च त्यानें पलीकडे अफगाणिस्तानांत जाऊन "आमच्या जुन्या जिवलग दोस्ताला" त्रास देऊं नये (?) अशी मनापासूनची उत्कट इच्छा असल्यानें त्याला कैदेंतच ठेवलें होतें. परंतु काय चमत्कार घडला कोण जाणे; तो या बंडाच्या वेळींच अगदीं नेमका बनारसहून पळाला आणि सरहद्दीवरील डोळ्यांत तेल घालून चोवीस तास जागरूक राहणाऱ्या, टेहळणी करणाऱ्या आणि पहारा ठेवणाऱ्या सर्व अधिकाऱ्यांच्या हातून निसटून अफगाणिस्तानांत गेला, इतकेंच नव्हे तर बंडखोरांचा पुढारी झाला ! हा दैवी चमत्कारच होय असें कित्येकांस वाटलें ! एरव्हीं ब्रिटिशांच्या इतक्या कडक बंदोबस्तांतून तो पळून जाणें शक्य तरी आहे काय ?

**१०१. रशियाची विपर्यस्त टीका** :—ब्रिटिशांशीं वैर धरलेल्या बोल्शेव्हिकांनीं मात्र या बंडाळीवर कांहीं तरी विपर्यस्त (?) टीका केली. ताश्कंद येथील मुस्लीम खात्यानें ( आशियांत रशियन चळवळीचें हें एक खात आहे. ) अशी बातमी प्रसिद्ध केली कीं:—

"भाडोत्री बंडखोरांच्या मध्यस्तीनें ग्रेट ब्रिटननें अफगाणिस्तानच्या तरुण "अमिराविरुद्ध बंड उभारलें असून त्यामुळें विनाकारण बऱ्याच निरपराधी "लोकांचें रक्त सांडलें गेलें." ‡

पण खरें पाहतां ग्रेट ब्रिटनचा व अफगाणिस्तानचा निरंतरचा दोस्तीचा तह झाला असतां असा बेइमानपणा, वचनभंग, किंवा क्षुद्रबुद्धीचा आगलावेपणा इंग्लंड करील तरी कशाला ? अफगाणांशीं युद्धच करावयाचें अगर अफगाणि-

‡ Asiatic Review, July 1929, p. 502.

स्तान जिंकावयाचें म्हटलें, तर सर्वशक्तिमान् साम्राज्यसरकारला तें अशक्य का आहे ? बरें, इंग्लंडला बंडखोरांना अमानुल्लाविरुद्ध चिथवावयाचें होतें असें मानलें तर २२-८-१९२४ रोजीं ब्रिटिशांनीं अफगाणाधिपाला दोन विमानें विकत दिलीं असतीं का ? खास बंडखोरांना वठणीवर आणण्यासाठीं खुद्द काबूलमध्यें नेऊन हीं दोन विमानें हिंदुस्थानसरकारनें पोंचविलीं तीं कशासाठीं ? तसेंच बंडखोरांचा पुढारी अबदुल करीम पुन: इंग्रजांनीं अटकेंत ठेवला हें कशाचें द्योतक ? बंड मोडतें असें पाहतांच तो परत आला. लाहोरमध्यें येतांच चाणाक्ष पोलिसांनीं त्याला बनारसहून पळालेला "कैदी" म्हणून ओळखलें व पुन: पूर्ववत् त्याला "कैदेंत" ठेवलें. स्वत:च्या वचनपूर्ततेसाठीं, "**मित्र जयासि म्हणविलें सूज्ञें त्याशीं करूं नये कपट**" या शिष्टाचाराला मानावें म्हणून जिवापाड झटत असतां ब्रिटिश सरकारनेंच हें बंड उठविलें, कैदेंतील अबदुल करीमला त्यांनींच सोडलें, इत्यादि आरोप त्यांवर करणें योग्य होईल का हें वाचकांनींच ठरवावें ! *

बंडखोरांचा पुरा पाडाव होण्यास ८।१० महिने लागले. १९२५ च्या फेब्रुवारी अखेरीस काबूलमध्यें अमानुल्लानें एक मोठा बंडसमाप्तीचा समारंभ साजरा केला. या बंडांचा परिणाम म्हणून अथवा अमानुल्लाची इच्छा म्हणून सुधारणांची गाडी आतां एकदम हळू जाऊ लागली. मुल्लांचे अधिकार काढून न्यायखात्याकडे दिलेली कांहीं कामें पुन: मुल्लांकडेच आलीं. कारण बंडखोरांची त्याबाबत मागणीच तशी जोराची होती.

**१०२. मुहाजिरिनांचें काबुलास प्रयाण** :—तिसऱ्या अफगाण युद्धाचें वर्णन झाल्यानंतर अमानुल्लानें केलेल्या महत्त्वाच्या सुधारणा व त्यांचे दूरवर पोहोंचणारे परिणाम यांचें विवेचन झालें. आतां येथें इतर कांहीं प्रासंगिक गोष्टींचा निर्देश करून नतर युरोपसंचार प्रकरणास प्रारंभ होणार आहे.

---

* श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं वरिष्ठ कायदेमंडळांत पुढें आणलेल्या स्पेशल लॉज रिपील बिलाविरुद्ध ता. १०-२-१९२५ रोजीं बोलतांना मि. (आतां सर) डेनिस ब्रे यांनीं अबदुल करीमचा व त्याच्या कामगिरीचा उल्लेख केला आहे तो वाचकांनीं अवश्य पहावा. त्याची योग्यता, त्याला ब्रिटिशांनीं अडकवून ठेवण्याचें कारण आणि कैदेंतून पळून गेला असतां त्यावर कायदेशीर इलाज करण्याची सरकारची नाखुषी इत्यादिकांचा खुलासा त्या भाषणांत आहे.

Legislative Assembly Debates, Vol. V-I, pp. 908-9.

युरोपांतील महायुद्धानंतर तुर्कस्तानांतील खलिफाची व त्याच्या विस्तृ साम्राज्याची ' दोस्त ' राष्ट्रांनीं लावलेली वासलात पाहून हिंदी मुसलमानांच्य मनोवृत्ति कशा खवळून गेल्या होत्या हें वाचकांस विदित आहेच. त्यां पंजाबांतील ' जालियनवाला ' बागेंतील हत्याकांडाची भर पडल्यानें ' धर्मासा मरावें ' या हेतूनें प्रेरित होऊन हजारों इस्लामी कुटुंबें, हिंदभूमीचा त्याग करू मुसलमानी प्रदेशांत राहण्यासाठीं व शक्य तर लढाई करून खलिफाला पु आसनाधिष्ठित करावें म्हणून खैबर घाटांतून काबूलच्या रोखानें निघालीं. त्यां ' मुहाजिरीन ' असें म्हणत. सरकारी कागदपत्रांत § अशा मुहाजिरिनांची संख्य १८००० दिली आहे, तर त्यांपैकींच एक राष्ट्रीय मुसलमान—**शौकत उस्मानी** (**मिरत** येथील खटल्यांतील एक आरोपी) ३६००० ‡ पेक्षां अधिक ' यात्रेकरू लोक हिंदुस्थान सोडून गेले अशी साधिकार ग्वाही देतात. ती संख्या कितीह असो, १९२० सालांतील अखेरच्या सहा महिन्यांत मुसलमान प्रवाशांच्या झुंडीच्य झुंडी काबूलमार्गें ' इस्तंबूल ' गांठण्यासाठीं गेल्या हें खरें. त्यांनीं आपली जमीन जुमला, घरदार व इतर सर्व चीजवस्त विकली व यात्रेसाठीं ते बाहेर पडले. मा लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे हिंदुस्थानसरकारनें कोणासच हरकत घेतल नाहीं किंवा कसलीही आडकाठी घातली नाही. लोकमत आधींच प्रक्षुब्ध झालें त्यांत धर्मवेडया मुसलमानांना धर्मयुद्धापासून परावृत्त करण्याची छाती कोणाच आहे ? पण बायकापोरांसह पायीं निघालेल्या ह्या श्रद्धाळू लोकांपैकीं पुष्कळ इसम वाटेंत थंडीनें, त्रासानें व दगदगीनें पैगंबरसदनीं गेले.

काबूलाधिपतीवर त्या वेळीं हिंदी मुसलमानांची फार मदार होतं ' अमानुल्लाखां दिल्लीच्या तख्तावर आतां विराजणार ' अशीं सुखस्वप्नेंही कित्येकां पडलीं होतीं. ब्रिटिशांच्या कचाटींतून सुटून आपण इस्लामी राजाच्या अंमल खालीं आल्याबद्दल तेव्हां त्या मुशाफरांच्या मनांत आनंदाच्या उकळ्या फुटल्य खऱ्या; पण खुद्द काबूलमध्यें गेल्यावर अफगाण सत्तेचा इंगा त्यांना पुरेपूर कळल जलालाबादेस मुहाजिरीनांचें थाटाचें स्वागत झालें. तेथील तत्कालीन गव्हर्न

---

§ Statement Exhibiting Moral and Material Progress and Cond tion of India : 1920, pp. 52–53.

‡ Shaukat Usmani : *Peshawar to Moscow*, p. 2.

अमानुल्लाचा युद्धमंत्रि व नुकत्याच झालेल्या युद्धांतील मुख्य सेनानी—नादिर-खान—हल्लींचा काबूलचा राजा—त्या धर्मप्रेमी मुसलमानांशीं फारच चांगल्या प्रकारें वागल्यामुळें त्यांना विशेष हर्ष झाला. काबूलला गेल्यानंतर अमानुल्लानें त्यांचें स्वागत केलें, ' बिरादरान '—भाई—म्हणून त्या सर्वांना संबोधिलें आणि त्यांच्या दुःखद परिस्थितीबद्दल कळवळा दाखविला.

" अफगाणिस्तान हा तुमचाच देश आहे. यथाशक्ति मी आपला सत्कार
" करीन. येथील विद्यालयें व लष्करी खातें आपलेंच आहे. त्यांत प्रवेश
" मिळण्यास कांहींच अडचण पडणार नाहीं. तुम्हांला बडया पगाराच्या
" जागा मिळतील. पण तूर्तास तुम्हा सर्वांची व्यवस्था 'जबुल्-अस्-
" सिराज ' * येथें केली आहे, तेथें मजेंत रहा." ‡

' जबुल्-अस्-सिराज ' येथें या पाहुण्यांना राजविलासांत ठेवलें असेल अशी कोणी समजूत करून घेऊं नये. त्यांना ठराविक ' आटा ' ( पीठ ) देण्यांत येई व त्याच्या बदलीं त्यांना तूप, मीठ, भाजी, जळण वगैरे आवश्यक जिन्नस घ्यावे लागत; प्रत्येकास स्वयंपाकही करावा लागे. रोज सक्तीनें लष्करी कवाइत देखील त्यांच्यावर लादली होती. असें करण्यांत अमानुल्लाचा दुहेरी हेतु होता. ब्रिटिशांनीं धूर्त हेरांना ' मुहाजिरीन' म्हणून रवाना केलें होतें. त्यांना निवडतां यावे हा एक, आणि आपणांस योग्य अशीं माणसें पारखून ठेवून घ्यावीं हा दुसरा. त्याप्रमाणें त्याचे दोन्हीही हेतु साध्य झाले. अस्तु. मुहाजिरिनांनीं पुढें काय काम केलें किंवा धर्मयुद्धांत अफगाण आपणांस सहाय्य करतील अशी त्यांची अपेक्षा कशी सपशेल खोटी ठरली इत्यादि कथानकाचा प्रस्तुत पुस्तकाशीं तादृश संबंध नसल्यानें आपण त्यांना येथेंच सोडूं.

**१०३. ब्रिटिश वकिलातीची काबूलमध्यें स्थापना :**—इ. स. १९२२ च्या प्रारंभास **सर हंफ्रेज्** हे ब्रिटिश वकील म्हणून काबूलमध्यें जाऊन राहिले. त्यांच्यासाठीं खास इमारत काबूलच्या बाहेर बांधली असून सर्व प्रकारें सुरक्षिततेची व्यवस्था केली होती. कंदाहार व जलालाबाद येथेंही ब्रिटिश कॉन्सु-लेट्स् स्थापण्यांत आलीं. त्याच वेळीं लंडन येथें अफगाणांचा वकील गेला.

---

* काबूलच्या उत्तरेस ५० मैलांवर असलेलें हवाशीर ठिकाण. येथूनच काबूलला विद्युत्शक्ति पुरविली जाते.

‡ Shaukat Usmani : *Peshawar to Moscow*, p. 4.

सुधारलेलें ब्रिटिश राष्ट्र व रानटी अफगाण देश हे समान दर्जाचे झाले! अफगाण वकील **तेहरान, अंगोरा, मॉस्को, बर्लिन, रोम** व **पॅरिस,** येथें राहूं लागले. आंतरराष्ट्रीय बाजारांत अफगाणिस्तानची किंमत चढूं लागली !

ब्रिटिशांचा वकील म्हणून हंफ्रेज् काबूलमध्यें राहणार; त्यांचा संबंध इंग्रजी मंत्रिमंडळांतील परराष्ट्रीय दिवाणाशीं; सर्व सूत्रें हलणार लंडनमधून आणि त्या संबंधींचा सर्व खर्च म्हणे हिंदुस्थाननें सोसावा ! कारण काय, तर हिंदुस्थानच्या संरक्षणासाठींच ब्रिटिश वकील काबूलमध्यें राहतो. इमारत वगैरे बांधकामाचा खर्च सोडून नेहमींचा खर्च सालीना सुमारें रु. ४,८६,००० सरासरीनें येतो! यांतच कंदाहार व जलालाबाद येथील " कॉन्सल–खान्यां " चा खर्च समाविष्ट आहे. काबूल येथें ब्रिटिश वकिलात स्थापन झाल्यापासून म्हणजे जानेवारी १९२२ ते फेब्रुवारी १९२५ अखेरपर्यंत रु. १५,२४,००० खर्च झाला. आणि तो हिंदी तिजोरींतूनच दिला गेला. ¶

काबूल येथें ब्रिटिश वकील गेला तेव्हां त्याच्यासाठीं दळणवळणाची कांहीं तरी व्यवस्था करणें जरूर होतें. यासाठीं हिंदुस्थान सरकारनें अमानुल्लाचें मन वळविण्याचे प्रयत्न पूर्वीपासूनच चालविले होते. काबूल ते पेशावर तारायंत्राचें दळणवळण असावें, त्या योगानें अफगाणिस्तानचा फायदा होईल, तुम्हांला खर्च मुळींच पडणार नाहीं, तुमचीं माणसें आम्ही शिकवून तयार करूं; इत्यादि लाघवी भाषा ब्रिटिशांसारख्या चढेल मुत्सद्यांच्या तोंडून निघाली. 'तेव्हां 'सिंहाची शेंपटी' नेहमींप्रमाणें वर न राहतां खालीं पडलेली होती असें अनुमान काढण्यास प्रत्यवाय कोणता ? अफगाणिस्तानांतील सहा विद्यार्थ्यांना ब्रिटिशांनीं परस्पर हिंदुस्थानच्या खर्चानें बिनतारी संदेशवाहकाचें काम शिकाविलें. ' त्यांच्या राहण्याचा वगैरे खर्च अफगाण सरकारनेंच सोसला असून साडेदहा महिन्यांच्या अवधींत फक्त एका दुभाष्याचाच रु. १३५० खर्च हिंदी तिजोरीवर पडला ' असें मि. ( आतां सर ) **डेनिस ब्रे** यांनीं वरिष्ठ कायदे–कौन्सिलांत सांगितलें.*

त्याच वेळीं दुसरीही एक महत्त्वाची माहिती एका सभासदाच्या प्रश्नाला उत्तर म्हणून त्यांच्या तोंडून बाहेर आली. हिंदुस्थानसरकारनें उदार होऊन

¶ Legislative Assembly Debates : Vol. VI-I, pp. 65-66.

* Legislative Assembly Debates, Vol. II-2, p. 2439.

पेशावर ते काबूलपर्यंतच्या तारा घालण्यासाठीं लागणारें सर्व सामान अफगाण सरकारास ' नजर ' केलें ! त्या सामानाची नुसती किंमत वाहतुकीचा खर्च सोडून रु. ४,४०,००० होती ! ‡ अमानुल्लानें अफगाण हद्दींत कामगारांनीं काम केलें त्याची मजुरी मात्र दिली. फुकट ' दान ' घेण्याचा दोषारोप कदाचित् टाळावयाचा असावा ! काबूल ते पेशावर तारायंत्र सुरू झालें, त्याचा इतिहास हा असा आहे आणि त्यासाठीं रयतेच्या पैशाचा चुराडाही वर दर्शविल्याप्रमाणें झाला आहे ! ही सर्वच ' परहितदक्षता ' म्हणण्याचें धाडस कोण करणार ?

**१०४. ब्रिटिश मुलुखांत अफगाणांनीं केलेले अत्याचार :-** ब्रिटिश सिंह अफगाणांच्या धिटाईच्या बंडामुळें किती नरम आला होता याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. १९२३ च्या एप्रिलमध्यें कांहीं ब्रिटिश विमानें आकाशभ्रमण करून ' **तझींखेल** ' टोळींतील पुंडांना वठणीवर आणण्यासाठीं बॉंब टाकीत होतीं. **दार्दोनी**च्या उत्तरेस ही टोळी राहात असते. त्या बाजूस अफगाण सरहद्द स्पष्टपणें रेखांकित नसल्यानें वैमानिकांच्या चुकीनें कांहीं बॉंब अफगाण मुलखांतील खेड्यांत पडले. कांहीं मेंढरें व मनुष्यें दगावलीं. २१४ घरें जमीनदोस्त झालीं. त्याकरितां ब्रिटिश व अफगाण अधिकाऱ्यांचें एक मंडळ नेमण्यांत येऊन लगेच त्या मंडळानें ठरविल्याप्रमाणें काबूलमधील इंग्रजी वकिलानें अफगाण सरकारला पत्र लिहून " मनःपूर्वक खेद " व्यक्त केला. जीवितास व मालमत्तेस नुकसान पोहोंचलें होतें त्याबद्दल भरपूर भरपाईही दिली !

याच वेळीं म्हणजे १९२३ च्या एप्रिलमध्यें अफगाण सरकार व ब्रिटिश अधिकारी यांच्या दरम्यान बऱ्याच कुरापती निघाल्या. **लंडीकोटल**पासून तीन मैलांवर मेजर **ऑर** व **अँडर्सन्** यांना कोणी अफगाणानें गोळया घालून ठार केलें ( ८ एप्रिल १९२३ ). **कोहाट** येथील छावणींत एका **अजब** नामक अजब करामतीच्या नामांकित डाकूनें सौ. **एलिस**चा खून केला व तिच्या मुलीस पळवून नेलें ! ब्रिटिशांचा हा भयंकर उपमर्द झाला. त्यांनीं काबूलमधील आपल्या वकिलामार्फत निषेधपर खलिते अफगाण परराष्ट्रीय मंत्र्याकडे पाठविले. ऑर व अँडर्सन् यांचा खून करणारांवर काबूलमध्यें खटला चालू असतां गुन्हेगार कैदेंतून निसटले व इंग्रजांनीं पुनः निषेध प्रकट केला !

‡ Legislative Assembly Debates, Vol II-2, p. 2439.

कु. एलिसला कांहीं दिवसांनंतर कोहाट येथें आपल्या राहत्या घरांत आणून सोडून ते निष्णात दरोडेखोर कोणाच्या कचाटींत न येतां 'स्वदेशीं' परतले. लंडीकोटलजवळील अत्याचार करणारे **दाउदशहा** व **अर्दाली** मोकाट सुटले होते. ब्रिटिश आपणांस स्वस्थ बसूं देत नाहींत, विनाकारण कोर्टांत आपली बदनामी करून शिक्षा व्हावी म्हणून खटपट करितात; याचा त्या स्वतंत्र वनवृत्तिच्या पठाणांना मनस्वी राग आला. त्यांनी त्याच वर्षी (१९२३) नोव्हेंबरमध्यें पाराचिनार येथें धाडशी अत्याचार केला. अशानें तरी ब्रिटिश आपणांस डरतील असें त्यांना वाटलें. पाराचिनारच्या लष्करी अधिकाऱ्याचें कुटुंब पळवून नेण्याचा त्यांचा विचार होता. पण श्री. **वॉट्स्** प्रतिकार करून आपल्या पत्नीचें शौर्यानें संरक्षण करण्यास पुढें आले. दाउदशहा व अर्दाली अशा शूर वीराला भीक घालणारे नव्हतेच. त्यांनीं पतिपत्नींस एकाच वेळीं यमसदनीं पाठविलें व कोणास कांहीं सुगावा लागण्याच्या आंत ते पसार झाले!

ह्या अत्याचारांमुळें आपलें वजन अफगाणिस्तानांत मुळींच उरलें नाहीं, अशी ओरड करण्यास इंग्लंडमधील व हिंदुस्थानांतील साम्राज्यवादी पत्रांना अवसर सांपडला. कित्येकांना तर पुन: या शेजाऱ्यांची आतां जुंपणार अशी भीति वाटली. वायव्य सीमाप्रांतावरील अधिकाऱ्यांनीं अतोनात श्रम करून अपराध्यांना शासन करण्याचें ठरविलें आणि ब्रिटिश हद्दींतील आफ्रिदी व अफगाण सैनिक यांनीं मिळून दरोडेखोरांचा खूप पाठलाग केला. एका आफ्रिद्यानें अचूक नेम धरून अर्दालीस निचेष्ट पाडलें. अजब व त्याच्या साथीदारांस रशियन तुर्कस्तानांत "हद्दपार" केलें. काय भयंकर शिक्षा ही !

अफगाण सरकारकडून गुन्हेगारांचा बंदोबस्त राखला जात नाहीं या सबबीवर याच वेळीं हिंदुस्थानसरकारनें मुंबई बंदरांत अफगाण सरकारसाठीं आलेलीं हत्यारांची पार्सलें अडकवून ठेविलीं व अत्याचारी इसमांचें पारिपत्य नीट झालें नाहीं तर तीं हत्यारें जप्त केलीं जातील असें बजावलें. पर्यायानें हा निर्वाणीचा खलिताच म्हणावा. रशियन वर्तमानपत्रकारांना आनंद झाला! मॉस्कोंत अशी वदंता पसरली कीं, ब्रिटिशांनीं अफगाणिस्तानशीं युद्ध पुकारण्याचा विचार चालविला असून 'निर्वाणीचा खलिता' नुकताच रवाना झाला आहे. पण ताझींच्या मुत्सद्देगिरीमुळें म्हणा, अथवा ब्रिटिश वकील हंफ्रेज् याच्या सोशिक वृत्तीमुळें

म्हणा, हें प्रकरण फार पेटलें नाहीं. अफगाणिस्तानचीं अडकवून ठेविलेलीं हत्यारें परत मिळालीं. कडक भाषा बंद झाली व शेजारचे दोस्त जसें कांहीं घडलेंच नाहीं या भावनेनें राहूं लागले.

**१०५. अमानुल्लानें केलेल्या प्रजोपयोगी सुखसोयी** :—आंतर-राष्ट्रीयभानगडींचा इतिहास आणि अमानुल्लाच्या राजकीय व शैक्षणिक सुधारणा पाहिल्यानंतर आतां इतर बाबींकडे थोडेंसें लक्ष देऊन महत्त्वपूर्ण युरोपपरिभ्रमणाची तयारी करावयाची आहे. इंग्रजांनीं मोठ्या औदार्यानें पेशावर ते काबूलपर्यंत तारायंत्राची व्यवस्था अमानुल्लास दान केली होतीच. तिकडे रशियानेंही रस्ते करण्याची व तारांचें दळणवळण चालू करून देण्याची आपली सिद्धता दर्शविली होती. काबूल ते कंदाहार व कंदाहार ते हिरात अशा तारा घालण्याचें ठरलें. काबूल ते खैबर हा नवा रस्ता करण्याचें घाटत होतें. शिवाय कंदाहार–चमन ( बलु-चिस्तानांत क्वेट्याकडे ), कंदाहार–हिरात, काबूल–गार्देज ( कंदाहारच्या रस्त्यावर ), व काबूल ते पट्टकेशर ( ऑक्सस नदीवरील सीमानगर ) ह्या सडकाही उत्तम प्रकारें बांधविण्याची व्यवस्था त्यानें केली. आणखी कांहीं वर्षें तरी मोटारींनींच बहुतेक वाहतुक चालणार हें अमानुल्लास कळून चुकलें व त्यासाठीं चांगले रस्ते असावे म्हणून त्यानें खटपट चालविली.

काबूलपासून सहा मैलांवर "**दार-उल्-अमान**" म्हणून एक नवी राज-नगरी वसविण्याचें अमानुल्लानें ठरविलें आणि तेथील इमारती बांधण्याचें, सडका आंखण्याचें वगैरे काम जोरानें सुरू झालें. तसेंच काबूलच्या पूर्वेस १८ मैलांवर असलेल्या **पाघमान** येथेंही एक वेगळी राजधानी बांधण्याचें काम चालू होतेंच. पाघमानची समुद्रसपाटीपासून उंची ८५०० फूट असल्यानें तेथील हवा अर्थात्‌च थंड असणार. आणि म्हणूनच उन्हाळयांत काबूलाधिपति ‘ गिर्यारोहण ’ करून पाघमानला जाणार होते, त्यासाठीं नव्या राजधानीची आवश्यकता होती.

इतर आणखी सुखसोयींचा प्रसार कसा होत होता हें कळण्यास एक दोन उदाहरणेंच पुरीं आहेत. खुद्द काबूलनगरास विद्युत्शक्ती पुरविण्यासाठीं जाबुल्–अस्–सिराज येथें अगदीं आधुनिक प्रकारचीं यंत्रें चालविलीं जात आहेत. **खोपोली** येथें टाटांचा विद्युत्शक्तीचा कारखाना जसा जलावतरणानें चालविला जातो तशाच प्रकारची व्यवस्था ‘ जाबुल ’–येथें होती. अफगाणिस्तानांतील हें पहिलेंच " हायड्रो-इलेक्ट्रिक " वर्क्स होय. याखेरीज पाघमान, जलालाबाद

व कंदाहार येथें विद्युत्शक्ती पुरविण्याच्या योजना अफगाण सरकारपुढें विचारार्थ ठेविल्या होत्या.

१०६. **आंतरराष्ट्रीय घडामोडी** :—याच कालांत आंतरराष्ट्रीय संबंधाच्या कांहीं भानगडी घडून आल्या. काबूलमधील एका जर्मन प्रोफेसरावर एका अफगाण नोकराचा खून केल्याच्या आरोपावरून खटला भरण्यांत आला होता. प्रोफेसरांनी स्वसंरक्षणार्थ आपणांस हत्याराचा उपयोग करावा लागला अशी जबानी दिली. यामुळें त्यांना चार वर्षांची शिक्षा न्यायाधिशानें दिली. परंतु राजे-साहेबांपुढें अपील नेल्यावर त्यांनीं प्रोफेसरमजकुरास माफी दिली.

तसेंच सि. **दारियो** नामक एका इटालियन इंजिनियरावर एका अफगाण पोलिसाचा ( २७-७-१९२४ ) रोजीं खून केल्याचा आरोप ठेवला होता. रीतसर त्याची चौकशी होऊन इटालियन इंजिनियरास देहान्त शिक्षा सुनावण्यांत आली. परंतु अफगाण कायद्याप्रमाणें खुनी इसमानें खून केलेल्याच्या कुटुंबियांस ठराविक रक्कम दिली, तर तो देहान्त शिक्षेपासून मुक्त होतो. काबूलमधील इटालियन वकिलानें मध्यस्थी केली आणि ७००० पौंड भरपाई म्हणून मृत पोलिसाच्या कुटुंबियांस देण्यांत आलें. परंतु दारियोची कारागृहांतून मुक्तता होण्यास किंचित् विलंब लागला. उतावळेपणानें दारियो तुरुंगांतून निसटून पळून गेला. तेव्हां त्याला पकडण्यांत येऊन चौकशी न करितां देहान्त शासन देण्यांत आलें. हें समजतांच इटालियन मंत्र्यानें अफगाण परराष्ट्रीय मंत्र्याकडून खुलासा विचारला, इटालियन ध्वजाला वंदन करून माफी मागण्यास सांगितलें आणि नुकसानभरपाई मागितली. बरेच दिवस लिखापटी चालू होत्या. शेवटीं अफगाण परराष्ट्रीय मंत्र्याच्या वतीनें दुय्यम सेक्रेटरीनें "क्षमस्व" म्हणून इटालियन ध्वजास प्रणाम केला आणि ७००० पौंडांपैकीं ६००० पौंड इटालियन सरकारास परत केले. अशा प्रकारें ही भानगड थोडक्यांत मिटली. *

ऑक्सस् नदींतील '**उर्ता तगाई**' नांवाचें एक लहानसें बेट अफगाण अंमलाखालीं होतें. डिसेंबर १९२५ मध्यें रशियनांनीं त्यावर हल्ला केला, तेथील अफगाण अधिकाऱ्यास ठार केलें व आपला लाल बावटा तेथें फडकाविला. दोन्ही शेजारच्या राष्ट्रांचा क्रोधानल भडकला ! अफगाणांचा अपमान झाला म्हणून

---

* Toynbee : *Survey of International Affairs, 1925*, VolI.

काबूलाधिपति क्रुद्ध झाले तर आम्हांला विरोध करणारे हे रानटी कोण म्हणून रशिया कपाळाला आंठ्या चढवून पाहू लागला. त्या वेळीं इंग्लंडच्या मनांत–किंवा हिंदुस्थानसरकारच्या हृदयांत–काय विचार चालू असावेत ? दोघांचें भांडण जुंपेल तर त्यांना पाहिजेच होतें. रशिया तर जवळ येऊं नये, पण आहे हा खाष्ट अमीर कसल्या ना कसल्या तरी भानगडींत नेहेमीं गुंतलेला राहील तर फार बरें, अशी ब्रिटिश मुत्सद्यांची इच्छा साहजिकच असणार; मात्र त्यांनीं या प्रसंगीं विशेष लुडबुड केल्याचें दिसत नाहीं. रशियानें काय हेतूनें ही चढाई केली, तें निश्चितपणें सांगतां येणें कठीण आहे. परंतु तात्काळ, एक कमिशन नेमून चौकशी करण्यास सोव्हिएट सरकार तयार झालें यावरूनच त्यांना पुढील बेत कायम ठरविण्यास अवधि पाहिजे होता हें उघड आहे. अफगाण व रशियन अधिकारी एकत्र बसले व बऱ्याच दिवसांच्या कालक्षेपानंतर त्यांनी तें बेट सर्वस्वीं अफगाणांचेंच असल्याचें मत दिलें; आणि आश्चर्य हें, कीं रशियानें लगेच तें बेट अफगाणसरकारच्या ताब्यांत दिलें. प्यादानें प्यादें मारून आपल्या हालचालीवर प्रतिपक्षी काय डाव खेळतो हें पाहण्यासाठींच रशियाची ही युक्ति नसेल ना ? नाही तर तें बेट एकाएकी घेतलें काय, कमिशन नेमलेंकाय आणि तात्काळ तें परत केलें काय, सर्वच प्रकार हास्यास्पद दिसतो.

**१०७. अमानुल्लानें रशियाशीं केलेला तह** :—या प्रसंगानंतर महत्त्वाची गोष्ट म्हणजे बोल्शेव्हिकांशीं अमानुल्लाचें होत चाललेलें जास्त संघटन. ऑगस्ट १९२६मध्यें रशिया व अफगाणिस्तान यांमध्यें जो एक दोस्तीचा गुप्त तह झाला, त्याचीं बोलणीं अर्थात्च कांहीं महिने अगोदरपासून चालत असलीं पाहिजेत. तहाचें स्वरूप पाहूनच त्याचें वैशिष्ट्य कळून येईल.

### रूसो-अफगाण तह ( १९२६ )

२८-२-१९२१ च्या तहाचीं कलमें अंमलांत असून या नव्या तहानें त्याला कोणत्याही प्रकारें बाध येत नाहीं.

( १ ) आम्हांपैकीं कोणावरही तिसऱ्या एका राष्ट्रानें अथवा अनेक राष्ट्रांनीं मिळून हल्ला केल्यास, एका राष्ट्राच्या बाबतींत दुसऱ्यानें पूर्णपणें तटस्थ वृत्तीनें वागावें.

( २ ) एकमेकांच्या प्रदेशावर चढाई करावयाची नाहीं हें आम्ही कबूल करितों. आम्हांपैकीं एकास दुसऱ्याकडून राजकीय अथवा लष्करी उपसर्ग

पोहोंचेल असें कोणतेंही कृत्य आम्हांकडून केलें जाणार नाहीं. विशेषत: एकमेकां-विरुद्ध तिसऱ्या एका राष्ट्राशीं अथवा अनेकांशीं कसलाही लष्करी अथवा राजकीय करार, तह, किंवा गुप्त संगनमत केलें जाणार नाहीं असें आम्ही मान्य करितों. आम्हांपैकीं एकाविरुद्ध इतरांकडून कसलाही बहिष्कार घालण्याचा किंवा आर्थिक वा व्यापारी कोंडमारा करण्याचा प्रयत्न झाल्यास, आम्हांपैकीं दुसरा त्यापासून अगदीं अलिप्त राहील. तिसऱ्या एका राष्ट्रानें अथवा अनेकांनीं आम्हांपैकीं एकाचें शत्रुत्व पत्करलें, तर दुसऱ्यानें अशा विरोधी राष्ट्राच्या धोरणास, कृत्यांस आणि तयारीस आपल्या हद्दींत मुळींच थारा देऊं नये.

( ३ ) एकमेकांचें सरकार आपापल्या देशांत स्वतंत्र व न्याय्य आहे असें आम्ही मान्य करितों. एकमेकांच्या अंतस्थ कारभारांत सशस्त्र अथवा निःशस्त्र लुडबुड आम्हांपैकीं कोणी करणार नाहीं असें आम्ही ठरवितों. अशा अंतस्थ व्यवहारांत लुडबुड करणाऱ्या किंवा एकाविरुद्ध हल्ला करणाऱ्या तिसऱ्या राष्ट्रांला आम्हांपैकीं कोणी सहाय्यही करणार नाहीं किंवा त्याच्या पक्षाला मिळणारही नाहीं. ज्या संस्थांचा, चळवळींचा अगर व्यक्तींचा हेतु आपणांपैकीं एकाच्या स्वातंत्र्यावर गदा आणण्याचा असेल अशा संस्था, चळवळी किंवा व्यक्ति आपल्या राज्यांत असणार नाहींत, येणार नाहींत, किंवा कोणत्याही प्रकारें त्यांना आश्रय मिळणार नाही अशी व्यवस्था ज्यानें त्यानें ठेवावी. तसेंच, आम्हांपैकीं एका-विरुद्ध उपयोगांत आणलें जाईल असें युद्धसामान, दारुगोळा, हत्यारें इत्यादिकांची कोणीही आपल्या राज्यांतून वाहतूक होऊं देऊं नये.

( ४ ) तह मुद्रांकित झाल्यापासून तीन वर्षें अमलांत येईल. मुद्रांकित होण्यास तीन महिन्यापेक्षां अधिक काल लागूं नये. नंतर तो बदलण्याची आवश्यकता वाटल्यास दोघांपैकीं कोणीतरी सहा महिन्यांची पूर्व सूचना, मुदत संपण्यापूर्वींच द्यावी. नाहींतर आणखी एक वर्ष हा तह अमलांत राहील. ‡

हा तह वाचतांना असें वाटतें कीं, रशियावर किंवा अफगाणिस्तान टपून बसलेलें एखादें राष्ट्र अगदीं जय्यत तयारींत होतें व म्हणूनच तयारीसाठीं या दोन्ही दोस्तांनीं नवा तह केला. अफगाणिस्तानपेक्षां रशियावर सर्व साम्राज्यवाद्यांचा डोळा होता. बहिष्कार आणि कोंडमारा यांची भीति रशियालाच विशेष होती. जर्मनीला वठणीवर आणण्यासाठीं कोंडमाऱ्याचाच अवलंब दोस्त

‡ *The Indian Year Book, 1927*, ( The Times of India. )

राष्ट्रांनीं युरोपियन युद्धप्रसंगीं केला होता व तो यशस्वी ठरला. ‘एकाकी’ लढणाऱ्या रशियाला विरोध करणारें बलशाली राष्ट्र साम्राज्यवादी असल्यानें त्यास अफगाणिस्तानसारख्या छोटया राष्ट्राशीं इतका महत्त्वाचा तह करावा लागला. अफगाण अमीरही हिंदुस्थानसरकारकडे शत्रुत्वाच्या भावनेनें पहात असल्याचें व तत्क्षणींच रशियाच्या कह्यांत अधिकाधिक जात असल्याचें प्रत्यक्ष चिन्ह म्हणजे वरील तह आहे.

इंग्रजांना रशियाविरुद्ध चळवळ करण्यासाठीं अफगाणिस्तानांत राहण्यास या तहानें सवड ठेवली नसली तरी हिंदुस्थानसंबंधीं ब्रिटिशांविरुद्ध चळवळ करण्यासाठीं रशियनांस अफगाणिस्तानांत राहण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं, हें या तहाचें आपल्या दृष्टीनें महत्त्वाचें अंग आहे. आपल्यावर कोणी चाल करून आल्यास पाठीवर घेण्यासाठीं किंवा वार झेलण्याकरितां ढाल म्हणून जसा ब्रिटिशांनीं तसाच रशियानेंही अफगाणिस्तानचा उपयोग करून घेतला आहे. हें धोरण अपरिहार्य असेंच होतें. आणि बफर स्टेट ( मृदंग राष्ट्र ) म्हटलें कीं, त्याला अशा दोघांचाही दाब सहन करावा लागणारच. रशियावर हल्ला होणार तो बिटिशांचा किंवा तत्सम साम्राज्यवाद्यांचा. ब्रिटिशांना इराणांतून, तुर्कस्तानांतून अथवा अफगणिस्तानांतून मार्ग मोकळे असावयाचे. पण पहिल्या दोन राष्ट्रांत स्वतंत्र राजे आल्यानें आणि त्यांचें ब्रिटिशांशीं विशेष सूत नसल्यानें, भीति उरली ती अफगाणिस्तानकडूनच हिंदुस्थान म्हणजे ब्रिटिशांची सवती मिरास आणि द्रव्यवैपुल्य, युद्धसामग्री व मनुष्यबल यांचें कधींही न संपणारें कोठार; तेव्हां तिकडूनच हल्ला करण्याचा हेतु इंग्रजांचा असणार! त्यांचें आरमार मोठें असलें तरी समुद्रावरून इंग्लिश सैनिक नेण्यापेक्षां हिंदुस्थानांतील फुकट मिळणारे “रंगरूट” नेणें इंग्लंडच्या दृष्टीनें हितावह असल्यानें रशियाला भीति होती ती हिंदुस्थानच्या बाजूनें अफगाणिस्तानमधून इंग्रज अधिकारी सैन्याला वाट मागतील म्हणूनच. युरोपियन महायुद्धांत बेल्जमची जी अवस्था झाली तीच अफगाणिस्तानची करण्याचा उद्देश इंग्रजांचा असल्यास त्यांत आश्चर्य मुळींच नव्हे. तहाच्या पहिल्या व दुसऱ्या अटीनें ती भीति रशियानें पार घालवून टाकली.

उलट, रशियनांचीं नवीं तत्त्वें राजसंस्थेविरुद्ध आहेत असें भासवून रशिया व अफगाणिस्तान यांचेमध्यें भेद पाडण्यास कोणा नारदास संधि मिळूं नये म्हणून “एकमेकांचें स्वातंत्र्य मान्य करून तेथील सरकार न्याय्य” असल्याची रशियानें

कबुलीही दिली आहे. तत्त्वनिष्ठेत रशियानें हा बदल केला तो व्यवहाराच्या व मुत्सद्देगिरीच्या दृष्टीनें इष्टच आहे. शिवाय रशियाचा कटाक्ष विशेषतः साम्राज्य-वाद्यांवर आहे आणि अफगाणिस्तान तर साम्राज्यवादी मुळींच नाहीं.

असा हा तह झाल्यानें इंग्रजांनाही विशेष काळजी उत्पन्न झाली. कारण हिंदुस्थानला रशियनांचा उपसर्ग अफगाणिस्तानांतूनच पोहोंचत होता. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं मार्ग काढण्याचें काम या तहानें विशेष दुष्कर झालें.

---

## प्रकरण आठवें

# अमीर अमानुल्ला : युरोपियन सफर

**१०८. प्रवासाची तयारी** :—स्वदेशाची सुधारणा करण्याचे अमानुल्लाचे प्रयत्न चालू होते त्यांत त्याला भर टाकण्यासाठीं युरोपांतील देशांचें निरीक्षण करण्याची इच्छा झाली. आपला ' गुरु ' गाझी **मुस्तफा केमाल** यालाही त्याच्या मनांतून भेटावयाचें होतें. आंतरराष्ट्रीय दर्जा वाढवून घेण्यासाठीं एकदां युरोपची सफर करून निरनिराळ्या राष्ट्रांशीं मैत्रीचें नातें जोडणें इष्ट असल्याचें तार्झीकडून अमिरास समजलें होतें आणि परदेशप्रवासानें मिळणारे अनेकविध फायदे त्याला स्वतःला कळत नव्हते असें नाहीं. ह्या सर्व दृष्टींनीं विचार करून अफगाण अमिरानें सहकुटुंब युरोपच्या यात्रेस निघण्याचा निश्चय केला.

अफगाण अमीर स्वदेश सोडून बाहेर सहसा जात नाहीं. आणि जाणें सुरक्षित नसतेंही. हिंदुस्थानपर्यंत येण्याचा उपक्रम अमिरांनीं पाडला होता. तसेंच हबीबुल्ला अमीर असतांना त्याचा पुत्र युरोपच्या प्रवासास गेला होता. परंतु स्वतः राज्यकर्ता अमीर युरोपच्या सफरीस निघाल्याचें उदाहरण पूर्वी अफगाण इतिहासांत घडलेलें नाहीं.

आपल्या पश्चात् **महमद वलीखान** यानें राज्यकारभार हांकावा असें अमानुल्लानें ठरविलें. अमिराचा आपल्या प्रतिनिधीवर इतका विश्वास होता कीं मदतनीस मंडळ देखील त्याला दिलें नाहीं. कुलमुखत्यारी महमद वलीखानावर टाकली आणि अमीर, राणी, राजभगिनी, राणीची बहीण, अमिराचे श्वशुर इत्यादि मंडळी कंदाहारमार्गे निघाली. अर्थात्च ज्या ज्या देशांत अमानुल्ला जावयाचा होता त्या त्या देशांतील मुख्य सत्ताधिशांनीं काबूलमधील आपल्या

वकिलांकरवीं अमानुल्लाला निमंत्रणें पाठविलीं आणि आपल्या देशांत येऊन पायधूळ झाडण्याची विनंति केली.

**१०९. हिंदभूमींतील पहिलें स्वागत** :—अमानुल्ला युरोपच्या सफरीसाठीं निघाला, तो काबूलहून कंदाहारमार्गें **चमन** येथें १० डिसेंबर १९२७ रोजीं आला. चमन हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें अखेरचें स्टेशन. अफगाणांचा **स्पिनबाल्दक** हा मजबूत किल्ला चमनपासून नजीक आहे. चमन स्टेशनवर अफगाण राजाराणीचें स्वागत करण्यासाठीं क. **सें. जॉन** ( गव्हर्नर जनरलचे प्रतिनिधि A. G. G., ), **सर चा. हेरिंग्टन्**, जन. ऑ. कमांडिंग ( वेस्टर्न एरिया ) व इतर लष्करी अधिकारी हजर होते. त्यांनीं खडी ताजीम दिली. तोफांची सलामी झडली. आमच्या साम्राज्यांत प्रवेश करून पायधूळ झाडल्या-बद्दल आभारप्रदर्शक अभिनंदन करणारी अशी एक तार पंचम जॉर्जकडून आली होती. ती देण्यांत आल्यावर व्हाइसरॉयांकडून आलेला शुभचिंतनपर दुसरा संदेशही अमानुल्लाच्या हाती पडला. योग्य शब्दांत त्यानें दोघांचे आभार मानून दोघांनाही अनुरूप उत्तरें पाठविलीं.

चमनहून केट्टामार्गें अफगाण अमिराची स्पेशल गाडी कराचीस ता. ११ डिसेंबर १९२७ रोजी दुपारी अडीच वाजण्याच्या सुमारास पोहोंचली. स्टेशनवर सिंधचे कमिशनर मि. **हड्सन्**, मे. ज. **नाइटिंगेल** व इतर बडे ऑफिसर हजर होते. अमानुल्ला खालीं उतरतांच बँडवादन झालें, तोफांची सलामी झडली. राणी सूरय्या, अमानुल्लाची भगिनी **नुरुल सिराज** व सुरय्याची बहीण **हुर्या ताझी** या तीनही राजस्त्रिया पूर्णपणें बुरख्यांतून हिंडत होत्या, तरी त्यांचा युरो-पियन धर्तीचा पोषाख झांकून राहूं शकला नाहीं.

कराचीस येतांच सायंकाळच्या सुमारास झुऑलॉजिकल् गार्डन्समध्यें अमा-नुल्लास चार मानपत्रें व एक उद्यानोपाहार या समारंभांस हजर रहावें लागलें. कराची नगरसभेनें, शीख व हिंदु जनतेनें, पार्शी नागरिकांनीं आणि इस्लामी बंधूंनीं अशीं मिळून चार निरनिराळीं मानपत्रें अफगाणाधिपास अर्पण केलीं. मोज-क्याच शब्दांत अमानुल्लानें सर्वांचे आभार मानिले.

दुसरे दिवशीं सकाळीं अमानुल्ला स्वतःच आपली मोटार हांकीत झुऑलॉ-जिकल् गार्डन्स पाहून अफगाण वकिलातींत आला. तेथें " न्याहारी " झाल्यावर सव्वा दहा वाजतां तो वैमानिक ठाणें पाहण्यासाठीं गेला. यंत्रें दुरुस्त कशीं करितात,

त्यांची रचना कशी असते इत्यादि चौकशी करीत तेथें तो बराच वेळ राहिला. नंतर कमिशनरांसमवेत उपाहार करून ता. १२ डिसेंबर रोजीं तिसऱ्या प्रहरीं आगबोटींत बसून तो मुंबईकडे निघाला. चार विमानें राजेसाहेबांची राखण करण्यासाठीं किंवा त्यांना सोबत म्हणून चमनपासूनच येत होतीं. तींच पुढें मुंबईपर्यंत जाणार असें ठरलें. राजेसाहेबांची बोट बंदरांतून निघतांच पुनः ३१ तोफांची सलामी झाली.

**११०. अमानुल्लाचें मुंबईंतील स्वागत** :—मुंबईस अमानुल्लाच्या स्वागताची तयारी काय चालली होती याचें वेगळें वर्णन कशाला पाहिजे? दिल्लीहून व्हाइसरॉय सपत्निक येऊन मुंबईत तळ देऊन राहिलेले. कारण बादशहांचा खासा पाहुणा बादशहाकडे जावयास निघणार. तेव्हां त्याची बरदास्त राखावयास पाहिजे. ता. १४-१२-२७ रोजीं साधारणपणें तिसरे प्रहरींच आगबोट मुंबई बंदरांत आली. मुंबईचे गव्हर्नर **सर लेस्ली विल्सन** व इतर अधिकारी बोटीवर पुढें सामोरे गेले व पुनः परत येऊन धक्क्यावर उभे राहिले. आयत्या वेळीं मुंबईचा मलेरिया व्हाइसरॉयांना बाधला. ते जे आंथरुणाला खिळले ते अमानुल्ला जाईपर्यंत उठूं शकले नाहींत. मनांतून इच्छा फार, कीं आपल्या बादशहांच्या मित्राला भेटावें. पण डॉक्टरांचा सल्लाच असा होता, कीं खोलीबाहेर पडावयाचें नाहीं! बड्या लाटांची फार निराशा झाली आणि तशीच अमानुल्लाचीही झाली असली पाहिजे.

आगबोटीनें नांगर टाकल्यानंतर खासे पाहुणे 'हिंदभूमीच्या प्रवेश द्वारा'-(Gate of India) पाशीं उतरले. सर लेस्ली विल्सन व इतर अधिकारी अमानुल्लाचें स्वागत करण्यासाठीं उभे होते तर लेडी **अर्यावन** व लेडी **विल्सन** या राजस्त्रियांच्या आदरातिथ्याकडे पहात होत्या. त्यांची दरबारी थाटानें मलबार हिलवरील गव्हर्नमेंट हाउसपर्यंत निघालेली मिरवणूक मुंबईच्या इतिहासांत अपूर्व देखाव्यांपैकीं व महत्त्वाची मानली जाईल. हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिश्चन, सर्वच धर्मांचे व पंथांचे लोक मोठ्या उत्सुकतेनें मिरवणुकींत भाग घेत होते.

त्याच दिवशीं रात्रीं दरबारी मेजवानी झाली. लॉर्ड **अर्यावन** बिछान्याबाहेर निघूं शकले नाहींत! अर्थात् सर लेस्ली विल्सन हेच मुख्य यजमान झाले. मेजवानीस बडे बडे हुद्देदार, सरकारी व लोकनियुक्त दिवाण, शहरांतील सन्मान्य पुढारी इत्यादि बरीच मंडळी हजर होती. पण त्या वेळेस अमानुल्लानें कोठें बसावें व राजप्रतिनिधींचे प्रतिनिधी सर लेस्ली विल्सन यांनीं कोणतें आसन अलंकृत

करावें यासंबंधी मानापमानाचा थोडासा फार्स झाला असें ऐकिवांत आहे. अमीर तर बोलूनचालून रानटी, स्वतंत्र वृत्तीचा. तो अशा इंग्रजी शिष्टाचारास, गोऱ्या कातडीस किंवा ब्रिटिश निशाणास भितो थोडाच ? अस्तु.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १५ रोजीं मुंबईतील सर्व पठाण, अफगाण वकिलातींत जमले होते. अमिराला भेटून इंग्रज सरकारची कडक शिस्त आपणांस कशी जाचक होते याबद्दल त्यांना तक्रार करावयाची होती. अमानुल्ला अफगाण वकिलातींत आला व तेथें पठाणांशीं मोकळेपणानें मिसळूं लागला, हें ज्यांनी पाहिलें त्यांना अमानुल्लाच्या लोकप्रियतेची मख्खी कळली असेल. राजा म्हणजे अगदीं आपल्यापैकींच असें प्रत्येकाला वाटे आणि अमानुल्लाही आपण प्रजेपैकी एक याच जाणिवेनें त्यांच्यांत मिसळून हंसत खेळत असे. मुंबईच्या पोलिसांचा आम्हांस फार त्रास होतो असें पठाणांनीं अमिरास सांगितलें. 'त्याची व्यवस्था मी करितों' या पोकळ आश्वासनापेक्षां अमानुल्ला त्यांस जास्त उत्तर देऊं शकला नाहीं.

युरोपियन क्लबतर्फे उद्यानोपाहार झाला; अर्थात् या व इतर प्रसंगीं सर लेस्ली विल्सन अयर्विनचे प्रतिनिधि म्हणून जिकडे तिकडे मिरवीत होतेच. अमानुल्लाला मुंबई पहावयाची होती. म्हणून तो मर्जीस वाटेल तिकडे मोटारमधून जात असे. बरोबर पोलिस कमिशनर होते. मुसलमानांचें शिष्टमंडळ त्याच्या मुलाखतीस आलें. मानपत्रांची रेलचेल उडाली.

**१११. जनतेनें केलेला अमिराचा सन्मान** :—शुक्रवारी सकाळीं डोंगरीवर एक प्रचंड सभा भरवून अमानुल्लास हीं मानपत्रें अर्पण करण्याचा समारंभ झाला. अलोट जनसंमर्द लोटल्यामुळें भाषणें अशी कोणांस ऐकूं गेलींच नाहींत. अमानुल्लाचें दर्शनही कित्येकांस झालें नाहीं, म्हणून त्यांची निराशा झाली. त्या सभेत मुसलमान पुढाऱ्यांखेरीज सौ. **सरोजिनी नायडू** व सौ. **कस्तूरीबाई गांधी**, डॉ. **साठे** वगैरे पुढारीही उपस्थित होते. सर्व समाजाचें प्रातिनिधिक स्वरूप तेथें दिसत असलें, तरी साहजिकच इस्लामानुयायी व विशेषत: पठाण प्रामुख्यानें व आधिक्यानें डोळ्यांत भरत.

मुंबईच्या मुसलमानी समाजातर्फे एक मानपत्र वाचून दाखविल्यावर **हकीम अजमलखान** यांनीं मुस्लीम युनिव्हर्सिटीच्या वतीनें दुसरें मानपत्र अमानुल्लास समर्पण केलें. **महंमद** अल्ली—खिलाफत चळवळीचे मुख्य आधारस्तंभ—यांनीं आपल्या संस्थेच्या वतीनें एक मानपत्र वाचून अर्पण केलें. हिंदु, मुसलमान,

व पार्शी संस्थांनी पुष्पहार अर्पण करून अफगाण अमिराचें स्वागत केल्यावर सर्वांना मिळून त्यानें एकच उत्तर दिलें.

शिष्टाचारानुसार आदरातिथ्याबद्दल व मानसन्मानाविषयीं मन:पूर्वक आभार मानल्यावर अमानुल्लानें मुसलमानांना चांगलाच उपदेश केला. " आमच्या राज्यांत हिंदु-मुसलमान असा भेद नसून दोघांनाही सारखेंच वागविलें जातें. तेथें हे भिन्न-धर्मीय लोक आपसांत भांडत नाहीत. हिंदूंशीं भांडल्यानें किंवा त्यांच्या धार्मिक भावना दुखवून तुमचें हित होणार नाहीं " इत्यादि अमानुल्लाचा उपदेश ऐकून अलीबंधू आणि त्यांच्याच कंपूंतील मंडळी फार निराश झाली. आपलेंच वेडें म्हणणें ऐकून घेऊन अमीर तदनुसार आचरण करील, अशी त्यांची खात्री असतांना त्याच अमानुल्लानें त्यांचे कान पिळावे, उपदेशाचे व हिताचे चार शब्द सांगावे, हें त्यांना रुचलें नाहीं. संमिश्र समाजांत कदाचित् बाह्यात्कारीं अमानुल्लाने असें सांगितलें असेल, या अपेक्षेनें ते दुपारच्या जुम्मा मशिदींतील प्रार्थनेकडे मोठ्या कुतूहलपूर्वक व आशायुक्त इच्छेनें कान लावून बसले.

सकाळी बऱ्याच जणांना अमानुल्लाचें दर्शन झालें नाहीं म्हणून दुपारीं प्रार्थनेच्या वेळचा कार्यक्रम ठरविण्यांत आला. त्या दिवशीं अमानुल्लानें प्रार्थना चालविली. "धार्मिक आचार पाळा, पण धर्मवेड सोडा" म्हणून त्यानें उपदेश केला. "आपल्या धर्माची प्रतिष्ठा रहावी असें वाटत असल्यास इतरांच्या धर्माला योग्य मान द्या. अन्यधर्मीयांच्या उपासनामार्गाची चेष्टा करूं नका. परधर्माविषयीं असहिष्णु राहिल्यानें पैगंबराच्या शिकवणीस तुम्ही कमीपणा आणतां. " इत्यादि उपदेश ऐकून धर्मवेड्या मुसलमानांना काय वाटलें असेल त्याची कल्पनाच करावी.

दुपारी चार वाजतां मुंबई कॉर्पोरेशन हॉलमध्यें नगरसंस्थेतर्फे मानपत्रार्पण समारंभ झाला. नगरपित्यांचें मत असें होतें, की अमानुल्ला बोटींतून 'प्रवेशद्वारीं' उतरणार तेथेंच व तेव्हांच त्याला मानपत्र द्यावें. परंतु त्या वेळीं व्हाइसरॉय हजर असणार. त्यांना या मानांतून वगळून चालणार नाहीं. त्यांच्या देखत अमानुल्लास मानपत्र अर्पण करणें शिरस्त्याला धरून नाही असा सरकारी हुकूम निघाला. पुढें व्हाइसरॉय आजारी असल्यानें हजर राहूं शकत नाहींत, तेव्हां अपोलो बंदरावर आम्ही मानपत्राचा समारंभ करूं कीं काय अशी कॉर्पोरेशननें पृच्छा केली असतां, सरकारकडून नकारार्थीच उत्तर आलें. शेवटी कॉर्पोरेशन हॉल-मध्येंच मानपत्र दिलें गेलें. झालेल्या सन्मानास आभारप्रदर्शक उत्तर देतांना

अफगाण राजे म्हणाले, " आपणां सर्वांचा देव एक आहे. आपणांत विश्वबंधुत्वाचें नातें आहे. धर्म वेगळा याचा अर्थ देवाला तुम्ही वेगळें नांव देतां. सर्व धर्मीयांची एकी झाली म्हणजेच राष्ट्रकार्य होतें. स्वदेशी मालच—तो मग हलका असो—जाडा भरडा असो—सदैव वापरा. त्यानेंच देशाची खरी उन्नति होईल. "

**११२. कांहीं मुसलमानांच्या अपेक्षा:**—कॉर्पोरेशनमधून अंजुमान-ए-इस्लाम या संस्थेंत राजेसाहेब गेले. तेथें अलीबंधू " अल्ला-हो-अकबर " ची गर्जना इतक्या जोराने पण विनाकारण करीत होते की अमानुल्लास त्यांच्या वेडेपणाची व पोरकट वर्तनाची चीड आली ! त्याचें प्रत्यंतर मानपत्र-स्वीकारानंतर तो भाषण करण्यास उभा राहिला तेव्हां पहावयास मिळालें. अमानुल्ला व्यासपीठावर उभा राहतांच अलीबंधूंच्या शिकवणीनुसार जमावानें 'अल्ला-हो-अकबर'ची खूप मोठ्यानें आरोळी ठोकली. ती ऐकून अमानुल्ला शांतपणें पण बंधुद्वयांकडे दृष्टिक्षेप करीत म्हणाला, "छे ! ही गर्जना फारच हळू झाली. याच्यापेक्षां जोरानें व सर्वांनीं मिळून नाहीं का अल्लाचें नांव घेतां येणार ? "

या उपहासात्मक विनंतीचा छान उपयोग झाला. चिमणीप्रमाणें लहान तोंडें करून सर्व खिलाफती मंडळी स्वस्थ बसली. अमानुल्लानें आपल्या भाषणांत विनयाचें प्रदर्शन केलें. धर्मवेडाबद्दल आणि मुल्लांपासून समाजाचा बचाव करण्याची सूचना देण्यास तो विसरला नाहीं. " मुल्लांच्या तावडीत सापडूं नका, त्यांचा प्रभाव पडूं देऊं नका, म्हणजेच तुमची प्रगति होईल. माझा इतका सन्मान कां केलात ? मी कांही राजा नव्हे, अमीर नव्हे, बादशहा नव्हे. गरिबापेक्षां गरीब असा मी एक रयतेचा बंदा गुलाम आहे. रयतेच्या इच्छेप्रमाणें, तंत्राप्रमाणें, मला वागलें पाहिजे." हें बोलणें ऐकून खरा प्रजावत्सल राजा कसा असतो आणि प्रजाहितदक्ष राहण्याचा भाव आणणारी परकी राजसत्ता कशी असते याचें ज्ञान जनतेस झालें.

शनिवारीं दुपारीं अमानुल्ला आगबोटीनें विलायतेस प्रयाण करणार म्हणून ठरलें होतें. त्या दिवशीं सकाळीं अमानुल्लाच्या भेटीस तीन शिष्ट-मंडळें आलीं. एक तरुण मुसलमान विद्यार्थ्यांचें. त्यांनीं अमानुल्लानें शिक्षणाप्रीत्यर्थ केलेल्या प्रयत्नांबद्दल प्रसंशोद्गार काढून अशीच सुधारणा जारीनें चालविण्याबद्दल विनंति केली. अमानुल्लानेंही त्यांचे योग्य शब्दांत आभार मानून शिक्षणाचें महत्त्व फार असल्याचें सांगितलें. मुंबईतील पारशी समाजाचें एक शिष्टमंडळ अमानुल्लास भेटा-वयास आलें असतां त्यानें आपल्या धर्माचा प्रसार अफगाणिस्तानांतच कसा

झाला, झरतुष्ट्र बाल्कमध्यें पूर्वकालीं होता, पारशी धर्माच्या इतिहासाशीं अफगाणिस्तान फार निगडित असल्याचें वगैरे ऐतिहासिक–पौराणिक नातें जोडून त्यांनीं अमानुल्लाची स्तुति केली. अमानुल्लानेंही तें सर्व खरें असल्याचें सांगून इतिहाससंशोधनास उत्तेजन देण्याचा आपला इरादा कळविला.

'अंजुमान-ए-महंमदीया' या इस्लामानुयायी पंथाचें शिष्टमंडळ अमानुल्लास भेटलें. अगदीं एकांतांत त्यांच्या पुढाऱ्यानें अमानुल्लाच्या कानांत सांगितलें कीं, " आम्ही हिंदी प्रजाजन असलों, तरी आमच्या आंगांत 'अफगाण' रक्त आहे. आमचा पंथ-संस्थापक फरा येथील राहणारा. इकडेच रहावें लागत असल्यानें आम्ही हिंदी प्रजाजन आहों. फऱ्यास यात्रेसाठीं मात्र आमच्यांपैकीं पुष्कळजण जातात. "

अमानुल्लानेंही थोडक्यांत त्यांचे समाधान करण्यासाठीं आनंद व्यक्त केला व शिष्टमंडळास निरोप दिला.

**११३. अमानुल्लाचा बोटीवरील कार्यक्रम** :—अमानुल्ला मुंबईहून ता. १७ डिसेंबर रोजीं पी. अँड ओ. कंपनीच्या ' रजपुताना ' बोटीनें निघाला. बंदरावर निरोप देण्यासाठीं सर ले. विल्सन , लेडी अर्यार्विन, लेडी विल्सन व पोलिस कमिशनर इत्यादि मंडळी आली होती. " आपणा सर्वांनी मजसाठीं फारच त्रास सोसला, विशेषत: मि. केली ( पोलिस कमिशनर ) यांनीं माझी व्यवस्था उत्कृष्ट ठेवली " इत्यादि आभारप्रदर्शक उद्गार काढून अमानुल्ला बोटीवर चढला. यथाकालीं आगबोट बंदरांतून निघाली. चार विमानें आकाशांत घिरट्या घालून आगबोटीस सोबत करीत होतीं. अमानुल्लाबरोबर काबूलच्या इंग्रजी वकिलातीतील एक लष्करी अधिकारी हजर होते.

बोटीवर येतांच अमानुल्ला मोकळेपणानें वागूं लागला. उतारूंशीं बोल, खलाशांना कांहीं प्रश्न विचार, आंत इंजिनघरांत जाऊन 'हें असें कां ? तें तसें कां ?' इत्यादि चौकस प्रश्न विचार, असें त्याचें वर्तन पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. आगबोटींतील सर्व यंत्रांची त्यानें माहिती करून घेतली. बिनतारी संदेशाचें काम चालतें कसें तें कुतूहलपूर्वक रोज पहात बसण्याची त्याला चटकच लागून गेली होती असें म्हणतां येईल.

बोटीवरील विलायती खेळांत तर त्याला फार मौज वाटली. प्रथमच जे खेळ तो खेळूं लागला, त्यांत प्राविण्य नसल्यानें इतरांचें कौशल्य पाहून तो

आपल्याशीच हंसे. मात्र त्याचें लक्ष तो खेळ स्वतःस चांगल्या रीतीनें कसा व कधीं खेळतां येईल इकडेच असल्याचें दिसे. केवळ वेळ घालविण्यासाठीं म्हणून खेळ खेळणें त्याला पसंत नव्हतें असें दिसलें.

कप्तानाबरोबर अमानुल्ला इतक्या मोकळेपणानें वागला कीं, त्या कप्तानाला धन्य असें वाटलें ! प्रत्येक यंत्राचें काम, तें कसें होतें, कोण चालवितें वगैरे अमानुल्लाचे चौकस प्रश्न पाहून आणि बादशहांच्या स्नेह्यांची बरदास्त ठेवण्याचा मान आपणांस मिळाला म्हणून त्याला विशेष उत्साह वाटला. अमानुल्लानें एकदोन प्रसंगीं त्याला भोजनास निमंत्रण दिलें व कप्तानासमवेतही त्यानें मोठ्या आनंदानें भोजन केलें. बोटीवरील इतर अधिकारीही राज-भोजनप्रसंगी पंक्तीचा लाभ घेत होते. अमानुल्ला सर्वांशींच मोकळेपणानें वागे.

इकडे राणीनें व राजभगिनींनी बोटीवर चढतांच काळ्या बुरख्यास रजा दिली. नेहमीं पडद्यांत राहणारी ही बिबी असें सांगितलें, तर कोणास खरेंही वाटणार नाहीं, इतकी सुरख्या युरोपियन वेषभूषा रचण्यांत कुशल दिसली. तिचें स्वरूपही जात्याच चांगलें असल्यानें एखाद्या ' मडमे'प्रमाणें ती दिसे. आपल्या मुलांशीं खेळण्यांत, त्यांना सृष्टिसौंदर्य किंवा बोटीवरील करमणुकींची साधनें दाखविण्यांत ती वेळ घालवीत असे. मात्र भाषेची अडचण फार असल्यानें तिला इतर युरोपियन समाजांत मोकळेपणानें मिसळतां येत नसे.

**एडन** बंदरावर तेथील अधिकारी आले. योग्य तो आदरसत्कार, औपचारिक आभारप्रदर्शन, शुभचिंतन झालें व बोट पुढें जाऊं लागली. नाताळचा सण बोटीवरच झाला. राणीनें मुलाबाळांना मिष्ट खाद्यें व खेळणीं बक्षिस म्हणून दिलीं. तिनें युरोपियन वेष अंगिकारिलेला—शिवाय युरोपचा प्रवासही करावयास निघालेली— तेव्हां त्यांच्या चालीरीतीही तिला पाळल्या पाहिजेच होत्या. असो.

**११४. मिसराधिपतींचें आदरातिथ्य** :—सुवेज कालव्यांत आगबोट शिरतांच तोफांची सलामी झाली. किनाऱ्याच्या एका बाजूस सर्व सैनिक शिस्तवार उभे राहून लष्करी पद्धतीनें अमिराचें स्वागत करीत होते. **पोर्ट सय्यद** ( बंदरांत ) मध्यें आगबोट रविवारीं सायंकाळीं सात वाजतां आली (२५-१२-१९२७).

अफगाण मंत्री व इजिप्तचे अधिकारी स्वागतार्थ हजर होते. त्या रात्रीं **अमानुल्ला** बोटीवरच राहिला. दुसरे दिवशी किनाऱ्यावर जातांच राजे **फौद** यांचे बंधू **उमर** हे अमानुल्लास सामोरे आले. सुएज कॅनाल कंपनीच्या

ऑफिसांत अमीर अमानुल्लास ' पानसुपारी ' झाली. तेथून सर्व मंडळी **कैरोस** जावयास निघाली.

कैरोस अफगाणाधिपति, इजिप्तचे राजे फौद यांचा पाहुणा होता. तेथील पदार्थसंग्रहालय, ' तुतानकामेन 'ची संपन्न कबर व तींतून निघालेले मौल्यवान जिन्नस, हें पाहून पिरामिड, स्फिंक्स इत्यादि पाहण्यास अमानुल्ला परिवारासह मोटारमधून गेला.

अमानुल्ला इजिप्तमध्यें पाहुणा म्हणून गेलेला. तेव्हां तेथील राजानें " ऑर्डर ऑफ मेहमत अली " ही बहुमानाची पदवी अर्पण करून त्याचा गौरव केला. मुसलमानी धर्मानें दोघेही बद्ध झाले असले तरी एकानें स्वपराक्रमावर ब्रिटिश-राज्यकर्त्यांकडून सम्राटाबरोबरीचा सन्मान मिळविलेला, तर दुसरा केवळ "सम्राटाचा आश्रित " म्हणून संतुष्ट वृत्तीनें राहिलेला. अमानुल्लाचें श्रेष्ठत्व याच वेळेस फौदशीं तुलना केल्यानें कळून येण्यासारखें होतें व तें इजिप्तनरेशाच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नसेल.

कैराहून अमानुल्ला **अलेक्झांड्रियास** गेला व तेथून पुढें इटालींत प्रवास करण्याचा कार्यक्रम ठरला होता. पी. अँड. ओ. कंपनीच्या टपाल बोटींतून संचार झाला, तो मुंबईपासून पोर्टसय्यदपर्यंतच. बोटीवर राजेसाहेबांस साजेल अशीच सन्माननीय व प्रशंसनीय व्यवस्था ठेविल्याबद्दल त्या कंपनीच्या शासकमंडळाच्या अध्यक्षांस-**लॉर्ड इंचकेप** यांस—अमानुल्लानें आभारप्रदर्शक संदेश पाठविला.

**११५. इजिप्तमधील प्रेक्षणीय स्थलनिरीक्षण** :—ता. २९।१२।२७ गुरुवारीं अमानुल्ला अलेक्झांड्रियांत आला. तेथें मुंबईच्या पूर्ण परिचयाचे गव्हर्नर **लॉर्ड लॉईड** हाय कमिशनर म्हणून सत्ता गाजवीत होते. सम्राटाचे पाहुणे म्हणूनच त्यांना अमानुल्लाचा सत्कार करणें क्रमप्राप्त झालें. जानेवारी २ तारखेस लॉर्ड व लेडी लॉईड यांच्या समवेत अफगाण राजाराणींनीं उपहार केला.

दुसरे दिवशीं तुर्की वकिलातींत अमानुल्लाचा सन्मान झाला. अलेक्झांड्रियामधील इंजिनियरिंग व टेक्निकल् शाळा त्यानें पाहिल्या. तेथील जुना ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय पाहण्यास तो विसरला नाहीं. आणि आपल्या जवळच्या तीन ठासण्याच्या बंदुका, दोन तलवारी व एक सुवर्णजडित छोटी तोफ (Arquebus) इतक्या जुन्या वस्तु त्या अरब-संग्रहालयास अमानुल्लानें नजर केल्या. त्या सर्व अफगाणिस्तानांत अठराव्या शतकांत तयार झालेल्या होत्या.

ता. ५-१-२८ रोजीं अफगाण पाहुणे " इटालिया " बोटींतून अलेक्झां-ड्रियाहून **नेपल्स**ला जाण्यासाठीं निघाले.

**११६. इटालींत सन्मानपूर्वक प्रवेश** :—ता. ८-१-२८ रोजीं सकाळीं अफगाण राजे व बरोबरचे इतर पाहुणे नेपल्सला पोंहोंचले. विमानांची सोबत " इटालिया "ला होतीच. कारण 'अतिथिविशेषा'चा सत्कार करण्याची ती एक रीतच आहे. अमानुल्ला बोटींतून उतरत असतांना तोफांची सलामी झडली आणि उतारूंनीं, खलाशांनीं आणि इटालियन नागरिकांनी टाळ्या वाजवून आकाश दुमदुमून सोडलें. सैन्याची पाहणी करून व त्यांचा सलाम स्वीकारून राजेसाहेब पुढें गेले.

इटालीच्या राजेसाहेबांतर्फे अमानुल्लाचें स्वागत करण्यासाठी हाय कमिशनर **सिनॉर कॅस्टेली** व काबूल येथे राहणारा इटालीचा वकील हे दोघे बोटीवर गेले होते. **जन. टारांटो,** कौंट व कौंटेस् **गुसी आर्डिनी** इत्यादिकांचें एक 'स्वागतमंडळ' इटालियन सरकारनें नेमलें होतें. अफगाणराजकुटुंब इटालींत असे-पर्यंत त्यांच्या तैनातीचें काम त्या मंडळाकडे सोंपविलें होतें. तेंही सामोरें गेलें. इटालियन दरबारांतील 'आचारपंडित' (Master of Ceremonies)ही हजर होते. रोममधील अफगाण वकील अमानुल्लास बोटीवरच भेटला.

धक्क्यावर युरोपमधील सगळे अफगाण वकील जमले होते. परराष्ट्रीय वकीलही राजेसाहेबांच्या स्वागतार्थ आले होते. नेपल्समध्यें अफगाण वकिलांची एक परिषद् भरणार असल्यामुळें बर्लिन, पॅरिस, लंडन व मॉस्को येथील अफगाण दूत जमले होते. परंतु लगेच राजे मंडळी स्पेशल गाडींत बसून रोमला गेली, असें दिसतें. त्यावरून ही राजकीय दूतांची परिषद् झाली नाही कीं काय? कां गाडीतच त्यांचीं खलबतें झालीं ?

**११७. रोममधील अमानुल्लांचें दरबारी स्वागत** :—रोममध्यें गाडी प्लॅटफॉर्मवर आली तेव्हां तेथील थाटमाट पाहून अमानुल्लास अत्यंत आनंद झाल्याचें दिसलें. त्यानें पायधूळ पहिल्यानें युरोपांत झाडली ती इटालींत. राजा, राणी, युवराज आणि **मुसोलिनी** ही बडीं प्रस्थें स्वागतार्थ हजर होतींच. शिर-स्त्यानुसार सर्व ' नमस्कार चमत्कार ' झाले व मिरवणुकीसाठी पहिल्या गाडींत दोन्ही राजे, दुसरीत दोन्ही राण्या व युवराज अशी मंडळी बसली. मिरवणुकीस किती गर्दी लोटली असेल याची कल्पनाच केलेली बरी. राजा बाहेर पडला तरी

राजदर्शनासाठीं हपापलेले लोक रस्त्यांत गर्दी करतात. मग बरोबर राणी; त्यांत इटालियन राष्ट्राला आपल्या तर्जनीच्या तालावर खेळविणारा व म्हणून त्या राष्ट्राचा प्राण असा कधीं मिरवणुकींत किंवा वेळ खर्च होणाऱ्या समारंभांत भाग न घेणारा मुसोलिनी देखील शांतपणें पहावयास सांपडणार, म्हणून जनसंमर्द पराकाष्ठेचा लोटला होता. अमानुल्लाला पाहण्याची उत्कंठा प्रत्येक इटालियन आबालवृद्धास लागलेली आणि बुरखा काढलेली अफगाण 'सौंदर्यखनि' आज रस्त्यांतून मिरवणार. ह्या सर्वच गोष्टी अशा होत्या, कीं त्यामुळें कोणा चिटपांखरासही घरांत राहण्याची इच्छा व्हावयाची नाही. आणि त्याचें प्रत्यंतर झालेल्या गर्दींत दिसत होतेंच.

मिरवणूक वाटेंत पियाझा देल्ल एसेद्रा ( Piazza-dell-Esedra ) येथें किंचित्काल थांबली व अमानुल्लास रोमतर्फे मानपत्र देण्यांत आलें. समयोचित असें थोडक्यांत आभारप्रदर्शक उत्तर अमानुल्लानें दिल्यावर मिरवणूक पुढें चालूं लागली. राजवाड्यांत तर विलक्षणच गर्दी जमलेली ! तेथें अमानुल्ला तिसऱ्या **व्हिक्टर इमॅन्युअल** राजाचा पाहुणा म्हणून राहिला होता.

त्याच दिवशीं दुपारीं अमानुल्लाचें मुसोलिनीशीं गुप्त संभाषण झालें. त्याचा विषय कोणता होता किंवा बोलण्याचा रोख काय होता हें अर्थातच बाहेर पडलें नाहीं.

त्याच रात्री दरबारी मेजवानी झाली. युरोपियन शिष्टाचाराप्रमाणें अशा वेळीं होणाऱ्या भाषणांस—तीं अगदीं छोटीं असलीं तरी—फार राजकीय महत्त्व असतें. आणि तेथें हजर असणाऱ्या व्यक्तींच्या मनांत काय चाललें असावें याचीं अनुमानें व तर्क वर्तमानपत्रांतच अधिक चांगल्या रीतीनें वाचावयास मिळतात. अमानुल्ला रोममध्यें आला त्यावेळचे तेथील वर्तमानपत्रांचे विचार पाहिले म्हणजे एकंदर जनतेचेंही धोरण लक्षांत येईल.

" अमानुल्ला म्हणजे अफगाणिस्तानचा मुसोलिनीच आहे. सर्व युरोपियन
" राष्ट्रांत इटालीनेंच अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य पहिल्या प्रथम मान्य केलें
" असल्यानें, त्या देशाच्या सुधारणेचे प्रयत्न होतील तेव्हां त्यास इटालीचेंच
" साह्य घेतलें पाहिजे. इटालियनांना अमानुल्लाबद्दल सहानुभूति व आपलेपणा
" वाटतो याचें कारण त्यानें इटालीप्रमाणेंच बोल्शेव्हिकांना दूर राखलें आहे.
" फासिस्मोची शिस्त व व्यवस्था कशी आहे याचा अभ्यास करण्यासाठीं
" अमानुल्ला आपणांत आला आहे. शिवाय मुसोलिनीशीं निकट परिचय
" व्हावा अशीही अमिराची इच्छा स्पष्ट दिसते. "

मेजवानीच्या प्रसंगीं इटालियन राजांनीं थोडक्यांत अमानुल्लाच्या राष्ट्रीकरणाचे व सुधारणांचे प्रयत्न प्रशंसनीय असल्याचें सांगितलें. अमानुल्लानें आपणांस इटालीबद्दल काय वाटतें तें सांगतांना इटालीनेंच सर्व युरोपियन राष्ट्रांच्या आधीं अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य मानिलें अशी कबुली दिली.

ता. ९ रोजीं ' नरदेवांची ही जोडगोळी ' पँथेनान पहावयास गेली व नंतर त्यांनी दुसऱ्या इमॅन्युअल व पराक्रमी हुंबर्ट राजांच्या थडग्यांवर पुष्पहार अर्पण केले. तेथून " अज्ञात योद्ध्यांच्या " समाधीवर सुमनमाला समर्पण करून ते परत आले. उपाहारोत्तर दोघांनीं तोर-द-क्वँतो ( Tor-de-Quinto ) ही लष्करी शाळा पाहिली. इटालींतील घोडेस्वार फारच कुशल असतात असें अमानुल्लानें नुसतें ऐकलें होतें. त्याची प्रचीति त्या शाळेंतील विद्यार्थ्यांचें अश्वारोहणचातुर्य पाहून आली.

रात्रीं अमानुल्लास दुसरी एक दरबारी मेजवानी झाली. भाषणें वगैरे औपचारिकच होतीं. मुसोलिनीशी बोलण्यांत आणि त्याच्याकडे एकसारखें टक लावून पाहण्यांत अमानुल्ला दंग होई हें तेथें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहिलें नाही.

**११८. पोपशीं मुलाखत** :—दरबारी पाहुणचार संपवून अमानुल्ला ग्रँड हॉटेलमध्यें राहण्यास आला. अतःपर तो इटालियन राजेसाहेबांचा पाहुणा नसून इटालियन सरकारचा होता. कारखाने, शाळा, यंत्रविभाग अशा किती तरी इटालियन संस्था त्यानें पाहिल्या. परंतु गुरुवारीं ( १२–१–१९२८ ) त्याला एक महत्त्वाची मुलाखत मिळाली. रोममधील ख्रिस्ती धर्माध्यक्षांच्या प्रख्यात नायकानें—पोपनें—**अकराव्या पायस**नें अमानुल्लास भेटीस बोलाविलें होतें.

तेथील शिरस्ता असा कीं, पोपकडून पाचारण गेलें कीं, त्याच सरंजामानिशी भेटूं इच्छिणारानें पोपकडे जावयाचें. अमानुल्ला लष्करी वेष घालून नेहमींच्या स्मितयुक्त मुद्रेनें पोपच्या सभास्थानीं गेला. पोप कधीं आसनावरून उठावयाचा नसतो. अमानुल्लास पोपजवळच आसन मिळालें. त्यांचें बोलणें विशेष कसलें होणार ? अमानुल्लाच्या राज्यांत पोपचा एकही अनुयायी नाहीं किंवा त्या पंथाचें—रोमन कॅथॉलिकांचें—एक प्रार्थनामंदिरही नाहीं. बरें, पोपमहाराजांस आपला धर्म तेथें वाढण्याचीही कांहीं आशा नव्हती. अमानुल्लानें मात्र धर्माध्यक्षांना "बाहेर कां पडत नाहीं ? " असा प्रश्न केला. इटालींत राजसत्तेचें व धर्मसत्ताधिशांचें सख्य

नव्हतें हें अमानुल्ला जाणून होता असें दिसतें. कदाचित् पोपच्या बोलण्यांतही ओघाओघानें त्याचा निर्देश आला असावा. "राजेसाहेब तर फारच मनमिळाऊ व गोड स्वभावाचे आहेत. त्यांचा व तुमचा मतभेद कां व्हावा हें समजत नाहीं." असें अमानुल्लानें विचारिलें. पण पोपनें कांहींच उत्तर दिलें नाहीं असें म्हणतात. शेवटीं निघतांना युरोपसंचारार्थ आलेल्या अमिरानें पोपला सांगितलें कीं, "तीनचार वर्षांच्या आंतच तुम्ही बाहेर प्रवासासाठीं जाल."

पोपचा कार्डिनलही अमानुल्लाशीं बराच वेळ बोलत होता. अमानुल्लाच्या वास्तव्यस्थानीं कार्डिनल परत भेटीसाठीं आला असतां पोपकडून सन्मानाच्या देणग्या अफगाणाधिपतीस आल्या. " ऑर्डर ऑफ दि गोल्डन स्पर " हा किताब व स्वत:चा एक लहानसा फोटो पोपनें कार्डिनलबरोबर पाठविला होता.

इटालियन राजेसाहेबांनीही आपल्या पाहुण्यास Callor of Anunnciata चा सन्मान बहाल केला.

अमानुल्लानें पुष्कळ इटालियन मोटारी खरेदी केल्या आणि इटालियन शिल्पी ( Engineers ) अफगाणिस्तानांतील कांहीं इमारती बांधण्यासाठी पाहिजेत अशी इच्छा तेथील सरकारजवळ प्रदर्शित केली.

इटालियन सफर संपविण्यापूर्वी त्यानें " Corriere della sera " या वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीस सांगितलें कीं, "इटालियन यंत्रें व शिल्पी कारागीर यांचा आमच्या देशांत फार उपयोग होईल. मुसोलिनीविषयीं मला अत्यंत आदर वाटतो इतकेंच नव्हे, तर त्याच्या कर्तबगारीची व उत्कट स्वदेशप्रेमाची फार फार तारीफ करावीशी वाटते. आम्हां दोघांचेंही कार्य एकच आहे. स्वदेशोन्नतीसाठीं आम्ही आपापल्यापरीनें झटत आहों."

रोमच्या नगराध्यक्षाकडे १००० पौंड अनाथांना वाटण्यासाठीं अमानुल्लानें पाठविले व **व्हेनिस, मिलन, ट्यूरिन**, या शहरांवरून तो पॅरिसकडे निघाला.

११९. **फ्रान्स-पॅरिस :—कॅनेस-नीस** या शहरांवरून अमानुल्ला **पॅरिसला** जाणार होता. त्याच्यासाठीं खास स्पेशल गाडीची व्यवस्था फ्रेंच सरकारनें केली होती. ता. २५ जानेवारी बुधवारीं अफगाण पाहुणे पॅरिसला पोहोंचले. 'बॉय ड बोलन्' स्टेशनपासून 'की-द-उर्से' पर्यंत मिरवणूक निघणार असें जाहीर झालें असल्यानें जिकडे तिकडे गर्दी होऊं लागली. पॅरिसच्या स्टेशनवर अफगाण मंत्री, लोकसभेचे अध्यक्ष **मों. दूमर्ग, मों. ब्रियांद, जनरल गूरो**

इत्यादि वरिष्ठ असून फ्रान्समधील अफगाण विद्यार्थी राष्ट्रीय झेंडा घेऊन अमानुल्लाच्या स्वागतार्थ हजर होते. गाडी येतांच अमानुल्ला उतरला. त्यानें सेनापतीचा लष्करी वेष धारण केलेला होता. सर्वांनीं त्याचें स्वागत केलें. प्रेसिडेंटसमवेत मोटारींत अमानुल्ला व मों. दुमर्ग होते. दुसऱ्या मोटारींत इतर मंडळी बसली. तोफांची सलामी झाली. टाळ्यांचा कडकडाट, टोप्या व हातरुमाल उडविणें........सर्व झालें. अमानुल्लास ' नमस्कार ' स्वीकारतां स्वीकारतां व टोपी उचलतां उचलतां पुरेपुरेसें झालें.

अमानुल्लाला पॅरिस शहराचें सुवर्णपदक व राणी सूरय्यास एक झगा अर्पण करून फ्रान्सनें अमिराचा सत्कार केला. तेथील ' सुवर्णपुस्तकां 'त* त्यांनीं आपलीं नांवें लिहिलीं.

दरबारी मेजवानी त्याच रात्रीं झाली, भाषणें मामुलीच होतीं. दुसरे दिवशीं लष्करी पदार्थसंग्रहालय, शेतकीप्रदर्शन पाहून आल्यावर मों. पॉइंकारे यांची व अमानुल्लाची खासगी बैठक झाली. अमानुल्ला पॅरिसमध्यें असतांना त्याची उतरण्याची सोय परराष्ट्रीय मंत्रिमंडळाच्या इमारतींत केली होती. परंतु युरोपियन राष्ट्रांना नामोच्चारमात्रें कांपविणाऱ्या नेपोलियनच्या शय्येवर अफगाण पाहुण्यानें निजावें व सूरय्यानें बोनापार्टपत्नि मेरी हिच्या मंचकाचा उपयोग करावा अशी व्यवस्था करण्यांत आली होती! बहुमान व आदर दर्शविण्याचा हा प्रकार विचित्र नव्हे काय ? असो.

लष्करी शाळा, सैनिकांची कवाईत, इत्यादि प्रकार पाहून अमानुल्लानें आपल्या हिदायतुल्लाखान‡ नामक ज्येष्ठ पुत्राचें शिक्षण ( Saint Cyr ) सँ. स्यूर येथिल लष्करी शाळेंतच व्हावें असें ठरविलें.

फ्रान्समधील आपला मुक्काम संपवून अमानुल्ला जर्मन राष्ट्राचा पाहुणचार उपभोगण्यासाठीं गेला.

---

* प्रत्येक मोठ्या शहरीं नामांकित पाहुण्याचें टिपण ठेवण्याची ' वही ' असते. तींत त्या त्या ठिकाणीं आलेल्या सन्माननीयांनीं आपलीं नांवें लिहावयाचीं असतात. हा एक मोठा मान आहे.

‡ सूरय्याशीं लग्न होण्यापूर्वींच हा पुत्र अमानुल्लास झाला होता. अशी विवाहपूर्व संतति अफगाणांच्या रीतिरिवाजास धरूनच आहे. त्यांत त्यांना विचित्र असें कांहींच वाटत नाहीं.

**१२०. जर्मनी–बर्लिन** :—अमानुल्ला जर्मनीस भेट देणार म्हणून त्याच्या स्वागतार्थ जंगी तयारी चालली होती. अफगाण राष्ट्रगीत वाजवितां यावें म्हणून संगीतज्ञांना कितीतरी दिवस आधीं तालीम दिली जात असे. कैसरच्या राजवाड्यांपैकीं एक अफगाण पाहुण्यांसाठीं झाडून स्वच्छ करून ठेवला हें समजल्यानेंच तेथील जनतेंत त्या पाहुण्यांचें महत्त्व कळून आलें. शेजारच्या **स्वीडनचा** राजा १५।२० दिवसांपूर्वींच **बर्लिनमधून** प्रवास करीत गेला. पण कोणाचें तिकडे लक्षही गेलें नाहीं. नेहमींची रीत म्हणजे राजेसाहेब एखाद्या उच्च दर्जाच्या हॉटेलांत उतरावयाचें. पण अमानुल्लासाठींच ही खास व्यवस्था करण्याचा नवीन उपक्रम केला गेला हें पाहून कित्येक 'अ-राजकां'ना ( Anti-monarchists ) आश्चर्यच वाटलें. पण जर्मन सरकारनें ही व्यवस्था केलेली. तेव्हां जास्त गडबड त्यांना करतां आली नाहीं. " प्रिन्स आल्बर्ट पॅलेस " हें अमानुल्लासाठीं राखून ठेवलेल्या राजवाड्याचें नांव.

ता. २२ फेब्रुवारीस अफगाण पाहुणे बर्लिनमध्यें आले. शिष्ट-मंडळ स्विस्-जर्मन सरहद्दीवर त्यांना सामोरें गेलें. **डॉ. रोसेन** हे त्या मंडळाचे अध्यक्ष होते. त्यांनीं स्वागतपर भाषण फार्सीत केलेलें पाहून अमानुल्लासच काय पण इतर सर्व मंडळीस सानंदाश्चर्य वाटलें. त्यांचें बोलणेंही सफाईचें होतें; नवशिक्याप्रमाणें किंवा परकीयाप्रमाणें ते फार्सींत अडखळत नव्हते. " जर्मनी प्रजासत्ताक झाल्यापासून दरबारी पाहुणे म्हणून आलेले स्वतंत्र राजे आपणच आहां. " अशा गौरवपर भाषणानें अमानुल्लाचें स्वागत केल्यावर अमानुल्लानेंही त्यांचे आभार मानले.

बर्लिन स्टेशनवर फील्डमार्शल **हिंडेनबुर्ग**, व्हाईस चॅन्सेलर **हेर हेर्ग्ट** ( मुख्य चॅन्सेलर आजारी होते ), सेनाध्यक्ष **जन० हेये**, जर्मन मुख्य प्रधान, लोकसभेचे अध्यक्ष इत्यादि वरिष्ठ अधिकारी हजर होते. रस्त्यांत व आजूबाजूस विलक्षणच गर्दी झाली होती. ' मीलनो'त्तर मिरवणूक निघाली. हिंडेनबुर्ग व अमानुल्ला एका मोटारींत बसले. दुसरींत राणी व जर्मन मंत्र्यांच्या स्त्रिया होत्या. लोकांचा उत्साह अपूर्व दिसून आला. कारण कैसर पदच्युत झाल्यानंतर असा थाट व असें वैभवाचें प्रदर्शन करण्याची संधि मिळाली नव्हती. लोकांतील उत्सवप्रियता पाहून कैसरच्या ज्येष्ठ पुत्रालाही ( क्राउन प्रिन्स ) आपण ही मिरवणूक पहावी असें वाटलें. पण त्याची मोटर रस्त्यांतून गेली तेव्हां कांहीं लोकांनीं "हुश् हुश् " करून तिरस्कार दर्शविला !

**१२१. राजनैतिक महत्त्वाची सफर:**—हिंडेनबुर्गच्या निवासस्थानीं अमानुल्ला त्या दिवशीं दुपारीं तीन वाजतां गेला. नंतर राजनैतिक प्रतिनिधींशीं थोडा वेळ बोलणें झालें. रात्रीं हिंडेनबुर्गकडून दरबारी मेजवानी झाली. हिंडेनबुर्ग तेथील यजमान. त्यानें अमानुल्लाचें अभिष्टचिंतनपर भाषण करतांना जर्मनीनें अफगाणिस्तानसाठीं काय केलें आहे याचा थोडक्यांत आढावा सांगितला. जर्मन संशोधकांनीं प्राचीन कालच्या इतिहासाचीं साधनें उपलब्ध करून दिलीं आहेत. अफगाणशिक्षणांत जर्मन प्रोफेसरांचें काम लहानसहान नाहीं. यांत्रिक तज्ज्ञ व शिल्पीही जर्मनींत काम करीत आहेतच. इतकें सांगून आणखी वाटेल त्या प्रकारची बौद्धिक, यांत्रिक वा आर्थिक मदत देण्यास जर्मनराष्ट्र सदैव तयार असल्याची ग्वाही हिंडेनबुर्ग यांनी दिली.

अमानुल्लानें जर्मनींच्या सहाय्याबद्दल मन:पूर्वक आभार मानले आणि प्रेसिडेंट हिंडेनबुर्ग यांना उदंड आयुष्य लाभो अशी इच्छा प्रदर्शित करून स्वच्छोदक प्राशन केलें. ( अशा प्रसंगीं मदिरासेवन करण्याचा शिष्टाचार असला तरी अमानुल्लानें 'धर्माज्ञेनुसार' शुद्ध पाणीच घेतलें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.)

दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. २३।२।२८ ला अमानुल्ला जर्मनीचें वैमानिक केंद्र पहावयास गेला. तेथें **युंकर्स** (Junkers) कंपनीनें त्याला ६-२४ टाइपचें तीन इंजिनें असलेलें एक मोनोप्लेन ( एकवाही विमान ) नजर केलें. दुपारीं लोकसभेच्या अध्यक्षांसमवेत उपाहार करून अमानुल्ला युद्धस्मारका 'वर पुष्पमाला अर्पण करण्यास गेला. सायंकाळीं चँसेलरांकडील मेजवानी झाली.

अमानुल्लाच्या आगमनामुळें जर्मनींत वर्तमानपत्रांत आणि लोकांत जी चर्चा चाले ती राजकीय दृष्ट्या विचारणीय होती. कोणी कोणी तर म्हणत, कीं व्हाइस-चँसेलर अमानुल्लाला खासगी रीत्या भेटून बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी बोलत होता. " युद्धोत्तर कालांत आमचा पितृदेश गरीब झाला, ( जर्मनीला पितृदेश असें संबोधण्याची तद्देशियांची चाल आहे ) इतर राष्ट्रांनीं त्याला पिळून काढलें आणि याच कारणासाठीं आपलें आदरातिथ्य इटालींत किंवा फ्रान्सांत झालें त्या तोडीचें आमच्याकडे होऊं शकलें नाहीं. बाह्य देखाव्याकडे पाहूं नका. आमच्या अंत:करणांत आम्हांस किती आनंद झाला आहे हें कळलें असेलच. युद्धोत्तर कालांत आमच्या राष्ट्रांत पाहुणचार स्वीकारणारे. स्वतंत्र राजे आपणच आहां. अफगाणांची मन:स्थिति काय आहे हें **जर्मनीच** योग्य रीतीनें जाणूं शकतो.

अफगाणिस्तानही स्वातंत्र्यार्थ व संरक्षणासाठीं बरेच दिवस ( आम्ही आतां झगडत आहों त्याप्रमाणें ) झगडत होतें हें आम्ही जाणून आहोंत. ”

तारीख २४ रोजीं बर्लिनच्या नागरिकांतर्फे अमानुल्ला व सूरय्या यांचा जाहीर सन्मान झाला. ‘ सुवर्णपुस्तकां ’त त्यांनीं आपलीं नांवें लिहिलीं. बर्लिनमधील निरनिराळ्या देखाव्यांचीं चित्रें असलेलें एक ‘ अल्बम् ’ त्यांना नजर करण्यांत आलें.

नंतर अमानुल्लानें यांत्रिक शाळा पाहिली व तेथें मिळालेल्या सन्मान्य पदवीचा त्यांनीं स्वीकार केला.

**१२२. जर्मनांचें रणांगणपटुत्वः**—२५ तारखेस जर्मनोनें ‘लुटुपुटी’ची लढाई करून अमानुल्लास आपलें लष्करी सामर्थ्य दाखविलें. तद्दानंतर लढाईचा देखावा देखील जर्मनांना पहावयास मिळाला नव्हता. म्हणून या नकली लढाईस बरीच गर्दी जमली होती. डोबेरित्झ परेड मैदानावर तर सैन्याचा जमाव बरोबर चौदा वर्षांनीं जमला ! जर्मनींतील वृद्धांना त्या वेळीं काय.वाटलें असेल ? युद्धांत लढलेलें असे जे थोडे योद्धे त्या वेळीं हजर होते त्यांच्या मनश्चक्षूंपुढें कोणता देखावा आला असेल ?

अमानुल्लाला ती नकली लढाई नीटपणे पाहतां यावी म्हणून त्याच्यासाठीं एका ऐतिहासिक ठिकाणीं व्यवस्था करण्यांत आली होती. **फ्रेडरिक दि ग्रेट** आपल्या सैन्यानिशीं सायलेशियावर हल्ला करण्यासाठीं जेथून निघाला त्या स्थानावर उभा राहून अमानुल्ला जर्मन योद्ध्यांचें कौशल्य पाहात होता.

तेथें लढणारे सैनिक दोन प्रकारच्या वेषांनी दर्शविले होते. ‘लाल’ पोषाख केलेल्या रिश्वार पलटणी व घोडदळ एका बाजूस असून विरुद्ध लढणारे निळ्या पोषाखांत होते. त्यांच्याकडे हलक्या व भारी मशीनगन्स व तोफखाना होता. पहिल्यानें निळ्या पायदळानें अघाडी घेतली व तोफा डागल्या. धूम्रमय बाँब टाकून त्यांचा धूर पेटविल्यावर ‘लाल’ पलटणीनें आपल्या हालचाली सुरू केल्या. जमिनीस गवत असल्यानें आग पसरूं लागली; तिला थांबविण्यासाठीं ‘ लाल ’ शिपायांनीं भराभर खंदक खणले. इकडे अस्मानी डगलेवाले योद्धे पुढें मार्ग काढीत होते. आपणांवर जोराची चढाई होऊं लागली असें पाहतांच तांबड्या शिपायांनीं धूम्रमय पडदा उत्पन्न केला आणि त्याच्या मागें छपून टँकचा हल्ला चढविला. धुराच्या ढगांतून हीं अजस्त्र धेंडें येत असलेलीं पाहून आश्चर्य वाटलें.

## प्रेसिडेंट हिंडेन्बुर्ग आणि अमीर अमानुल्ला



( लुटुपुटीची लढाई पहात आहेत. )

बाल.ग्यान प्रेस, पुणें.

राजकारस्थान्यांनीं घेतलेला बळी



अमीर अमानुल्ला

---

बालोद्यान प्रेस, पुणें.

त्यांच्या अचुक माऱ्यामुळें प्रतिपक्षियांचें कांहींच चाललें नाहीं. ही टँकची लढाई सर्वस्वीं मनुष्यबलावरच चालली होती, कारण महायुद्धोत्तर तहांतील अटीनुसार जर्मनीला यांत्रिक चालना असलेले टँक ठेवण्यास परवानगी नाहीं. एक एक टँक पुढें रेटण्यास बारा बारा माणसें लागत !

अशी लढाई चालू असतां लाल वीरांचा पराभव होण्यास उशीर लागला नाही. नंतर दोन्ही सैन्यें एकत्र झालीं. तोफा, घोडदळ, मशीनगन्स, सर्व एकामागून एक शिस्तीनें ' मार्चपास्ट ' करीत गेल्यावर ही ' लढाई ' संपली.

या प्रसंगामुळें कित्येक राष्ट्रीय वर्तमानपत्रांनीं काढलेले उद्गार लक्षां ठेवण्यासारखे आहेत. " शिस्तधारी योद्धे असे लष्करी चालीनें गेलेले आज आ. किती तरी दिवसांनीं पाहतो ! याच शिपायांवर जर्मनीचें वैभव अवलंबून होतें ना ? पूर्वी हें सैन्य पोलादाप्रमाणें खंबीर म्हणून त्याची ख्याति होती ! आणि आतां...... "

**१२३. जर्मनींतील प्रवासाचें वैशिष्ट्य** :—अमानुल्लानें त्या रात्रीं जर्मन अधिकाऱ्यांस परत मेजवानी दिली आणि दरबारी पाहुणचार संपला. नंतर मला मोकळेपणानें हिंडूं द्या, आगतस्वागत कोठेंही नको अशी इच्छा प्रदर्शित करून अमानुल्लानें आपला इतर कार्यक्रम आंखला.

क्रुपचा प्रचंड कारखाना, **लीपझीग , डेसो, एसेन** येथील सर्व मोठमोठे कारखाने अमानुल्लानें शांतपणें पाहिले. क्रुपनें त्याला एक मोटार गाडी बहाल केली. ती अमानुल्लानें स्वतःसाठीं न घेतां दूरच्या विद्यार्थ्यांना शाळेंत येण्याजाण्यास उपयोगी पडावी म्हणून आवश्यक त्या सुधारणा करून काबूलला पाठवून दिली.

साखरेचा कारखाना, रसायनांचा कारखाना व कापडाची गिरणी यांसाठीं जर्मन तज्ज्ञांकडून त्यानें कांहीं अंदाजपत्रकें मागविलीं. काबूलमध्यें इतक्या कारखान्यांची तूर्त आवश्यकता फार होती असें त्याचें मत होतें. युरोपांतील इतर सफर संपविल्यानंतर वैमानिक वाहतूक व मीटरगेज रेल्वे यांबद्दल बोलण्याचें अभिवचन देऊन अमानुल्लानें आपले दोन यांत्रिक तज्ज्ञ तत्संबंधीं माहिती व अंदाजपत्रकें गोळा करण्यासाठीं जर्मनींत ठेविले.

इकडे ही तयारी चालू असतांना वर्तमानपत्रांत ओरड झाली की, जर्मनीनें ५,००,००० पौंडांचें कर्ज अफगाणिस्तानास दिलें आहे ! लगेच दुसरे दिवशीं ती खोटी असल्याचें प्रसिद्ध होऊन जर्मन राष्ट्रातर्फे असा खुलासा पुढें करण्यांत आला

क्रीं, अमिरानें जर बरीचशी खरेदी केली, तर कांहीं रक्कम रोख व बाकीची सोईच्या हप्त्यानें वसूल करण्याची सवलत अमिरास देण्यांत येईल. परंतु अमानुल्लानें या सवलतीचा कितपत उपयोग केला तें त्या वेळीं समजलें नाहीं. असो.

या वेळीं अफगाण पाहुणे पॅरिसमार्गे लंडनला जावयाचे असल्यानें त्यांच्या-साठीं स्पेशल गाडी तयार ठेवण्यांत आली होती. जाण्यापूर्वी अमानुल्लानें हिंडेनबुर्ग यास भारी किंमतीचा नजराणा पाठविला. तसाच त्या वृद्ध सेनानीनेंही आपल्या पाहुण्यास साजेसा नजराणा दिला. हिंडेनबुर्ग, चॅन्सेलर **हर मार्क्स** व **हर लोबे** ( रीशस्टॅगचे अध्यक्ष ) या तिघांस प्रत्येकीं "आल्मेर-इ-आला" ही पदवी व त्या बहुमानास शोभणारा पोषाख अमानुल्लानें बहाल केला. वास्तविक जर्मन राज्यघटनेंतील नियमानुसार कोणाही अधिकाऱ्यास अशा पदव्यांचा स्वीकार करितां येत नाहीं आणि तत्त्वनिष्ठ हर लोबे यांनीं ती पदवी व पोषाख नाकारला देखील. परंतु इतर दोघांनीं "राजनैतिक शिष्टाचारा" निमित्त तत्त्वें व नियमबंधनें दूर करून त्यांचा स्वीकार केला. तत्त्वनिष्ठांनीं व कांहीं वर्तमानपत्रांनीं मोठा गिल्ला केला. हिंडेनबुर्ग अशा आरडाओरडीस भीक घालणारा नव्हता. त्यानें आपल्या कृत्याचें समर्थन केलें. जेव्हां तो नियम करण्यांत आला तेव्हां अशी महत्त्वाची व आणीबाणीची वेळ आली असतां काय करावें, याची योजना केली नसल्यानें आज आम्ही उपक्रम घालून देत आहों, असें सांगून व फार तर आम्ही आमच्या खासगी नात्यानें त्या पदव्यांचा स्वीकार केला असें समजा, असें कारण दाखवून त्यानें त्या वादावर पांघरूण घातलें!

बर्लिनहून अमानुल्ला परिवारासह ८ मार्चला निघाला व दुसरे दिवशीं पॅरिसला येऊन दाखल झाल्यावर तेथून अल्पकालानंतर **कॅले** येथें प्रयाण करून लंडनला बादशहा पंचम **जॉर्जचा** पाहुणा म्हणून जाण्यासाठीं 'मेड ऑफ ऑर्लीन्स' बोटीमधून डोव्हरला पोहोंचला.

**१२४. स्वागताची अपूर्व तयारी**:—अमीर अमानुल्ला युरोपच्या प्रवासाला निघतो ही बातमी आश्चर्यकारक अशी तर होतीच; पण इंग्लंडलाही तो भेट देणार असल्यानें त्याच्या प्रवासाला विशेष महत्त्वाचें स्थान आंतरराष्ट्रीय राजकारणांत मिळालें. इंग्लंडचा व अफगाणिस्तानचा सुमारें एक शतकाचा इतिहास पाहिला, तर त्यांच्यांत स्नेहभाव नांदणें शक्य नाहीं असाच ध्वनि सारखा निघत राहील. तहाच्या कागदावरील काळ्या शाईचीं निर्जीव अक्षरें

कितीही मोठ्यानें "परमस्नेही" "कायमची दोस्ती" इत्यादि शब्दगर्जना करीत असलीं, तरी १८४१, १८७९, १९१९ हीं तीनही वर्षें ख्रिस्ती शकांतून जोंपर्यंत जात नाहींत किंवा रशियाची आशियांतून संपूर्ण पिछेहाट होत नाहीं, तोंपर्यंत इंग्लंड व अफगाणिस्तान यांच्या संबंधाचें स्वरूप जसें दिसतें–दाखविलें जातें–तसें नाहीं हें खास !

इतकें असूनही अमीर अमानुल्ला इंग्लंडला जाण्याचा बेत ठरवितो आणि इंग्लंडच्या राजानें–हिंदुस्थानच्या सार्वभौमानें–त्याला आपला खासा पाहुणा मानावा, अशी काय जादु इंग्रजांवर अफगाणाधिपानें टाकली ? इंग्लंडमध्यें स्वागताची किती जय्यत तयारी चालू होती आणि तेथील अधिकाऱ्यांची पाहुण्याला खूष करण्यासाठीं जी धडपड चालली होती, तिची कल्पना अमानुल्लाच्या इंग्लंडांतील कार्यक्रमावरून सहज येईल.

ता. १३–३–२८ रोजीं कॅलेहून " मेड ऑफ ऑर्लीन्स " नामक स्पेशल बोटींतून अमानुल्ला सकुटुंब सपरिवार डोव्हरला आला. वैमानिक खात्यानें दोन खास विमानें अमानुल्ला इंग्रजी खाडी ओलांडीत असतांनाच " मेड ऑफ ऑर्लीन्स "वर घिरट्या घालण्यासाठीं पाठविलीं होतीं त्यांनीं स्वागत केलें. डोव्हर येथें तोफांची सरबत्ती झाली. पंचम जॉर्जांचे प्रतिनिधी म्हणून युवराज पाहुण्यांना सामोरे आले. ठराविक दरबारी पद्धतीचें स्वागत झालें. अमानुल्लासाठीं खास ‘ स्वयंसेवक ’ (?) परिचर्येसाठीं दिले होते. त्यांची नांवनिशी पाहूनच सामान्य जनांस आश्चर्य वाटेल.

१ फील्ड–मार्शल **व्हायकौंट अॅलन्बी,**
२ ब्रिगे. जन. ,, **हॅंप्डन्**
३ ले. कर्नल सर **फ्रॅन्सिस् हंफ्रेज्** ( काबूलचे इंग्रजी मंत्री )
४ कर्नल सर **क्लाइव्ह विग्रॅम्**
५ ले. कर्नल **व्हिव्हियन गॅब्रील**
६ ,, ,, **एड्वर्ड विक्हॅम्**
७ ,, ,, **पर्सी डोड्**

असे हे " सप्तर्षि " अमानुल्लाचा शब्द झेलण्यास मिळावा म्हणून तयार होते. हा जर अमीर अमानुल्लाचा थाट, तर राणी सूरय्या बिचारी एकटी सुटेल कशी ? तिच्याकडे लेडी अॅपूहिल व लेडी हंफ्रेज् या दोन स्त्रिया आणि

ले. कर्नेल **विल्यम फ्रेझर** इतकी मंडळी तैनातीला होती. मात्र अमानुल्ला **किंवा** सूरय्या यांचें बोलणें फक्त काबूलमधील इंग्रजी वकिलालाच कळावयाचें. बाकीच्यांना केवळ गंमतच वाटावयाची. परंतु राजा म्हटला कीं, त्याच्या भोंवतीं ग्रहोपग्रहांचें चक्र असावयाचेंच. तो एकटा कोठें जाऊं शकत नाहीं. सूर्यमालेंत जसे नऊ ग्रह असून सूर्याबरोबर ते भ्रमण करीत राहतात तसेंच नृपतींचें आहे. म्हणून ही ग्रहमाला निवडण्यांत आली.

डोव्हरला ही सर्व मंडळी येऊन अफगाणिस्तानच्या स्वतंत्र राजाला भेटली; त्यांनीं स्मितपूर्वक त्याला खडी ताजीम दिली. लष्करी, विमानी आणि नाविक अधिकारी आपापल्या दरबारी पोषाखांत येऊन राजाच्या पाहुण्याची बरदास्त ठेवण्याची खटपट करीत होते. डोव्हरच्या मेयरनीं अमानुल्लास मानपत्र दिलें. एक स्पेशल गाडी स्टेशनवर राखून ठेवली होती, तींत अफगाणाधिपति, त्यांची राज्ञी व **नुरुल सिराज, हुर्या ताझीं** या दोन मुली आणि अमानुल्लाचे गुरु, श्वशुर, हितचिंतक आणि परकी खात्याचे मंत्री अशा सर्व नात्यांचा मान एकट्यासच असलेले **महमद बेग खान ताझीं** व इतर परिवार जाऊन बसला. दुपारीं सवा वाजतां गाडी स्टेशनमधून निघाली व बरोबर तीन वाजतां लंडनच्या व्हिक्टोरिया स्टेशनवर आली. प्लॅटफॉर्मवर **बादशहा पंचम जॉर्ज, सम्राज्ञी मेरी**, राजकुटुंबांतील इतर मंडळी आणि मुख्य दिवाण **बॉल्ड्विन्**, सर ऑ. **चेंबर्लेन**, गृहमंत्री सर "**जिक्स**," लॉर्ड **बर्कन्हेड**, लॉर्ड मेयर, सागराधिपति, आकाशाधिपति, नगराधिपति इत्यादि बडे बडे हुद्देदार सम्राटांच्या या रानटी पाहुण्यास भेटण्यास आले. हस्तांदोलन, कुशल-प्रश्न व आभार आणि परिचय झाल्यावर मिरवणुकीसाठीं मंडळी ठरलेल्या वाहनांत जाऊन बसली.

पट्टीचा मान मिळालेल्या गाडींत **सम्राट् पंचम जॉर्ज, अमीर अमानुल्ला राजे, युवराज** आणि **ड्यूक ऑफ यॉर्क** अशी चौकडी बसली. दुसऱ्या गाडींत **सम्राज्ञी मेरी, राणी सूरय्या, डचेस ऑफ यॉर्क** व **राजपुत्र हेन्री** अशी मंडळी होती. नुरुल सिराज व लेडी अँप्हिल यांची तिसरी गाडी आणि हुर्या ताझीं व अश्वाधिपांची चवथी गाडी. नंतर पांचवी व सहावी अशा गाड्या वैभवानिशीं **बकिंगहॅम** राजवाड्याकडे जाऊं लागल्या! सर्व रस्ते माणसांनीं फुलून गेले होते. पताका तर सर्वत्र फडफड करीत होत्याच. इंग्रज लोक जरासे भावनाप्रधान; म्हणजे राजा—बादशहा—अशा दैवी पुरुषांबद्दल त्यांना नेहमीं आदर वाटतो. डामडौलाची,

बढाई मारण्याची आणि साम्राज्यशाहीचा डंका सर्वत्र पिटण्याची हौस त्यांना भारी! लग्नाची वरात, विहिणींचा नखरा, वधूवरांचे पोषाख, दागिने आणि स्वरूप हीं पाहण्यासाठीं आपणांकडील स्त्रिया धांवून येतात. तशापैकींच कांहींसा प्रकार इंग्रजी जनतेचा आहे. मिरवणूक म्हटली, कीं त्यांना प्रिय. त्यांत सम्राटही बाहेर पडणार; मग तर विशेष उत्साह. राणीसाहेब बरोबर जाणार म्हटल्यावर आनंदाची पर्वणीच आली. हिंदुस्थानापलीकडल्या डोंगराळ मुलखाचा राजा आपल्या राजाचा पाहुणा होणार आणि त्याच्या सन्मानासाठीं मिरवणूक निघणार! अर्थात् ही गंमत पहावयास मिळणार! शिवाय त्याची बुरख्यांत राहणारी राणीही बरोबर मिरवणार! मग काय विचारतां? कपिलाषष्ठीप्रमाणें येणारा हा योगायोग अपूर्व असें इंग्रजांना वाटलें आणि म्हणून लंडनमधील त्या मिरवणुकीस किती गर्दी जमली असेल याची कल्पनाच केलेली बरी! तोफांची सरबत्ती किती वेळां झाली; टाळ्यांचा कडकडाट किती झाला आणि इंग्रजी टोप्या किती वेळां उडाल्या, बायकांचे पांढरे हातरुमाल किती फडफडले—शुभचिंतनपर वाक्यें केवढया मोठ्यानें उच्चारलीं गेलीं—या सर्वांची साक्ष स्वर्गीय विमानांत बसून तमसातीरावरील अपूर्व चमत्कार पहात असलेल्या देवादिकांनाच देतां येईल.

अफगाणिस्तानचा यःकश्चित् अमीर तो काय? आणि सूर्य कधींही न मावळणाऱ्या प्रचंड साम्राज्याचे बादशहा, त्यांची राणी, राजपुत्र, प्रधान, मंत्री, वकील, हे सर्व त्याच्या तैनातीसाठीं राबतात ही काय गंमत आहे? अमीर रानटी, बंडखोर, आमच्याशीं फटकून वागतो, अशी तक्रार करणारे अधिकारी त्याला कागदोपत्रीं फार तर " हिज हायनेस " म्हणत. तो नेहमीं आपल्या बगलेंतला ' बच्चा ' असावा अशी त्यांची इच्छा; परंतु ' **स्वयमेव मृगेंद्रता** ' प्राप्त करून घेणारा अमीर अशा अपमानास्पद रीतीनें राहील का? अर्थातच नाही; आणि यांतच अमानुल्लाच्या इंग्लंडांतील अपूर्व स्वागताचें रहस्य आहे.

इंग्लंड इतकें नरम येऊन अफगाणिस्तानच्या अमिराची मर्जी संपादण्यासाठीं बादशहांकडून त्याचा जाहीर पाहुणचार करील, ही गोष्ट अमीर गादीवर आला तेव्हां कोणास शक्य दिसली नसती. अबदुर रहमानचा पुत्र नासिरुल्लाखान इंग्लंडमध्यें मागें गेला होता, तेव्हां त्याचा असा सन्मान झाला नसेल. फार काय, इतर कोणत्याही भूपतीच्या नशिबीं नसेल इतकें वैभव, इतका मानमरातब आणि इतकी बडेजावी त्या वेळीं इंग्लंडांत अमानुल्लाची झाली. त्याचें कारण एक तर अमिराची

'विक्रमार्जित सत्त्वप्राप्ति' आणि दुसरें भूगोलाचें साहाय्य. केवळ भौगोलिक रचनेमुळेंच अफगाणिस्तानला आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें आहे. तशांत तेथें अमीर जरासा हुषार असला कीं मग विचारावयास नकोच ! असो.

**१२५. अमिरावर आदरातिथ्याचा भडिमार**:—बकिंगहॅम राजगृहांत आल्यावर आमिरावर सर्व पाहुणचारांची सरबत्ती सुरू झाली. दरबारी आदरसत्काराची भाषा त्या वातावरणांत घुमूं लागली. पुश्तु अथवा पर्शियन शब्द पूर्वी त्या राजप्रासादांत कदाचित् उच्चारले गेले असतील; पण अमानुल्लाच्या वास्तव्यामुळें अपरिचित शब्दप्रयोग ऐकून सर्वत्रच आश्चर्यमय देखावे दिसत. तेथील सर्वांचें लक्ष वेधणारा अमीर सम्राटांचा पाहुणा म्हणून बकिंगहॅममध्यें मिरवीत होता. त्याचें मन रिझविण्यासाठीं व त्याला कांहींही कमी पडूं नये म्हणून जगडव्याळ साम्राज्यांतील बडेबडे उमराव धडपडत असत. आमचें यंत्रकौशल्य पहा, आमची वैमानिक प्रगति एकदां तरी नजरेखालून जाऊं द्या, इंग्रजांचें समुद्रवर्चस्व कोणत्या जोरावर आहे त्यांतील कांहीं भागाकडे किंचित् दृष्टि फेका, अशाच विनंत्यांनीं अमानुल्लाचा कार्यक्रम आंखला गेला होता. डोंगराळ प्रदेशांतील रानटी राजाला आपल्या शक्तीचें, सामर्थ्याचें व यांत्रिक चमत्कारांचें प्रदर्शन दाखवून 'गार' करून टाकूं ही इंग्रज मुत्सद्यांची इच्छा. पण लंडनला पोहोंचण्यापूर्वींच अमिरानें अर्धे अधिक युरोपखंड पाहिलेलें होतें. तो अशा प्रदर्शनाला भुलतो थोडाच ?

लंडनमध्यें आल्यावर प्रथमतः "अज्ञात योद्धया"च्या समाधीस वंदन करण्यासाठीं अफगाणाधिपति लवाजम्यानिशीं गेले. ( युद्धांत अनेक ठिकाणचे अनेक योद्धे गतप्राण होतात. त्यांच्या प्रत्येकाच्या नांवचें वेगळें स्मारक न करितां राष्ट्रांतील स्मृति जागृत ठेऊन पुढील पिढीस स्फुरण चढावें म्हणून "अज्ञात योद्धया"चें एकच थडगें बांधतात आणि त्या ठिकाणीं येऊन सर्व राष्ट्रानें नैमित्तिक प्रसंगानुसार राष्ट्रसेवकांच्या थडग्याला वंदन करावयाचें असतें.) अज्ञात योद्धयाच्या समाधीस योग्य समारंभानें पुष्पहार अर्पण केल्यावर पाहुणे राजे पुनः बकिंगहॅम राजवाड्यांत आले. रात्रौ तेथें त्यांना दरबारी मेजवानी झाली. शतकभर 'खाऊं कीं गिळूं' अशा 'प्रेमानें' राहिलेल्या शेजारी सरकारचे वरिष्ठ एके ठिकाणीं जमले; तेव्हां मेजवानी दरबारी थाटाची झाली हें उचित होय !

युरोपियन राष्ट्रांत अशा प्रसंगीं मुख्य पाहुण्यांचें अभिष्ट चिंतणारें पण परिस्थितीस अनुसरून असें छोटेंसें भाषण करतात आणि पाहुणे तितक्याच

मोजक्या शब्दांत आभार मानतात. बकिंगहॅम राजप्रासादांत राजे पंचमजॉर्ज यांनीं अमानुल्लाचें अभिष्ट चिंतण्यासाठीं भाषण केलें तें असें:—

" राजेसाहेबांच्या कारकीर्दींत अफगाणिस्ताननें केलेल्या प्रगतीकडे माझें
" सहानुभूतिपूर्वक लक्ष आहे. स्वदेशोद्धारार्थ राजेसाहेबांची जी खटपट चालली
" आहे, ती पुरी करण्यासाठीं राजेसाहेबांस दीर्घायुष्य लाभावें अशी मी प्रार्थना
" करितों. आणि आपलीं हीं दोन्ही शेजारचीं राष्ट्रें शांततेनें नांदून परस्परांच्या
" उन्नतीस कारणीभूत होवोत अशीच माझी इच्छा आहे. "

दुसऱ्या दिवशींचा कार्यक्रम विशेष महत्त्वाचा होता. प्रथमतः दरबारी मिरवणुकींत सामील होऊन राजाराणी लॉर्ड मेयरच्या निमंत्रणावरून गिल्डहॉलकडे गेलीं. आदल्या दिवशीं स्टेशनवरून राजवाड्यापर्यंत निघालेली मिरवणूक " साधी " होती. सर्व सरंजामानिशींची मिरवणूक १४-३-१९२८ रोजीं बकिंगहॅम राजवाड्यापासून निघाली ती गिल्ड हॉल (नगरसभा-मंदिर) पर्यंत गेली. नगराध्यक्षांनीं ( लार्ड मेयर ) अत्यंत अदबीनें राजाराणींचा सत्कार केला. तोफांची सरबत्ती झडली, बँडवादन झालें, टाळ्यांचा कडकडाट, टोप्या उडविणें इत्यादि आनंदप्रदर्शक सर्व प्रकार झाले. लंडन कॉर्पोरेशनच्या वतीनेंही जाहीर स्वागत झालें. मानपत्र समर्पण केलें. आणि नंतर उपाहाराचा समारंभ ठरला होता, तिकडे सर्व मंडळी गुंतली. शिष्टाचाराप्रमाणें लॉर्ड मेयर यांनीं अभिष्ट चिंतितांना काढलेले उद्गार असे होते:—

" उभयतां राजाराणींची ही भेट म्हणजे राजेसाहेब व आमचे सम्राट यां-
" मधील नांदत असलेला सलोखा दर्शविणारें गमक आहे; हें आम्ही व इतर
" आमचे नागरिकबंधू ओळखून आहों. या दोन राष्ट्रांमधील दोस्तीचे व
" शांततेचे बंध आणखी दृढ व्हावेत अशी आमची उत्कट इच्छा आहे. दोन्ही
" देशांचा आपसांतील व्यापारधंदा पुष्कळ वाढेल असा आम्हांस विश्वास
" वाटतो. "

अमीर अमानुल्लानेंही समयोचित उत्तर थोडक्यांत दिलें. त्यानें फार्सींत भाषण केलें, त्याचा आशय असा:—

" अफगाणिस्तान व ब्रिटन यांचे भावी राजकीय संबंध ठरवितांना
" इंग्लंडचे राजे व आम्ही यांमध्यें वसत असलेल्या दाट स्नेहाचा फार
" उपयोग होईल. "

अमानुल्लास इंग्रजीचें ज्ञान नव्हतें व नाहींही. इंग्रजींत भाषण झालें कीं, त्याचें फार्सीमध्यें भाषांतर करून सांगितल्यानंतर अमानुल्लानें फार्सींत उत्तर द्यावें व त्याचाही इंग्रजी सारांश तज्ज्ञांनीं सांगावा असा प्रकार प्रत्येक सभेच्या वेळीं चालू होता.

१२६. **मुक्या मेजवानीचा समारंभ** :—त्याच दिवशीं म्हणजे ता.१४-३-२८ रोजीं बुधवारीं सायंकाळीं अमानुल्लास इंग्लंडच्या परराष्ट्रीय खात्यातर्फे फॉरेन ऑफिसमध्यें मेजवानी झाली. अर्थात्च सर ऑस्टिन चेंबर्लेन हे तेथील यजमान आणि अमानुल्लाराजे खासे पाहुणे. परंतु नेहमींच्या शिष्टाचाराविरुद्ध असें यजमानाचें वर्तन तेथें घडलें. म्हणजे भाषणें वगैरे कांहींच झालीं नाहींत! मंगलाष्टकें न होतां विवाहसमारंभ पार पडल्यावर एखाद्या पुराणमताभिमानी ठमा-काकूंना जितकें आश्चर्य वाटून चुटपुट लागली असती किंवा समाराधनेंत भोजन करणारांनीं श्लोक म्हटला नाहीं अथवा "उदक" सोडण्याचें राहिलें इत्यादि प्रकारांमुळें जुन्या चालींच्या लोकांत जी खळबळ उडेल तीच विलायती समाजांत अशा 'मुक्या' मेजवानीनें होते. चेंबर्लेनांच्या मनांत चाललेले भविष्यांविषयींचे विचार त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हते म्हणून ते मौनव्रत स्वीकारते झाले, का बोलण्यासारखें कांहींच उरलें नाही? इंग्रजी भाषेंतील गौरवपर वचनांचा आणि अभिष्ट चिंतण्याच्या वाक्प्रचारांचा त्या सायंकाळीं तमाम लंडनमध्यें दुष्काळ तर पडला नव्हता?

ही सुनकी मेजवानी झाल्यानंतर दुसरे दिवशीं—गुरुवार ता. १५-३-२८ रोजीं अफगाण लिगेशन*मध्यें अमानुल्लानें यजमानांस—पंचमजॉर्जादिकांस मेजवानी दिली. इंग्रजी शिष्टाचार असा आहे, कीं आपणांस कोणी भेटावयास आला, कीं लगेच परत-भेट त्याकडे झाली पाहिजे. मेजवानी आपण झोडली कीं शक्य तितक्या त्वरेनें परत मेजवानी द्यावी लागते. कोणाचा उपकार अथवा शिष्टाचाराचा

---

* लिगेशन याला पयार्यशब्द तज्ज्ञानीं सुचविण्याची कृपा करावी. कॉन्सुलेट, ऐंबसी व लिगेशन अशा चढत्या पायरीनें दर्शविली जाणारी अधिकाऱ्यांची जागा 'वकिलात' या एकाच फार्सी शब्दानें दर्शविणें योग्य नव्हे. स्वतंत्र राष्ट्रांचे परस्परांचे स्नेहसंबंध संर-क्षणार्थ असणारे अव्वल दर्जाचे वकील परदेशांत ज्या ठिकाणीं राहतात त्या जागेस लिगे-शन म्हणतात. हिंदुस्थानांत लिगेशन कोणत्याच राष्ट्राचें नाहीं. तीं सर्व लंडनमध्यें असणार. हिंदुस्थानांत सर्वत्र कॉन्सुलेट्स् आहेत.

" उपचार " आपल्याबरोबर घेऊन न जातां " फिटंफाट " करावी लागते. तदनुसार भेटीला परतभेट, मेजवानीला परतमेजवानी हें झालें. लिगेशनची जागा अपुरी असल्यानें या समारंभास इंग्लंडकडील शेलकीच मंडळी बोलवावी लागली.

अफगाणाधिपतींचा लंडनमधील राजकीय—दरबारी—मुक्काम ता. १५-३-२८ रोजी संपला. म्हणजे बकिंगहॅम राजवाड्यांत बादशहाचे पाहुणे म्हणून ते फक्त तीन दिवसच होते. त्यानंतर क्लॅरिज हॉटेलांत ही सर्व मंडळी राहण्यास गेली. अतःपर ते इंग्लंडसरकारचे पाहुणे होते. यानंतरचा त्यांचा कार्यक्रम विविध प्रकारचा असला, तरी अंतरीच्या एकाच भावनेनें प्रेरित होऊन आंखण्यांत आला होता. इंग्रजी हृत्पटलावर काय विचार कोरले होते ते जाणण्याची शक्ति मानवांना अवगत नसली, तरी इंग्रजी राजकारणाचा थोडासा अभ्यास असणारास त्यांतील मर्म कळण्यास अवधि लागणार नाहीं.

ता. १६ मार्च रोजीं **बर्मिंगहॅम** मधील बी. एस्. ए. कारखान्यांत अफगाणराजे गेले, नव्हे त्यांना तेथें नेलें. नेहमींच्या प्रचारांतील बी. एस. ए. सायकलच तेथें होते असें नाहीं, तर बंदुकी, रायफल्स, दारूगोळा, मोटारी, मोटार-सायकली व इतर नानाप्रकारच्या वस्तू तेथें तयार होतात. तो कारखाना व त्यांतील यंत्रसामग्रीवर होणारें काम पाहून अमानुल्लास आश्चर्य वाटलें.

**१२७. लष्करी वैमानिकांची कसरत** :—शनिवारीं ( १७-३-२८ ) लष्करी विमानांची कसरत अमानुल्लासाठीं ठरविण्यांत आली होती. **हॉल्टन** येथें खाशा स्वाऱ्या बरोबर अकरा वाजतां येतांक्षणींच विमानाधिपति सर **ह्यू ट्रेंचर्ड**, दुय्यम अधिपति, वैमानिक खात्याचे सेक्रेटरी **सर होअर** व अंडर-सेक्रेटरी **सर फिलिप ससून**, लेडी होअर, अफगाणिस्तानांतील ब्रिटिश मंत्री सर हंफ्रेज् इत्यादि मंडळींनीं खडी ताजीम दिली. औपचारिक कुशल प्रश्न झाले व नंतर प्रेक्षणीय भाग दाखविण्यास सुरुवात झाली.

हॉल्टन येथें १५ ते अठरा वर्षें वयाचीं तीन हजार मुलें वैमानिक व तदनुषंगिक ४० धंद्यांचें शिक्षण घेत असतात. त्यांचे वेगवेगळे वर्ग, प्रयोगशाला, रसायनशाला इत्यादि विभागांतून हिंडून आल्यानंतर वर्गांत विद्यार्थ्यांना प्रोफेसर माहिती कशी सांगतात तें पाहण्यासाठीं सर्व मंडळी थांबली. अमानुल्लाला इंग्रजी कळत नव्हतें. तरी तो प्रोफेसरांचें व्याख्यान मोठ्या कुतूहलानें ऐकूं लागला. पैगंबर, महमद, इस्लाम, कुराण, मशीद इत्यादि शब्द त्याच्या कानीं पडतांच हा

कशासंबंधींचा धडा आहे असें राजेसाहेबांनीं तत्काल हंफ्रेज् यांना विचारिलें. कारण दुसऱ्या कोणास फार्सी अथवा पुश्तु येतच नव्हतें. "इस्लामी धर्माची माहिती विद्यार्थ्यांना सांगण्यांत येत असल्याचें" कळल्यानें अमानुल्लानें आणखी प्रश्न विचारले, "कां? कशासाठीं? हेतु काय?"

"विमानांना जगांतील वाटेल त्या प्रदेशावरून फिरावें लागतें आणि उतरावें लागलें तर भिन्न लोकांचे भिन्न धर्म, त्यांचे आचार, चालीरीती इत्यादिकांची माहिती असणें सुरक्षिततेच्या दृष्टीनें व लोकांचीं मनें दुखविलीं जाऊं नयेत म्हणून इष्ट आहे."

शाळेंतील ३००० मुलांनीं एकत्र जमून राजेसाहेबांच्या दोस्त पाहुण्यांस 'सलाम' केला. आणि अमानुल्ला व सूरय्या यांनीं स्मितपूर्वक त्याचा स्वीकार केल्यावर मोटरमधून **हेंडन्** या 'वैमानिक' स्टेशनकडे सर्व मंडळी गेली. तेथें आकाशाध्यक्ष सर **जॉन सामंड** आपल्या अधिकाऱ्यांसमवेत हजर होते. मोठ्या आदरानें त्यांनीं राजाराणींचें स्वागत केलें. राजेसाहेबांना बसण्यासाठीं खास जागा करण्यांत आली होती. तेथें पाहुणे स्थानापन्न होतांच तीन एकवाही (सिंगल सीटर) विमानें आकाशांत आलीं आणि फार उंच न जातां जवळच्या जवळ राहून बॉंब कसे टाकतां येतात हें त्यांनीं दाखविलें. तीन तकलुपी तंबू उभारले होते; त्यांवर त्यांनीं बॉंब टाकले. बॉंबचा स्फोट होऊन धूर व ज्वाळा यांनी तंबू वेढले गेले आणि पाहतां पाहतां त्यांची तेथेंच राख झाली! विमानांनीं आकाशांतील कवाईत (ड्रिल) करून दाखविली. आपण जसे कांहीं जमिनीवरच वेगातिशयानें चालत आहों असें वैमानिकांना वाटत असावें असें दिसलें. आकाशांत संचार करीत असल्याबद्दल, द्रुततमगतीविषयीं किंवा खालीं पडल्यास काय होईल या भीतीची किंचितूशी कल्पनाही त्यांच्या मनाला शिवली नसावी असें वाटे.

परंतु त्या दिवशींचें सर्वांत आश्चर्यकारक काम दुसरेंच होतें. अमानुल्लानें तें पाहिल्यापासून त्याला इंग्रजी वैमानिक प्रगतीचें कांहीं विशेष महत्त्व वाटलें कीं नाहीं तें सांगतां येणें कठीण आहे. परंतु त्या विमानांतून बसणाऱ्या व अशी बुद्धि गुंगाविणारीं कामें करणाऱ्या तरुण वैमानिकांचें त्याला फार कौतुक करावेंसें वाटलें. अशीं चतुर माणसें आपल्या तैनातींत राहतील तर......हा विचार त्याच्या मनांत कितीतरी वेळां आला आणि इंग्लंडचें व अफगाणिस्तानचें नातें

जसें दिसतें तसें असतें, तर हे कारागिर माझ्या नौकरींत असूं द्या असा त्यानें आग्रह धरिला असता. परंतु वर्तमान परिस्थितींत त्याला स्वस्थ बसून "वाः वाः" असे उद्गार काढण्यापलीकडे मार्गच नव्हता.

शत्रूंच्या कचाटींत सांपडण्याची शक्यता न ठेवतां दिवसा बॉंब टाकून त्यांचें नुकसान कसें करावें याचें प्रदर्शन करण्यासाठीं तीन "फॉक्स डे–बॉंबर्स" विमानें गर्जना करीत संचार करूं लागलीं. त्यांचा पुढील भाग निमुळता नसून हत्तीच्या गंडस्थलाप्रमाणें विशाल होता. आवाज इतका मोठ्यानें होई कीं काना-मागें मेघगर्जना होत आसल्याचा भास होत असे. पण लगेंच तीं विमानें पश्चिमे-कडे नीलाकाशाच्या पडद्यावर काळ्या ठिपक्याप्रमाणें माशांएवढीं दिसूं लागलीं. त्या विमानांचें काय काम आपणांस दाखविणार ? इतकीं उंच व दूर तीं गेलीं कशाला ? म्हणून सूरग्या राणीनें दुर्बिण राजेसाहेबांकडून घेतली व ती त्यांतून पाहूं लागली. राजेसाहेबांची मान तर सारखी वर झालेली होतीच. बारीक ठिपके मोठे होऊं लागले; हो, तीं जवळ येत आहेत, असें राणी म्हणाली व तिनें दुर्बीण बाजूला ठेवली. इतक्यांत आवाज मोठा येऊं लागला व विमानें जमिनीवर येऊन झपाट्यानें आदळलीं असें वाटलें ! राणीनें व इतर राजभगिनींनीं किंकाळी देखील फोडली ! परंतु राजाराणी बसले होते त्याच्या अगदीं जवळून साधारणपणें जमिनीपासून ५० फूट अंतरावर येऊन सुमारें २००-२२५ मैलांच्या वेगानें तीं विमानें बॉंब टाकून निघून गेलीं. त्यांनीं काय केलें हें पाहीपर्यंत पुनः तीं काळ्या ठिपक्याप्रमाणें आकाशांत दिसूं लागलीं ! यांतील चपळाई, धारिष्ट व कौशल्य हीं आश्चर्यकारक होतीं ! तीं पाहून प्रेक्षकांना अचंबाच वाटला. डोळे मोठे करून आणि तोंड उघडून अमानुल्ला किती वेळ तरी स्तंभित होऊन पहातच राहिला होता. अशा विद्युद्वेगानें बॉंब टाकून गेल्यावर या विमानांचा कसचा तपास लागणार आणि त्यांवर कसला मारा होणार ? आणि तीं वर गेल्यावर तर दृष्टिक्षेपाच्याहि पलीकडे जाणार. मग त्यास भीति कसली आहे ? आवाज मात्र इतका भयंकर मोठा होता, कीं त्यामुळें राणी व राजभगिनी यांनीं कानांत बोटेंच घातलीं ! आवाज व वेग यांवरून त्या विमानांची शक्ति फार अचाट असली पाहिजे असा अमानुल्लानें तर्क केला व हंफ्रेज् यांस विचारतां तो खरा ठरला. इतक्या शक्तीचीं विमानें दुसरीं नाहींत असें राजेसाहेबांस सांगण्यांत आलें. आपण आज फारच अजब चमत्कार पाहिला असें अमानुल्लास वाटलें.

विमानांची लष्करी शक्ति दाखविल्यानंतर नुसती कसरतही आम्हांस कशी करतां येते तें पहा, असें म्हणून आकाशांत विमानें आपलीं करामत दाखवूं लागलीं. "Go" ह्या इंग्रजी शब्दाचा आकार त्यांनीं आपल्या गतीनें धूर सोडून करून दाखविला. आणखी त्यांत दुसरीही मौज अशी केली कीं, 'गो' (जा) असा हुकुम सुटल्यानंतर विमानें हलावयाचीं असलीं, तरी आकाशांत गेल्यावरही त्यांना शेवटचा–ओऽओ असा आवाज ऐकूं येई इतक्या विद्युद्वेगानें तीं वर चढलीं.

दोन मिनिटांच्या आंत सर्व विमानें आकाशांत मोठ्या निनादानें व वेगानें गेलीं व घोडदौड खेळतात तशी "विमानदौड" खेळूं लागली. राजाराणींच्या अगदीं डोक्यावरून तीं जात म्हणून एकसारखें डोकें वर केल्यानें अमानुल्लाच्या मानेला कळ लागली खरी. पण तो इतका गुंगला होता, कीं त्याचें तिकडे लक्षही नव्हतें. राणी मात्र वरचेवर मान खालीं करीत असे. स्त्रीजातीला विध्वंसक शस्त्रांमध्यें गोडी कशी वाटणार ? ललितकला, शाला, छात्रालय, विद्यार्थ्यांचे खेळ अशा ठिकाणीं त्यांना अत्यंत कौतुक वाटतें खरें; पण तसेंच लष्करी बाबतींत कसें असूं शकेल ? सुमारें ६०–६५ विमानें हवेंत घिरट्या घालीत होतीं. त्यांचा एकमेकांत 'शिवाशिवी' चा खेळ चालला आहे असें खास वाटे. एकामागें दुसरें, त्याच्या खालून तिसरें, बाजूनें चौथें असे किती तरी प्रकार त्यांत होत. एकमेकांवर हीं आपटणार तर नाहींत ना अशीही भीति किती तरी वेळां प्रेक्षकांना वाटली. पण अपघात न होतां सर्व प्रेक्षणीय प्रयोग चालू होते. अफगाणिस्तानचे राजाराणी त्यांचें कौशल्य पाहण्यास आल्यावर वैमानिकांस स्फुरण कां चढूं नये ? त्यांनीं विमानांतून बहिरीससाण्याप्रमाणें भराऱ्या मारल्या, खंड्यापक्षी मासे धरण्यास उडी मारतो तशी अगदीं खडी उडी घेतली, पण जमिनीला विमान न टेकवितां लगेच तोंड फिरवून तसेंच वर आरोहण केलें. या वेळीं मात्र "विमान पडलें" असें प्रेक्षकांस वाटलें. त्यामुळें सहानुभूतीचे दुःखोद्गार राजे अमानुल्ला, सूरय्या राणी व इतर मंडळी यांच्या तोंडून एकदम निघालेही. त्यांना वाटलें, कीं विमानाचें एंजिन तुटल्यामुळें वा अन्य कारणास्तव तें एकाएकीं खालीं पडत आहे. पण वैमानिकांचें तें कौशल्य पाहून त्यांनीं नंतर टाळ्याच पिटल्या आणि आश्चर्ययुक्त कौतुकाचे उद्गार न कळत त्यांच्या तोंडून आले ! "शर्यत" खेळतांना विमानांनीं दाखविलेली गति पाहून त्यांना संचालना देणाऱ्या यंत्रांच्या प्रचंड शक्तीची कल्पना सहज करितां येई. आणि यामुळें इतकें मजबूत पण हलकें, जोरदार परंतु टिकाऊ,

उष्णता, थंडी अथवा हिमवृष्टिसारख्या नैसर्गिक प्रकोपांना दाद न देणारें आकाशयान तयार करणाऱ्या शिल्पीजनांची तारीफ झाली तर त्यांत नवल कोणतें ?

कांहीं वैमानिकांनीं कोलांट्या घेतल्या; अनेक प्रकारच्या उड्या मारीत ते हवेंत परिभ्रमण करूं लागले. जमिनीवर एकट्या खेळाडूलाही ज्या उड्या घेतां येणें शक्य नाहीं त्या हवेंत विमानासह ते लीलया घेत. जीविताची त्यांना तिळमात्र पर्वा नसावीसें दिसलें. पाण्यांतून उताणे पोहून जातात तसेंच हवेंतून विमानासह खालीं जमिनीकडे डोकें करून एक आकाश–नाविक गेलेला पाहून सर्वांना आश्चर्यातिशयानें तोंडांत बोटेंच घातलीं ! असें करामतीचें पण धोक्याचें काम करण्याची लष्करी दृष्ट्या अथवा इतर कोणत्याही हेतूनें आवश्यकता असते असें नव्हे, पण केवळ वैयक्तिक धाडशी कौशल्य म्हणून त्याला महत्त्व दिलें जातें. एवढेंच नाहीं तर, अशा वाकबांच्या गुणाचें चीज करणारी पारितोषिकें व दरबारी सन्मान त्यांना मिळतात.

हा सर्व कार्यक्रम अमानुल्लाला इतका मनोरंजक आणि आनंददायक वाटला, कीं त्या विमानांचा गंभीर निनाद सारखा त्याच्या कानांत घुमत होता. डोळ्यांपुढें भरारीनें खालीं येऊन लगेंच वर जाणारीं तीं विमानें, तो " उताणा " पोहणारा वैमानिक आणि दौड करणारे वेगवान् आकाशनाविक–" खंड्या- " प्रमाणें बुडी ( ? ) मारणारा ' हवाईस्वार ' इत्यादि चमत्कार कितीतरी वेळ खेळ खेळत होते ! परत निघतेवेळीं राणीशीं तो यासंबंधींच बोलूं लागला. पण जाण्यापूर्वी हंफ्रेजला त्यानें सर्व वैमानिकाधिकाऱ्यांचे अत्यंत स्तुतिपर आभार मानावयास सांगितलें. आपण हा सर्व खेळ पाहून अत्यंत खूष झाल्याचें तो पुनः पुनः म्हणाला.

**१२८. समुद्रयानांचें सामर्थ्य :—** ता. १८–३–१९२८ ला रविवार होता. तेव्हां दुसरा कांहीं महत्वाचा कार्यक्रम झाला नाहीं. पण लॉर्ड सॅलिस्बरी यांचे येथें उपाहाराला निमंत्रण होतें; त्याप्रमाणें राजाराणी जाऊन आले. उपाहारप्रसंगीं यजमानांनीं आपणांस किती आनंद होत आहे तें बोलून दाखवितां येत नसल्याचें सांगितलें. राजेसाहेबही या अगत्यपूर्वक केलेल्या स्वागतानें उपकृत झालेले दिसले. हें सर्व तोंडीं भाषेंतच चाललें होतें. अंतरींची तळमळ काय होती ती एक ज्याची त्याला ठाऊक किंवा त्या अदृश्य सृष्टिचालकालाच माहीत. कारण सॅलिस्बरींच्या वडिलांनींच द्वितीय अँग्लो–अफगाण–युद्धाचा पाया रचला

होता ( पृ. ३४–३५ पहा ). तार्झीसारख्या चाणक्यानें अमानुल्लास त्यांचा पूर्वेतिहास सांगितला असेल !

सोमवारीं राजेसाहेबांना इंग्लंडचें आरमारी वर्चस्व दाखविण्याचें ठरलें होतें. ब्रिटनला " समुद्राची सासू " असें कां म्हणतात तें कळून येण्यासाठीं हें प्रदर्शन करावयाचें होतें. वास्तविक पाहिलें तर अफगाणिस्तानला समुद्रकिनारा कोठेंच नाहीं. आजूबाजूंच्या नद्यांतून नौकानयन होईल म्हणावें तर त्यांतून लांकडी लहान होडयाही चालण्याची पंचाईत. मग ह्या आरमारी देखाव्याचें प्रयोजन काय ? आमचें नाविक सामर्थ्य किती आहे आणि जगामध्यें " समुद्राची सासू " म्हणून आम्ही कसे नांदतों हें दाखविण्याच्या हेतूनेंच अमानुल्लासाठीं ही अरमारी देखाव्याची व्यवस्था केली होती. नेहमींच्या पाहुणींतलें पण " बायकी " उदाहरण देऊन असें म्हणतां येईल कीं, विहिणीविहिणींची गांठ पडली म्हणजे नसतें कारण काढून आपले दागिने, उंची उंची कपडे, गाडयाघोडे, नोकरचाकर इत्यादि डामडौल दुसरीच्या डोळ्यांत भरावा म्हणून त्यांची आपसांत जशी अहमहमिका चालू असते त्यांपैकींच हा प्रकार होता. आणि राष्ट्रांना इंग्रजींतून स्त्रीलिंगीच संबोधितात !

**पोर्ट्स्मथ्** येथें अमानुल्ला व सूरय्या पोहोंचल्याबरोबर त्यांचें आदरपूर्वक स्वागत करण्यासाठीं सागराधिपति ॲडमिरल **सर अस्मंड डी ब्राक,** दुय्यम ॲडमिरल, पिछाडीचे ॲडमिरल इत्यादि सरकारी अधिकारी गणवेशांत नटून सजून तर आलेच होते. परंतु इतर नागरिकांचा जमावही कांहीं कमी नव्हता. धक्क्याची बाजू तर प्रेक्षकांनीं फुलून गेली होती. पाहुण्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ तोफांची सलामी झाली. सैनिकांनीं लष्करी सलाम केला. अफगाण झेंडा आरमारी ऑफिसावर फडकूं लागला. सर्व औपचारिक विधि पार पडल्यानंतर राजेसाहेब आणि सूरय्या राणी जहाज पाहण्यास गेले. प्रथमतः इतिहासविख्यात इंग्रज सागर–सेनापति **नेल्सन** याचें जहाज " **जयःश्री** " ( व्हिक्टरी ) हें दाखविण्यांत आलें. १८०५ सालीं बांधलेल्या जहाजांत व आजच्या बाष्पनौकांत किती प्रगति झाली आहे हें दाखविण्यासाठीं नेल्सनची " जयःश्री " दाखविण्यांत आली. नेल्सनचें अद्भुत पण स्फूर्तिदायक चरित्र इंग्रजी इतिहासांत अजरामर राहील. त्याच्या काळापासून (१२५ वर्षांपूर्वींपासूनही) आमचें समुद्रावर प्रभुत्व होतें ही प्रौढी मारण्याचा हेतु यावेळीं नव्हता असें नव्हे. नेल्सन अखेरीस पडला ती जागा अमानुल्लाला

दाखविली. सर ह्यूफ्रेज् व ताज्झीं मधून मधून नेल्सनची माहिती सांगत होते. नेल्सन ज्या खोलींत रहात असे ती 'जयःश्री 'वरील भागाही मोठ्या अभिमानानें अधिकाऱ्यांनीं दाखविली. नेल्सनचें महत्त्व व अभिमान इंग्रजांना किंवा ज्यांच्यावर इंग्रजी इतिहास सक्तीनें लादला आहे अशा परतंत्रांना. अमानुल्लाला मात्र नेल्सनचे इतके गोडवे गाइलेले आवडले नाहींत. कारण

**प्रकृतिः खलु सा महीयसां सहते नान्यसमुन्नतिं यया ।**

पूर्वीच्या तोफा कशा होत्या ? त्यांचा मारा कसा करीत ? जहाजें बांधीत कशीं ? इत्यादि चौकस प्रश्न अमानुल्लानें पुष्कळ विचारले व त्यांचीं समाधानकारक उत्तरेंही दिलीं गेलीं.

"जयःश्री "च्या जोडीस "**शार्दूल**" ( टायगर ) नांवाचें आधुनिक लढाऊ जहाज ठेवलें होतें. महायुद्धांत 'शार्दूल'नें मोठा प्रताप गाजविला असल्यानें तें तसें ठेवण्यांत औचित्य होतें. ट्राफलगारच्या लढाईत नेल्सनच्या जयःश्रीनें विजय मिळवून इंग्लंडचें आरमारी वर्चस्व प्रस्थापिलें, तर युरोपियन युद्धांत इंग्रजी आरमारानें जगज्जिगीषु जर्मनीचा पराभव करून इंग्रजांच्या श्रेष्ठत्वावर आलेली गदा परत फिरविली. म्हणून इंग्रज आरमारांतील एक युद्धनौका "शार्दूल" ही "जयःश्री" च्या जोडीस लावून ठेवली होती. राजेसाहेब पहावयास येणार म्हणून तीवर जिकडे तिकडे पताका व तोरणें लावून सर्व सुशोभित केलें होतें. तीवरील १३॥ इंची जोड तोफा पाहूनच तिच्या लष्करी महत्त्वाची कल्पना होई. तोफांची डागणी नव्या पद्धतीची कशी असते ? नव्या युद्धनौकेवर आणखी कोणत्या सोई आहेत इत्यादि सर्व अमानुल्लानें बारकाईनें पाहिलें. नंतर ॲडमिरल्टी हौसमध्यें "खाना" झाला. सर्व अधिकाऱ्यांनीं मोठी कृतज्ञता प्रकट केली. अमानुल्लाच्या चौकस व जिज्ञासु बुद्धीचें त्यांना कौतुक वाटलें. राजेसाहेबांशीं प्रत्यक्ष बोलतां आलें नाहीं, राजेसाहेबांची मातृभाषा अवगत नाहीं म्हणून त्यांनीं खेद प्रकट केला, वगैरे दरबारी प्रकार झाले.

**१२९. पाणबुडींतून जलान्तसंचारः**—पण इंग्रजी आरमाराचें सामर्थ्य एवढयानें कोठें संपतें ? समुद्रावरील व्यवस्था पाहिल्यानंतर आंतील आरमार—जलान्तसंचारिणी नौका—( सबमरीन्स ) त्यांना अमिरास दाखवावयाच्या होत्या. "शार्दूल "वर चढलेले राजे व राणी सूरय्या "सुरुंगी" ( **माईनलेअर** ) '**आल्रेसफोर्ड** 'वर आले, तेव्हां पुढें अफगाण निशाण फडकावीत असलेली एक

लांबलचक बोट त्यांना दिसली. इतर जहाजाहून त्या बोटीचा आकार वेगळा, रूप निराळें आणि नूरही पण एकदम बदललेला. शिवाय तीवर अफगाणी झेंडा आला तो कसा ? इत्यादि फरक पाहून अमानुल्लानें हें काय म्हणून विचारलें. " ही राजेसाहेबांना दाखविण्याकरितां ठेवलेली पाणबोट. आतां आपणांस हिच्यांतूनच समुद्राखालून जावयाचें आहे " असें म्हणतांच अमानुल्लाच्या मुद्रेवर थोडेंसें स्मित झळकलें. ' आपण आज एक नवें धाडस करणार ! ' या विचाराचेंच तें द्योतक असावें. आणि भर तारुण्यांत अभिनव गोष्टीविषयीं किंवा पराक्रमाविषयीं असें मन प्रफुल्लित होणारच. राजेसाहेबांचे पाय त्यांना तिकडे जलदी खेचूं लागले. इतर दरबारी शिष्टाचारांचीं बंधनें आणि बरोबर येणारी अधिकारी धेंडें नसतीं, तर अमानुल्ला खास धांवत उड्या मारीत गेला असता !

सर्व मंडळी " सुरुंगी "वर आल्यानंतर त्या आगबोटीचें काम कसें चालतें हें थोडक्यांत सांगावें लागलें. कारण अमानुल्ला मध्यंतरींच पाणबोटीकडे पहात असे. त्याचें लक्ष आपण पाण्यांतून जाऊं केव्हां इकडेच लागलेलें दिसलें. हें इंग्रजांसारख्या धूर्त अधिकाऱ्यांच्या लक्षांत येण्यास उशीर लागला नाहीं. "सुरुंगी" वरील नकाशाची जी खोली होती तिचें स्वरूप बदलून " राणी-महाल " बनविण्यांत आला होता. कारण, राणीसाहेबांना पाणबोटींतून प्रवास करण्याची इच्छा नव्हती, धाडस नव्हतें, व गोडीही नव्हती !

राणी " सुरंगी "वर राहिली आणि राजे एल्. २२ या पाणबोटीवर मोठ्या उत्साहानें चढले. राणीला साहजिकच थोडीशी चिंता वाटली. पण पतीच्या धाडसांत तिनें व्यत्यय मुळींच आणला नाहीं. आपल्या पत्नीला जात्यनुसार काळजी लागणार हें अमानुल्लानें ओळखून पत्नि दृष्टिआड होईपर्यंत तो हातरुमाल उडवून तिला धीर देण्याचा व आनंदित करण्याचा प्रयत्न करीत होता. पण अमानुल्ला जसजसा दूर जाऊं लागला—बोटीवर हिंडावयाचें असल्यानें तो सूरम्याच्या दृष्टिक्षेपांतून सुटला—असें पाहतांच राणीच्या डोळ्यांत अश्रुबिंदु चमकूं लागले. तिनें ते चटकन् पुसून टाकले व इतर कांहीं गोष्टींसंबंधीं बोलून ती मन रिझवूं लागली.

पाणबोटीवरील खलाशांनीं व अधिकाऱ्यांनी अमानुल्लाचें हार्दिक स्वागत केलें. बोटीवर येतांच अमानुल्लानें पुनः एकदां राणीकडे हातरुमाल उडविला—टोपी काढली—मी जातों, काळजी करूं नको—आतां लगेच भेटूं—असा अदृश्य संदेश

त्यानें राणीकडे पाठविला. दुर्बिण घेऊन तो पाहूं लागला. राणीचे डोळे आपणांकडे आहेत हें त्याला दिसलें. तिची चिंताक्रांत मुद्रा पाहून त्याला वाटलें कीं, " फिक्र न कून " ( ' काळजी करूं नकोस ' ) असें बजवावें. पण दुर्बिणींतून माणसें जवळ आल्यासारखीं दिसलीं तरी त्यांच्याशीं बोलतां येतें थोडेंच ?

एल्. २२ जोरानें पाणी काटीत काटीत प्रथमतः बाजू बाजूनें जात होती. ती फोर्ट ब्लॉक हाउसजवळ येतांच तोफांची सलामी झडली. नंतर पाणबुडीचें सुकाणूं साउदॅम्टन्च्या रोखानें वळविण्यांत आलें. आणि आतां आपणांस ' बुडी घ्यावयाची ' अशी सूचना राजेसाहेबांस देण्यांत आली. तें कसें होतें हें पाण्यासाठीं मोठ्या उत्सुकतेनें अमानुल्ला खालीं गेला. हंफ्रेज्च्या मार्फत त्याने अनेक प्रश्न विचारून अधिकाऱ्यांना पुरेपुरेसें करून सोडलें. पाणबोटीचा वेग वाढला तो कोणत्या यंत्रामुळें व कसा हें अमानुल्लास पहावयाचें होतें. एक शिंग वाजतांच बोट बुडणार–बुडी घेणार–म्हणून राजेसाहेब मोठ्या उत्सुकतेनें पाहूं लागले. एक मिनिटाच्या आंत पाणबुडी पाण्याखालून संचार करूं लागली. तिचें मोठें ' डिझेल' एंजिन थांबलें. दुसऱ्याच यंत्रावर ती चालूं लागली. आपण कसकसे जात आहों हें दिसावें म्हणून एक वेगळा 'पेरिस्कोप' अमानुल्लासाठीं ठेवला होता. परिस्कोपांतील प्रतिबिंबावरून आपण कसा प्रवास करीत आहों, हें वर काय काय दिसतें यावरून अजमावितां येतें. ती सर्व यंत्रें पाहिल्यावर संदेशाची व्यवस्था अमानुल्लास दाखविण्यांत आली. ती पाहून अमानुल्ला चकित झाला. जलान्त–संचार, गुप्त-संदेशवाहन हें पाहून त्या अफगाण राजाला आश्चर्य वाटलें.

संदेशपद्धतीचें काम कसें चालतें हें पाहण्याची राजेसाहेबांची इच्छा दिसली आणि इतक्या बड्या पाहुण्यांची ही इच्छा सफळ कां होऊं नये ? त्यांच्या चेहऱ्यावरील बारीक सारीक फेरफारावरून राजांचे मनोभाव तत्काळ ओळखून त्यांना सुख द्या असा इंग्रजसम्राटांचाच हुकूम. तेव्हां त्यांच्या इच्छा सर्व सिद्धीस जाणार यांत संदेह कसचा ? तेथें हंफ्रेज् यांनी राजेसाहेबांना विचारलें की, " राणीसाहेबानांच संदेश पाठवावयाचा ना ? ' मी समुद्रांतून तुला हा निरोप धाडीत आहें, ' एवढें पुरे ना ? " राजेसाहेबांनी संदेशयंत्रासंबंधीं अधिक प्रश्न विचारतांच हंफ्रेज् पुढें येऊन त्यांनी उपरोक्त संदेश पाठविला.

राणीला संदेश " सुरुंगी "वर असतांना मिळाला. पतिराज आतां दिसत होते, पाण्याखालीं बोटींतून ते गेले काय आणि लगेंच " मी पाण्याखालून तुला

निरोप धाडतों." असा संदेश येतो काय, या सर्वच गोष्टींचा तिला मनस्वी अचंबा वाटला. " राजेसाहेब आपल्या प्रत्युत्तराची उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करीत आहेत; उत्तर काय तें कळविण्याची कृपा करा " असा तगादा 'जासुदानें' करितांच तिनें त्या अवस्थेंत काय उत्तर द्यावें ? समुद्रांतून राजेसाहेबांनीं निरोप पाठविला तर " मी तुम्हांला समुद्रावरून उत्तर धाडतें " असेंच ती म्हणणार आणि त्याप्रमाणें हें तिनें दिलेलें उत्तर राजेसाहेबांना समुद्रांत मिळालेंही !

राणीनें उत्तर पाठविलें म्हणूनच अमानुल्लाला आनंद झाला नाही, तर सर्व चमत्काराचीच त्याला फार गम्मत वाटली व तो खुशालला. नंतर आपण किती खोल आहों तें मोजण्याचें साधन, कोणत्या कोनानें आपली पाणबुडी चालली आहे हें दर्शविणारा 'लेव्हल' बाटलींतील बुडबुडा, पाणी भरलेल्या टांक्या–कारण पाणी भरल्यामुळेंच बोट बुडूं शकते—चालना देण्याचीं यंत्रें, हवा खेळविण्याचें साधन, सुकाणू वगैरे सर्वसाधारण माहिती राजेबहादुरांस देण्यांत आली. अत्यंत कुतूहलपूर्वक त्यांनीं प्रश्न विचारलेले पाहून 'राजेसाहेब किती मन लावून पाहतात' म्हणून त्यांची अधिकाऱ्यांनीं तारीफ केली.

पाणबुडीचें मुख्य काम म्हणजे आंतून आपण अदृश्य राहून जाणाऱ्या येणाऱ्या बोटींना टॉर्पेडो मारून बुडविण्याचें. जर्मनीनें याच मार्गानें दोस्तांचीं व तटस्थांचीं ५४०८ जहाजें ( ११९८९००० टन ) गेल्या युद्धांत 'समुद्रास्तृप्यंतु' केलीं ! राजेसाहेबांस तें काम तर अवश्य दाखविलें पाहिजे. 'आमचा दरारा, आमचें कौशल्य, आमची विध्वंसक शक्ति आणि आमचें एकंदर सामर्थ्य एकवटून अमानुल्लाला दाखविलें कीं, अशा बलशाली साम्राज्यसरकारच्या वाटेला जाण्याची इच्छाही त्याला होणार नाहीं' या हेतूनें सर्व प्रदर्शन चाललेलें. टॉर्पेडो कसे ठेवतात, मारावयाचे कसे, त्यांची गति कशी असते, नेम अचुक लागला हें ओळखावें कसें इत्यादि माहिती अमानुल्लास सांगितल्यानंतर " राजेसाहेब दोन टॉर्पेडो मारतील काय ? " अशी नम्रतेनें पृच्छा करण्यांत आली. अमानुल्ला स्वतः शिकारी व आकाशांतील उडता पक्षी बंदुकीनें पाडणारा. तेव्हां पाण्यांतून अचुक नेम मारण्याला संधि मिळते ती कां घेऊं नये, असें त्याला साहजिकच वाटलें. त्याची उत्कट इच्छा होती कीं, आपण टॉर्पेडो मारून पहावा. अधिकाऱ्यांनीं त्याला कोणता टॉर्पेडो राजेसाहेब मारणार तो दाखविला. तो २१ इंची टॉर्पेडो होता. त्याचें वजन १॥ टन म्हणजे सुमारें पक्के बंगाली ४० मण ! बरें, समुद्राच्या

आंतून टॉर्पेडोचा प्रवास व्हावयाचा तोही विलक्षण वेगानेंच. पाण्यांतून किंवा पाण्यावरून बाष्पनौका फार फार तर ताशीं २०-२५ मैलांच्या वेगानें जातात. आणि हा गोळा जातो ४० मैलांच्या वेगानें !

टॉर्पेडो ठेवण्याची जागा, तेथून तो बाहेर पडतो कोठून, 'घोडा' ( ट्रिगर ) दाबला म्हणजे विद्युत्शक्तीनें स्फोट होतो कसा इत्यादि हालचालींचें ज्ञान अमानुल्लास करून दिल्यावर टॉर्पेडो मारण्याची तयारी झाली असल्याचें कळलें. अमानुल्लानें नेम धरला आणि 'घोडा' दाबला व लगेंच पेरिस्कोपमधून टॉर्पेडोची गति पाहिली. लगेंच दुसरा टॉर्पेडो उडवून तो पाण्यांतून कसा जातो हें वरून पाणी हालतें यावरून समुद्रांत राहून त्यानें पाहिलें. इतक्यांत बातमी आली कीं, " राजेसाहेबांचे दोन्ही नेम अचुक लागले. " मग अमानुल्लाला आत्मविश्वासाचा, नव्या पराक्रमाचा व आश्चर्याचा आनंद झाला. तो अतिशय खूष झालेला दिसला. आणखीही इतर कार्यें पाहून होईपर्यंत " पाणबुडी " वर आली आणि अमानुल्ला खाली उतरला.

इकडे राणी सूरय्या ही समुद्रावरून साउदॅम्प्टनला आली होती. दोघांची अल्पविरहानंतर गांठ पडली. दोघांच्याही मुद्रेवर हास्य झळकूं लागलें. इतक्यांत अमानुल्लाला कांहीं नजराणे देण्याचा समारंभ उरकण्यांत आला. " एल्. २२ " वर अफगाण निशाण फडकत आहे असें रंगीत चित्र उत्तम प्रकारें चौकटीत बसविलेलें अफगाणाधिपास नजर देण्यांत आलें. अफगाणिस्तानला समुद्र असता, एवढेंच काय पण एकादें मोठें तळें जरी अफगाणिस्तानांत असतें, तर ती पाणबुडीच अमानुल्लास मिळाली असती. टॉर्पेडोची गोलंदाजी अचुक केल्याबद्दल मिळणारें सुवर्णरंगित पदक–' तारांकित टॉर्पेडो '–अमानुल्लाच्या बाहूवर लटकविलें. टोपीला लावण्याची फीत ही सर्व पाहुण्यांना बक्षीस दिली. राजेसाहेबांच्या धाडसाची, अचुक गोलंदाजीची व चौकस बुद्धीची सर्वांनींच तारीफ केली. राणीला उद्देशून राजेसाहेब असे आहेत, तसे आहेत, अमुक पाहून तसें म्हणाले, इत्यादि स्तुतिप्रकार झाले. शुभचिंतन, आभारप्रदर्शन होऊन " गम्यतां पुनर्दर्शनाय " असा अधिकाऱ्यांनीं निरोप दिला.

**१३०. टँकच्या लढाईचा देखावा** :—ता. २०–३–२८ रोजीं **लल्वर्थ** येथें लढाईचें कौशल्य राजेसाहेबांच्या निदर्शनास आणावयाचें होतें. कार्यक्रम १० वाजतांचा ठरला होता. आणि तो इंग्लंडमधील कार्यक्रम मिनिटाबरहुकूम

व्हावयाचाच. अफगाणिस्तानांत राहिलेला राजाही पण वेळच्यावेळीं आपले संकेत पाळीत असे. एक मिनिट मागेंपुढें त्यानें होऊं दिलें नाहीं. ९–५० ला मोटारींतून खाशा स्वाऱ्या आल्या. त्यांचें सुस्वागत झालें, कुशलप्रश्न विचारले, इत्यादि ठराविक वर्णन अतःपर लिहून जागा अडवीत नाहीं.

लढाई टँकची होती. टँक म्हणजे एक लांबट पोलादी टांकी. आंत गोलंदाज बसून गोळ्या चालवीत असतो. शिवाय वाटेल तिकडे ती टांकी चालवीत नेतां येते. तिला चाकें वगैरे कांहीं नसतात. एक मोठा अजस्र राक्षसच पाहिजे तर म्हणा. आंतील गोलंदाजाला कसल्याही प्रकारची भिती नसते. चार चार टँकांचा एक असे तीन गट एकदम हल्ला करण्यासाठीं निघाले. त्यांच्या समोरच एक लांकडी भिंत उभारली असून तिचा विध्वंस कसा करतां येतो हें दर्शवावयाचें होतें.

लढाईसाठी शिंग फुंकले नाहीं किंवा कुचाचा नगारा दिला नाहीं. एक मोठा प्रकाश निमिषमात्र चमकला आणि युद्ध सुरू करण्याची खूण ती हीच. बरोबर दहा वाजतां लढाईला सुरुवात झाली. टँक एका दिशेनें मारा करूं लागले, विरुद्ध बाजू संरक्षण करण्यासाठी तीन तीन पौंडांचे गोळे डागणाऱ्या ५ तोफा होत्या. स्थिर राहणारे कांहीं टँकही होते. आरंभ झाल्याची खूण बरोबर १० वाजतां दिसली. ५० सेकंदांच्या आंतच तोफांचा भडिमार सुरू झाला. तीन मिनिटांत भिंतीचा एक भाग ढांसळला. पुढें सरसावण्यासाठीं चालत्या टँकच्या धुडांनी एक युक्ति योजली. समोरची भिंत आणि टँक यांच्यामध्यें धूरच धूर करून सोडल्यानें तोफांचा मारा करणारास टँक कोठें आहेत हें दिसेना. टँकमधील गोलंदाजांनी भिंत आपल्या समोर आहे असें पाहून ठेवलेलें आणि भिंत तर हलणार नाहीं. तेव्हां भिंतीच्या दिशेनें पण तोफांचा मारा चुकवीत पुढें 'पाऊल' टाकणें टँकना सोपें झालें. इतक्यांत विचित्र वारा चोहोबाजूंनीच आला. वावटळ झालें आणि तो धुराचा पडदा वर उडून गेला.

एवढ्यानें टँकांची प्रगति थांबली नाहीं. त्यांनीं तसाच हल्ला चालविला. टँक थांबत नाहींत हें पाहून विरुद्ध बाजूनें कांहीं मशीनगन्स लपवून ठेवल्या व त्यांचा मारा टँकवर केला. पण तें धूड कशाला दाद देणार? प्रारंभ झाल्यापासून १० मिनिटांत त्यांनीं इष्ट ठिकाण गांठून भिंतीचा पुरा विध्वंस करून टाकला.

टँकमध्यें पुष्कळ प्रकार आहेत. १, २, ३, ४, ५ असे निरानिराळे मार्क देऊन ते दर्शविले जातात. कोणाचा वेग जास्त तर कोणाच्या गोळ्या सामर्थ्यवान्. कित्ये-
कांची कसल्याही प्रदेशांतून जाण्याची [illegible] तर कांहीं [illegible]

जागेंत आपले वैशिष्ट्य राखणारे. जुन्या प्रकारांतील " मार्क ५ " हे टँक राजेसाहेबांना दाखविण्यासाठीं आणले होते. अगदीं खडी चढण असली किंवा तसाच उतार असला तरी आपलें काम करूनही चढउतार नियमितपणें करण्याची त्यांची शक्ति पाहून कारागिरांचें व विशेषतः तिचा योग्य उपयोग करून घेणाऱ्या दुर्लभ ' योजका 'चें कौतुक वाटलें. अमानुल्लासाठीं एक टँक सजवून ठेवला होता. त्यांत तो मोठ्या उत्सुकतेनें चढला. गोळी कशी मारतात तें पाहिलें आणि त्यानें स्वतःही कांहीं गोळ्या चालविल्या. टँक एकसारखे हालत असतां अचूक नेम मारण्याची कला अवघड असली तरी आवश्यक असते. नेम बरोबर साधला नाहीं तर गोळ्या फुकट जाऊन टँकचें कार्य साधावयाचें नाहीं.

ही नकली लढाई पाहून झाल्यावर दोन सशस्त्र गाड्यांसमवेत राजेसाहेबांना **डॉर्चेस्टर**चें बीम स्टेशन दाखविण्यासाठीं नेलें. तेथून जगांतील सर्व ठिकाणी संदेश पाठवितां किंवा घेतां येतात हें पाहून, तें काम चालतें कसें ? किती वेळ लागतो ? अडचणी कांहीं येत नाहींत काय ? भाषा कोणती असते ? काबूलला बातमी पाठवावयाची तर कसें कराल ? तें शक्य आहे कीं नाहीं ? इत्यादि अनेक प्रश्न अमानुल्लानें विचारले. अमेरिका, ब्राझील, अर्जेंटाइन, जपान, ईजिप्त इत्यादि देशांशी दळणवळण ठेवण्याची ठिकाणें पाहिली व त्याला अत्यंत मौज वाटली, कीं एका ठिकाणीं बसून सर्व जगांतील खबर अल्प कालांत मागवितां येते व पाठावतांही येते !

**१३१. बुल्फर्ड क्षेत्रावरील युद्धप्रदर्शनः**—दोन प्रहरचा उपाहार **लॉर्ड बाथ** यांचे समवेत झाला. "वामकुक्षी " नंतर ४ वाजतां दुसरा कार्यक्रम आंखलेला होता. चार वाजण्याचे सुमारास पाहुणे-राजे व इतर मंडळी **बुल्फर्ड** क्षेत्रावर मोटारीतून आली. नियोजित ठिकाणीं राजे व राणी जाऊन बसल्यावर त्यांना काय दिसलें, असें त्यांस विचारलें असतें तर प्रथमतः दोघांनीही आश्चर्योद्गार काढून " लढाईची सर्व तयारी दिसली; सैनिक होते, पण घोडा, गाढव, उंट, अशासारखें चतुष्पाद जनावर एकही नव्हतें" असेंच म्हटलें असतें. निदान तोफखान्यासाठीं तरी मोठीं घोडी व खेचरें लागावयाचीं; पण नव्या युगांत सर्वच वाहतूक यांत्रिक केली असल्यानें घोड्यांना रजा देण्यांत आली होती,

सर्व लढणाऱ्या पलटणी आपापल्या हुद्याप्रमाणें उभ्या होत्या. प्रथमतः तोफखाना व त्याचे इंजिनियर, नंतर पायदळ व त्यांना नेण्यासाठीं मोटार लॉऱ्या,

टँक, आर्मर्ड कार्स ( सशस्त्र गाड्या ) इत्यादिकांची एक मोठीच पलटण झाली. राजा-राणी स्थानापन्न होतांच बँड-वादन सुरू होऊन अफगाण राष्ट्रगीत वाजविण्यांत आलें. नंतर सर्वत्र स्तब्धता पसरली. एक अक्षरहि अधिकाऱ्यांच्या तोंडून निघालें नाहीं किंवा कोणी हुकुमाचें शिंग फुंकलें नाहीं. सर्व बडे बडे अधिकारी येऊन पाहुण्यांस सलाम करून पुढें गेले. त्यांच्या मागें वर सांगितलेल्या क्रमानें सर्व पलटण अमानुल्ला बसला होता त्या ठिकाणापुढून निघून गेली. सर्व सैनिकांची शिस्त, एका पायाबरोबर त्या सर्व पलटणींतिल शिपायांचे हलणारे पाय, खाकी कपडे, चकाकणारीं बटनें, एकजात तालावर " लेफ्ट-राइट " असा चाललेला बुटांचा खडखडाट, प्रकाशांत तळपणारीं शस्त्रें, इत्यादि प्रकार दृष्टीस पडतांच अमानुल्लास रणसहज स्फुरण आलें असावें.

ही सर्व पलटण अमानुल्लापुढून निघून गेली ती कांहीं वेळ दिसेनाशी झाली. बरोबर ४ वाजून ३२ मिनिटांनीं उत्तर क्षितिजावर मशीनगन्स–सशस्त्र मोटारी-बारीक दिसूं लागल्या. प्रथमतः अघार्डीचे अधिपती आपल्या गार्डीतून आले. नंतर तोफा दिसूं लागल्या. त्या गेल्या व जवळ जवळ येत चालल्या–तशा मोठमोठ्या होत अमानुल्लाजवळून जाण्याच्या मार्गानें त्या दौडत होत्या. दूर असतांना कांही आवाज येत नसे. पण नजीक येतांच चाकांचा खडखडाट व इंजिनचा घरघराट हे आवाज कानांत घुमूं लागले. कांहीं तोफांच्या गाड्या मोटारीमागें बांधलेल्या असल्यानें त्यांचा आवाज कांही नसे. पण मोटार जवळ आली कीं, डोकें उठण्याइतका मोठा खडखडाट होई. एक मोटार पुढें निघून जाते न जाते तोंच दुसरी येई. आणि दोन्हींच्या गोंधळानें केवढा मोठा ध्वनि निघत असेल याची कल्पनाच केलेली बरी !

मशीनगन्सची ही वरात संपतांक्षणींच मोठ्या तोफा व हॉवित्झर यांची पलटण आली. तोफखाना घोड्यांकरवीं ओढत न्यावयाचा अशी आतांपर्यंतची रीत. ती त्याज्य ठरवून मोटारींनीं तोफा न्याव्या असें लष्करी तज्ज्ञांनी मत दिलें होतें. त्याची अंमलबजावणी प्रथमतः झाली ती याच वेळीं, म्हणून इंग्रज प्रेक्षकांनाही आश्चर्य वाटलें. लहान मोठ्या तोफा, हलक्या, जड हॉवित्झर्स या एकामागून एक धांवपळ करीत येत आहेत असें दिसे. तोफा चढविलेल्या गाड्यांना कोणाला सहा चाकें तर कोणाला आठ, अशी तोफांच्या वजनास अनुरूप होतीं. प्रत्येक गाडीबरोबर तोफांचा मारा करण्याची, कोन बदलता यावा, खालीं वर तोंड करतां यावें, म्हणून

आवश्यक असणारी एक घोडीही दिली होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हें सर्व सैन्य खऱ्याखुऱ्या युद्धासाठींच जय्यत तयार ठेवलें आहे असें दिसे.

तोफखान्यानंतर इंजिनियरांचीं खाशीं वाहनें आलीं. या इंजिनियरांमागून सॉमरसेट लाइट इन्फंटरी–पायदळ–आली. पायदळाच्या छोट्या तोफाही बरोबर होत्याच. ही सर्व मिरवणूक राजाराणीसमोरून निघून जाण्यास फार अवधि लागला नाहीं. पलटणीबरोबर राजघराण्यांतील प्रेक्षकांचे डोळेही प्रवास करूं लागले. तोफखाना बोजड असल्यानें तो त्वरेनें जाणें शक्यच नव्हतें. ताशीं आठ मैलांचे वेगानें तो गेला व समोरचा सर्व देखावा संपला; आपलें काम इतक्या लवकर कसें संपलें म्हणून राणी राजेसाहेबांस विचारीत असतां कांहीं काळ्या गाड्या येत असल्याचें दिसूं लागलें. सूर्यप्रकाशाच्या दिशेनेंच त्या येत होत्या म्हणून त्यांचें स्पष्ट स्वरूप कळलें नाही. फक्त काळी आकृतीच दिसे. त्यांचा वेग जोराचा होता. जरा जवळ येतांच त्या " सशस्त्र गाड्या "–आर्मर्ड कार्स–असल्याचें अमानुल्लानें ओळखलें. पाहतां पाहतां त्या अफगाणाधिपाजवळ आल्या. त्यांतील अधिकाऱ्यांनीं राजेबहादुरांस सलाम केला आणि लगेच डाव्या हाताकडे वळून ४० मैलांच्या वेगानें त्या धावूं लागल्या. इंजिनांचा आवाज आणि बाहेर पडणारा धूर एवढेंच गमक असल्यानें मोटार दिसली नाहीं तरी ती जात असल्याचें दुरूनही सांगतां येई. हलके छोटे टँक एका ओळीनें नंतर आले. त्यांच्यामागून मध्यम टँकाची एक पलटण आली. दूर असतांना त्यांचा आवाज फारसा ऐकूं येत नव्हता. परंतु जवळ येतांक्षणींच डोकें उठणारा तो घडघडाट ऐकून सर्वांनींच कानांत बोटे घातलीं.

हे टँक राजेसाहेबांच्या जवळून जात होते त्याच वेळीं एकवाही लढाऊ विमानें ( Single Seater Fighters ) डोक्यावरून मोठ्यानें निनाद करीत जात होतीं. टँकांचा घडघडाट आणि विमानांचा भिरभिराट यांनीं सर्व वातावरण भरून गेलें. टँकांचा वेग पंधरा मैलांचा तर विमानांचा एका शून्यानेंच जास्त म्हणजे १५० मैलांचा ! पण त्यांनी योग असा साधला, कीं टँक अमानुल्लाचे पुढें असतांनाच अगदीं टँकच्या डोक्यावर विमानें यावीं. आणि त्याप्रमाणें तीं आलींही. या दोन्ही वाहनांच्या गतींतील विरोध एकदम डोळ्यांत भरल्यावांचून कसा राहील ? एक " सडपातळ " असून हवेंत वाटेल तसें तरंगत होतें तर दुसरें हत्तीसारखें धूड जमिनीवरून गजगतीनें जातांना धरणीकंपासारखे धक्के

देई. सर्व प्रकार पाहून झाल्यावर अमानुल्लानें सगळ्या लष्करी कामगिरीची अतिशय तारीफ केली.

हा सर्व कार्यक्रम आटोपून राजाराणी सायंकाळी सव्वासहा वाजतां **सॅलिस्बरीस** परतली. तेथें नगराध्यक्ष व " नगराध्यक्षीण " बाई पाहुण्यांचें स्वागत करण्यास सिद्ध होत्याच. त्यांचे सर्व मानपान झाले, परिचय करून दिले, कुशल प्रश्न विचारिले, नगरातर्फे सार्वजनिक मानपत्र समर्पण करण्यांत आलें. जेथें तेथें इतका मान-सन्मान अमानुल्लाचा झाला, कीं तो ठराविक सांच्याचा होता असें म्हणतां आलें, तरी त्याचें महत्त्व केव्हांही कमी ठरणार नाहीं. सर्व समारंभानंतर खाशा स्वाऱ्या लंडनला परतल्या.

**१३२. विमानांतून लंडनवर संचार** :—वैमानिक संचाराचे दोन मुख्य भेद आहेत. एक लष्करी हेतूसाठी केलेला संचार आणि टपाल, उतारूंची ने-आण करणें यासाठीं दुसरा. दोन्ही खातीं दोन भिन्न अधिकाऱ्यांच्या हातीं असतात. लष्करी विमानांचें काम निराळें आणि सार्वजनिक प्रवासासाठीं असणाऱ्या आकाश-नौकांचें कार्य वेगळें म्हणून दोन्ही प्रकारांत रचनेंत आणि बांधणीत फरक हा असावयाचाच. लष्करी विमानांची कसरत दाखवून आपली आकाशयानांनीं युद्ध करण्याची तयारी अमानुल्लाच्या निदर्शनास आणली. आतां इतर बाबतींतही आमचें कौशल्य पहा म्हणून **इंपीरियल एअरवेज लि०** या कंपनीच्या चालकांनीं " कृपा करून येऊन आपल्या पायधुळीनें आमचें विमान पुनीत कराल काय ? " अशी त्यास पृच्छा केली. आपल्या इभ्रतीस साजेल अशाच रीतीनें अमानुल्लानें तें निमंत्रण स्वीकारिलें.

इंपीरिअल एअरवेज ही कंपनी साम्राज्यांतलि वैमानिक दळवळण वाढविण्यासाठी स्थापन झाली असून ब्रिटिश साम्राज्यांतील टपालाची व उतारूंची आकाशमार्गे वाहतुक करण्याचें कंत्राट हिलाच मिळालें आहे. हिंदुस्थान-इंग्लंडमधील वैमानिक टपालाची ने-आण ह्याच कंपनीकडून होते. त्या कंपनीचें निमंत्रण अमानुल्लानें स्वीकारलें. ता. २१-३-२८ रोजी **क्रॉयडन्**च्या वैमानिक स्टेशनापासून विमान निघणार होतें व लंडन शहरावर आकाश-संचार करणार होतें. पॅरीस व लंडन या दोन शहरांमध्यें एकसारखें जा ये करणारें एक अठरा " स्वारींचें " विमान अमानुल्लासाठीं नटवून सजवून ठेवलें होतें. अफगाण निशाणेंही आंतील बाजूस युनियन जॅकसमवेत लावलीं होतीं.

ठराविक वेळीं राणीसहवर्तमान इतर परिवारासह हे रानटी राजे आले. स्वागत, शुभचिंतन झाल्यावर त्या मोठ्या विमानांत सर्व आरोहण करते झाले. निरनिराळ्या खोल्या, प्रवासाची उत्तम प्रकारची सोय, अल्पाहाराची तजवीज, विद्युत्पंखा, विद्युद्दीप, बाहेर पहाण्यासाठीं खिडक्या, वगैरे प्रवाशांसाठीं केलेल्या सोई राजेसाहेबांस दाखविण्यांत आल्या.

विमान सुरू झालें, भुर्र्ररदिशीं सर्व मंडळीसमवेत तें आकाशांत उडूं लागलें. आपण कसकसें जात आहों हें अमानुल्लास दाखविलें जात असतां अफगाण अमीर अगदीं उत्सुकतेनें आपणांस तो भाग ओळखतां येईल काय, त्या इमारतीचें नांव काय, इत्यादि प्रश्न मनाशींच विचारीत होता. जमिनीवर उभें राहून समोरून एकादी इमारत कोणती हें सांगणें सोपें असलें, तरी वर आकाशांत राहून इमारतींचें फक्त डोकें पाहून तो भाग ओळखतां येणें कठिण जातें. तमसा नदीचें शांत पात्र विशाल होतें, तरी वरून एकाद्या ओहोळाप्रमाणेंच दिसे. लंडन टॉवर-वरून उडून विमान सेंट पॉलच्या " देवळा "वरून गेलें. तो मोठा गोल डोम पाहून अमानुल्लाला आश्चर्य वाटलें. राणी व राजकन्या आपसांतच आपण कोठून कोठून कसें आलों याबद्दल चर्चा करीत होत्या. " आपली ' सिफारात ' ( "अफगाण लिगेशन " ) तुला दिसते का ग ? " असा राणीनें प्रश्न करतांच राजभगिनी " नाहीं बाई, पण आपण उतरलों तें क्लॅरिज होटेल आहे कुठं ? " असें म्हणाली. आपले डोळे ताणताणून त्या पाहूं लागल्या, कीं एखादा तरी ओळखीचा भाग येईल.

लंडनमधील सर्व भागांचा चित्रपट आपल्या डोळ्यांपुढून जात असल्याचें अमानुल्लास वाटलें. सर्वच देखावा पाहात असतां त्याच्या तोंडावर अचंबा आणि स्मित झळकत होतें. सेंट पॉलवरील क्रॉस व तो भव्य घुमट पाहून होतो न होतो तोंच पार्लमेंट सभागृह पुढें दिसूं लागलें. त्यानंतर बकिंगहॅम राजवाडा आला व तो अमानुल्लानें ओळखलाही. इतक्यांत त्यास हिरवें गार व विशाल हाइड पार्कही दिसूं लागलें. सर्व देखावा झटपट पुढें पुढें सरकत असे. पुनः तमसा नदी आली आणि विमानाचें स्टेशनही आलेंच. विमानाचा वेग कमी झाला. २५०० फुटांवरून इतक्या सफाईनें त्यानें आपले पाय खालीं जमिनीवर टेकले, कीं राणी व राजभगिनी यांना कांहीं कळलेंही नाहीं. " उतरा " असें म्हणतांच " झालें का—आपण आलों जमिनीवर पुनः ? " असें त्यांनीं विचारलें. ३० मिनिटांतच सर्व प्रवास आटोपला.

विमानाची गति मापण्याचें यंत्र, उंची दर्शविणारें मापन, दिशा दाखविणारें साधन—वगैरे विमानांतील बारीक सारीक यंत्रांची व भागांची माहिती अफगाण अमिरानें नेहमींच्या चौकस बुद्धीनें विचारली. "आम्ही आकाशयानांसाठीं केलेला लंडनचा नकाशा पहा" म्हणून एक जंगी नकाशा पसरून अमानुल्लास दाखविला. विमानांत बसलें असतां लंडन कसें दिसतें याचा तो नकाशा होता. तो आपणांजवळ असावा अशी इच्छा अमानुल्ला प्रगट करणार असें चर्येवरील हालत्या रेखांवरून वैमानिक अधिकाऱ्यानें ताडलें आणि राजेसाहेबांनीं आक्रमिलेला मार्ग रक्तरेखांकित करून तो विस्तृत नकाशा अमानुल्लास नजर करण्यांत आला.

**१३३. वैमानिक टपालाची व्यवस्थाः**—ही झाली सफरीची सोय; पण आमचें टपाल-खातें किती कार्यक्षम आहे हें पाहुण्यांना दाखवावयाचें राहिलेंच! राजेसाहेब व सिव्हिल वैमानिक खात्याचे अधिकारी वैमानिक ठाण्यावर फिरून पाहणी करीत असतां, एक विमान डोक्यावर भराऱ्या मारतांना दिसलें. राजेसाहेब बोलण्यांत व प्रश्न विचारण्यांत तल्लीन झालेले. राणी व राजभगिनी विमानाकडे पाहूं लागल्या. कांहीं तरी पडल्यासारखें दिसतांच त्या किंचित् थबकल्या. इतक्यांत एक शिपाई धांवत धांवत आला, पाहुणे मंडळींच्या अगदीं जवळ पडलेली पिशवी त्यानें उचलली, वरचें सील फोडलें, कात्रीनें दोरी कापली आणि आंतून एक पुडकें काढून आपल्या वरिष्ठांच्या हातीं त्यानें दिलें.

तें पुडकें उघडून पाहतात तों आंत अमानुल्लाच्या नांवचें एक पोस्ट कार्ड निघालें. मोठ्या अदबीनें शिर लववून "राजेसाहेबांना आलेल्या टपालाचा स्वीकार करावा" असें **सर ब्रँकर** पोस्टमनचें काम करीत म्हणाले. आश्चर्यातिशयानें अमानुल्ला चकितच झाला. त्यानें तें हातांत घेतलें व वाचून पाहिलें, तेव्हां आपण उभे असलेल्या वैमानिक ठाण्याचें चित्र दिसलें. राजेबहादुरांचें यश चिंतितों असें फार्सीमध्यें त्यावर लिहिलें होतें. वैमानिक खात्याच्या अधिकाऱ्यांकडून तें आलें होतें. त्यावर वैमानिक टपालाला आवश्यक असें तिकीट, अर्धा तास पूर्वीचा पोस्टाचा शिक्का, 'वैमानिक टपाल' अशी निळी चिठ्ठी वगैरे देखावा बेमालूम करण्यांत आला होता. राणी, राजकन्या व परिवारांतील मंडळींच्या नांवेंही अशींच कार्डें होतीं. तीं ज्याचीं त्यास दिलीं गेलीं.

नंतर आकाशांत विमानें भ्रमण करीत असतां त्यांना ताब्यांत ठेवावयाचें कसें, इकडे जा, तिकडे नको, अशा आज्ञा कशा व कोणीं द्यावयाच्या इत्यादि

माहिती राजेसाहेबांना समजावून सांगण्यांत आली. समुद्रावर दीपगृह असतें तसें हवाई-जहाजांचें दीपगृह दाखविलें. आगगाडी स्टेशनवर येण्यापूर्वी आणि स्टेशन-मधून सुटल्यानंतर रंगीत दिव्यांवरून अथवा फलकांवरून विशिष्ट हेतु दर्शवि-णाऱ्या खुणा केल्या जातात, तशा विमानांच्या सिग्नल्स कोणत्या, हेंही अमानुल्लास दर्शविण्यांत आलें. रेल्वेलाइन्सचा ३०-४० स्टेशनांना मिळून जसा "कंट्रोलर" असतो, कानाला टेलिफोन लावून सदा बसलेला राहून अमुक गाडी तमुक स्टेशन-वर ह्या फळावर घ्या, तिकडून इतके वाजतां सोडा, अशी जशी हुकुमवृष्टि करीत असतो, तितकेंच सूत्रबद्ध काम हवेंत स्वैरसंचार करणाऱ्या विमानांचे बाबतींत केलें आहे, हें पाहून अमानुल्लास आश्चर्य वाटलें. आगगाडीचे रूळ ठराविक अस-ल्यानें मार्ग तरी निश्चित असतो. पण तशी गोष्ट विमानांची नाहीं. हा सर्व प्रकार इंग्रजी शिस्त, इंग्रजी व्यवस्था, यंत्राप्रमाणें काम करणारी इंग्रजी कार्यपद्धति पाहून अफगाण अमीर काय, पण दुसरा कोणीही असता, तरी थक्क होऊन गेला असता. आणि इंग्रजांच्या जागतिक वर्चस्वाची मख्खी तरी यांतच आहे हें काय कोणास सांगावयास पाहिजे ?

१३४. **रेल्वे वर्कशॉपला भेट** :—यानंतर ग्रेट वेस्टर्न रेल्वेचें वर्कशॉप पाहण्याचा कार्यक्रम संध्याकाळीं ठरला होता. वाटेंत **पॅडिंग्टन्** येथें नगराध्यक्षां-कडून मानपत्र घेतल्यावर **स्विंडन्** येथें अमानुल्ला आला. मुंबईस **परेल**चें अथवा **माटुंग्या**चें वर्कशॉप, लाहोरबाजूस **मोगलपुरा** येथील रेल्वेचें वर्कशॉप किंवा कलकत्त्याकडे **खडगपूर**चा रेल्वेचा कारखाना यांना जसें महत्त्व असेंच ग्रे. वे. रेल्वेच्या स्विंडन् येथील वर्कशाप्स्ना आहे. तेथील सर्व प्रकारचीं यंत्रें पाहून अमा-नुल्लाला आश्चर्य वाटलें. झाडाचा एक मोठा ओंडका ओबडधोबड असा असतां पाहीपाहींपर्यंत ७-८ करवती एकदम चालून त्याच्या एक आकाराच्या सारख्या फळ्या कापून तयार करितात. दुसरें यंत्र लगेच त्या रंधून काढतें. पाहिजे तसे तुकडे पाडून त्या कापल्या जातात. खिळे मारण्याचेंही काम यंत्रांकरवीं झटपट होतें. इत्यादि क्रिया अफगाणाधिपास आश्चर्यकारक कां वाटूं नयेत ?

भट्टीचें काम पाहून तर तो स्तिमितच झाला. एंजिनचे सुटे भाग तयार होतात काय व लगेच ते एकत्र जमवून त्यांचें एंजिन तयार होऊन चालूं लागतें काय हा विचारच मुळीं अचंबा उत्पन्न करतो. मग हजारों माणसें यंत्राप्रमाणें काम करीत असतां सर्व क्रिया झपाझप उरकलेल्या पाहून अमिराला काय वाटलें असेल

बरें ? तें एंजिन तयार झाल्याबरोबर डोक्यावरून जाणारी एक यारी ( क्रेन ) आली आणि तिनें तें अगदीं लीलया उचलून नेलें देखील !

सर्व कारखान्यांतील कामें अमानुल्लानें लक्षपूर्वक पाहिलीं. हें कशाकरितां ? त्याचा उपयोग काय ? तो भाग कसा बनवितात ? इत्यादि प्रश्न तो सारखा विचारीत होता व अधिकारीही आपणांस राजेसाहेबांच्या खाशा पाहुण्यांची सरबराई करण्याची संधि मिळाली म्हणून मोठ्या आनंदानें सर्व समजावून सांगत.

इंग्रजी रेल्वेचा इतिहास थोडक्यांत निवेदन केल्यावर स्टीम एंजिनचा जनक **जॉर्ज स्टीफन्सन्** याचें अगदी पहिलें एंजिन ' उत्तर ध्रुव '–(नॉर्थ स्टार) अमानुल्लास दाखविलें. त्याच्यांत सुधारणा कसकशा होत गेल्या हें सांगून आधुनिक प्रचंड एंजिनही तेथेंच दाखविलें !

**१३५. विलायती सफरीचा चित्रपट** :— अफगाण राजे कधीं नव्हत्याचे इंग्लंडला आलेले. शिवाय अफगाणिस्तान आणि इंग्लंड यांचें सख्यही बरेच ( ? ) दिवस नांदत होतें. पुढें ही दोस्ती चिरकाल टिकावी अशी सदिच्छा दोन्ही शेजारच्या राजकर्त्यांची. तेव्हां पौर्वात्य राष्ट्रांतील राजेरजवाड्यांना युरोपियन आदरातिथ्याचा नमुना दाखवावा म्हणून अमानुल्लाचा कार्यक्रम कसा ठेवला होता याची कल्पना वरील वर्णनावरून थोडी बहुत येईलच. दोन्ही राजांना परस्परांचें दर्शन वारंवार घडावें, परस्परांची आठवण एकसारखी होत रहावी, या दूरदर्शी हेतूनें अफगाण राजेसाहेबांसाठीं जो जो म्हणून कार्यक्रम झाला त्याची फिल्म घेऊन ठेवली होती. चलच्चित्रपट चालविला कीं, अफगाण दोस्त आपणांपुढेंच आहे असें सम्राटांना वाटावें आणि आपण इंग्लंडमध्यें कसे राहिलों याची आनंदी स्मृति ताजी तवानी करावीशी वाटली, कीं काबूलमध्यें अमानुल्लानें तो चित्रपट पहावा म्हणजे झालें. परंतु विधिघटना किती बलवत्तर, अदृष्टपूर्व आणि कठोर असते पहा ! अमानुल्लाच्या इंग्लंडमधील वास्तव्याचा चलच्चित्रपट घेतला आणि आज अमानुल्लाचें सर्व वैभव, सर्व डामडौल, भावी आकांक्षा आणि ते उंच मनोरथ सगळे चलच्चित्रपटाप्रमाणेंच डोळ्यांपुढून निघून गेले नाहींत काय ? अमानुल्लाचें मध्यंतरीचें आयुष्य पाहतां त्याचा फ्रान्समध्यें, जर्मनींत, इंग्लंडमध्यें असा असा सन्मान झाला असें सांगितलें, तर कोणाचाही विश्वास बसणार नाहीं. अमानुल्लाचा इंग्लंडमधील आयु:क्रम चलच्चित्रपटांत ग्रथित झाला हा किती औचित्यपूर्ण पण विलक्षण योगायोग आहे बरें ?

**१३६. वेधशाळेतील यंत्रनिरीक्षण :—ग्रीनिच** येथील वेधशाळा पाहण्याचा कार्यक्रम ता. २२।३।२८ चा ठरला होता. प्रत्येक मोठ्या नकाशावर ग्रीनिचचें नांव आढळतें. कारण शून्य अक्षांश हा ग्रीनिचमधून जाणारा असा धरला आहे आणि सर्व जगानें त्यास मान्यता दर्शविली आहे. हिमालयाला पृथ्वीचा मानदंड असें कवि कुलगुरु म्हणतात. तसेंच ग्रीनिचमधून जाणारी काल्पनिक रेघ-नकाशावरील अक्षांश—हा नेहमीं शून्य दर्शवून त्याच्यापासून इतरांची गणना केली जाते. ग्रीनिचच्या पूर्वेस अथवा पश्चिमेस इतके अंश असेंच लिहितात. म्हणजे ग्रीनिच खरोखरच पृथ्वी—मापनाचें आरंभस्थान होऊन बसलें आहे.

ग्रीनिचचें महत्त्व एवढ्यांतच नाहीं. तेथील वेधशाळा ही जगांतील अत्युत्कृष्टांपैकीं एक आहे. त्या वेधशाळेंत काम करण्यास संधि मिळणें हाच मुळीं अपूर्व मान आहे. आज २५० वर्षांची परंपरा तिच्यामागें आहे. तिचा नांवलौकिक तिळमात्र कमी झाला नसून वाढत आहे. अर्थात् तेथें पाहण्यासारख्या पुष्कळच गोष्टी असावयाच्या.

अमानुल्ला ग्रीनिचला जाण्यासाठीं निघाला तो प्रथमत: वेस्टमिन्स्टर धक्क्यावर ९ वाजतां होडींत बसून डॉक, बोटी, व त्यांची व्यवस्था पहात पहात लंडन टॉवरपाशीं आला. नंतर दुसऱ्या बोटींत बसून लंडन टॉवरपासून त्याचा जलप्रवास सुरू झाला. नदीच्या दोन्ही बाजूंस आगबोटींच्या चिमण्या व त्यांच्या डोलकाठ्या दिसत होत्या. ' अफगाण राजे, आमच्या बादशहांचे खासे पाहुणे ' त्या रस्त्यानें जाणार म्हणून सर्वांनाच आनंद झाला होता. त्याचें प्रदर्शन करण्यासाठीं निशाणें, पताका, तोरणें लावून सर्व जहाजें शृंगारण्यांत आलीं होतीं.

वाटेंत **बुलिच** येथील तोफखान्याचें कोठार व दारुगोळ्यांचा कारखाना पाहून मोटारमधून अमानुल्ला ग्रीनिच येथील दरबारी वेधशाळेंत आला. वेधशाळेवरील वरिष्ठ **सर फ्रँक डायसन्** राजेसाहेबांस सामोरे आले. औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर प्रथमत: त्या नामांकित वेधशाळेची पूर्वपीठिका, कार्यास प्रारंभ अडीचशें वर्षांपूर्वी कसा झाला, राजाश्रय कसा होता इत्यादि इतिहास सांगितल्यावर निरनिराळीं शास्त्रीय उपकरणीं व त्यांचे विविध उपयोग अफगाण अमिरास समजावून देण्यांत आले. डोंगराळ व रानटी प्रदेशांत राहणाऱ्या व इतर जगाच्या मानानें अगदींच मागासलेल्या अशा देशाधिपतीस अत्यंत कार्यक्षम व आधुनिक सूक्ष्मयंत्रांचें प्रयोजन व उपयोग कसा आकलन करतां येणार ?

अठ्ठावीस इंची ( व्यासाच्या ) कांचा असलेली २८ फूट लांबीची अजस्त्र दुर्बिण अमानुल्लास दाखविली. "एवढ्या मोठ्या फुंकणींतून ( ? ) तुम्ही पाहतां तरी काय ? अस्मानांत चांदण्या, तारे व अफ्ताब, ( सूर्य ) या शिवाय तुम्हांस काय दिसतें ? आणि तें पाहण्यास इतकें प्रचंड यंत्र हवें कशाला ? आम्ही डोळ्यानें पाहतों त्यापेक्षां तुम्ही अधिक तें काय पाहणार ? " इत्यादि अनेक जिज्ञासापूर्ण प्रश्न अमानुल्लानें विचारले व त्यांस उत्तरेंही अर्थात् दिलीं गेलीं.

दिवसा देखील चांदण्या पाहण्यासाठीं या दुर्बिणीचा उपयोग आहे असें अमानुल्लास सांगण्यांत आलें. कारण आकाशांत आपणांस दिसतात त्यापेक्षां किती तरी अधिक तारे आहेत, गुरूचे चार चंद्र, शनींचें तेजोवलय व दहा चंद्र इत्यादि सूक्ष्म प्रकार चर्मचक्षूंस दिसत नाहींत, ते हींतून दिसतात असें अमानुल्लास सांगण्याची सोयच नव्हती. " भलतेंच कांहीं तरी सांगतां " असें म्हणून त्यांची त्यानें थट्टाच केली असती. " दिवसा चांदण्या दिसणें अगदीं अशक्य " असें तो म्हणाला, तेव्हां देखील सर्व ज्योतिष्यांना आश्चर्य वाटलें. आपल्या मूलतत्त्वांवर अविश्वास दर्शविणें—नव्हे जी गोष्ट प्रत्यक्ष दृक्प्रत्यास येते तिचीच अमानुल्लानें शंका घेणें—त्यांना चमत्कारिक व हास्यास्पद वाटल्यास नवल नाहीं. पण हे पडले सम्राटांचे दोस्त,—अफगाणिस्तानचे स्वतंत्र अमीर ! त्यांना हास्यास्पद ठरवून कसें चालेल ? तेव्हां राजेसाहेबांची खात्री करून देतों, म्हणून त्यांपैकीं एक ज्योतिर्विद दुर्बिण रोखूं लागला. त्यानें बराच वेळानें राजेसाहेबांस आंत पाहण्यास सांगितलें. आकाश अभ्राच्छादित असल्यानें, "पांढऱ्या भुरकट दगडमातीचा ढीगच मला दिसतो " या पलीकडे अमानुल्ला जास्ती बोलेना. तज्ज्ञांच्या मतें, " मी दिवसां तारा पाहिला " अशी स्वमुखेन कबुली अफगाण अमिराकडून घ्यावयाची होती. पण परिस्थितीच अशी विचित्र आली, कीं २।३ वेळ खटपट करूनही अमानुल्लाचें समाधान झालें नाहीं. ढगांनीं अमानुल्लाचें म्हणणें खरें ठरविण्यास सहाय्य दिलें. ज्योतिर्विद थकले. " आज ढग आले, नाही तर......" इत्यादि संकेतार्थी प्रयोग करण्यापेक्षां ते कांहीं अधिक करूं शकले नाहींत. मला कांहीं तरी थापा ठोकून ' बनविण्याचा ' यांचा प्रयत्न होता, पण तो फसला, अशीच मनाशीं बढाई मारीत अमानुल्ला पुढे इतर प्रयोग पाहण्यास गेला. नेहमींच्या प्रेक्षकांना दाखवावयाची दुर्बिण दाखविल्यावर अमानुल्लानें असा खुळचट प्रश्न केलेला पाहून सर फ्रँक यांचा बराच हिरमोड झाला. तरी पुनः त्यांनीं सूर्यावर डाग आहेत, त्याचे आम्ही फोटो घेतले,

फार प्रयास पडतात, इत्यादि माहिती शास्त्रीय परिभाषा वगळून साध्या शब्दांत त्यांनीं सांगण्यास सुरुवात केली. गालांतल्या गालांत अमानुल्ला हंसत होता. सूर्यावर डाग ? आणि ते शक्य तरी कसे ? हे अगदीं उघड उघड प्रश्न त्याच्या मनांत आले. परंतु एवढ्या ' बड्या ' गृहस्थांचें म्हणणें एकदम सपशेल चूक म्हणण्यापेक्षां " हॉं; अस्सं, ठीक " असें म्हणून ऐकावें हा " सर्वविदां समाजे विभूषणं मौनमपण्डितानाम् " मार्ग त्यानें अवलंबिला. निरनिराळ्या ग्रहणप्रसंगीं जगांतील ज्या ठिकाणांहून तीं नीट दिसलीं तेथून महत्प्रयासानें व अत्यंत खर्च करून घेतलेले सूर्यबिंबाचे अनेक फोटो त्याला दाखविले. हा डाग सर्वांत मोठा आहे, तो ज्वालामुखी असावा, असें वर्णन जरासें खोल गेलें कीं, अमानुल्लानें हंसू झांकण्यासाठीं तोंडाला रुमाल लावावा. फोटो मात्र कुतूहलपूर्वक पहावे.

सर फ्रँक यांनीं आपला पाहुणा फारच " रानटी " असल्याचें मनांत ओळखलें. त्यांनीं त्यास सर्वच माणसांना गंमत वाटावयास लावणारीं विविध प्रकारचीं घड्याळें दाखविण्यास नेलें आणि सर्व देशांतील मुख्य मुख्य ठिकाणीं किती वाजले असतील हें एकाच वेळीं बेरीजवजाबाकी न करितांहि समजावें म्हणून केलेली व्यवस्था अमानुल्लास दाखविली. काबूलचें वेलामान दर्शविणारें घड्याळ नेहमीं सज्ज ठेवलेलें नसे; पण अफगाण अमीर येणार तेव्हां इतर शहरांसमवेत काबूलचाही समावेश करण्यांत आला होता. " आतां येथें दुपारचे दोन वाजले आहेत ना ? तर मग या वेळीं काबूलला सायंकाळचे सहा वाजून ३२ मिनिटें झालीं आहेत." असें काबुलाधिपतीस सांगण्यांत आलें. त्याला तें खरें वाटलें कीं नाहीं हें सांगतां येणें कठिण. पण तो लगेच पुढें चालूं लागला.

निरनिराळ्या आकाराचीं इतकीं घड्याळें पाहून तर तो थक्कच झाला. एकाच दिवाणखान्यांत एवढीं ठेवतां कशाला ? असा त्यानें प्रश्नही विचारला. पण त्याचें कांहीं तरी उत्तर ड्रंफ्रेज् यांनीं दिलें. सर फ्रँक तर आतां उत्साहरहित झाले ! " अरसिकेषु कवित्वनिवेदनम् शिरसि मा लिख ! मा लिख ! ! मा लिख ! ! ! " या प्रसिद्ध उद्गारांचा अर्थ त्यांना ठाऊक असता तर तेच शब्द उच्चारून त्यांनीं आकाशाकडे पाहून खात्रीनें हात जोडले असते ! युरोपमधील साध्या अक्षरओळख असलेल्या मनुष्यापेक्षांहि कनिष्ठ दर्जाचें ज्ञान डॉयसनूसारख्या पट्टीच्या विद्वानांस कल्पनेनेंही ताडतां येणें अशक्य. मग अशा अज्ञानी अमानुल्लाबद्दल त्यांना कींव वाटली असली तर आश्चर्य कसचें ?

अमानुल्ला ग्रीनिचमध्ये शिरत असतांनाच एक मोठा लाल भडक गोळा उंचावरून खालीं पडतांना त्यानें पाहिला होता. दुपारीं बारा वाजतां काबूलमध्यें जशी तोफ होते, तशापैकीच तेम्स नदीकांठांवरील जहाजांना वेळ कळण्याची ही खूण आहे हा खुलासा हंफ्रेज् यांनीं केला. मात्र आमच्याकडे दुपारीं एक वाजतां हा गोळा पडतो असें ते म्हणाले. त्याची आठवण देऊन डॉयसन् अमिरास पुढें घेऊन चालले. " गोळा पाहून वेळ कळविण्याची फार जुनी पुराणी पद्धत आहे. अलीकडे सर्व वेळ वायरलेसनेंच समुद्रावरील जहाजांनादेखील आम्ही कळवितों. हें पहा तें घड्याळ. प्रत्येक मिनिटागणिक वायरलेसनें रग्बीहून सर्वत्र खूण केली जाते. म्हणजे मिनिटाबरोबर घड्याळ लावतां येतें आणि कमी जास्त फरक करावयाचा असल्यास तोही करतां येतो. " प्रत्येक मिनिटाला वायरलेसनें संदेश पाठविण्याची आवश्यकता काय ? असा प्रश्न अमानुल्लाचे मनांत घोळूं लागला. पण तो तसाच स्तब्ध राहिला.

डॉयसन् यांनीं नंतर एक अत्यंत सूक्ष्म रचनेचें चांदीचें मोठें घड्याळ दाखवून, " एक सेकंदाचा शंभरावा भागही यानें मोजतां येतो. हें बिनचुक चालणारें असल्यानें त्यांत सेकंदाचा शतांशही फरक पडणार नाहीं " असें प्रौढीनें सांगितलें. या वेळीं मात्र अमानुल्लाच्यानें राहवेना. " ५-१० सेकंदें किंवा मिनिटें आगें मागें झालीं म्हणून हो काय बिघडलें ? इतकें सूक्ष्म व काटेकोर हिशेब ठेवणारें यंत्र पाहिजे तरी कशाला ? " असा त्यानें आश्चर्यस्तिमित होऊन प्रश्न केला. त्याला ही सर्व पोकळ बढाई वाटली. का त्यांत कांहीं तथ्य दिसेना, कोणांस ठाऊक ? त्यानें प्रश्न विचारला खरा. तेव्हां सर फ्रँक डॉयसन् ह्या प्रश्नास स्तब्धतेशिवाय काय उत्तर देणार ?

ग्रीनिचची वेधशाळा कशीबशी एकदांची पाहून संपली. सर्व कार्यक्रमांत अत्यंत कंटाळवाणा असा—अमानुल्लाच्या दृष्टीनें—वेळ गेला असेल तर हा. वास्तविक ही गोष्ट ज्या अधिकाऱ्यांनीं कार्यक्रम आंखला त्यांच्या लक्षांत यावयास पाहिजे होती. डोंगराळ मुलुखांत राहणारा व लढणारा हा पठाण. त्याला तुमच्या " स्वर्गीय " शास्त्राची माहिती काय असणार आणि तुमच्या प्रगतीबद्दल त्याला वाटणार तरी काय ? लढाई दाखविली, ठीक झालें, मोटार कशी करितात तें दाखवा, कापड कसें तयार होतें तें दाखवा; जमिनींतून लोखंड, कोळसा कसा निघतो तें दाखवा. नेहमींच्या प्रचारांतील व पाहिल्याबरोबर समजणाऱ्या गोष्टीच तेवढ्या दाखवावयाचे सोडून " आकाशांत भराऱ्या मारणारांचें " शास्त्र त्याला सांगण्यास

सुरवात केली तर × × × पुढें गीता वाचणारास दोष न देतां, गीता वाचणारांच्या समुदायांत अमानुल्लास नेणारांचीच ती चूक म्हटली पाहिजे.

**१३७. अमानुल्लाचा झालेला सन्मान** :—त्याच रात्रीं **रॉयल जिऑग्रॅफिकल सोसायटीनें** अमानुल्लास आपल्या सन्मान्य सदस्यत्वाचा बहुमान अर्पण करून भूगोलशास्त्राच्या बाबतीत त्या संस्थेनें किती खटपट केली आहे तें थोडक्यांत सांगितलें. निरनिराळे महत्त्वाचे पण दुर्मिळ असे कांहीं नकाशेही त्याला दाखविण्यांत आले. पण हिमालयाचें अत्युच्च शिखर 'गौरीशंकर' चढणाऱ्यांनीं घेतलेली चित्रेंच तेवढीं अमानुल्लास आवडलीं. '**मर्केटर प्रोजेक्शन**'नें काढलेल्या एका जगाच्या मोठ्या नकाशाची प्रत अमानुल्लास नजर करण्यांत आली.

शुक्रवार ता २३ चा राजेसाहेबांचा कार्यक्रम शैक्षणिक संस्था पाहण्यांत गेला. अमानुल्लाचें शिक्षण फार झालें नसलें तरी **ऑक्सफर्ड** युनिव्हर्सिटीनें त्याला D. C. L. ही पदवी बहाल केली. जर्मनींत अफगाणाधिपति गेले होते तेव्हां तेथेंही त्यांना एक विनापरीक्षा सन्मान्य पदवी दिली होती. जो मानमरातब होत होता त्याचा दरबारी अदबीनें अमानुल्लानें स्वीकार केला.

ऑक्सफर्ड येथील ऑल सोल्स कॉलेज पाहण्यांत १०-१२ मिनिटें गेलीं. बरोबर बारा वाजतां अमानुल्लाच्या मागें तीन अक्षरी शेंपट लागलें. त्या वेळचा तो गंभीर समारंभ, अमानुल्लाला मिळालेला फीतबाज काळा झगा, सर्वांनीं आनंदानें केलेला टाळ्यांचा कडकडाट इत्यादि प्रकाराचें सविस्तर वर्णन हवें कशाला ? आमच्या कॉलेजांची परंपरा शेंकडों वर्षांची आहे, जगांत नामांकित विद्वान होऊन गेले त्यांपैकीं "आम्ही" इतके शिकवून तयार केले, विद्यमान अभ्यासकांपैकीं हे × ते ×–× हे × आमच्या विद्यार्थ्यांपैकीं आहेत, इत्यादि गुरूंना साजणाऱ्या समर्थनीय बढाया तेथें मारण्यांत आल्या. नंतर अर्ल बर्कनहेड यांनी अमानुल्लास उपाहारास बोलाविलें. हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी, ज्या युनिव्हर्सिटीनें अमानुल्लास पदवी देऊन स्वतःस व अफगाणनृपतीसही धन्य केलें त्या युनिव्हर्सिटीचे अधिकारी, इंग्लंडचे मुरलेले साम्राज्यवादी मुत्सद्दी, असे अर्ल बर्कनहेड अमानुल्लाची खुशामत करून "उपाहाराचे वेळीं राजेसाहेब (टेबलावरील) पंक्तीचा लाभ देण्याची मेहेरबानी कृपा करून करतील काय ?" अशा नम्रतेनें, अदबीनें व लाघवी वाणीनें विनंति करतात, त्यांतील मर्म

न कळण्याइतका खुळचट अमानुल्ला तर खास नव्हता ! ताझीं बरोबर होतेच. त्यांना का यांतील हेतु कळणार नाहीं ? अस्तु.

टेबलावरील पक्वान्नांप्रमाणेंच रुचकर व मिठ्ठीमिठ्ठीं भाषणें हांसत हांसत होत असतां उपाहार संपला. ख्रिस्त चर्च, मॅकडीलीन इत्यादि कॉलेजांना भेट देऊन पुन: ऑल सोल्सला राजे परत आले. २० मिनिटें विश्रांति घेऊन **कौव्ले** येथील मॉरिस मोटार कारखान्याकडे गेले. तेथील यंत्रांची कामगिरी, कारागिरांचें कौशल्य, मॉरिस मोटारचें वैशिष्ट्य या प्रमुख गोष्टी पाहून खाशी स्वारी लंडनला " निजधामीं " परतली.

**१३८. इंग्लंडहून रशियाकडे प्रयाण** :—ता. २४ रोजीं केंबलेंचें लष्करी कॉलेज पाहण्यांत अमानुल्लाचा वेळ गेला. जगविख्यात " रोल्स रॉइस " मोटारींचा कारखाना, लॅंकेशायर परगण्यांतिल एक कोळशाची खाण, **मँचेस्टर** मधील कापसाच्या व कापडाच्या गिरण्या, पोर्ट **सनलाइट** येथील " सनलाइट " साबणाचा कारखाना असे किती तरी प्रेक्षणीय भाग अमानुल्लानें पाहिले. ठिकठिकाणीं नगराध्यक्षांकडून व जनतेकडून त्याचा सन्मान होई, मेजवान्या झोडाव्या लागत आणि औपचारिक भाषणें ऐकण्याचा प्रसंग येई.

घोडदौड, विद्यार्थ्यांची वल्हविण्याची शर्यत ( Boat race ), इंग्लंड-विरुद्ध स्कॉटलंडचा फुटबॉलचा सामना, स्काउट रॅली असे विविध करमणुकीचे प्रकारही पाहण्याची व्यवस्था करण्यांत आली होती.

जलयानांचें कौशल्य दाखविण्यासाठीं ३ एप्रिल हा दिवस राखला होता व नंतर लवकरच आपले पाहुणे परतणार, म्हणून बादशहांनीं शेवटचा खाना अमानुल्लासाठीं ता. २ एप्रिल रोजीं ठरविला. विंडसर कॅसलमध्यें ही मेजवानी झाली. आणि पांच तारखेस अमानुल्ला पॅरिसला जाण्यासाठीं निघाला. निरोप देण्यासाठीं बादशहा जॉर्ज व सम्राज्ञी मेरी यांनीं ड्यूक ऑफ ग्लूस्टर यांस 'अधिकारपत्र' दिलें होतें. सर ऑस्टिन चेंबर्लेनही आले. पण बर्कनहेड मात्र कोठें होते कोणास ठाऊक ! हंफ्रेज व तैनातीची इतर मंडळी तर स्पेशल गाडींतून डोव्हरपर्यंत जाणार असें ठरलें होतें. व्हिक्टोरिया स्टेशनवर अमानुल्लानें सर्वांचा प्रेमानें निरोप घेतला. वर्तमानपत्रांच्या बातमीदारांस मुद्दाम जवळ बोलावून " इंग्लंडच्या राजांनीं व जनतेनेंही आमचा आदरसत्कार फारच प्रेमळपणानें केला याबद्दल राणीसाहेब व मी सर्वांचे आभारी आहों असें अवश्य जाहीर करा " म्हणून बजाविलें. डोव्हरला

स्पेशल बोटींतून–मेड ऑफ आर्लीन्स मधून–ते कॅलेस जावयास निघाले. बोटीवर चढतांच सम्राट व सम्राज्ञी यांस आभारप्रदर्शक एक संदेश पाठवून अमानुल्लानें त्यांचा निरोप घेतला व त्याच्या दिवाणानें मुख्य प्रधानांनाही त्याच आशयाचा एक संदेश धाडला !

पॅरिसला त्याच दिवशीं ( ५-४-२८ ) सायंकाळीं पोहोंचून ता. ८ रोजीं बर्लिनला जाण्यासाठीं अफगाण मंडळी निघाली.* बर्लिनहून अमानुल्ला लगेच वॉर्सा-वरून मॉस्कोला जाणार होता. परंतु इतक्यांत घशांतील कांहीं विकार वाढल्यामुळें त्यावर बर्लिनमध्यें शस्त्रक्रिया करावी लागली (११-४-२८). इस्पितळांत चार दिवस राहून नंतर अमीर आपल्या ठिकाणीं राहण्यास आला; तरी प्रवासाला निघण्या-इतकी तयारी झाली नव्हती. युंकर्स कंपनीनें दिलेल्या विमानांत बसून राणीसमवेत त्यानें बर्लिनची आकाशांतून पाहणी केली. राणीची आकाशोड्डाण करण्याची ही पहिलीच खेप होय !

अफगाणिस्तान व इराण यांचे दरम्यान वैमानिक दळणवळण प्रस्थापित करण्यासंबंधीं युंकर्स कंपनीच्या मुख्याशीं अमानुल्लाचें बोलणें झालें. युंकर्स कंपनी आज ४–५ वर्षें सर्व इराणभर संचार करीत असल्यानें त्यांना हें सोईचें होतें.

बर्लिनहून निघून अमानुल्ला व सूरय्या वॉर्सा येथें ता. २९-४-२८ रोजीं पोहोंचले. त्यांची मिरवणूक निघाली. उत्तम प्रकारें स्वागत झालें. रात्रीं मेजवानीचा बेत पार पडला. सर्व कांहीं ठराविक सांच्यांतून निघालें. मार्शल **पिलसुड्स्की** कांहीं विकृतीमुळें अंथरुणास खिळून होता. त्याला भेटण्याची अमानुल्लास उत्कट इच्छा होती. म्हणून आजारी असतांनाच त्याला मोटारींत घेऊन अमानुल्लानें हिंडवून आणून त्याच्याशीं पाऊण तास खलबत केलें ! दोघांनाही आनंद झालेला दिसला.

---

*ताझीं, राजभगिनी, राणीची बहीण, व राजपुत्र रहमतुल्लाखान इतकी मंडळी पेशावरमार्गें काबूलला जाण्यासाठीं ता.१६ एप्रिलला टपालबोटीनें मुंबईस पोहोचलीं असें लंडन टाइम्समधील तारेवरून दिसतें. ( १७-४-२८, पृ. १५g ). पुढें ता. २९ एप्रिल रोजीं वॉर्सा येथील बातमीदारानें रशियाकडे जावयास निघालेल्या अफगाण परिवाराची नांवनिशी देतांनाही ताझीं व दोन्ही राजभगिनींचा उल्लेख केला. ( लं. टा. ३०-४-२८. १३c ). यांतील पहिलेंच खरें दिसतें. कारण हिंदुस्थानांतून लाहोर व पेशावर येथील दोन तारा त्या विधानाला पुष्टि देतात.

**१३९. रशियास भेट देण्याचें प्रयोजनः**--अमानुल्ला मॉस्कोलाहि जाणार ही गोष्ट कित्येकांना इष्ट वाटली नाहीं. रशियाला जे पाण्यांत पाहतात किंवा रशियाचा डाव ज्यांच्यावर आहे त्यांना तर हें मुळींच रुचलें नाहीं. पण अमीर दुसऱ्यांच्या आवडीनिवडीकडे कशाला पाहतो? त्यानें कशाचीही परवा न करितां आपला बेत कायम केला.

इकडे रशियांत अमानुल्लाच्या आगमनासंबंधीं काय विचार प्रसृत होते तें पाहिलें म्हणजे सर्व सफरीचें सार व राजकीय महत्त्व हें तिला रशियांतील प्रवासामुळेंच प्राप्त झालें असें वाटेल. वास्तविक रशियाच्या तत्त्वांप्रमाणें राजाला त्यांनीं आपल्या प्रदेशांत येऊं कां द्यावें हाच प्रश्न कित्येक रशियनांनीं काढला. कांहींचें म्हणणें असें, कीं अफगाण राजाचा मानमरातब कशासाठीं करावयाचा? आपापल्या परीनें निव्वळ तत्त्वनिष्ठेचाच विचार केला, तर हे पक्ष रास्त दिसतात. परंतु राजनीति व जगव्यवहारच असा विचित्र व कठिण आहे कीं, त्याचें सार्वकालिक निश्चित स्वरूप कधींच सांगतां येणार नाहीं. आणि त्याच व्यवहारज्ञानावर विसंबून रशियन सरकारनें अमानुल्लाचें राष्ट्रीय स्वागत करण्याचें ठरविलें. त्याच्या नांवाचा निर्देश "पादशहा" अशा 'उपसर्गा'सह होऊं लागला. अमीर किंवा राजा याचा अर्थ सर्वांसच समजण्यासारखा होता. परंतु चहूंकडे सामाजिक समत्व प्रस्थापित करण्यासाठीं अवतरलेल्या देशानें एका व्यक्तीस इतका श्रेष्ठपणा कां द्यावा असा प्रश्न जनतेकडून व्हावयाचा, या भीतीनें ही 'पादशहा'ची योजना रशियन सरकारनें केली असावी. अमानुल्लाला व अफगाण जनतेला खूष करण्याचें कार्यही त्यायोगें साधलेंच. "पादशहानें गादीवर येतांच इंग्रजांशीं पन्नास दिवसांची लढाई केली," अशी त्याची ओळख '**प्रावडा**'नें रशियन जनतेस करून दिली. शिवाय अमानुल्लानें अफगाणिस्तान धार्मिक बंधनापासून मुक्त करण्याचें कंकण बांधलें होतें ना? आणि ब्रिटिश मुत्सद्यांनीं अमानुल्लास मारून टाकण्याचा प्रयत्न केला असल्यानें त्या 'पापा'चें क्षालन तर केलें पाहिजे? रशियाशिवाय तें कार्य करणारा कोण आहे? म्हणून अमानुल्लाचें आपण अगत्यपूर्वक व थाटाचें स्वागत करणें आवश्यक आहे, अशी विचारसरणी रशियन जनतेपुढें मांडण्यांत आली.

ता. ३ मे रोजीं अफगाण पाहुणे मॉस्कोंत पोंहोचावयाचे होते. परंतु रशियन सरहद्दीवरच त्यांना सामोरे जाण्यासाठीं नेगोरेलोये या स्टेशनवर रशियन दुय्यम परराष्ट्रीय मंत्रि व 'सत्कार मंडळ' हजर होते. रशियन हद्दींत अमानुल्लाची

गाडी शिरली हें चटकन् ध्यानांत येण्यासारखेंच होतें. शृंगारलेली एक कमान उभारून तीवर " कम्यूनिझम भौगोलिक बंधनातीत आहे " ( Communism knows no frontiers ) हें वाक्य लिहिलें होतें. तेथें अफगाण राष्ट्रगीत व " कम्युनिस्ट इंटरनॅशनल " हें गतिवादन झालें. कांहीं रशियन अधिकारी येऊन अमानुल्लास भेटले.

" आज आपल्या शहरांत स्वतंत्र पौर्वात्य देशांतील अफगाणाधिपति येत आहे " अशा वाक्यांनीं रशियन वर्तमानपत्रांनीं अमानुल्लाचें स्वागत केलें. सर्वत्र अफगाणिस्तान, हिंदुस्थान व इंग्लंड या तीन देशांचींच नांवें घेऊन चर्चा होऊं लागली. वर्तमानपत्रें या विषयानें भरून गेलीं. " **इझ्वेस्तिया** "नें लिहिलें कीं,

" ब्रिटिशांनीं आपल्या चढाईच्या धोरणासाठीं अफगाणिस्तान व हिंदुस्थानमधील
" स्वतंत्र रानटी टोळ्यांच्या प्रदेशांत प्रवेश करून टेहळणीची नाकीं ठेवलीं
" आहेत, व तो मुलुख आपल्या वर्चस्वाखालीं आणला आहे. नैसर्गिक बंध-
" नांनीं व जातिगोतीच्या संबंधानें वास्तविक तो अफगाणिस्तानाचाच
" असल्यानें त्याचा समावेश अफगाणिस्तानांतच होणें इष्ट आहे. "

" **प्रावडा** "चें म्हणणें वेगळें होतें. " खुद्द लेनिननेंच ' पादशहा ' अमानुल्लास
" अभिष्टपर पत्र लिहिलें होतें. ' अफगाण-सोव्हिएट दोस्ती सुमारें दहा वर्षें
" टिकली. अफगाणस्वातंत्र्य व सोव्हिएटस्नेह हीं गमावून ' साम्राज्यवादी
" चांचे ' लोकांच्या भुलथापांस न भुलण्याइतका अनुभवी व धूर्त मुत्सद्दी
" अमानुल्ला खास आहे ' असें त्यांत म्हटलें होतें. "

१४०. **मॉस्कोंतील सन्मानः**—ठराविक वेळीं ता. ३ मे रोजीं स्पेशल गाडी मॉस्को स्टेशनमध्यें आली. अध्यक्ष श्री. **कालीनिन**, परराष्ट्रीय मंत्री श्री. **चिचेरिन**, युद्धमंत्रि श्री. **वोरोशिलॉफ** आणि राजनैतिक खात्यांतील श्रीमती **कोलंती** देवी इतकी मंडळी स्वागतार्थ स्टेशनवर हजर होती. कालीनिननें स्वागत-पर भाषण थोडक्यांत केलें व कोलंती देवीनें सूरय्या राणीस लाल गुलाबाचा एक गुच्छ अर्पण केल्यावर मोटारमधून खाशा स्वाऱ्या शहरांतून मिरवत निघाल्या. अमानुल्ला व कालीनिन एका गाडींत होते तर दुसरींत सूरय्या व कोलंती देवी बसल्या होत्या. लोक मोठ्या उत्सुकतेनें रस्तोरस्तीं गर्दी करून उभे होते. अमानुल्लाची उतरण्याची सोय परराष्ट्रीय मंत्रिमंडळाचे जागीं करण्यांत आल्यानें मिरवणूक तिकडे गेली. दोन प्रहरीं अमानुल्लानें कालीनिनच्या घरीं जाऊन खलबत केलें.

त्याच रात्रीं सरकारी रीत्या अमानुल्लाचा सत्कार करण्यांत आला. क्रांतिकारी लष्करी मंडळ ( Revolutionary Military Council ) च्या वतीनें श्री. वोरोशिलॉफ यांनीं अफगाण ' पादशहा 'स एक तलवार व एक खंजीर बक्षीस दिला आणि राणी सूरय्यास एक रायफल नजर केली. कार्लीनिननें भाषण करतांना म्हटलेल्या कांहीं वाक्यांचें महत्त्व विशेष आहे.

" दोघांचेही हितसंबंध एक असल्यानें आणि दोघांचे शत्रूदेखील तेच
" आहेत म्हणून अफगाण व सोव्हिएट यांचें स्नेहसामर्थ्य या समान संकटा-
" वर अवलंबून आहे. दोघांनींही नऊ वर्षांपूर्वी एकाच शत्रूशी टक्कर दिली
" असून दोघांनीही विजय संपादन केला आहे. भविष्यकालीं हीं दोन्ही राष्ट्रेंच
" अत्यंत निकट स्नेहानें निगडित होतील. कारण दोघांनी आपणांवरील
" दास्याचा व परावलंबनाचा प्रसंग टाळला आहे. "

चिचेरिननें आपणांस जें वाटलें तें वर्तमानपत्रांत लेख लिहून दर्शविलें. खरें पाहिलें तर स्वदस्तुरी लेख प्रसिद्ध करण्याची चिचेरिनची कधींच वहिवाट नसे. परंतु हा प्रसंगच असा महत्त्वपूर्ण होता कीं, त्या वेळीं नवीन उपक्रम करणें क्रमप्राप्तच झालें. चिचेरिनच्या लेखाचा सारांशः—

" आशियांतील दळणवळणाच्या मुख्य मार्गांचें आरंभस्थान आणि हिंदु-
" स्थानचें प्रवेशद्वार म्हणून अफगाणिस्तानला गत काली महत्त्व होतें, आजही
" आहे व पुढें देखील राहील. शिकंदर ( अलेक्झांडर ) पासून नेपोलियन-
" पर्यंतच्या सर्व युद्धविशारदांनीं ही गोष्ट लक्षांत घेतली होती. इंग्रजांनींही
" इतके दिवस अफगाणिस्तानवर वर्चस्व गाजविलें तें यासाठींच; परंतु नऊ
" वर्षांपूर्वी ' पादशहा ' अमानुल्लानें ब्रिटिशांशीं युद्ध केलें आणि तलवारीच्या
" बळावर इंग्लंडकडून अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य कबूल करून घेतलें. अमा-
" नुल्लाच्या या विजयामुळें रशियाचा व अफगाणिस्तानचा संबंध अधिक दृढ
" होईल. या सर्व कारणांसाठीं आपण स्वतंत्र अफगाणनायकाचें स्वागत करूं
" या. त्या योगानें आपल्या दोन्ही देशांचे स्नेहसंबंध निकट होतील. "

मॉस्कोंतील शाळा, लष्करी शिक्षणाच्या सोई, यांत्रिक व्यवस्था, लेनिनची कबर व इतर प्रेक्षणीय स्थळें पाहून ता. ९ मे रोजीं अमानुल्ला **लेनिनग्राड** ( पूर्वीचें सेंट पीटर्सबर्ग अथवा युद्धकालचें पेट्रोग्राड ) येथें जाण्यास निघाला. तेथें तोफखान्याचें शिक्षण देणारी लष्करी शाळा पाहिल्यानंतर शहरांतून औद्योगिक

चळवळी पाहण्यासाठीं तो हिंडला. **पीटर दि ग्रेट** हा जसा आपल्या देशाची सर्वांगीण सुधारणा करण्यासाठीं झटत होता तद्वतच अमानुल्लाचे प्रयत्न होते. आणि म्हणून त्याला लेनिनग्राड हें शहर पाहण्याची विशेष उत्सुकता होती. कारण पीटरनें तें वसाविलें होतें.

१४१. **'बंधू'च्या घरचा सत्कार** :—लेनिनग्राडहून १३ तारखेस निघून **क्रिमियांत सिबास्तेपूल** येथें अमानुल्लाची स्पेशल गाडी ता. १५ रोजीं पोहोंचली. तेथें आरोग्यखात्याचीं इस्पितळें पाहून व चेतोहारि सृष्टिशोभा आणि उत्साहवर्धक हवा यांचा अनुभव घेतल्यावर ता. १८ रोजीं **इस्तंबूल**-(कॉन्स्टँटिनोपल) ला एका खास बोटींतून पाहुणे मंडळी रवाना झाली. **बॉस्फरसच्या** सामुद्रधुनींतून अमानुल्लाची बोट जात असतां तुर्की सरकारचीं विमानें व युद्धनौका सोबत करीत होत्या. **हैदरपाशा** येथें सायंकाळीं पांच वाजतां बोट आली. किनाऱ्यावर जनरल **नैली पाशा, मिद्हत बे,** पोलीस ऑफिसर व नगराधिपति इत्यादि तुर्की अधिकारी आले असून ५० अफगाण विद्यार्थीही आपल्या राजाच्या सत्कारार्थ जमले होते. अमानुल्लानें तुर्कीत भाषण करून सर्वांचे मनःपूर्वक आभार मानले. आणि अंगोरास आपल्या मानसगुरूला—गाझी मुस्ताफा **केमल पाशास**—भेटण्यासाठीं स्पेशल गाडींतून अमानुल्ला निघाला.

दुसरे दिवशीं म्हणजे २० मे रोजीं ११॥ वाजतां अंगोरा स्टेशनवर गाझी आपल्या मंत्रिमंडळासह अमानुल्लाच्या स्वागतार्थ सिद्ध होते. नमस्कारचमत्कार झाले. एकमेकांचें दर्शन घडल्यामुळें दोघांनाही अत्यानंद झाला. त्याच रात्रीं दरबारी मेजवानी झाली. तेव्हां केमाल पाशानें अफगाणिस्तान व तुर्कस्तान यांच्या आधुनिक इतिहासांतील साम्यस्थलें दाखविलीं आणि अमानुल्लाच्या कारकीर्दींत अफगाणिस्तानची पुष्कळ भरभराट होवो अशी सदिच्छा प्रकट केली. अमानुल्लानें केलेल्या सुधारणा इष्ट होत्या; त्या यशस्वी रीतीनें लोकांत प्रसृत होवोत अशीही इच्छा केमाल पाशानें व्यक्त केली.

अमानुल्लाला तर इतका आनंद झालेला दिसला, कीं त्याला त्यामुळें मोठें भाषणच करतां येईना. "माझ्या प्रिय व उदार बंधो," म्हणून त्यानें केमाल पाशास संबोधिलें आणि तुर्कस्तानांत 'भावा'च्या घरीं रहावयास संधि मिळाल्याबद्दल अत्यानंद प्रदर्शित केला. भावाचेंच घर, तेव्हां आभार वगैरे औपचारिक शब्दांची त्यास आवश्यकता भासली नाहीं.

अंगोरा म्युनिसिपालिटीनें अफगाण राजाराणींचा सत्कार केला त्या वेळीं दोन अंगोरा ( जातीचीं नामांकित ) मांजरें व दोन रेशमी गालिचे पाहुणे मंडळीस नजर करण्यांत आले.

तुर्कस्तानच्या अनभिषिक्त राजानें–अमानुल्लाच्या उदार बंधूनें-अफगाणाधिपतीस सोनेरी चौकटीत बसवून हिरे माणकांनीं सुशोभित केलेला एक स्वतःचा फोटो बक्षिस दिला, तुर्की तलवारही अमानुल्लाच्या कंबरेस लटकाविली आणि मूठ भरीव सोन्याची असून तिवर आठ मोठमोठे हिरे व इतर रत्नें जडविली होतीं असा एक चांदीचा खंजीरही दिला.

**१४२. तुर्को–अफगाण तह:** —लष्करी व बौद्धिक शिक्षण संस्था, सैन्य पाहणी, शाळेतील मुलांच्या शर्यती इत्यादि अन्यत्र झालेले कार्यक्रम तुर्कस्तानांतही झाले हें सांगावयास नको. परंतु तुर्कस्तान व अफगाण यांचा जो तह अमानुल्ला तेथें असतांनाच करण्यांत आला तो महत्त्वाचा आहे. त्या नऊ कलमी तहाचा सारांश असा:—

१. दोन्ही राष्ट्रांत खरा स्नेहभाव व चिरकालीन शांति नांदावी.

२. दोन्ही राष्ट्रांविरुद्ध अगर दोघांपैकीं एकाविरुद्ध एक अथवा अनेक शत्रूंनीं हल्ला केला तर दुसऱ्या राष्ट्रानें शक्य तेवढें वजन खर्च करून हा अनिष्ट प्रसंग टाळावा आणि इतकेंही करून युद्ध टळलें नाहींच तर-दोघांनीं आपसांत खलबत करून दोघांस श्रेयस्कर असाच मार्ग काढावा.

३. एकमेकांविरुद्ध लष्करी, आर्थिक, व्यापारी किंवा कसलाही तह अथवा करार तिसऱ्या कोणत्याही राष्ट्राशीं केला जाणार नाहीं.

४. परस्परांची प्रगति व्हावी म्हणून दोन्हीही राष्ट्रें शक्य ती खटपट करतील आणि यासाठीं प्रचलित असलेल्या तहांव्यतिरिक्त आणखी तह अथवा करार करावे लागले तरी ते केले जातील.

५. न्यायखात्यांतील, तसेंच शास्त्रीय आणि लष्करी, तज्ज्ञ अफगाणिस्तानला पुरविण्याचें तुर्कस्तान मान्य करीत आहे.

६. तुर्कस्तानच्या हद्दींत असलेले अफगाण प्रजाजन व अफगाण सत्तेखालीं राहणारे तुर्की प्रजाजन हे 'खासे' प्रजाजन (Most favoured nationals ) मानले जातील आणि त्यांच्या सोईसाठीं लागणारे इतर करारमदारही केले जातील.

७. ८. हीं कलमें महत्त्वाचीं नाहीं.

९. हा तह मुद्रांकित ( Ratified ) होण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं आणि मुद्रांकित झाल्यापासून लगेच अंमलांत येईल. पहिलें कलम कायमचेंच अंमलांत राहावयाचें आणि बाकीचीं, दहा वर्षांपर्यंत बंधनकारक समजावीं.‡ —ता. २५ मे १९२८.

अमानुल्लाच्या युरोपच्या सफरीचें महत्त्व किती आहे याचें संकलित विवेचन पुढें यावयाचें आहेच. तरी पण या तहाबद्दल थोडी चर्चा येथेंच करणें इष्ट आहे. पहिलें कलम अगदीं मामुली असलें तरी शेवटच्या कलमांत त्यावर वज्रलेपाचा शिक्का मारला आहे. इतर कोणत्याही राष्ट्रांचे अफगाणिस्तानशीं जे तह झाले त्यांत पहिलें कलम थोड्या फार फरकानें याच प्रकारचें असलें, तरी त्यावर दुसरा कसलाच शिक्कामोर्तब नसतो. परंतु 'दोन बंधु' एकत्र येऊन तह करीत असल्यामुळें त्यांत हें नवीन वारें दिसतें. दुसऱ्या कलमावरून या दोन्ही राष्ट्रांची दोस्ती नकली किंवा 'राजनैतिक स्वार्थी' नसून तिला खरोखरच बंधुप्रेमाचा 'सुवास' येत आहे असें दिसून येतें. इंग्लंडशीं अशा अटींवर तह कां झाला नाही हें सांगण्याची आवश्यकता नाही. सहाव्या कलमांत तुर्कस्तानला अफगाणिस्ताननें व अफगाणिस्तानला तुर्कस्ताननें **आमचे खास दोस्त** ( 'मोस्ट फेवर्ड नेशन' ) असें म्हटलें असल्याचा स्पष्ट पुरावा आहे. इतर राष्ट्रांच्या तहाची भाषा जरी अशा प्रकारची असली, तरी राजकारस्थानाचीच छाप प्रत्येक अक्षरावर दिसत असते, तसें या तहाचे नसून यांत एकमेकांविषयीं आंतला व बाहेरचा एकच भाव असून परस्पर हितरक्षणार्थच हा तह केला आहे हें स्पष्ट दिसतें. अमानुल्लानेंच तुर्कस्तानशीं १-३-१९२१ रोजीं केलेला तह* पाहिल्यास अमानुल्लाच्या दृष्टिकोनांत आता किती बदल झाला होता हें तर समजेलच; पण त्या औपचारिक तहापेक्षां हा किती कळकळीचा व सद्धेतुप्रेरित होता हेंही दिसून येईल.

---

‡ *The Times*, London, 28-5-1928, 11*g*.

*ह्या तुर्की-अफगाण तहांतील कलमांचा सारांश:—

१. अल्लाच्या मेहेरबानीनें पौर्वात्य राष्ट्रांत जागृति होत असतां आमचीं दोन्हीं राष्ट्रें दोस्तीच्या बंधनांनीं निगडित होणेंच इष्ट आहे. म्हणून आम्ही परस्परांचें संपूर्ण व खरेखुरें स्वातंत्र्य मानतों.

२. एकदां स्वातंत्र्य मानल्यानंतर आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें राज्यव्यवस्था ठेवण्यास दोन्हीं राष्ट्रें समर्थ आहेत.

[ टीप पुढें चालू ]

**१४३. तेहरानमधील स्वागतसमारंभ :**—तें कांहींही असो, हा तह केल्यानंतर अमानुल्लाचें व तुर्कस्तानचें सख्य विशेष जुळलें हें खास. ता. २७ मे रोजीं सायंकाळीं स्पेशल गाडींतून अफगाण पाहुणे अंगोराहून निघाले. हैदरपाशा येथें पोहोंचल्यावर रशियन आरमारांनीं रक्षित असें अमानुल्लाचें खासें जहाज **बाटुम** येथें गेलें. तेथून **बाकूस** जाऊन तेथील रशियाच्या ताब्यांतील रॉकेल तेलाचे कारखाने पाहून व अफगाण विद्यार्थ्यांना त्या धंद्यांतील शिक्षण मिळण्याची काय सोय करावी याविषयीं तेथील अधिकाऱ्यांशी चर्चा करून अमानुल्ला पुन: जलयानारूढ झाला. बाकू हें **कॅस्पियन** समुद्रावरील बंदर. तेथून इराणी सत्तेखालचें बंदर **पेहेलवी** ( पूर्वीचें नांव **एंझेली** ) हें गांठल्यानंतर तेहरानमध्यें इराणी शहाचे पाहुणे म्हणून अफगाण राजाराणी गेले. पेहेलवीस इराणी अधिकारी व तेहरानमधील अफगाण वकील राजास सामोरे गेले. तेहरानमध्यें प्रवेश करण्या-पूर्वीच शहानूशहा **रेझा शहा** पेहेलवी सपुत्र अमानुल्लाचें प्रेमानें स्वागत करण्यासाठीं पुढें आला. इराणांत येतांच सूरय्यानें आपला फार दिवस बासनांत बांधलेला बुरखा काढला व उपयोगांत आणला. अमानुल्ला व रेझाशहा यांची एका गाडींतून मिरवणूक निघाली. लोकांनीं सर्व शहर इतकें उत्साहानें शृंगारलें होतें कीं, तसा देखावा तेहरानमध्यें पन्नास वर्षांत कोणाच्या पाहण्यांत आला नव्हता. शहाकडे पाहुणे क्वचितूच येतात असें नसलें, तरी शेजारचे राजे—त्यांतून मुसलमानी धर्माचे—

---

३. खलिफाचें आसन स्थिरावून तुर्कस्तान इस्लामी जगताचा अध्वर्यु झाल्याबद्दल अफगाणिस्तान त्या राष्ट्राचें अभिनंदन करीत आहे.

४. एखाद्या साम्राज्यशाही राष्ट्रानें दोघांपैकीं कोणावरही हल्ला केला तरी तो आपणांवरच आहे असे समजून त्या राष्ट्रास कुमक करण्यास दुसरें राष्ट्र बांधलें आहे.

५. दोघांपैकी कोणीही विरोधी सत्तेशीं कोणताही वेगळा तह अथवा करार करूं नये. तिसऱ्या राष्ट्राशीं तह करण्यापूर्वीं आपल्यापैकीं दुसऱ्यास कळविलें जाईल.

६. काबुली वकील अंगोरा येथें व तुर्की वकील काबूलमध्यें ताबडतोब नेमले जावे. कॉन्सल्स व इतर व्यापारी प्रतिनिधि मागाहून नेमले जातील.

७. परस्परांच्या हितसंबंधाच्या गोष्टींची माहिती एकमेकांस व्हावी म्हणून तत्काळ खास टपालाची व्यवस्था केली जावी.

८. निदान पांच वर्षेपर्यंत तरी तुर्कस्तानांतून शैक्षणिक व लष्करी तज्ज्ञ अफगाणि-स्तानांत पाठविले जातील. अफगाणिस्तानची इच्छा असल्यास हे तज्ज्ञ आणखीही जास्त दिवस पाठविण्यांत येईल.

( **Toynbee** : *Survey of International Affairs, 1920–23, p. 385*).

आपल्या शहाचे 'मेहेमान' (पाहुणे) म्हणून आले, हीच बाब त्यांस मोठया आनंदाची व उत्सवप्रेरक होती. त्यांत अमानुल्लाच्या युरोपच्या सफरीचें यथातथ्य वर्णन इराणी वर्तमानपत्रांतून त्यांना वाचावयास मिळालें होतें. मग अशा अमानुल्लाचें स्वागत त्यांनींही मोठया थाटानें, आनंदानें व उत्साहानें केलें तर आश्चर्य कसलें?

अमानुल्ला तेहरानमध्यें सात दिवस राहिला. तेथें इराणी जनतेस उद्देशून भाषण करितांना त्यानें कांहीं बढाईखोर व इराणी लोकांस अपमानास्पद असे शब्द उच्चारले असें तेहरानमधील जनतेचें म्हणणें आहे. "अफगाणिस्तान सहा महिन्यांच्या आंत युरोपमधील कोणत्याही राष्ट्राच्या तोडीला येतें कीं नाहीं तें पहा, इराण मागें राहील; पण अफगाणिस्तान आतां प्रगतीच्या मार्गावर जोरानें धांवणार!" इत्यादि वाक्यें इराण्यांना लागलीं तर तो दोष त्यांचा कसला? कोणाही स्वाभिमानी लोकांना तीं ऐकवलीं नसतींच.

**१४४. स्वदेशीं प्रयाण** :—तेहरानमध्यें मेजवान्या, मानपत्रें, नजराणे इत्यादि सर्व ठराविक दरबारी प्रसंग झालेच. त्यांचें वर्णनही ठराविक सांच्याचेंच असल्यानें तें देऊन जागा आडवीत नाहीं. ता. १६ जून रोजीं तेहरानहून पूर्वेकडे **मशहद्**मार्गें हे 'राजकीय' पाहुणे स्वदेशी निघाले. अमानुल्लास जर्मनींत बक्षिस मिळालेलें विमान मशहद येथें त्याच सुमारास आणण्यांत आलें असून मशहद ते **हिरात** हा राजाराणींचा प्रवास विमानांतून झाला.

हिरातहून ता. १८ जूनला अमानुल्ला निघाला व त्याच दिवशी कंदाहारला पोहोंचला. मध्यंतरींचीं गांवें पहात तो काबूलला १ जुलै १९२८ रोजी पोहोंचला. सात महिन्यांच्या प्रवासानंतर अमीर पुनः आपल्या प्रदेशांत आला. जनतेनें त्याचें अत्यंत आनंदोत्सवानें स्वागत केलें. त्याला मानपत्रें मिळालीं; त्याच्या अभिनंदनपर आणि दीर्घायुष्यचिंतनपर पत्रांचा तर वर्षावच झाला. आपला अमीर युरोपांतील सर्व मोठमोठया राजांचा खासा पाहुणा होता; त्याची जिकडे तिकडे फारच वाहवा झाली; त्यानें अनेक देश पाहिले; इत्यादिकांमुळें अफगाण प्रजेला विशेष अभिमान वाटला. सत्ताधारी अमीर फार फार तर हिंदुस्थानपर्यंत मजल मारावयाचा. तेव्हां आपलें राज्य दुसऱ्यावर सोंपवून सहा सात महिने युरोप खंडांत जिज्ञासू व चिकित्सक दृष्टीनें संचार करणारा अमानुल्ला कांहीं तरी विशेष श्रेष्ठतेचा आहे असें जसें इतर देशांतील लोकांस वाटलें, तसेंच तें अफ-

गाणांच्याही मनांत बिंबलें. अमानुल्लाच्या लोकप्रियतेचें अत्युच्च शिखर तें हेंच. तें त्यानें गांठलें म्हणूनच या अभूतपूर्व व तेजस्वी अमिराचे गोडवे गाऊं लागतांच एक दुःखद जाणीव होते! अत्युच्च पदाची प्राप्ती म्हणजे पदच्युतीचा प्रारंभ. प्रगतीचें ध्येय गांठणें म्हणजेच अधोगतीला सुरवात करणें होय! असा कटु अनुभव जगाच्या इतिहासांत अनेक वेळां नमूद झाला आहे. आणि म्हणूनच कित्येक दूरदृष्टीच्या वृद्धांच्या मनांत या मंगल प्रसंगीं भावी दुःखाचे काल्पनिक चरके बसले!!

**१४५. अमानुल्लाच्या सफरीचें राजकीय दृष्ट्या महत्त्व :—** प्रवासाचें साधारण वर्णन दिल्यानंतर अमानुल्लाच्या सफरीचें आंतरराष्ट्रीय महत्त्व किती होतें हें पाहिलें पाहिजे. काबूलहून निघून कंदाहार-क्वेट्टामार्गें अमानुल्ला कराचीस व तेथून मुंबईस आला. हिंदुस्थानास ही त्याची पहिलीच भेट. नंतर युरोपला जाण्यासाठीं बोटींत बसून तो गेला व वाटेंत ईजिप्तमध्यें कांहीं दिवस मुक्काम झाला, तो विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊन केला होता असें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थानांतील व ईजिप्तमधील अमानुल्लाचें वास्तव्य निर्हेतुक असें असलें तरी त्या दोन्ही देशांत इंग्रज अधिकाऱ्यांनी अफगाण 'अमिराचें' केलेलें अपूर्व स्वागत, रकानेच्या रकाने खर्चून त्याची ओतप्रोत स्तुती करणारीं अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रें, दिल्लीहून एकदम 'खालीं उतरून' मुंबईस आलेले व्हाइसरॉय (आतां प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना आंथरुणाबाहेर पडतां आलें नाहीं ती गोष्ट अलाहिदा) जनतेनें मानपत्रांचा अमानुल्लावर केलेला वर्षाव, इत्यादि गोष्टी काय दर्शवितात? विशेषतः 'भांडखोर' 'अननुभवी तरुण' 'बोल्शेविकांच्या कच्छपी लागलेला अफगाणांचा अमीर' अशीं विशेषणें देणाऱ्या अधिकाऱ्यांनीं व इंग्रजी वर्तमानपत्रांनीं एकदम पगडी फिरवून पिढीजाद भाटांनाही न साधणाऱ्या शब्दांत अफगाणिस्तानच्या 'स्वतंत्र' राजेसाहेबांची प्रशंसा करण्याइतकी या अमिरांत काय जादू होती? याचें उत्तर '**काल**' व '**भूगोल**' यांनींच हा फरक घडवून आणला हें होय.

युरोपांतील सफरीचें महत्त्व त्या त्या देशाप्रमाणें वेगळें आहे. इटालीनेंच अफगाणांचें स्वातंत्र्य प्रथमतः मान्य केलें, तर युरोपांत प्रवास करतांना अफगाण नरेश प्रथमतः इटालींतच उतरले. मुसोलिनीबद्दल अमानुल्लाला वाटत असलेला आदर व स्नेहपूर्ण कौतुक, त्यांचीं झालेलीं गुप्त खलबतें, अमानुल्लानें इटालियन

मोटारी व शिल्पी यांची केलेली मागणी, युद्धसामग्री पुरविण्याचें इटालीला मिळालेलें कंत्राट व त्यासंबंधीं मुसोलिनीनें जाहीर रीत्या व्यक्त केलेला साभिमानपूर्वक संतोष, पोपशीं झालेली अमानुल्लाची मुलाखत, अमानुल्लानें युरोपमधील सर्व अफगाण वकिलांची इटालींत बोलाविलेली सभा, इत्यादि गोष्टींचें राजकीय—आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें—महत्त्व कमी लेखतां येणार नाहीं.

परंतु अमानुल्लाला इटालीचाच प्रेमा इतका कां आला, किंवा इटालीनें तरी अफगाण स्वातंत्र्य प्रथम मान्य करण्याचे कारण काय? या बाबींचाहि विचार केला पाहिजे. मुसोलिनीनें तलवारीच्या जोरावर स्थापलेली देशनिष्ठा व राज्यव्यवस्था देशहितास अत्यंत पोषक अशीच झाली असल्यानें कोणाही राजास त्या कर्तृत्वशाली वीराबद्दल अभिमान, आदर व कौतुक वाटेल. केवळ 'एकतंत्री सुलतानशाही' म्हणून तिला नांवें ठेवण्याचें कारण नाहीं. निदान अमानुल्लाच्या दृष्टीनें तो दोष नसून उलट तोच मोठा सद्गुण ठरत असल्यानें अमीर मुसोलिनीकडे आकर्षिला गेला. इटालीनें अफगाणांचें स्वातंत्र्य केव्हां व कोणत्या परिस्थितींत मानलें या संबंधीं निश्चित असें कांहींच मत देतां येत नाहीं. मात्र काकतालीय न्यायानेंच जरी इटालीस या बाबतींत अग्रेसरत्वाचा मान मिळाला असला, तरी हल्लींचें इटालियन सरकार त्या प्रसंगाचा जास्तींत जास्त फायदा घेतल्यावांचून राहणार नाहीं हें उघड आहे. युद्धसामग्री, मोटारी व शिल्पी कारागीर हे अमानुल्लानें इटालींतून नेले, याचा संबंध इटालीच्या भावी साम्राज्यशाही आकांक्षांशी जोडावयाचा कीं काय? हिंदुस्थानचा व्यापार व उद्योगधंदा काबीज करण्यासाठीं टपलेल्या इटालीस अफगाणिस्तानांतही चंचुप्रवेश नको असेल असें कोणीं म्हणावें?

यानंतर फ्रान्सला अमानुल्लानें दिलेली भेट व त्या देशाशीं जोडलेले संबंध यांचेंही महत्त्व जाणलें पाहिजे. फ्रान्सकडे अमानुल्लाचाच काय पण बहुतेक सर्व मुसलमानांचा विशेष ओढा दिसून येतो. विशेषतः फार्सी भाषाभाषींना फ्रान्स, फ्रेंच भाषा व संस्कृति फार आवडतात, याचें कारण मुसलमान प्रदेशांत फ्रेंच मिशनऱ्यांचा प्रथम प्रवेश असो किंवा दोन्ही भाषांतील व रीतिरिवाजांतलि मार्दव असो, फ्रेंच व फार्सी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या शिष्टाचारांत बरेंच साम्य आढळतें हें मात्र खरें. कदाचित् इंग्रजांच्या आक्रमशाली आचारांचा पगडा आपणांस नको, त्यांची भाषा, त्यांचे ग्रंथ, त्यांचे तज्ज्ञ, त्यांचे अधिकारी वगैरे कोणीच नको अशा भावनेनें इंग्रजी संस्कृति दूर लोटण्याचा

प्रयत्न मुसलमानी राष्ट्रांनीं केला आहे असें वाटतें. एकदां इंग्रजांना 'नको'च्या सदरांत टाकलें, कीं त्यांचे शत्रूही त्याच वर्गांत पडणार. कारण इंग्रजांच्या शत्रूला जवळ करणें–इंग्रजांना धुडकावून–म्हणजे पर्यायानें इंग्रजांचा रोष संपादन करणेंच होय. आणि राष्ट्र कितीही बलशाली वा स्वतंत्र वृत्तीचें असो 'सूर्य कधींही न मावळणाऱ्या' साम्राज्याशीं विनाकारण विरोध करणें किंवा त्या साम्राज्याला चिडविणें हें त्या राष्ट्राला केव्हांही हितावह होणार नाहीं. म्हणूनच इंग्रजांच्या तोडीच्या, परंतु इंग्रज व त्यांचे उघड शत्रू-जर्मनी व रशिया–यांना वगळून उरलेल्या, राष्ट्रांकडे अनन्यगतिकत्वात् मुसलमानी देश वळले असावेत. कोणतेंही कारण असो, अमानुल्लानें आपला ज्येष्ठ पुत्र शहाजादा हिदायतुल्लाखान फ्रान्समध्येंच शिक्षणासाठीं ठेवला असून उच्च शिक्षणासाठीं इतर बरेच अफगाण विद्यार्थीही फ्रान्समध्यें पाठविण्यांत आले होते. शिवाय फॅशनच्या बाबतींत फ्रान्सचें–पॅरिसचें–अग्रेसरत्व सर्वमान्य असल्यानें अमानुल्ला व सूरय्या यांच्या खास तैनातीसाठीं फ्रेंच शिंपी न्यावे लागले. अमानुल्लाच्या काकानें–नाशिरुल्लानें–विलायतची सफर केली, तेव्हां त्यालाही फ्रेंच फॅशनचा विलक्षण मोह पडला होता. तोच परिणाम राजघराण्यांतील इतर मंडळींवर कायम राहिला होता. विशेषतः अमानुल्ला फ्रेंचांचा चहाता असल्यामुळें त्यानें आपल्या भेटीच्या वेळीं त्यांच्या देशाशीं राजकीय स्नेहसंबंध जोडले. फ्रान्सला इंग्लंडच्या वाढत्या व पसरत्या साम्राज्याला पायबंद घालण्याची इच्छा असल्यानें हिंदुस्थानच्या प्रवेशद्वारीं अफगाणिस्तानांत मिळालेला प्रवेश त्या देशांतील मुत्सद्यांनीं व्यर्थ जाऊं दिला नाही.

फ्रान्सनंतर जर्मनी. अमानुल्लाचें हिंडेनबुर्गादिकांनीं केलेलें जाहीर स्वागत, इतर स्वागत, इतर राजांना न मिळालेला मान अफगाण अमिरास जर्मनीनें दिला ही गोष्ट आणि तत्त्वनिष्ठा सोडून व वर्तमानपत्रांची कडक टीका सहन करूनही जर्मन कारभाऱ्यांनीं अफगाणपदव्यांचा केलेला स्वीकार याच राजकीय धोरणाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या बाबी आहेत. जर्मनांनीं अमानुल्लाच्या आगमनाच्या वेळीं प्रकट केलेले विचारही काळजीनेंच पाहिले पाहिजेत. अफगाण अंत:करणाची जाणीव जर्मनीला 'विशेष आहे' याचा अर्थ काय? महायुद्धांत जर्मनीच्या विनंतीस धुडकावून तत्कालीन अफगाण अमिरानें इंग्रजांविरुद्ध युद्ध केलें नाहीं, त्या प्रसंगास उद्देशून हा संभावित टोला तर नसेल ना? जर्मन संशोधकांनीं अफगाण इतिहासांत अमूल्य भर टाकून अफगाणिस्तानची जी कामगिरी

बजावली तिची बढाई सांगून आफगाणिस्तानच्या पुनर्घटनेंत मोठासा हिस्सा मिळविण्याची जर्मनीची इच्छा व तयारी स्पष्टपणेंच दाखविण्यांत आली होती. प्रश्न इतकाच कीं, अफगाणिस्तानला मदत करण्यापुरतेंच जर्मन गरुड आपले पंख पसरणार होता, कीं हिंदुकूशपर्वताच्या शिखरांवरून पलीकडील सुपीक व मोहक प्रदेशाकडेही त्याची–झडप घालण्याच्या इच्छेनें असो वा नसो–नजर होती ! राजकारणांतल्या चळवळीचे धागेदोरे अत्यंत दूरवर पसरलेले असतात, तसेच ते फारच सूक्ष्म असल्यानें आणि ते पाहण्यास 'संभवनीयते'चें सूक्ष्मदर्शक यंत्र उपलब्ध आहे म्हणून, कल्पनेच्या खेळापलीकडे फारसें जातां येत नाहीं. जर्मनीनें अफगाण अमिरास कर्ज दिलें ही बातमी खोटी ठरली, तरी त्यांत तथ्य बरेंच होतें. लढाईचा देखावा अमानुल्लास दाखविण्यांत आला त्यांत केवळ पाहुण्यांच्या करमणुकीपेक्षां अधिक खोल हेतु स्पष्टच होता. विमानाची व मोटारीची अमिराला मिळालेली देणगी निर्हेतुक असेल असें म्हणवत नाहीं. तसे नजराणेच द्यावयाचे, तर जडजवाहीर किंवा भारी कापड, पुतळे, यंत्रें, बंदुका वगैरे मुळींच कमी नव्हत्या. मग विमान व मोटारच दिली गेली यांत अंतस्थ हेतु नसेल कसा ?

जर्मनीनंतर इंग्लंडमधील स्वागत, तर 'न भूतो न भविष्यति' याच कोटींतलें होतें. डोंगराळ प्रदेशाचा व रानटी लोकांचा यःकश्चित् अमीर तो काय, आणि प्रचंड साम्राज्याचे सम्राट् सर्व अधिकाऱ्यांसह त्याच्यापुढें गोंडा घोळतात तो काय, सर्वच आश्चर्यकारक ! सिंह कोणत्याही कारणास्तव असो, स्वत्व इतकें कधींच विसरला नसेल ! "**किं जीर्णं तृणमत्ति मानमहतामग्रेसरः केसरी ।**" असें निश्चयात्मक विधान करणारा कवि ह्या ब्रिटिश सिंहाचें हें वर्तन पाहून काय म्हणता ?

आपल्या शेजारच्या बलशाली साम्राज्याचें खरें सामर्थ्य किती आहे, त्याचा रोष संपादन केल्यास काय अनर्थ ओढवेल आणि त्याच साम्राज्याच्या पंखाखालीं राहिल्यास आपला किती फायदा होईल इत्यादि प्रकारें अमानुल्लावर पगडा बसविण्याच्या हेतूनेंच त्याच्या इंग्लंडमधील सफरीचा कार्यक्रम आंखण्यांत आला होता. औद्योगिक क्षेत्रांतील आपली प्रगति दाखवून अफगाणिस्तानच्या उद्योग-धंद्यांच्या चळवळींस आपलीं यंत्रें, आपले तज्ज्ञ, आपलें भांडवल हीं सर्व वाहिलीं जावीं असें इंग्लंडला वाटल्यास तें इंग्रजी स्वभावाविरुद्ध कसें ठरेल ? इटाली, फ्रान्स व जर्मनी या राष्ट्रांत झालेला अमानुल्लाचा मानमरातब व त्याची औद्योगिक,

शैक्षणिक व लष्करी संस्था पाहण्याची आवड इंग्रजांच्या कानांवर आली असल्यानें त्यांना अमिराचा कार्यक्रम आंखण्यांत बरीच मदत झाली. तसेंच अमानुल्लाची अपेक्षा काय आहे हेंही त्यांना समजून चुकलें होतें. इटाली, फ्रान्स आणि जर्मनी यांनीं आपल्या देखाव्यानें अमानुल्लास भारलें असेल, तर ती बाधा कमी करण्याचा–शक्य तर समूळ नाहीशी करण्याचा–प्रयत्न ब्रिटिश मुत्सद्यांना करावयाचा होता. भौगोलिक पाहणी करण्याचें कंत्राट मिळालें तर इंग्लंडला पाहिजेच होतें. "भूगोल" पाहण्याच्या मिषानें खनिज संपत्तीचाहि तपास काढतां येतो आणि मग फुकटांत पैसे मिळवून देण्याच्या मिषानें तद्देशीय सरकारकडून खाणींचे मक्ते मिळवितां येतात. अशी ही दूरवरची संधानें इंग्रजांच्या डोळ्यांपुढें नव्हतीं असें म्हणवत नाही.

हा सर्व स्वार्थी कावा अंतःकरणांत उद्भूत होण्यास तरी कारण काय ? असाही चोकस प्रश्न संभवतो. त्याचें उत्तर उघड आहे. अफगाणिस्तानपलीकडे रशियाचें भूत ब्रिटिश सिंहाला एकसारखी भीति दाखवीत बसलें आहे. अमानुल्लाचा कल प्रथमपासूनच सोव्हिएट सरकारकडे विशेष झुकलेला आहे हें दर्शविण्यास पुरेसे पुरावे पूर्वी उद्धृत केलेच आहेत; अर्थात् त्याला रशियन राज्यपद्धति सर्वस्वी आवडते म्हणून अमानुल्लानें सोव्हिएट सरकारशीं स्नेह जडविला कीं ब्रिटिशांना रशियाची फार भीति वाटते म्हणून अफगाण अमीर कारस्थानी हेतूनें 'लाल बावटया'शीं सलगी ठेवूं लागला हें निश्चितपणें सांगतां येण्याजोगी साधार माहिती आज तरी उपलब्ध नाही. पण एवढें खरें, कीं ब्रिटिशांना नरम आणण्यासाठीं अशी हिकमत योजण्याची मुत्सद्देगिरी त्याच्या दरबारीं खास होती. अमानुल्लानें रशियाच्या कच्यांत न जातां ब्रिटिशांच्या आश्रयाला यावें–निदान स्वतंत्र तरी रहावें–अशी इंग्रजी राजकारणपटूंची बरेच दिवसांची इच्छा आहे. ती साध्य करण्याच्याच हेतूनें इंग्लंडमधील कार्यक्रम आंखलेला दिसतो. इंग्लंडमध्यें अमानुल्लानें ता. १३।३।२८ या दिवशीं, मंगळवारी, पाऊल टाकलें, आणि अशा अपूर्व स्वगताला तेरा ह्या अमंगल आंकडयाचा योगायोग जमून आला.

यानंतर अमानुल्लाच्या रशियन सफरीचेंही निरीक्षण केलें पाहिजे. रशिया व इंग्लंड यांचें जवळ जवळ हाडवैर आहे. त्यामुळें अमानुल्लाच्या रशियन सफरीस महत्त्व कां येऊं नये ? अफगाण अमिरानें रशियांत मुळींच जाऊं नये अशी इंग्रज मुत्सद्यांची जितकी तीव्र इच्छा होती तितकीच, किंबहुना किंचित् तीव्रतर अशी

अमानुल्लाची त्या प्रदेशांत जाण्याची होती. इंग्लंडमध्यें गेल्यावर रशियाला वगळणें धूर्तपणाचें झालें नसतें. रशियांतील अमानुल्लाचा प्रवास टाळतां येणें शक्य नव्हतें. एक वेळ इंग्लंडची सफर रद्द करण्यास तो तयार झाला असता, पण रशियाची यात्रा करण्याची संधि त्यानें कांहींही झालें असतें तरी गमावली नसती. आपला शेजारी म्हणून तरी त्याला रशियाशीं सलोखा ठेवणें भागच होतें; इंग्लंडनें वचकून रहावें यासाठीं अमानुल्लास मनांत नसतें तरी सोव्हिएट सरकारचा स्नेह संपादन करण्याचें सोंग घ्यावें लागलें असतें; कारण तसें केल्यानेंच अफगाणिस्तानचें स्वातंत्र्य टिकलें असतें. पण याहीपेक्षां एका सबळ कारणामुळें अमानुल्ला रशियाच्या सफरीस गेला; आणि तें म्हणजे तेथील राज्यपद्धतीच्या प्रयोगनिरीक्षणाचें. विशेषत: या धर्महीनांच्या राज्याचा यशस्वी दिसणारा प्रयोग कसा चालला आहे हें ( अनुकरणाच्या हेतूनें ? ) पाहण्याची उत्कंठा अमिरास होती. स्वत:ला त्याला धर्मवेड मुळींच नको होतें. युरोपमधील त्याच्या सर्व प्रवासांत त्याला धर्मभावनेविरहित असा एकही देश आढळला नव्हता. कमी जास्त प्रमाणांत इटाली, फ्रान्स, व इंग्लंडमध्यें त्याला धर्माचें प्राबल्य दिसून आल्यावांचून राहिलें नसेल, आणि रशियांत तर धर्माचें नांवही ऐकावयाला मिळालें नसतें. कारण धर्माविरुद्ध मोहीम करणें हाच रशियन सरकारचा धर्म आहे !

रशियनांच्या दृष्टीनें पहावयाचें तर त्यांना अमानुल्लावर पडलेलें साम्राज्यवादी भुतांचें दडपण दूर करावयाचें होतें. अफगाण अमिराच्या वैयक्तिक गुणांवर लुब्ध होऊन रशियानें ( किंबहुना, कोठल्याही देशानें ) त्याचें स्वागत केलें नाहीं. आशियाखंडांतील ब्रिटिश साम्राज्याची मोठी इमारत कोसळून पाडण्याची—किंवा कोट्यवधि गरीब, गांजलेल्या बंदिस्तांच्या गंजलेल्या लोहशृंखला तोडण्याची—रशियन सरकारची सर्व खटपट चालू असल्यानें वाटेंत अफगाणिस्तानशीं सलोखा ठेवणें त्यांना आवश्यक आहे. म्हणजे अफगाण प्रदेशांत बोल्शेव्हिक मतप्रसार होऊं नये अशी त्यांची इच्छा नाहीं असें मात्र नव्हे. अफगाणिस्तानांत बोल्शेव्हिक राज्यपद्धति स्थापली गेली, तर मग काय ? ...... हिंदुस्थान रशियाच्या पूर्णपणें कह्यांत आलेंच म्हणून समजा. आणि याच हेतूस्तव अमानुल्लासारख्या रानटी, एकतंत्री राजास ( पादशहास ? ) त्यांनीं आपल्या राजनगरींत बोलाविलें, त्याचा उत्तम प्रकारें आदरसत्कार केला, कांहीं कानमंत्र दिले, व इतर जें करावयाचें होतें तें सर्व केलें.

आतां अमानुल्लानें युरोपांत भेट दिलेल्या राष्ट्रांपैकीं शेवटचें जें तुर्कस्तान, त्याचे अनभिषिक्त राजे—गाजी **मुस्तफा केमाल**—म्हणजे अमानुल्लाचा चालता-बोलता कित्ताच होता, तेव्हां अंगोरास जाणें अत्यावश्यक होतें. केमालचें परिपूर्ण अनुकरण करण्याचा त्याच्या 'मानस' भावानें—अमानुल्लानें—निश्चयच केला होता. आणि त्यांत त्यास केमालची पूर्ण अनुमति होती. तुर्कस्तानशीं झालेल्या अफगाण तहांत अमानुल्लाच्या तुर्कस्तानांतील प्रवासाचें सार आहे. इतर सर्व राष्ट्रांची मतलबी दृष्टि आणि तुलनात्मक दृष्टया तुर्कस्तानची स्नेही वृत्ति यांतील फरक अमानुल्लास नजर म्हणून मिळालेल्या वस्तूंवरून दिसून येईल. कोणीं मोटारी, कोणीं विमानें, कोणी नकाशे दिले, तर राजपदवीस साजतील अशाच जडजवाहिरमय चिजा केमालनें आपलें अनुकरण करणाऱ्या आपल्या धाकटया भावास दिल्या. असो.

यानंतर शेवटीं अमानुल्ला इराणकडे वळला. इराणच्या शहाशीं अमानुल्लाची दोस्ती यथातथाच झाली असें म्हणतां येईल. वाटेंत तेहरान लागलें, म्हणूनच अफगाण अमीर तिकडे गेला. केमालप्रमाणेंच इराणी शहा मुसलमानी प्रजेची व प्रगति घडून येईल अशा मार्गाचा अवलंब करीत असला, तरी अमानुल्लाविषयीं शहाचें किंवा शहाविषयीं अमानुल्लाचें मत असावें तितकें चांगलें नव्हतें हें खरें. त्याचें प्रत्यंतर अमानुल्लानें तेहरानमध्यें केलेल्या भाषणांत आढळतें. पण या शेजारी राष्ट्रांचा धर्म एक असूनही त्यांची आपसांतील ही असमाधानी वृत्ति कां, अशी शंका कोणीं उपस्थित केल्यास इराणच्या पूर्वेतिहासांत तिचें उत्तर आढळेल. हिरात हें इराणला पाहिजे आहे; कारण मागें तें इराणच्याच अंमलाखालीं होतें. परंतु पेशावर अफगाणांना पाहिजे असलें तरी इंग्रज मुत्सद्दी जसे तें गमावण्यास मुळींच तयार नाहींत, तसेंच अफगाण अमीर हिरात सोडण्यास कदापिही सिद्ध होणार नाहीं. ह्या अशा अहमहमिकेमुळें इराणचा शहा व अफगाण अमीर यांचें विशेष रहस्य जमूं शकलें नाहीं. शिवाय दोघेही आपापल्या परीनें जगाच्या विस्तृत मैदानावर कोणाचा देश प्रथम प्रगतीचें शिखर गांठतो या स्पर्धेनें नव्या नव्या सुधारणा प्रजेवर लादीत आहेत. त्यांतून ते शेजारी. तेव्हां इराणमधील अमानुल्लाचें वास्तव्य अगदीं औपचारिकच झालें असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

एकंदरीनें पाहतां अमानुल्लानें ही अपूर्वच सफर केली असें म्हणतां येईल. आशियाखंडांतले जे जे राजे अन्यदेशीं जात ते ते सर्व आक्रमण करण्याच्या स्पष्ट हेतूनेंच प्रेरित असत. पण त्यांनीं बहुधा स्वीय खंडांतच मुलुखगिरी केली. धर्म-

प्रसारासाठीं मात्र आशियांतील कांहीं धर्मनिष्ठांनीं युरोपमध्यें पराक्रम गाजविला होता. युरोपांतील राजे देखील सर्व ' स्नेही '* राजांचा पाहुणचार घेत चहूंकडे संचार करीत गेल्याचें उदाहरण नाहीं. आपल्या राज्याची सुधारणा करण्यासाठीं गतकालांत रशियन बादशहा पीटर दि ग्रेट हा युरोपभर हिंडत होता हें यद्यपि खरें असलें, तथापि तो गुप्त वेषानें संचार करीत होता ही गोष्ट दृष्टिआड करून चालणार नाहीं. नेपोलियननें तर सर्व युरोप एक वेळ सोडून अनेक वेळां शब्दशः व लाक्षणिक अर्थानेंही पादाक्रांत केलें होतें. पण अमानुल्लाची युरोपियन सफर ही अगदीं वेगळ्या स्वरूपाची आहे. तिला इतिहासांत तोडच नाही असें म्हणतां येईल.†

**१४६. युरोपच्या सफरीस लागलेलें 'गालबोट'** :—अमानुल्ला युरोपभर संचार करीत असतां काबूलचें राज्य **महमद वलीखान** याच्या ताब्यांत होतें हें मागें सांगितलेंच. अमिराच्या पश्चात् राजनगरींत सहसा शांतता नांदत नाही, बंडें उद्भवतात, हा अफगाण इतिहासावरून निघालेला सिद्धांत आहे. म्हणून अफगाण अमीर सहसा स्वदेशाच्या बाहेर जात नसत. पण अमानुल्लाचें सगळेंच अपूर्व. त्यानें आपला प्रतिनिधी नेमून सर्व कार्य व्यवस्थित चालावें अशी तजवीज केली. त्याच अवधींत बंडें झालीं, नसलीं तरी राजासन बळकावण्याचा एक क्षुल्लक प्रयत्न ' करविला ' गेला.

जून १९२८ च्या मध्यास **करमखान** नामक एक तोतया " मी अफगाणिस्तानचा खराखुरा वारस आहे " असें सांगून मृत अमिराशीं. बादरायण संबंध जोडून काबूलचें सिंहासन बळकावण्याच्या हेतूनें हिंदुस्थानांतून तिकडे गेला. अमानुल्ला हीनकुलोत्पन्न आहे, तो बलानें अमीर झाला आहे, असें सांगत करमखान बन्नूहून काबूलकडे जात असतां वाटेंत हिंदी सरहद्दीपलीकडील राजनिष्ठ अफगाण टोळ्यांनीं त्याला पकडलें व बंदोबस्तानिशीं दरबारी चौकशीसाठीं काबूलला पाठविलें.

---

* राजकारणांत स्नेह या शुद्ध शब्दाची इतकी विटंबना होत असलेली पाहून कोणा कोशकारास किंवा ' शब्दसृष्टीच्या सागरास ' वाईट वाटणार नाही ?

† या सफरीच्या सविस्तर वर्णनाला आधार सर्वस्वी ' लंडन टाइम्स 'चाच असल्यानें ठिकठिकाणीं निर्देश केला नाहीं. अन्यत्र कोठेंही इतकी संगतवार माहिती आली नाहीं व येणें शक्यही नव्हतें.

तेथें करमखाननें कांहीं गोष्टी सांगितल्या त्यांचा स्पष्ट उलगडा इतक्यांत होण्यासारखा नाहीं. " एका काश्मिरी सय्यदानें मला बन्नूस पाठविलें आणि तेथें दोन महिने मला माझ्या सोंगाच्या बतावणीची शिकवण त्या सय्यदाकडूनच मिळत असे. नंतर **मिरनशहाच्या** मार्गानें मजबरोबर लवाजमा देऊन त्या सय्य-दानेंच मला इकडे पाठविलें. नोकरचाकर वगैरे सर्वांचा खर्च सय्यदानेंच सोसला." इत्यादि इत्यादि.

करमखानाची योग्य ती वासलात अफगाण अधिकाऱ्यांनीं लावलीच. त्याला न्यायासनापुढें खेंचून शिक्षा फर्माविण्यांत आली. पण त्यानें सांगितलेल्या कहा-णीची वासलात आपणांस इतक्यांत नीटपणें लावतां येणार नाही. पुढें यथावकाश या प्रसंगावर किंचित् अधिक प्रकाश पाडणारी माहिती येणार आहे.

## प्रकरण नववें

# अमीर अमानुल्ला : नवीन सुधारणा व राज्यत्याग

१४७. **सुधारणा अमलांत आणण्याची उत्कंठा** :—युरोपहून आल्यानंतर अमीर अमानुल्लाला एकच ध्यास रात्रंदिवस लागला होता. आणि तो म्हणजे अफगाणिस्तानला आधुनिक जगांतील इतर पुढारलेल्या देशांच्या रांगेंत आणून बसविण्याचा. आपल्या देशांतील लोकांच्या पोषाखाच्या जुन्या तऱ्हा, अडाणी समजुती, धार्मिक वेड इत्यादि जों जों त्याच्या दृष्टीस पडे, तों तों त्याचा उत्साह वाढे आणि शक्य असतें तर त्यानें 'यक्षिणीची कांडी' मिळविण्याचेही आटोकाट प्रयत्न करून आपलें उद्दिष्ट कार्य साधलें असतें. परंतु कायदे करणें, फर्मानें काढणें याविना तिसरा मार्ग त्याला उपलब्ध नव्हता. तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. कायदे केले किंवा फर्मानें छापलीं, पण त्यांतील हुकुमानुसार जर कोणी वागलें नाहीं तर काय उपयोग ? अमानुल्लाची अडचण तीच होती. इतक्या वर्षांची अंगांत मुरलेली रीतभात एकाएकीं बदलतां येणें शक्य नव्हतें हें त्याला दिसून आले. पण तीव्र इच्छा होती म्हणून त्यानें सक्तीनें लोकहितार्थ कांही सुधारणा जनतेवर लादल्या.

१४८. **युरोपियन सफरींतील कामगिरी व कमाई** :—युरोपच्या सफरींत अमानुल्लाच्या श्वशुरांनीं—परराष्ट्रीय मंत्री या नात्यानें—इंग्लंड, इराण, जपान, तुर्कस्तान, ईजिप्त, फिन्लंड, पोलंड, स्वित्झर्लंड, बोलिव्हिया या देशांशीं नवे तह केले. तसेंच **वहाबी नरेश इब्न सौद, येमेन** ( अरबस्तान ) व चीन येथील सरकार यांच्याशीं तहाची वाटाघाट चालू होतीच. अमानुल्ला नुसता संचार करून येतांच त्याची व त्याच्या देशाची किंमत आंतरराष्ट्रीय व्यवहारांत किती चढली हें कळण्यास वरील देशांचीं नांवेंच पुरेशीं आहेत.

राज्यांतील अंतर्गत सुधारणेस हात घालण्यापूर्वी अमानुल्लानें आपल्या सफरीच्या कार्याचें सिंहावलोकन केलें. त्याचा एकूण खर्च अदमासें दोन लक्ष रुपये ( १५००० पौंड ) आला; तर नजराणे व सन्मानादाखल मिळालेल्या वस्तूंची किंमतच सहा कोट रुपये ( ४५,००,००० पौंड ) झाली.* हें सर्व जनतेस समजावून सांगिल्यावर त्यांची त्याच्या सफरीस हरकतही आली नाहीं. उलट आपल्या अमिरानें मोठ्या कुशलतेनें आणि हुशारीनें ही कमाई केली याबद्दल त्यांना अभिमानच वाटला.

**१४९. अमानुल्लाची सामाजिक सुधारणा** :—जुलै १९२८ मध्यें अमानुल्लानें एक फर्मान काढून झनानखान्यांत नवीन भरती करण्याची बंदी केली व अतःपर कोणासही एका वेळीं एकापेक्षां जास्त बायका असूं नयेत असा कायदा केला. जर कोणी या हुकुमानंतर आपला झनानखाना वाढवील तर त्याला दंड केला जाईल, आणि अधिकाऱ्यांकडून हा गुन्हा घडल्यास त्यांच्या पगारावर गदा येईल असें त्यानें फर्माविलें. युरोपच्या वातावरणांत राहिल्यानें स्त्रीदाक्षिण्याचे धडे अमानुल्लाला पुष्कळ मिळाले होते. झनानखान्यांतच बहुतेक अमीरउमरावांचा कालक्षेप कसा चालतो हें त्यास ठाऊक होतें. राज्यांतील प्रत्येक घटकानें, प्रत्येक प्रजाजनानें कार्यक्षम व्हावें, स्वदेशप्रगतीस यथाशक्ति हातभार लावावा, अशी अमानुल्लाची इच्छा असल्यानें केवळ राजकीय सुधारणांवरच त्यानें भर दिला नाहीं. सामाजिक बाबतींत तो तटस्थ किंवा विरक्त नव्हता.

स्त्रियांचा एक क्लब काबूलमध्यें स्थापण्यांत आला व तशाच प्रकारच्या स्त्रियांच्या संस्थाही मोठमोठ्या शहरीं निघाल्या होत्या असें तत्कालीन वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें होतें.

एवढेंच करून तो थांबला नाहीं. मुलींचीं लग्नें त्या अठरा वर्षांच्या झाल्याविना होऊं नयेत असा कायदा अमानुल्लानें केला¶ ! मुलींना व विवाहित स्त्रियांस बुरखा न घेतां हिंडण्यास प्रोत्साहनही त्यानें दिलें. मुलामुलींना एकत्र शिकण्याची सोय करून त्या शाळेंत अमिरानें आपल्या मुली पाठविल्या व मंत्र्यांनाही तसेंच करण्यास सांगितलें ! १५ सप्टेंबर १९२८ रोजीं भरलेल्या एका सार्वजनिक सभेंत अमानुल्लानें बुरख्याची घातुक चाल सोडण्याबद्दल जनतेला

* *The Times*, London, 31-10-1928, 13*e*.

¶ *Asia Magazine*, June 1929.

दहावा अफगाण स्वातंत्र्य-दिन, पाघमान



पाघमान



अमानुल्लानें निर्माण केलेल्या राजनगरीचें दृश्य.

बालोद्यान प्रेस. पुणें.

विनंति केली, आणि सूरय्या राणीचा बुरखा स्वहस्तानें त्यानें भर सभेंत काढून टाकला !

१५०. **अफगाणिस्तानचें " पार्लमेंट "**:—राजकीय सुधारणांत अमिरानें प्रथमतः दोन लोकसभा स्थापण्याचें काम हातीं घेतलें. सातशें प्रतिनिधींची निवड करून त्यांनीं राजनगरींत बसून राज्यकारभाराची चर्चा करावी अशी त्याची योजना होती. अफगाणिस्तानच्या निरनिराळ्या भागांतून व शहरांतून हे प्रतिनिधी निवडले जावयाचे व वर्षांतून आठ महिने त्यांनीं देशकार्यासाठीं जमावयाचें; या प्रतिनिधींची निवडणूक दर तीन वर्षांनीं व्हावयाची असें ठरलें होतें. या ७०० प्रतिनिधींतून दीडशें निवडक मंडळी काढावयाची व त्यांचें वरिष्ठ मंडळ बनवावयाचें असा अमानुल्लाचा बेत होता. सातशें प्रतिनिधींच्या मोठ्या मंडळीस '**लोइ जिरगा**' असें नांव होतें.

अमानुल्ला दरवर्षी एप्रिलमध्यें अफगाण स्वातंत्र्यदिन साजरा करीत असे. परंतु युरोपच्या सफरींत तो काल निघून गेल्यामुळें तो परत स्वदेशीं आल्यावर ऑगस्टमध्यें पाघमानमध्यें तो महत्त्वपूर्ण ऐतिहासिक दिवस साजरा करण्याचें ठरलें होतें. अमानुल्लाच्या यशस्वी युरोपियन प्रवासामुळें त्या समारंभास विशेष रंग चढणार होता आणि त्याच वेळीं लोइ जिरग्याची पहिली—अरेरे ! अमानुल्लाच्या कारकीर्दींतील तीच पाहिली आणि तीच शेवटची सभा ठरली हा दैवदुर्विलास क्रूर खरा !—बैठक व्हावयाची होती. तेथें सर्व सातशें सभासदांना नव्या पद्धतीचे पोषाख देण्यांत आले. बहुतेकांच्या दाढ्या काढलेल्या होत्या. त्या सर्वांना अमीर अगदीं प्रेमानें व आगत्यानें पण नव्या पद्धतीनें भेटला. त्यांच्याशीं त्यानें हस्तांदोलन केलें. लोकांचा त्या वेळचा तो उत्साह किती अपूर्व ! राजा अगदी आपणांत मिळून मिसळून वागतो, आपणांस राज्यकारभाराच्या बाबतींत सल्ला विचारतो, फुकट नवे कपडे देतो इत्यादि आनंदाच्या भरांतच सर्व प्रजाजन मग्न होते.

१५१. **शिक्षणविषयक सुधारणा** :—'हृष्त नफरी' म्हणजे आठ मनुष्यांत एकाला लष्करी शिक्षणासाठीं सक्तीनें घ्यावयाचें ही पद्धत पूर्वी फक्त दोन वर्षांपुरतीच असे. म्हणजे लष्करी शिक्षण दोन वर्षांत पुरें होई. परंतु अमानुल्लानें ती मुदत तीन वर्षांची केली. लष्करी शिक्षणाकडेच त्यानें लक्ष दिलें असें नव्हे. तर बौद्धिक शिक्षणापैकीं प्राथमिक शिक्षण मोठमोठ्या गांवांतून आणि

शहरांतून सक्तीचें केलें. मात्र तें मोफत नव्हतें. साधारणपणें प्रत्येक विद्यार्थ्याला सालीना दोन पौंड ( २६।। रु.) फी म्हणून खर्च येई.|| शाळेंतील शिक्षणक्रम संपतांच प्रत्येक विद्यार्थ्यास एक वर्षभर लष्करी शिक्षण घेतलेंच पाहिजे अशी सक्ती करण्यांत आली.

काबूल व कंदाहार येथें दोन कॉलेजें बांधण्याची व्यवस्था झाली होती व त्यांचें काम देखील सुरू झालें होतें. तसेंच **खुर्द झबितर** येथें एक लष्करी अधिकाऱ्यांसाठीं कॉलेज उघडण्याची तजवीज झाली होती. पण...... !

राज्यकारभाराचें शिक्षण घेण्यासाठीं रशिया, फ्रान्स व इटाली या तीन देशांत मिळून ६५ अधिकारी अमानुल्लानें पाठविले होते व आणखी २० निघण्याच्या तयारींत होते. **बाकू** येथें १५ विद्यार्थी खनिज तैलशास्त्र शिकण्यासाठीं पाठविण्याचें ठरलें. तुर्कस्तानांत अभ्यासासाठीं वा लष्करी शिक्षणासाठीं जे विद्यार्थी जावयाचे त्यांना प्रथमपासूनच तुर्की भाषा शिकविण्याची योजना अंमलांत आली होती. मुलें व मुली मिळून सुमारें १५० अफगाण तुर्कस्तानांत शिक्षणासाठीं पाठविण्यांत आले. मुंबईतील युवकांनीं त्यांचें बॅ. **मु. रा. जयकर** यांच्या अध्यक्षतेखालीं स्वागत करून अल्पोपाहारही दिला होता. फ्रेंच शाळेंतील विद्यार्थ्यांची संख्या वाढत होती आणि एक वर्षाच्या आंत ( १९३० च्या मध्यास ) ३०-४० ग्रॅज्युएट्स् जर्मनींत अथवा फ्रान्समध्यें जाण्यास तयार झाले असते. पण ......!

**१५२. राष्ट्रीय ध्वजाचा पुनर्जन्म** :—पूर्वीचा अफगाणी राष्ट्रीय ध्वज काळा असून त्यावर पांढऱ्या रंगांत, सूर्य, डोंगर आणि कांहीं हत्यारांची एक जुडी इतकी चित्रें असत. अमानुल्लानें युरोपहून येतांच आपलें जुनें निशाण बदललें. पांढऱ्या आकृति कायम ठेवून, काळा, तांबडा व हिरवा असे तीन रंग त्या निशाणावर आणण्याचें अमानुल्लानें सुचविलें. गतकालाचा निदर्शक म्हणून काळा रंग ठेवला होता; तांबडा रंग धैर्यसूचक मानला जाईल, तर हिरव्याने पुनर्जन्माची किंवा नव्या अवताराची आठवण होईल, अशी विचारसरणी नवीन झेंडा स्वीकारतांना जनतेपुढें मांडली गेली. अमानुल्लाची लोकप्रियता व त्याचें प्रजाजनांवरील वजन अत्युच्च पदाला पोहोंचल्याची स्पष्ट खूण ती हीच. ध्वजासारखी पुरातन परंपरेचा अभिमान बाळगण्याची बाब, पण तिच्यांतील फेरबदल बिनहरकत अफगाणांनीं मान्य केला तो केवळ अमानुल्लानें सुचविला म्हणून.

---

|| *The Times*, London, 25-10-1928, 17 *c*.

१५३. **दरबारी समारंभांस फांटा** :—दरबारी वागण्याचे शिष्टसांप्रदाय, कोणाचा मान पहिल्यानें बसण्याचा, कोणाचा अमिराचे उजवे बाजूस तर कोणाचा त्याचे पाठीमागें, तसेंच वंदन करण्याचे ठराविक प्रकार इत्यादि दरबारी बंधनें अमानुल्लानें काढून टाकलीं. राजसभेंतील ठराविक आचार अतःपर बंधनकारक नाहींत असें जाहीर केलें. ह्या निर्बंधांचें प्रस्थ इतकें माजतें कीं, त्यासाठीं एक वेगळा अधिकारी आचारपंडित ( Master of Ceremonies) म्हणून नेमावा लागतो ! तें सर्व अमानुल्लानें नको असें ठरविलें. तसेंच, लवाजमा व इतर सरंजामही उमराव व अमिराबरोबर जात असे. त्याची आवश्यकता नाहीं असें फर्मावून तो पोकळ डौल व तज्जन्य इतर खर्चाच्या बाबी त्यानें कमी केल्या.

१५४. **लोकांवर लादलेला नवा कर** :— वरील दरबारी रिवाजांची पद्धत मोडल्यानें थोडीशी बचत झाली खरी; पण इतर सुधारणांसाठीं सरकारी तिजोरीवर बोजा फार पडला. आणि सरकार तरी पैसे आणणार कोठून ? ते सर्व रयतेच्या खिशांतूनच गेले. विद्यार्थी परदेशांत अभ्यासासाठीं पाठवावयाचे, परदेशांत वकील नेमावयाचे, स्वदेशांत चालविलेल्या शिक्षणसंस्थांचा सर्व खर्च भागवावयाचा, म्हणून प्रजेवर नवीन कर बसविणें क्रमप्राप्त होतें. अप्रत्यक्ष कर बसवून ही अधिक लागणारी रकम मिळवितां आली असती. परंतु अमानुल्लाच्या मनांत, प्रत्येक प्रजाजनानें आपण होऊन या सत्कृत्यांस मदत करावी, असें होतें. म्हणून त्यानें प्रत्यक्ष कर लादला. पंधरा वर्षांवरील प्रत्येक पुरुषानें पांच रुपये द्यावे, प्रत्येक सरकारी अधिकाऱ्यानें एक महिन्याचा पगार द्यावा आणि व्यापाऱ्यानें आपणांस जास्तींत जास्त देतां येईल तितकी रकम द्यावी असें अमानुल्लाचें फर्मान सुटलें. तत्काल एक काबुली व्यापाऱ्यानें रु. १,००,००० दिले व आपली राजनिष्ठा आणि सुधारणांबद्दल कळकळ प्रदर्शित केली.[३]

१५५. **इतर महत्त्वाच्या सुधारणा**:— राजनगरींत आणि सरकारी कचेऱ्यांतून युरोपियन पोषाख वापरला जावा असें फर्मान सुटलें. साहेबी टोपीच प्रत्येकानें घालावी असा नियम झाला. अफगाणिस्तानांतील शीख प्रजाजनांवर हा जुलूम होत आहे, शीखधर्माविरुद्ध हें आचरण होईल, इत्यादि ओरड हिंदुस्थानांतील शिखांनीं कां चालविली होती तें समजत नाहीं. कारण काबूलस्थ शिखांनीं ती नवी

[३] *Asia Magazine*, June 1929.

आज्ञा तक्रार न करतां मानली होती. हिंदुस्थानसरकारमार्फत आपलें गाऱ्हाणें काबूलच्या मंत्रिमंडळापुढें मांडण्यासाठीं शिखांनीं खटपट केली आणि त्या कारवाईस प्रारंभही झाला होता असें म्हणतात. प्रजाहितदक्षतेचा पाझर असा सटींसामासीं फुटला तेव्हां अंतस्थ हेतु कांहीं वेगळा होता कीं काय अशी शंका घेण्यास जागा राहते. अस्तु. लष्करांतील सैनिकांनीं वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या परवानगीविना मुल्लां-च्या किंवा पीरांच्या भजनीं लागूं नये असें अमानुल्लानें फर्माविलें. पूर्वी शुक्रवारीं 'आमतातील' ( सार्वजनिक सुट्टी ) असे, ती बदलून त्यानें रविवारीच सुट्टी असावी असा हुकूम सोडला. प्रत्येक रहिवाशानें ओळखपत्र (Certificate of identity) जवळ बाळगावें असाही एक नियम अमलांत आला. त्यामुळें सरकारदप्तरीं प्रजा-जनांची संपूर्ण नोंद राहूं लागली.

अफगाणिस्तानांत रेल्वे अशी मुळीं नाहींच. मिटरगेजचा एक ५–७ मैलांचा फांटा राजनगरीजवळ नुकताच झाला असला तरी त्याला व्यापारी अथवा दळण-वळणाच्या दृष्टीनें कांहीच किंमत नाही. फ्रान्समधील एका कंपनीकडे उत्तर प्रदेशां-तील रेल्वे करण्याचें व जर्मनींतील एका कंपनीकडे दक्षिण भागांत रेल्वे सुरू करण्याचें काम सोंपविण्यांत आलें होतें. ' दार–उल्–अमान ' ही काबुलच्या जवळ नवी राजनगरी वसविण्याचें काम ताबडतोब पुरें करण्याचें ठरविलें. तसेंच नियोजित युनिव्हर्सिटीसाठी इमारती बांधण्याची व इतर व्यवस्था करण्याची अमानुल्लाची खटपट चालू होतीच. शिवाय सैन्याची शिस्त व लष्करी खात्याची पुनर्घटना यांकडे अवश्य लक्ष दिलें पाहिजे, हें त्याला युरोपच्या प्रवासानें कळून चुकलें होतेंच. त्याप्रमाणें तो तयारीसही लागला. तुर्की लष्करी तज्ज्ञांना त्यानें बोलाविलें होतें. न्यायसभांची सुधारणा करण्याची योजना विचारासाठीं घेतली असून काबूलमध्यें एक बँक स्थापण्याचीही वाटाघाट चालू होती.

१५६. **सुधारणांचे तत्कालीन परिणाम**:—राजधानींत अमानुल्लाच्या सहवासांत असलेल्या अधिकाऱ्यांना व इतर कांहीं थोडक्या विचारी मंडळींना सुधारणांचें महत्त्व पटल्यामुळें त्यांना त्यांत कांहींच गैर दिसलें नाहीं. महिन्याच्या पगाराची गोष्ट कशाला, त्यांच्यापैकीं कांहींजण आपलें सर्व आयुष्य देशोन्नतीसाठीं खर्चण्यास तयार होते. स्त्रियांचा 'पडदा' काढून टाकल्यानें त्यांचें काहीं नुकसान झालें नाही, किंवा मुलामुलींना शाळेत पाठविलें म्हणून त्यांच्या भावना दुखविल्या जाणें शक्य नव्हतें. त्यांची देशहिताची तळमळ अमानुल्लाच्या कळकळीइतकी

दार–उल्–अमान (काबूल जवळ)



अफगाण सेक्रेटॅरीएटची इमारत



‘रोल्सरॉईस’ मोटारमधून अमानुल्ला उतरत असतां

बालोद्यान प्रेस, पुणें

तीव्र नसली तरी मनापासूनची असल्यानें, अशा सुधारणांस त्यांच्याकडून विरोध होणें शक्य नव्हतें. परंतु अफगाण जनतेंत खेडवळांचेंच प्राबल्य अधिक आहे. त्यांच्या गरजा, त्यांच्या अडचणी आणि त्यांचें हिताहित इत्यादिकांकडे दुर्लक्ष करून कसें चालेल ? या नव्या सुधारणांनीं त्यांच्यावर काय इष्टानिष्ट परिणाम घडून आले तें पाहूं.

राणीचा बुरखा अमिरानें काढून टाकला ही बातमी ऐकून त्या खेडवळ अफगाणांना एकदम एक प्रकारचा मानसिक धक्का बसला असेल हें खरें. जुन्या व शास्त्रसंमत रूढीचा पाश एकदम तोडणारा सुधारक सर्व काळीं सर्व बहुजन-समाजास असे धक्के देत असतोच; पण पडद्याच्या उचलबांगडीपासून खेडवळ अफगाणांना प्रत्यक्ष त्रास असा कांहींच नव्हता. कारण बुरख्याची चाल खेडो-पाडी जवळजवळ नसतेच. आणि काबूलमध्यें राणीनें बुरखा काढला म्हणून त्यांचें काय मोठें नुकसान होणार होतें ? नुसती साधी भावना अथवा परंपराविषयक अभिमान दुखविल्यानें मनुष्य कधीं चवताळत नाहीं. अगदींच निकटच्या संबंधांत भावनांना धक्का बसल्यावरच तो क्रुद्ध होऊन प्रतिकार करतो.

झनानखान्याची चाल तर केवळ अमीरउमरावांची किंवा उच्च अधि-काऱ्यांची असावयाची. ती बंद केल्यामुळें खेडवळांस कांहींच संकट प्राप्त झालें नाहीं, किंवा त्यांचे विलासही थांबले अशांतला प्रकार झाला नाहीं.

मुलींचीं लग्नें वयाच्या अठराव्या वर्षापूर्वी करूं नयेत हा दंडक मात्र अफ-गाणांना विचित्र वाटला. स्त्रियांच्या बाबतींतील अफगाणी आचार इतके आश्चर्य-कारक आहेत, की ते सांगितल्यास हसूंच येईल. मुलीचें नांव त्रयस्थांस सांगणें म्हणजे तिला भ्रष्ट करण्याइतकेंच निंद्य कर्म आहे, अशी बहुतेक अफगाण खेड-वळांची समजूत असते ! तेव्हां मुलींचीं लग्नें अठरा वर्षें करावयाचीं नाहींत असा कायदा अमीर करतो, ही ढवळाढवळच त्यांना मुळीं पटेना ! चौदा वर्षांपर्यंत विवाह-मर्यादा घातली तर आपणांकडे त्याविरुद्ध किती काहूर माजलें; मग अफगाणि-स्तानसारख्या मागासलेल्या देशांत ती मर्यादा १८ वर्षांची केल्यास जनतेचा विरोध किती तीव्र झाला असेल याची कल्पना करतां येईल.

विलायती कपडे घालण्याची सक्ती अफगाण जनतेला साहजिकच जाचक व आर्थिक दृष्टया अधिक खर्चाची वाटली. तेव्हां लोकमत प्रचलित राजसत्तेविरुद्ध खवळत जाण्यास ह्या नियमानें मदतच झाली. शिवाय ओळखपत्रें घेतल्याशिवाय

प्रवास करणें अफगाणांना मुष्कील झाल्यानें त्यांना अमानुल्लाचा फार राग आला. विशेषतः लुटालूट करणाऱ्या आणि सदैव भटकत असणाऱ्या मेंढपाळांना नव्या नियमानें आपल्या निसर्गदत्त व जन्मसिद्ध हक्कांवर मोठीच गदा आली असें वाटलें.

सैनिकांस मुल्लांच्या अथवा पीरांच्या भजनी लागण्यास देखील बंदी केल्यानें मुल्ला व पीर यांचें पित्त खवळलेंच; पण सैनिकांनाही आपल्या धार्मिक आचारांत ही सरकारी ढवळाढवळ मुळींच खपली नाहीं. धर्माचें स्वरूप कसेंही असो, स्वधर्म-रक्षणासाठीं सर्व देशांतील लोकांनी सर्व कालीं प्राणार्पण करण्यासही मागें पुढें पाहिलें नाहीं, हें ऐतिहासिक सत्य लक्षांत घेतल्यास अमानुल्लाची ही आज्ञा अत्यंत अविचारीपणाचीच ठरेल !

बायकांनीं पुरुषांसारखें जमून करमणुकीसाठीं अनेक प्रकारचे खेळ खेळावे इत्यादि प्रकार नवे म्हणून अफगाणांना विचित्र वाटले असले, तरी त्यामुळें जनता खवळली असें नव्हे. लोकक्षोभ होणाऱ्या बाबी ज्या होत्या त्या वर दिल्याच आहेत.

‘ पार्लमेंटांत ’ आपला प्रतिनिधि जाणार एवढ्यानें जनतेला फार आनंद झाला असें नव्हे. पण आपणांपैकीं एक ‘ बादशहा’ला भेटणार, नवे कपडे घालणार व काबूलमध्यें राहणार इत्यादि कल्पनांनींच त्यांना आनंद झाला. ‘ हश्त नफरी ’ मात्र त्यांना नडत असे. सक्तीनें लष्करांत जावें लागावें ही ‘ इष्टापत्ति ’ आहे इतकें समजण्याचें ज्ञान त्यांना कसें असणार ? आज आपणांस ‘ विनाकारण ’ लष्करांत जावें लागतें व दोन नव्हे, तीन वर्षें राबावें लागणार एवढीं बंधनेंच त्यांना दिसत, आणि म्हणून त्यांचा असंतोष वाढण्यास तें एक कारण झालें.

राष्ट्रीय ध्वज, परदेशी विद्यार्थी व अधिकारी पाठविणें इत्यादि गोष्टी खेड-वळांना महत्त्वाच्या कशा वाटणार ? मात्र प्रत्येक पुरुषानें ( १५ वर्षांवरील ‘बच्चा’ पुरुष धरला जाई ) पांच रुपये द्यावे हा निर्बंध त्यांना जाचकच झाला. लोकांची कमाई अगोदर थोडी; त्यांत सर्व कर पैशांत वसूल करण्याचा प्रघात आमिरानें पाडल्यानें त्यांना अधिक अडचणी आलेल्या; आतां त्यांत या पांच रुपयांची भर पडली ! अमानुल्लानें एखादा अप्रत्यक्ष कर बसविला असता, किंवा धान्य अथवा पिकाच्या रूपानें ही रक्कम वसूल केली असती तरीही त्याला विरोध झाला असता. पण अफगाणिस्तानच्या आधुनिकीकरणाच्या उत्साहाच्या भरांत त्याला ही जाणीव राहिली नाहीं. प्रत्यक्ष झळ लागली, स्वतःच्या पोटाला चिमटा बसला, कीं लोक तत्काळ प्रचलित राजसत्तेकडे बोट दाखवितात आणि आपल्या परिस्थितीची जबाब-

दारी राज्यांतील मुख्य व्यक्तीवर टाकतात. आर्थिक अडचणी लोकांना—विशेषतः खेड्यांतील जनतेला—फार बोचूं लागल्या, तेव्हां त्यांच्या मनांत अमीरपदाधिष्ठित व्यक्तिविषयींचा आदरभाव नष्ट होऊन त्या ठिकाणीं असंतोषाचें बीज रुजूं लागलें. अर्थात् त्याचा फायदा घेण्यासाठीं कित्येक जण टपले होतेच !

**१५७. अमानुल्लाच्या युरोपीय धोरणाचे दूरवरचे परिणाम :—** सूरय्याला सार्वजनिक सभेंत बुरख्याशिवाय आणली म्हणून कोणत्याही देशानें अफगाणिस्तानाविरुद्ध तक्रार केली नसती, किंवा दरबारी शिष्टाचार रद्द केल्यामुळें कोठल्याही राष्ट्रास काबूलाधिपतीविरुद्ध आरडाओरड करतां आली नसती. परंतु, फ्रान्स, जर्मनी, इटाली व तुर्कस्तान इत्यादि राष्ट्रांना अफगाणिस्तानच्या पुनर्घटनेंत मोठमोठीं कामें मिळालीं, आणि आपणांस मात्र अगदीं खुबीनें वगळण्यांत आलें ही गोष्ट निराश झालेल्या आशाळभूतांच्या डोक्यांत येण्यास अवधी लागला नाहीं. आपण ज्याचा इतका सन्मान केला, इतकी उद्बोधक व मनोरंजक स्थळें दाखविलीं, आपलें आरमारी वर्चस्व त्याच्यापुढें मिरविलें, वैमानिकांचें कौशल्य त्याच्या नजरेस आणलें, ज्याला भारी किंमतीचे नजराणे दिले, मेजवान्या दिल्या, त्या अमिरानें आपणांस मोठ्या चातुर्यानें दूर ठेवावें हे मानभावी इंग्रज राज्यकर्त्यास अपमानास्पद वाटलें. सुमारें शंभर वर्षें चालत आलेल्या शेजारधर्मावर अमानुल्लानें बोळा फिरविला अशी त्यांची समजूत झाली, क्रोधानल भडकला आणि आपली इभ्रत राखण्यासाठी......!

या ठिकाणी अशीही एक शंका संभवेल कीं अमानुल्लानें रशियास देखील वगळलें होतें; मग अस्वल कां चवताळलें नाहीं ? एकट्या सिंहालाच अमिरानें वगळलें असें नव्हे, तर शेजारच्या शिष्टांना, एकमेकांविषयीं मनांत किंतु उत्पन्न होऊं नये, म्हणून त्यानें दूरच ठेवलें होतें. मग रशिया खवळला कीं कसें ?

त्याचें उत्तर अगदीं सोपें आहे. रशियाशी झालेले दोनही तह अंमलांत असून त्याप्रमाणें दरसाल अमिरास खंडणी मिळत असे. शिवाय अफगाण वैमानिक दलांतील ब्रिटिशांकडून १९२४ साली विकत घेतलेलीं दोन विमानें वगळल्यास, बाकी सर्व विमानें रशियन होतीं. आणि वैमानिक खात्यांतील ३० अधिकारीही रशियनच होते ! म्हणजे लष्करी वैमानिक खातें सर्वस्वीं रशियनांच्या ताब्यांत होतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. यामुळें रशियास रागावण्यास कारण नव्हतें.

अफगाण अमिरानें रशियांत तैलशास्त्र शिकण्यासाठीं विद्यार्थी धाडणें किंवा रशियाशीं अशा प्रकारें सलगी ठेवणें हें कृत्य एक वेळ ब्रिटिशांच्या दृष्टीनें गैर ठरलें नसतें. परंतु तुर्की लष्करी तज्ज्ञ व जर्मन यांत्रिक कलाभिज्ञ आणि फ्रेंच शिक्षणाधिकारी यांना अफगाणिस्तानांत वाटेल तसें वावरावयास मिळतें, हें दूरदृष्टीच्या ब्रिटिश मुत्सद्यांस साम्राज्यसंरक्षणाच्या दृष्टीनें इष्ट दिसलें नाहीं, अनिष्ट वाटलें, म्हणूनच त्यांना राग आला. व्यापार, रेल्वेसाठी पाहणी, शिक्षण, इत्यादि कामांसाठीं प्रथमतः सवलत मिळवून एकदां चंचुप्रवेश करून घेतल्यानंतर त्या ठिकाणी आपल्या साम्राज्याची इमारत कशी उठवावी ही युक्ति सर्वच युरोपियन मुत्सद्यांच्या आंगवळणीं पडली आहे. इंग्रजांनीं तर आपलें प्रचंड साम्राज्य अशाच प्रकारांनी स्थापिलेलें आहे. तेव्हां जर्मनी, फ्रान्स किंवा तुर्कस्तान आपणांवर तोच प्रयोग करील ही भीति चोराचीं पाउलें ठाऊक असणाऱ्या ' चोरां'च्या मनांत उद्भवली असल्यास नवल नाहीं. अफगाणिस्तान म्हणजे हिंदुस्थानची देवडी. त्यांतील दक्षिणेकडची रेल्वे करण्याचें काम जर्मनीस दिलेलें. कंदाहार-केट्टा ह्या भागाची जर्मनी ' पाहणी ' करणार, यांतच किती तरी भयंकर अर्थ आहे असें इंग्रजांस वाटल्यास नवल नाहीं.

फ्रान्स आणि इंग्लंड युरोपियन युद्धकालीं दोस्त असले, तरी आतां तें स्नेहाचें नातें राहिलें नसून दोघांचा 'सवतीमत्सर' एकसारखा धुमसत आहे. त्यानें अद्याप पेट घेतला नाहीं इतकेंच. आशियांत ब्रिटिश सिंह हातपाय पसरत आहे, त्याला शक्य तर आळा घालण्याची तीव्र इच्छा फ्रान्सला आहे. म्हणूनच सीरियावर फ्रेंचांनीं मँडेट स्वीकारली आहे. आणि अशा फ्रान्सचे शिक्षणाधिकारी अफगाण जनतेस शिक्षण देणार, तेथील इंजिनियर उत्तर अफगाण प्रदेशांतील रेल्वे बांधणार आणि अफगाण विद्यार्थी उच्चाभ्यासालादेखील फ्रान्समध्येंच जाणार. अर्थात् ब्रिटिशांच्या डोक्यांत तिडिक उठविण्यास आणखी काय पाहिजे होतें ?

तुर्कस्तान तर बोलून चालून शत्रुपक्षीय होतें. ग्रीकांना पुढें करून ह्या ' युरोपमधील रोगी थेरडा ' गाडून टाकण्याचे दोस्तांनीं पुष्कळ बेत केले; परंतु सर्वांना तो पुरून उरला, इतकेंच नव्हे, तर कात टाकलेल्या सापाप्रमाणें आतां पुनः नव्या दमानें सर्व राष्ट्रकार्योंचा त्याचा गाडा चालू झाला आहे. अफगाण अमीर तुर्की गाझी मुस्ताफा केमालला वडील बंधूप्रमाणें तर लेखतोच, पण अगदीं त्याचाच कित्ता डोळ्यांपुढें ठेवून अमानुल्ला आपला राज्यकारभार हांकण्यास सुरुवात

करितो ! त्या तुर्कीकडे लष्करी खात्याची पुनर्घटना करण्याचें काम अफगाण अमिरानें सोंपविलें. शिवाय ब्रिटिश राजनीतीचे नमुने दाखवून तुर्की गाझीनें तिजविरुद्ध अमानुल्लास सल्लामसलत कशावरून दिली नसेल ? हिंदुस्थानसरकारशीं अफगाण राजाचें धोरण कसें असावें याविषयीं अमिरास तुर्की अधिकारी सल्ला न देतील तर केमालकडून कर्तव्यच्युतीचा दोषारोप त्यांचेवर खास होईल. आणि नव्या तुर्की तालमींत केमालच्या हाताखालीं तयार झालेले मुत्सद्दी अशी चूक कदापिही करणार नाहीं. तेव्हां तुर्कांनाही अफगाणिस्तानांत मिळालेला हा प्रवेश ब्रिटिशांस रुचला नसल्यास नवल नाहीं. तें असो. आपणांस सामान्यपणें इतकेंच पहावयाचें आहे, कीं अफगाणपुनर्घटनेंतील नव्या सुधारणांमुळें फ्रान्स, जर्मनी व तुर्कस्तान या राष्ट्रांच्या प्रतिनिधींस व तज्ज्ञांस अफगाणिस्तानांत विशेष प्रवेश मिळाला आणि त्यायोगें अमिरावर ब्रिटिशांची मर्जी खप्पा होण्यास कारण मिळालें.

मर्जी खप्पा झाली कीं नाहीं तें स्पष्टपणें कोठेंही नोंदलेलें नाही. पण नोव्हेंबर १९२८ च्या मध्यापासून पूर्व अफगाणिस्तानांतील '**शिनवरी**' लोकांनीं अफगाण अमिराविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें ही गोष्ट मात्र अगदीं खरी आहे.

**१५८. बंडाळीस प्रारंभ** :—अमानुल्लानें जनतेवर लादलेल्या सुधारणा अत्यंत सद्धेतुमूलक होत्या यांत तिलप्राय शंका नाहीं. परंतु त्यांच्यामुळें उद्भवलेले अनर्थ पाहिल्यानंतर अमानुल्लास अविचारीपणाबद्दल दोष देणें भाग पडतें. यदाकदाचित् अमानुल्लाचें कार्य यशस्वी ठरलें असतें, तर त्याची थोरवी फारच वाढली असती. परंतु अशा अशक्य गोष्टी साध्य करण्यासाठी जी तयारी लागते, जें सैन्य हुकमतीखालीं पाहिजे असतें किंवा जी दूरदृष्टी आवश्यक असते त्याबद्दल अमानुल्लानें योग्य ती काळजी न घेतल्यानें त्याच्या सद्धेतुप्रेरित राष्ट्रभक्तीस तात्कालिक फल अत्यंत कटु आलें. युरोपसंचार करून विद्यमान श्रेष्ठ प्रतीच्या राष्ट्रचालकांकडून त्यानें मोठा सन्मान मिळविला. त्याचें वर्णन नुकतेंच संपविल्यानंतर आतां सिंहाला शह देणाऱ्या या अमानुल्लाच्या पडत्या काळाचा इतिहास लिहावा लागावा हा खरोखरीच मोठा दैवदुर्विलास म्हटला पाहिजे. नेपोलियनच्या युरोपखंडाच्या आक्रमणाचा इतिहास लिहिणारास लगेच त्या फ्रेंच बादशहाचा सेंट हेलिनांतील दुःखद बंदिवास नमूद करण्याची कष्टद पाळी यावी

तशापैकीच कांहींसा हा प्रकार आहे. पण एकदां अंगीकृत केलेलें इतिहास-कथनाचें कार्य शेवटास नेणें भाग आहे.

अमानुल्ला जुलै महिन्यांत काबूलला पोहोंचला. जेथें त्याला पुरे सहा महिनेही पूर्ण रहावयास मिळाले नाहींत, तोंच नोव्हेंबरमध्याचे सुमारास पूर्व अफगाणिस्तानांत जलालाबादेकडे शिवनरी लोकांनीं बंडाचें निशाण उभारलें अशी बातमी आली. प्रथमतः ही क्षुल्लक बाब असेल म्हणून अमिरानें तिकडे दुर्लक्ष केलें. प्रांतिक गव्ह-र्नराकरवीं तिकडील बंदोबस्त करण्यासाठीं हुकुम दिले गेले. परंतु आठ नऊ दिवसांत तें बंड इतकें पेटलें, कीं २४ नोव्हेंबर १९२८ रोजी अमानुल्लास जातीनें जलालाबादेस बंडखोरांचा पाडाव करण्यासाठीं सैन्यासह जावें लागलें. विमानें आलीं, त्यांनीं हस्तपत्रकें वाटून बाँबची धमकावणी दिली; अमानुल्लाचे मंत्री बंडखोरांशीं शिष्टाई करण्यास गेले, पण कांहींच उपयोग होईना. कोणी एक भिस्त्याचा पोर (बच्चा-इ-सक्का) बंडखोरांचा स्वयंमन्य पुढारी म्हणून अमानुल्लाला विरोध करण्यासाठीं उठला होता. बंडखोरांनीं जलालाबाद पूर्णपणें वेढून टाकलें. जाळपोळ, लुटालूट, मारामारी इत्यादि अव्यवस्था आसपासच्या प्रदेशांत माजली. काबूल ते पेशावरचें दळणवळण बंद झालें. व्यापारी काफिले मध्येंच अडकून राहिले. पेशावरहून निघणाऱ्या मोटारी फार फार तर डाक्या-पर्यंत जात व तेथून कांहीं तरी भीतिग्रस्त बातमी घेऊन परत फिरत. व्यापारी वर्गांत हाहाःकार उडाला !

**१५९. ब्रिटिशांना लागलेली घोर चिंता** :—इकडे ब्रिटिशसरकारवर तर फारच मोठी जबाबदारी पडली. शिनवरी लोकांच्या कांहीं टोळ्या जशा अफगाण अमलाखालीं आहेत तशाच ब्रिटिशांच्या सत्तेखालींही असल्यानें एकमेकांचें सख्य होतें, कां वैर जुंपतें ही पंचाइत पडली. आणि कांहीं झालें असतें तरी तें अनिष्टच होतें. कारण दोन्ही शिनवरी टोळ्या एक झाल्या तर जुनापुराणा दोस्त असलेल्या अमिराविरुद्ध ब्रिटिश प्रजाजन लढतात असा आरोप यावयाचा. बरें, त्या भांडखोरांचें भांडण लागलें, तर प्रजाहिततत्पर सरकारास आपल्या रयतेचा कैवार घेणें क्रमप्राप्त होऊन पर्यायानें अफगाणिस्तानच्या अमिराशींच लढावें लागणार. आणि असें झालें असतें तर मात्र अफगाणिस्तानांतील अंतस्थ बंडाळी तत्काळ थांबली असती. पण तें झालें नाहीं. ब्रिटिश शिनवरी अगदीं तटस्थ राहिले—नव्हे त्यांना थोपवून धरण्यांत ब्रिटिश अधिकाऱ्यांवर फार ताण पडला.

ब्रिटिशांनीं प्रथमपासूनच पूर्ण तटस्थ वृत्ति स्वीकारल्याचें जाहीर केलें. अफगाण बंडाळीसंबंधीं यथायोग्य बातम्याही पूर्वीप्रमाणें बाहेर पडेनात. ‘ हिंदीसरकारचें धोरण तटस्थ वृत्तीचें असल्यानें सर्व माहिती असतांही कांहींच बातमी सांगतां येत नसल्याचें ’ मात्र वरचेवर वर्तमानपत्रांतून कळे.

**१६०. बंडखोरांच्या मागण्या** :—डिसेंबर ९ रोजीं बंडखोरांनीं अमानुल्लाच्या मंत्र्यांच्या आग्रहास्तव तात्पुरता तह केला असें म्हणतात. आठ-दहा दिवसांत कांहींतरी अटी नक्की ठरवून तडजोड करण्याचा बंडखोरांचा विचार दिसला. अमानुल्लानें लादलेल्या सर्व सुधारणा एकदम परत घ्याव्या असा शिनवाऱ्यांचा आग्रह होता. विशेषतः स्त्रियांचा बुरखा काढून टाकल्यामुळें ते फार चिडले असावेत. राणी सूरय्या ‘ काफिर ’ ( मुस्लीमेतर ) आहे, तिला अमानुल्लानें सोडचिठ्ठी द्यावी, असा कित्येकांचा आग्रह होता तर कांहींच्या मते अमानुल्ला देखील ‘ काफिर ’ ठरला होता. साहेबी टोपी घालावयास नको म्हणूनही बरेच अफगाण नाखूष झालेले दिसत. ह्या तात्पुरत्या तहाची मुदत संपतांच तडजोड होत नाही, म्हणून बंडखोरांनीं काबूल व जलालाबाद या दोन्ही शहरांवर डिसेंबर १७ रोजी जोराचे हल्ले चढविले. काबूलचा हल्ला इतका निकराचा झाला, कीं एक दोन दिवसांतच काबूलचें इतर अफगाण शहरांशीं व पेशावरशीं देखील दळण-वळण बंद झालें. बंडखोरांचा नायक भिस्तीनंदन मधून मधून काबुलावर हल्ला करी. अमानुल्लाच्या सैन्यास फितूर करण्याचे अथवा त्यांना ठार करण्याचे त्याचे प्रयत्न चालू होतेच. आणि अफगाणिस्तानांत अत्यंत सोपी गोष्ट कोणती असेल, तर ती फंदफितुरीची. स्वामिनिष्ठेची ओळखच जेथें नाहीं, तेथें फितुरी माजण्यास कसचा अवकाश ? ‘ आमचा पगार थकला ’ या सबबीवर अमानुल्लाचे कांहीं सैनिक फितले, तर कित्येकांना बंडखोरांना सामील झाल्यास ‘ लूट ’ करावयास मिळेल हा मोह अनावर झाला. त्यामुळें अमिराचें बल कमी होऊं लागलें व बंड-खोरांचा प्रभाव वाढतो असें दिसूं लागलें. काबूलवर हल्ले होऊन शहरांतील कित्येक भागांत बंडखोरांचा उपद्रव होत होता.

**१६१. ब्रिटिशांनीं तटस्थ राहून बजाविलेली कामगिरी**:—इकडे काबूलस्थ ब्रिटिश वकिलाकडून कांहींच वार्ता कळेना म्हणून हिंदी सरकार व साम्राज्यसरकार अत्यंत चिंताकुल झालें ! पेशावरहून विमानें पाठविण्याचें ठरलें व त्याप्रमाणें दोन आकाशयानें काबूलकडे तत्काळ रवाना झालीं देखील. विमानें

१४

खालीं जमिनीस स्पर्श न करतां तशींच परत आलीं व त्यांनीं काबूलमधील इंग्रजी वकील सुरक्षित असल्याची बातमी आणतांच सर्वत्र किंचित् आराम वाटला. वकिलातींतील अधिकाऱ्यांनीं पहिल्यानें जमिनीवर मोठीं अक्षरें काढून वरील विमानांना कुशल वृत्त कळविलें असें तत्कालीन वर्तमानपत्रांत म्हटलें होतें. नंतर मात्र ' सिमॅफोर कोड ' ( प्रकाशसंदेश ) नें निरोप पोहोंचविले जात.

काबूलच्या आसपास जोराच्या चकमकी होऊं लागल्या. ब्रिटिश वकिलातीवरून गोळ्या जात. ब्रिटिशांची न्यायप्रियता, आजपर्यंतचें त्यांचें अफगाणिस्तानासंबंधीं व तेथील राज्यकर्त्यांविषयीं असलेलें ' अकृत्रिम प्रेम ', हल्लींची तटस्थवृत्ति इत्यादिकांच्या पुण्यसंचयामुळें मात्र आंत एकही गोळी आली नाहीं, कीं कोठल्याही प्रकारें उपसर्ग अथवा इजा आंतील मंडळीस झाली नाहीं ! बंडाळीचा हा वणवा लवकर विझत नाहीं असें सर फ्रान्सिस हंफ्रेज् यांस दिसून येतांच त्यांनीं प्रथमत: ब्रिटिश वकिलातींतील बायकामुलांची रवानगी पेशावरीं करावयाचें ठरविलें. अमानुल्लाच्या कारकीर्दीत अफगाणिस्तानांत शांतता नांदूं लागली व पाश्चिमात्यांबद्दलचा अफगाणांचा द्वेष पुष्कळ कमी झाला असें समजतांच बहुतेक परराष्ट्रीय वकील व अमानुल्लाचे परकी नोकर सहकुटुंब सहपरिवार काबूलमध्यें जाऊन राहिले होते.

हिंदी सरकारशी विचारमसलत करून विमानांतून बायकामुलांना हिंदुस्थानांत पेशावरीं न्यावें असें ठरलें व तदनुसार ता. २३ डिसेंबर रोजीं विमानांची पहिली खेप झाली. दोन विमानें मिळून वीस बायकामुलें पेशावरास येऊन दाखल झालीं. पुढें काबूलमधील इतर राष्ट्रांच्या वकिलातींतील बायकामुलेंही सुरक्षित ठिकाणीं पोहोंचविण्याचें काम केवळ उपकारबुद्धीनेंच प्रेरित होऊन स्त्रीदाक्षिण्यतत्पर इंग्रज वकिलानें स्वीकारलें व फ्रेंच, जर्मन, तुर्की, इटालियन, इराणी इत्यादिकांच्या कुटुंबांतील मंडळी पेशावरास जमूं लागली. **सप्तम एडवर्डाचें** स्मारक म्हणून बांधीत असलेलें एक रुग्णालय या परकीय पाहुण्यांना 'अभ्यागतालय' म्हणून तात्पुरतें देण्यांत आलें होतें. त्यांना कोणीं भेटूं नये, कोणीं त्यांच्याशीं बोलूं नये अशी व्यवस्था करण्यांत आली होती. एखादा वर्तमानपत्राचा बातमीदार त्या पाहुण्यांची मुलाखत घेऊन अफगाणिस्तानच्या बंडाळीचें खरेंखुरें स्वरूप हिंदी पत्रांत प्रसिद्ध करून हिंदी सरकारच्या तटस्थ वृत्तीच्या कडक व्रतांत नसतें विघ्न उपस्थित करील ही भीति होती.

नाजुक प्रकृतीचे हे पाहुणे घाबरून गेलेले होते व त्यांना काबूलहून एका-एकीं निघावें लागलें असल्यानें कोणाजवळ अंगावर होते त्यांपेक्षां अधिक कपडे नव्हते, तर कोणाचें ' मुद्रारंगसाहित्य 'च विसरून राहिलें; कित्येकांच्या मुला-बाळांची खेळणीं बरोबर आलीं नव्हतीं, तर कांहींचा घरचा पोषाख, हिंवाळ्यांतील पोषाख असा काबुलास राहून गेला. सर्व बांधाबांध करण्यास त्यांना अवसर मिळाला असता, तरी विमानांतून हा पसारा येऊं शकला नसता हें उघड आहे. सांगण्याचा मतितार्थ इतकाच कीं, या सर्व पाहुण्यांची एकूण एक प्रकारची सरबराई हिंदी सरकारास हिंदी प्रजाजनांनी दिलेल्या करांतून करावी लागली. हंफ्रेज् यांच्या पत्नीहि याच मंडळीबरोबर परत आल्या, त्यांना मात्र वायव्यसीमाप्रांताच्या चीफ कमिशनरांकडे पाहुणचारासाठीं रहावें लागलें. आल्यापासून लेडी हंफ्रेज्ना चैन मुळीं कसें तें पडत नव्हतेंच. सकाळ संध्याकाळ तारा करण्याकडे व आलेल्या तारा वाचण्याकडे त्यांचें लक्ष लागलेलें. त्या वेळीं क्वेट्टा–कंदाहारमार्गें मात्र कांहीं तारांचें दळणवळण चालू होतें.

१६२. **हिंदी व्यापाऱ्यांची ओरड** :—तिकडे काबूलमधील व्यापार थंडावला. ' बड्या दिना ' ( नाताळ ) साठीं तेथील युरोपियनांना पुष्कळ खाद्यपेयें पाहिजे होतीं. स्थानिक सामग्रीवर त्यांचें भागण्यासारखें नव्हतें. मुख्यत: मद्याचीच उणीव त्यांना फार भासली. कारण अफगाण कायद्याप्रमाणें सर्व प्रकारच्या मद्यांस त्या राज्यांत बंदी आहे आणि केवळ वकिलांच्या व इतर परकी प्रजाजनांच्या वैयक्तिक उपयोगासाठीं आवश्यक असेल तेवढीच दारू प्रसंगाप्रसंगानें आयात करण्यास परवानगी मिळे. पेशावरमध्येंही अशीच गडबड व निराशा झाली. सर्व प्रकारचीं सुकीं व ताजीं फळें डिसेंबरअखेरीस फार खपावयाचीं; परंतु एक दीड महिन्यांत नवा पुरवठाच आला नसल्यानें धारण तेजीची झाली, व माल पुरेसा मिळेना. काबूलमध्यें आवश्यक असलेला माल रस्ता सुरक्षित नाहीं म्हणून रवाना करतां येईना. आयात करणारांचें, माल आला नाहीं म्हणून नुकसान झालें, तर उलट माल गेला नाहीं म्हणून निर्यात व्यापाऱ्यांना खोट बसली. अशा परि-स्थितींत अमानुल्लाचा पक्ष घेऊन हिंदी सरकारनें या अंतस्थ यादवींत पडावें, बंडखोरांचा पाडाव करण्यास अमिरास मदत द्यावी, व्यापार पूर्ववत् चालू करावा, अशासाठीं हिंदी मुसलमानांनीं स्थानिक पत्रांतून हिंदुस्थानसरकारला सूचना व आग्रह करण्यास आरंभ केला.

१६३. **दैवी चमत्कार** :—याहीपेक्षां शहाणीं अशीं कांहीं पत्रें होतीं. त्यांनीं अफगाण बंडाचें जनकत्व पर्यायानें ब्रिटिश सरकारवर लादण्यासाठीं सूचक लेख लिहिले. डिसेंबरमध्येंच अलाहाबाद येथील ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या देख-रेखीखालून निसटलेल्या अफगाण सरदाराला सरकारनेंच फुसलाविलें असेंही कित्येक म्हणत. अफगाण सरदार, माजी अमीर अयुबखानाचा पुत्र, **महमद उमरखान** नामक असून, तो अलाहाबादेस ब्रिटिशांच्या नजरकैदेंत होता.* तेथें त्याज-वर विशेष लक्ष पुरविण्याचा हुकूम अफगाण यादवीस प्रारंभ झाला तेव्हांच वरिष्ठ सरकारकडून प्रांतिक सरकारास दिला गेला होता.|| परंतु पुन: 'दैवी चमत्कार' घडला, उमरखान अलाहाबादेहून पळाला, हें 'चारचक्षु' सरकारला कळलें नाहीं, असें सरकारतर्फे परराष्ट्रीय सेक्रेटरींनीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत सांगितलें.|| तो कोठें गेला हेंही समजेना; मात्र त्यानें अफगाण सरहद्द ओलांडली असावी अशी माहिती त्याच वेळीं सर डेनिस ब्रे यांनीं सांगितली. मुख्यत: उमरखान पळाल्यानंतर बरेंच दिवसांनीं तो फरारी झाल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्यानें तार्किक वर्तमानपत्रकारांस सरकारच्या सद्हेतूंबद्दल शंका घेण्यास अवसर सांपडला. परंतु त्याच वेळीं सर-कारनें एक पत्रक काढून अफगाण बंडाळींत ब्रिटिशांचा हात असल्याचें सूचित करणारावर खटला करण्यासाठीं प्रांतिक सरकारास अधिकार दिल्याचें स्पष्ट जाहीर केलें, त्यामुळें तत्संबंधीं कोणासच टीका करतां येईना. अस्तु.

अफगाणिस्तानांत शांतता प्रस्थापित होण्याचें चिन्ह दिसेना व काबूल-मध्यें त्रयस्थांनाही राहणें धोक्याचें होऊन बसलें. तेव्हां प्रथमतः बायकामुलांना

---

*अशा कैद्यांस इंग्रजींत Prince on parole असें म्हणतात. इंग्रजी Parole या शब्दानें दर्शविलेला अर्थ मराठींत व्यक्त करण्यापेक्षां मूळ इंग्रजी अर्थ दिला म्हणजे त्या शब्दांतील जादू व उमरखानासारख्या अनेक कैद्यांचें महत्त्व लक्षांत येईल. "Prisoner's promise that he will not attempt escape, or will return to custody if liberated, or will refrain from taking up arms against captors for a stated period."—या अर्थाच्या तिकोनांत अबदुल करीम, उमरखान व इतर अफगाण कैदी कसे 'फिट्' बसतात तें पहाण्यासारखें आहे. वरील इंग्रजी अर्थ *The Concise Oxford Dictionary* मधून घेतला आहे.

|| Legislative Assembly Debates, 1929, Vol. I, pp. 313-314.

सुरक्षित ठिकाणीं नेण्याची व्यवस्था विमानांकरवीं ब्रिटिशांच्या मेहेरबानीनें होऊं शकली. इतर परराष्ट्रीय वकिलांना व हिंदी प्रजाजनांना या सवलतीचा फायदा देण्यांत आला. हंफ्रेज् यानें हिंदुस्थानसरकारचें मन वळवून विमानें मिळण्याची तजवीज केली. त्याप्रमाणें ज्या परदेशीय मंत्र्यांना आपली बायकामुलें सुरक्षित मार्गी हिंदुस्थानांत जावीं असें वाटत होतें त्यांनीं ही व्यवस्था ब्रिटिशमंत्र्याकरवीं केली आणि अगदीं आपुलकीच्या भावनेनें तुर्की, इराणी, जर्मन, फ्रेंच व इटालियन प्रजाजनांना अमोलिक सहाय्य हिंदी सरकारनें केलें. रोजचे खाद्यपदार्थ देखील मिळण्याची पंचाईत काबूलस्थ इंग्रजी वकिलाला पडत असल्यानें विमानांतून आवश्यक त्या जिनसा त्यास पाठविण्यांत आल्या. विमानांची फेरी बहुधा रोजचीच होत असे. बायकामुलें सुरक्षित नेऊन ठेवल्यानंतर पुरुषांनाहि पेशावरीं जाण्याची व्यवस्था झाली.

**१६४. अमानुल्लाचा पहिला राज्यसंन्यास** :—अमानुल्लाची फारच वैचित्र्य अवस्था झाल्यासारखी दिसली. त्याच्या सैनिकांनीं ऐन वेळीं दगा दिल्यामुळें काय करावें हें त्यास सुचेना. बंडखोरांची तर एकसारखी सरशी होत होती. दोन प्रतिस्पर्ध्यांमध्यें गरीब रयतेची कुचंबणा होते असें पाहून आणि मुख्यत: लढवाले आपणां स्वत:विरुद्ध आहेत हें समजतांच त्यानें राज्यसंन्यास करण्याचें ठरविलें आणि 14 जानेवारी १९२९ रोजीं आपला बेत अमानुल्लानें कृतींत आणला ! ! सर्व जगभर आश्चर्यमय खेदोद्गार निघाले ! अमिराबद्दल सर्वांनाच सहानुभूति वाटे; कारण त्याची राष्ट्रभक्ति उत्कट होती; आणि राष्ट्रकार्यांत सुधारणा घडवून आणण्यासाठीं त्यानें फार खटपट केली होती. त्याचें कार्यच इतकें महत्त्वाचें व अपूर्व होतें, कीं सर्व जगांतील लोकांचें लक्ष या नव्या प्रयोगाकडे लागलें होतें. केमाल पाशा किंवा रेझा पेहेलवी यांचे प्रयत्न जरी याच धर्तीचे होते, तरी अमानुल्लाचें कार्य–अथवा त्याचें जंगी धाडस–त्या दोघांहून भिन्न अतएव विशेष प्रकारचें होतें. म्हणूनच अमानुल्लाच्या राज्यत्यागाची बातमी ऐकून जागतिक घडामोडींत लक्ष घालणाऱ्या सर्व जनतेस दु:ख झालें. असो.

अमानुल्लानें राज्यत्याग केला तो आपल्याविरुद्ध पेटलेलें लोकमत पाहून. प्रजाच जेव्हां राजाविरुद्ध उठते तेव्हां, एक अत्यंत क्रूरपणें आपली सत्ता त्या राजानें सैन्यबलावर प्रस्थापित तरी करावी किंवा निमूटपणें दुसऱ्या योग्य माणसास वाट करून द्यावी. अमानुल्लाची विचारसरणी अगदीं वेगळ्या प्रकारची होती.

त्याचें सैन्य अनुकूल असतें तरी तो कडक रीतीनें स्वसत्ता प्रस्थापित करता कीं काय, तें सांगतां येत नाहीं. पण प्रस्तुत प्रसंगीं त्यानें राज्यसंन्यास करावयाचें ठरविलें. आपल्या वडील बंधूस अमीरपदाधिष्ठित करून स्वतः अमानुल्ला कांहीं मोटारी घेऊन कंदाहारीं गेला. राणी सूरय्या व इतर राजस्त्रिया विमानांतून आधींच तिकडे गेल्या होत्या.

**१६५. दोन दिवसांचे अमीर इनायतुल्ला** :—अमानुल्लाचा वडील भाऊ इनायतुल्लाखान हा हबीबुल्लाचा ज्येष्ठ मुलगा आणि म्हणून काबूलचा अमीर होण्यास लायक. पण अमानुल्लानें १९१९ मध्यें अमीरपद कसें मिळविलें तो इतिहास मागें येऊन गेलाच आहे. पूर्वी या भावाभावांचें फारसें सूत नसावें. पण या दोन्ही भावांस तार्झीच्या दोन्ही मुली दिल्या असल्यानें त्यांचें निकटचें नातें (?) जमलेलें होतें. आणि (सूरय्याच्या धोरणामुळेंच?) हे दोन्ही बंधु प्रेमभावानें एकत्र राहूं शकले. अशा इनायतुल्लास १४ जानेवारी रोजीं अमीरपद प्राप्त झालें तरी काबूल-मध्यें सत्ता, बंडखोरांचा पुढारी भिस्तीनंदन याचीच होती. 'काफिर' अमानुल्ला व सूरय्या निघून गेल्यास बंडखोर कांहीं त्रास देणार नाहींत असें वाटलें. कोणत्या कारणानें कां होईना, पण आपणांस अखेर अमीरपद तर मिळालें म्हणून इनाय-तुल्लास आनंद झाला असला, तरी तो देखील क्षणभंगुरच ठरला! बंडखोरांनीं इनायतुल्लासुद्धां आम्हांस नको असा आग्रह धरला आणि प्राणरक्षणार्थ या ताज्या अमिरास ब्रिटिश वकिलाची मदत घेऊन विमानमार्गें पेशावरीं यावें लागलें. इनाय-तुल्लानें ता. १७ जानेवारीस राज्यत्याग केला व दुसरे दिवशीं तो पेशावरी पोहोंचला!

अमानुल्ला राज्यसंन्यास करून कंदाहारीं गेला ही बातमीच मुळीं उद्वेगजनक होती; दोन दिवसांनीं इनायतुल्ला राज्यत्याग करून परत आल्यानें तींत आणखी भर पडली आणि आतां अफगाणिस्तानच्या या चलच्चित्रपटावर कोणते विचित्र देखावे दिसणार अशा औत्सुक्यानें सर्व जगांतील लोक तिकडे पाहूं लागले. यापेक्षां आश्चर्य असें तें कोणतें पाहिजे होतें? कल्पनाशक्तीच्या टापूंत न येणारे प्रसंग अवचित घडून आल्यानें 'आतां काय होतें तें पहावें' अशाच विचारानें देशांतील सर्व जनताही ग्रस्त झाली.

**१६६. भिस्तीनंदन अमीर हबीबुल्ला होतो** :—इनायतुल्ला काबूल-मधून बाहेर पडतांच बंडखोर भिस्तीनंदनानें—बच्चा–इ–सक्कानें–'अमीर हबीबुल्ला गाझी' हें नामाभिधान धारण केलें व पुंडाईच्या पराक्रमावर प्राप्त केलेल्या अमीर-

पदावर तो अधिष्ठित झाला. एके काळीं पेशावरच्या क्षुल्लक पेयगृहांत कषायपात्रें धुणारा हा भिस्त्याचा पोर काबूलचा अमीर झाला! त्यानें 'साहसे श्रीः प्रतिवसति' हें जरी सिद्ध केलें, तरी राज्यलक्ष्मीनें ह्या नवीन स्वयंवरप्रसंगीं, बंधूनें केलेल्या '**कुलशील रूप सद्गुण असतील स्वानुरूप जरि त्यातें**' या उपदेशाकडे अत्यंत दुर्लक्ष केलें व बच्च्यास वरिलें असेंच म्हणावें लागतें. बच्चा काबूलचा अमीर झाला, तरी देखील ब्रिटिश वकिलातीस कोठल्याही प्रकारें धक्का पोहोंचला नाहीं. उलट 'तुमच्याशीं आमचें वैर नाहीं' असें सांगण्यास त्याचे लोक तेथें जात. यावरून इंग्रजसरकारची 'तटस्थ' वृत्ति, बंडखोरांचाहि त्यांनीं संपादिलेला विश्वास आणि 'संशयातीत चोख वर्तन' हीं सिद्ध होत नाहींत काय ?

अमानुल्ला कंदाहारला गेला व काबूलमध्यें बच्चा अमीर झाला, त्याच सुमारास इकडे जलालाबादेस **अली अहमदजान** (अमानुल्लाच्या बहिणीचा पति) नामक वीरानें आपण अफगाणिस्तानचे अमीर असल्याचें घोषित केलें! याच वेळीं हिरातकडे कोणी चौथा महत्त्वाकांक्षी पुरुष निघाला नाहीं किंवा शेजारच्या इराणनें तें शहर घेण्याची इच्छा दर्शविली नाहीं, हें अफगाणिस्तानचें भाग्यच म्हटलें पाहिजे. कारण मध्यवर्ति काबूलची सत्ता डळमळीत होतांच प्रांताप्रांतांतील अधिकारी स्वयंमन्य अमीर होतात, असा अफगाणिस्तानचा मागील इतिहास आहे.

**१६७. अमानुल्लाच्या राजत्यागाचीं कारणें** :—आतां या तीन ठिकाणच्या तीन बड्या प्रस्थांस तूर्त क्षणभर विश्रांति देऊन अमानुल्लाला राज्यत्याग करण्याचा प्रसंग कां आला तें पाहूं. बंड उद्भवण्याजोगी परिस्थिति अमानुल्लाच्या सुधारणांमुळें उत्पन्न झाली ही गोष्ट खरी. करांचा बोजा प्रजेवर मनस्वी पडला, स्वसत्ता कमी झाली म्हणून मुल्ला व काजी चवताळले, त्यांनीं प्रजेला राजाविरुद्ध बंड पुकारण्यास उत्तेजन दिलें, सामाजिक सुधारणांमुळें जनतेच्या मनांतून अमानुल्ला उतरला इत्यादि सर्व बाबी सत्य असल्या, तरी ह्या 'नाटका'चें पर्यवसान अशा खेदाश्चर्यमय प्रकारांत व्हावें, हें मात्र तारतम्यबुद्धीस तितकेंसें समर्पकपणानें पटत नाहीं. १९२३–२४ चीं बंडें काय कमी जोराचीं होतीं ? आणि कांहीं तरी वेगळीं कारणें या प्रचलित बंडाच्या बुडाशीं आहेत असें कित्येकांस वाटतें त्याचें कारणही हेंच. १९२८–२९ चें हें बंड केवळ तद्देशीय लोकांच्या चीड अथवा संतापामुळें झालें असेल किंवा तें तद्देशीय पीक आहे असें म्हणणें अगदीं भोळेपणाचें होईल. अफगाण भूमींत तें विषबीज रुजलें यांत मतभेद नसला, तरी

युरोपियन * ' बीं ' अथवा ' खत ' त्या झाडासाठीं उपयोगांत आणलें गेलें असावें असेंच राजनैतिक तज्ज्ञांस म्हणावें लागेल.

अमानुल्लाच्या अधःपाताला कारणीभूत झालेला विषवृक्ष इतक्या त्वरेनें वाढला याचें कारण पाहण्यास, जून १९२८ मध्यें " मी गादीचा खरा वारस आहें " असें सांगत काबूलकडे जाणाऱ्या करमखानाची जबानी महत्त्वाची ठरेल. ' एका काश्मिरी सय्यदानें मला पढविलें–त्यानेंच माझ्या नोकरचाकरांची व्यवस्था केली' इत्यादि वाक्यांवरून पुष्कळच गोष्टींचा उलगडा होतो. 'सय्यद' म्हणजे धार्मिक गुरु अथवा पुढारी. धार्मिक विधींत त्याचें फार महत्त्व असतें. ते बहुतेक आपल्याकडील भटभिक्षुकांप्रमाणेंच परोपजीवी असतात. आणि तसें असतांना दोन महिने बन्नूला राहून करमखानला ' संथा ' देण्यासाठीं लागणारें व नोकराचाकरांचा सरंजाम ठेवण्याइतकें द्रव्य त्या ' भिक्षुक ' सय्यदानें कोठून पैदा केलें हा प्रश्न साहाजिकच उपस्थित होतो. बन्नू हें ब्रिटिश मुलखांतील ठिकाण. अफगाणिस्तानच्या अमिरा-विरुद्ध उठलेले लोक अफगाण हद्दींतलेच होते; त्यांच्यांपैकीं कोणी हिंदी प्रदेशांत येऊन राहूं शकला असता तरी त्यास ब्रिटिशांच्या ' दोस्ता 'विरुद्ध कारवाई करण्यास सवलत मिळणें शक्य नव्हतें. कारण अफगाणिस्तानशीं स्नेहसंबंध राखण्याची ब्रिटिश सरकारची इच्छा महशूरच आहे.

**१६८. कर्नल लॉरेन्सचा इतिहास** :—हा काश्मिरी सय्यद कोण व कोठला हें पाहण्यास ' टी. ई. शॉ ' ( एअर-क्रॅफ्ट्स्मन् शॉ ) या अद्वितीय कारस्थानी इंग्रज देशभक्ताची या सुमाराची हालचाल लक्षांत घेतली पाहिजे. याचें पूर्वीचें नांव **कर्नल लॉरेन्स** असें होतें आणि युरोपियन महायुद्धाचे वेळीं अरबस्तानांतील तुर्की साम्राज्याचीं शकलें पाडून त्यांना इस्तंबूलविरुद्ध लढण्यास उद्युक्त करण्यांत मुख्यतः याच लॉरेन्सचें अंग असल्यानें ' अरबस्तानांतील कर्नल लॉरेन्स ' या नांवानेंच तो नेहमीं ओळखला जातो. रानटी टोळयांशीं मिळूनमिसळून वागण्यांत, त्यांना आपलेसें करून घेण्यांत आणि आपल्या अंगच्या दैवी करामती दाखवून त्यांना आपल्या पूर्ण हुकमतीखालीं आणण्यांत, लॉरेन्सचा हात धरणारा अन्य वीर कोणीदेखील आढळावयाचा नाहीं.

---

* देशी फळांचें विलायती बीं आणलें म्हणजे किंवा विलायती खत घातल्यानें पुष्कळ फायदे होतात हें आपणांस ठाऊक आहेच. कोणत्याहि एका विशिष्ट देशाविरुद्ध ही टीका नव्हे.

त्याचें धैर्य अचाट आहे. मोहक मुद्रा, आकर्षक दृष्टिबल आणि छाप पाडणारी शरीरयष्टि या नैसर्गिक सामग्रीस लॉरेन्सनें रानटी टोळयांच्या मन:स्थितीचें व भाषांचें पूर्ण ज्ञान संपादून अमोलिक जोड दिली होती. ' हा आपला प्रभावशाली गुरूच आहे ' असें मानून अडाणी जनता–मग ती कोठलीही असो–लॉरेन्सच्या मागें लागे. लॉरेन्सच्या कर्तबगारीची मख्खी यांतच आहे.

त्याच्या आंगच्या गुणांचें व दैवी चमत्कार करण्याच्या सामर्थ्याचें योग्य चीज करून घेण्यांत प्रथम ब्रिटिश फॉरेन ऑफिसनें ( ब्रिटिश परराष्ट्र कचेरी ) व नंतर कलोनियल ऑफिसनें ( वसाहत कचेरी ) गुणग्राहकता दाखविली यांत शंका नाहीं. मेसॉपेटेमिया, ट्रान्स्जॉर्डेनिया, सीरिया, पॅलेस्टाइन इत्यादि तुर्की साम्राज्याचे ' स्वतंत्र ' विभाग केवळ लॉरेन्सच्या कर्तबगारीनेंच पडले. त्याची द्रव्योत्पादनशक्ति पाहूनच सर्व थक्क होत. पाहिजे तेथें पाहिजे तितकें द्रव्य तो ' जादूनें ' उत्पन्न करी * आणि स्वत:ला कांहीच न ठेवतां आपल्या रानटी ' भक्तगणांत ' तें वाटून टाकी. लोकप्रिय होण्याला आणखी काय पाहिजे ?

अशा गुणांचें हें गोरें बाळ हिंदुस्थानसरकारनें केव्हां आणि कशासाठीं नोकरीस ठेवलें तें समजत नाहीं. कैरो येथील वैमानिक दलांत ' टी. ई. शॉ ' या नांवानें लॉरेन्सनें प्रवेश मिळविला. तेथूनच कदाचित् त्याची कराचीला रवानगी झाली असावी. कराचीहून मे १९२८ मध्यें त्याची बदली पेशावरास झाली आणि ८ जानेवारी १९२९ रोजीं त्याला स्वदेशी जाण्याचा हुकूम देण्यांत आला. त्याप्रमाणें लपून छपून तिसऱ्या वर्गाचा उतारू म्हणून त्यानें इंग्लंडांतील साउदॅप्टनपर्यंत प्रवास केला.

असा प्रभावशाली कर्नल लॉरेन्स हिंदुस्थानांत विनाकारण आला असेल असें म्हणवत नाहीं. खोट्या नांवाखालीं त्यानें वैमानिक दलांत प्रवेश मिळविला, ही गोष्ट अधिकाऱ्यांना ठाऊक असतां त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. कराचीहून पेशावरला रवाना करण्यांत त्यांचा कांहींही हेतु नाहीं, असें कसें होईल ? त्याच्या गुणांमुळें करमखानाचा ' काश्मिरी सय्यद ' देखील क. लॉरेन्स ऊर्फ शॉच असावा असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. काश्मिरी माणसें गोरींगोमटीं असतात यावरून कर्नल लॉरेन्सचें वर्णन करमखानानें केलें तें ठीकच. त्याला पुष्टी देणारें दुसरें

---

* ब्रिटिश सरकारच्या नोकरींत असतांनाच मात्र हा गुण दृष्टोत्पत्तीस येई. नोकरी सुटली कीं द्रव्योत्पादन आटत असें हें खरें.

विधान असे, कीं करमखानाप्रीत्यर्थ झालेला खर्च द्रव्योत्पादनशक्ति असणाराच करूं शकेल. इतरांना तें कसें साधणार ? असो.

शिनवाऱ्यांनीं बंड उभारलें तेव्हां त्यांचेजवळ राणी सूरय्याचे फ्रान्समधील तिकडील रिवाजाप्रमाणें प्रचलित फॅशनेबल पोषाख घातलेले फोटो आढळले.¶ अर्थात्च रानटी लोकांच्या दृष्टीनें हा निर्लज्जपणा अधार्मिकच नव्हता तर तो अमानुष ठरला, आणि सूरय्याचा वध करण्यास ते उद्युक्त झाले असल्यास नवल नाहीं. राणीचे भलतेच चाळे पुरविणारा अमानुल्ला स्त्रीलंपट, दुबळा व तितकाच दोषी ठरला, म्हणून दोघांनाही काबूल सोडून जाणें भाग पडलें. आणि आपल्या सर्व सुधारणांचा परिणाम फार विपरीत होतो, हें पाहून अमानुल्लास राज्यत्याग करणें प्राप्त झालें. मात्र हे वर उल्लेखिलेले फोटो बंडखोर शिनवाऱ्यांजवळ कोठून आले, हा प्रश्न शिल्लक उरतोच. पण त्याचें उत्तर मात्र नीटसें देतां येत नाहीं. शॉचा या फोटोशीं कांहीं संबंध असेल काय ? कदाचित् प्रजाजनांत 'राजनिष्ठे'ची वृद्धि व्हावी म्हणून त्यानें ते फोटो अफगाणांत मुद्दाम विलायतेहून मागवून वाटविले तर नसतील ? कोणीं सांगावें ?

मात्र राज्यत्याग करण्यापूर्वी अमानुल्लाच्या सरकारी वर्तमानपत्रांत—अमान-इ-अफगाणमध्यें—एक नोटीस प्रसिद्ध झाली होती. "जगांतलि अट्टल हेर कर्नल लॉरेन्स यास पकडून देणारास मोठें बक्षीस दिलें जाईल.¶" असें त्या पत्रांत जाहीर केलें होतें. याचा अर्थ दुसरा काय निघूं शकणार आहे ? यावरून एवढें स्पष्ट दिसतें, कीं अमानुल्लाच्या सरकारास शॉचा संशय आला होता. त्याचप्रमाणें काबूल-मधील ब्रिटिश वकिलातीमध्यें अमेरिकन वकिलातींतील एका गृहस्थासमवेत जो संवाद घडून आला असें 'आशिया' मासिकाच्या जून १९२९ च्या अंकांत दिलें आहे, तो खरा असेल तर,—आणि तो खोटा नसल्याचा पुरावा अजून बाहेर आला नाहीं—कर्नल लॉरेन्स ऊर्फ शॉ याचा प्रत्यक्ष संबंध अफगाण बंडाळीशीं जुळतो. आणि शॉची मागील कर्तबगारी पाहतां त्याला हें काम लीलया साध्य करतां येण्यासारखें होतें. हिंदी सरकारचें शॉच्या बाबतींतलें वर्तन व ब्रिटिश सरकारनें पार्लमेंटांत दिलेलीं उडवाउडवीचीं उत्तरें लक्षांत घेतां, या तर्कास पुष्टि येते. कांहींहीं झालें, तरी ब्रिटिश हद्दींत राहून लॉरेन्सनें—हिंदुस्थान सरकारच्या सहाय्यानें नसेल—उच्च दर्जाची 'राष्ट्रीय' कामगिरी बजावली, एवढ्यासाठीं देखील आंतरराष्ट्रीय

¶ *Asia Magazine*, June 1929.

न्यायालयांत इंग्रज दोषी ठरतील. ही बंडाळी उठवून लॉरेन्सचा अथवा लॉरेन्सच्या कृत्यांकडे कानाडोळा करून हिंदी सरकारचा लाभ कोणता झाला? या शंकेचें निरसन करणें दुर्घट नाहीं. कारण ' स्वकार्यविषयीं अन्यार्थ विध्वंसण्या 'स इंग्रज मागें पुढें पहात नाहींत, हें ब्रिटिशनीतीशीं ज्यांचा किंचित्ही परिचय झाला आहे अशांना उमगलें आहे.

**१६९. भिस्ती अमिराची कारकीर्द** :—आतां मागील कथासंदर्भ जुळवावयाचा म्हणजे कंदाहार येथील अमीर अली अहमद जान व काबूलस्थ भिस्तिनंदन यांचें पुढें काय होतें तें पहावयाचें. एकदां अमानुल्लास ' काफिर ' ठरविल्यानंतर त्याच्या नव्या सुधारणा कोण चालू देतो? ता. १८ जानेवारी १९२९ रोजीं बच्चानें मागील सर्व सुधारणा रद्द केल्या आणि काजीमुल्लांकडे न्यायदानाचें काम पूर्ववत् ठेवलें. पुढें २० तारखेस त्यानें अमानुल्लाच्या सर्व शाळा-देखील निरुपयोगी ठरविल्या. तत्संबंधींच्या जाहीरनाम्यांत 'भिस्ती' राजा काय म्हणतो तें नमुन्यादाखल पाहाण्यासारखें आहेः—

" अमानुल्लानें मुलांमुलींसाठीं शाळा स्थापल्या. त्या शाळांत डावीकडून
" उजवीकडे लिहिण्यास शिकवीत. परकीय आंकडे मांडावयाचें शिक्षण तेथें
" दिलें जाई. इस्लामेतर राजांचीं नांवें विद्यार्थ्यांना सांगितलीं जात. इस्लामी
" जगाबाहेरच्या देशांतील डोंगर-नद्यांची माहिती अफगाण मुलामुलींना करून
" देत. आणखीही पुष्कळ ' सैतानी ' शिक्षण दिलें जाई."$

इतकेंच करून बच्चा थांबला नाहीं; तर त्यानें शाळेंतील नव्या पद्धतीचीं बाकें, खुर्च्या, टेबलें यांचा, काबूलच्या थंडींत शिपायांसाठीं शेकोटी करण्याकडे उपयोग होऊं दिला. उत्तमोत्तम ग्रंथ, नकाशे, शालेय पुस्तकें इत्यादिकांची मन-वाटेल तशी विल्हेवाट लावली. कपाटें फोडलीं. रसायनशाळेंतील बाटल्यांत दारू भरून ठेवली आहे असें सांगून त्यांचा चुराडा केला. लक्षावधि रुपयांचा विध्वंस भिस्त्याच्या अज्ञानानें-नव्हे धर्माभिमानामुळें-झाला! मुसलमानी वीरांनीं अशा प्रकारची वाङ्मयविध्वंसक कामगिरी इतिहासांत बऱ्याच वेळां केली आहे. तेव्हां बच्चाला दोष कसा देतां येणार?

**१७०. अमानुल्ला पुनः अमीर होतोः**—अमानुल्ला कंदाहारमध्यें राहिला तरी त्याच्या राष्ट्रप्रेमाची पूर्णपणें जाणीव असलेले थोडकेच पण दूरदृष्टीचे

$ *Vishwabharati Quarterly*, April-July, 1929.

अधिकारी व अनुयायी त्याच्या पाठीस लागले, व त्यांनीं अमानुल्लास कंदाहार येथें तात्पुरतें नवें राज्य स्थापण्यास प्रवृत्त केलें. काबूलपदाचा त्याग करूं नका, आम्ही तुम्हांस सहाय्य करूं, भिस्त्याच्या पोरास अल्पायासें उडवून देऊं, इत्यादि आश्वासनें त्या अधिकाऱ्यांनी दिलीं व अमानुल्लानें तदनुसार वागण्याचें ठरविलें. ता. २१ जानेवारीस त्यानें ' राज्यसंन्यास परिवर्तन ' झाल्याचें जाहीर केलें. पण ता. १४ रोजीं त्यानें जो राज्यसंन्यासाचा निश्चय सर्वांस कळविला, तोच कांहीं शेजारी राष्ट्रांना पथ्यकर वाटला, म्हणून परिवर्तनाच्या बातमीस कोणींच महत्त्व देईना !

इनायतुल्लाच्या राज्यत्यागानंतर तो पेशावरीं आल्यावर त्याला खास रेल्वेट्रेननें क्वेट्टा येथें पोहोंचविण्याची व्यवस्था हिंदी सरकारनें केली व तेथें जाऊन तो आपल्या धाकट्या भावास कंदाहारीं ता. २३ जानेवारीस मिळाला. हिंदी सरकारनें इनायतुल्लास ही स्नेहभावानें मदत केली यामुळें तटस्थ वृत्तीस बाध आला नाहीं काय, असा प्रश्न पार्लमेंटांत विचारण्यांत आला असतां नकारार्थी उत्तर मिळालें. बच्चा देखील इंग्रजांवर रागावला, कारण इनायतुल्लास त्यांनीं कंदाहारला जाण्यास मदत कली, अशी बातमी तत्कालीन पत्रांत प्रसिद्ध झाली होती. परंतु हा सिद्धसाधकपणाच असल्यानें त्यांत तथ्य कांहींच नव्हतें. कारण बच्चाचा घुस्सा झाला असता, तर वैमानिक दलामार्फत चाललेल्या माणसांच्या वाहतुकींत व्यत्यय कां आला नाहीं ? बच्च्याच्या संमतीशिवाय आणि सहाय्याविना तें कार्य चालू राहणें खरोखर अशक्यच होतें. असो.

अमानुल्लानें नवें राज्य कंदाहार येथें स्थापलें; त्याचें मंत्रिमंडळ तेथें आलें; मग बच्चावर तत्काल हल्ला कां झाला नाहीं ? त्याचें कारण असें, कीं अफगाणिस्तानांतील हिंवाळा फार कडक असतो. काबूल तर बर्फवृष्टीनें त्या वेळीं फुललेलें दिसतें. मार्च मध्यानंतर बर्फ वितळण्यास सुरवात होते. तत्पूर्वी लढाईचा प्रयत्न करणें, म्हणजे आपण होऊनच स्वसैन्यघात करून घेण्यासारखें आहे. शिवाय अमानुल्लाचें सैन्य पूर्वीच्या मानानें पुष्कळच थोडें होतें. म्हणून त्याला कांहीं दिवस स्वस्थ बसून तयारी करण्यांतच वेळ घालवावा लागला.

बंड सुरू झाल्याबरोबर हिंदुस्थानसरकारनें प्रवाशांस अफगाणिस्तानांत जाण्यास कायद्यानें बंदी केली होती. फक्त अफगाण प्रजाजनांसच सरहद्द ओलांडण्याचा परवाना देण्यांत येईल असें सरकारी रीत्या जाहीर झालें, याचें कारण उघडच होतें. काबूलमधील ब्रिटिश प्रजाजन विमानांतून पेशावरास आणले जात



असतां, हिंदुस्थानांतून मुशाफर तिकडे जाऊं देणें केव्हांही सुरक्षित नव्हतें. अंतस्थ बंडाळी चालू असलेल्या मुलुखांत आपल्या राजनिष्ठ प्रजेनें सांपडावें हें प्रजाहित-तत्पर ब्रिटिशसरकारास कसें आवडेल? तेव्हां ही बंदी घालण्यांत 'अतिस्नेहः पापशङ्की' हेंच कारण होतें! शिवाय काबूलमधील परिस्थिति चक्षुर्वैसत्यम् पाहून आलेल्या इसमानें कांहीं तरी भलत्यासलत्याच बातम्या हिंदुस्थानांत प्रसृत केल्या तर तटस्थपणाच्या व्रतांत विघ्न नाहीं का येणार? कडक व्रताचरणासाठीं निर्बंधही कडकच पाहिजेत. अस्तु.

**१७१. निरनिराळ्या अमिरांचा आपसांत लढा**:—काबूल व कंदाहार यांमधील गझनी म्हणून जें इतिहासप्रसिद्ध शहर आहे तेथें याच सुमारास **मलिक ग्यासुद्दीन** नांवाचा एक टोळीनायक आपणांस तेथील अमीर म्हणवून घेऊं लागला. अफगाणिस्तान पूर्वीप्रमाणें 'स्वतंत्रपणें' नांदणार अशी भीति कित्येकांना वाटली ती विनाकारण नव्हे. मध्यवर्ती सत्ता डळमळली, कीं असा प्रकार अफगाण इतिहासांत घडतो हें मागील अमिरांच्या कारकीर्दीवरून वाचकांच्या लक्षांत आलें असेलच.

इकडे काबूलस्थ हबीबुल्लाचें बस्तान ठीक बसलेलें दिसलें. त्याच्या सैन्यास अमानुल्लाच्या सैन्यास मिळत असे त्याच्या तिप्पट पगार दिला जाई.$ त्यामुळें लष्करभरती बेसुमार वाढली. कोणी अमानुल्लानिष्ठ टोळीनें काबूलवर अथवा आसपास हल्ला केला, कीं तिची दाणादाण उडविण्यास बच्चास अथवा त्याच्या अनुयायांस मुळींच अवधि लागत नसे. उत्तम प्रकारच्या आधुनिक बंदुका व भरपूर दारुगोळा हबीबुल्ला गाझीने कोठून मिळविला तें सांगतां येणें कठिण आहे!

अमानुल्लाच्या पक्षाचा सरदार जलालाबादेस अमीर म्हणून राहिला हें भिस्तीनंदनास व त्याच्या अनुयायांस सहन झालें नाहीं. म्हणून शिनवरी व खुगियानी टोळ्यांनीं जलालाबादेवर हल्ला करून ता. ९ फेब्रुआरीस अली अहमदजान यास पदच्युत केलें. जलालाबाद बंडखोरांच्या हातांत गेलें, तेथील दारुगोळ्याचें कोठार होतें त्याचा आग लागून भडका उडाला व मोठा स्फोट झाला आणि आजूबाजूच्या भागांस बरेंच नुकसान पोहोंचलें. बऱ्याच दिवसांनंतर बिचारा अली अहमदजान हिंदी हद्दींत लंडीखान्यास पायींच आला. तेथून त्याला पेशावरीं पोहोंचविण्यांत आलें. (२८-२-१९२९).

---

$ *Asia Magazine*, June 1929.

**१७२. भिस्तीनंदनाचा पराक्रम**:—काबूलमध्यें बच्चानें अनन्वित कृत्यें केलीं; त्यानें अमानुल्लाला काफिर ठरविलें, किंवा त्याला नव्या प्रकारच्या शाळा सैतानी वाटल्या, हा केवळ मतभेदाचा वा अज्ञानाचा प्रश्न असूं शकेल. परंतु सर्व काळीं सर्व प्रदेशीं अन्याय्य ठरणारीं अशीं कांहीं दुष्ट कृत्यें असतात, तीं बच्चानें केलीं. बंडखोरांचा तो पुढारी; अल्पकालांत त्याची सद्दी आली व भाग्य उगवलें; अतिशय मोठी सत्ता एकाएकीं त्याचे हातीं आली. या सर्वांचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. आपण करतों त्या कृत्यांची इष्टानिष्टता कधीं त्यानें पाहिली नाहीं. 'राजा बोले दळ हाले' याप्रमाणें आपल्या मनांत येतील ते विचार तत्काळ कृतींत उतरले पाहिजेत असा त्याचा आग्रह होता. त्यामुळें किती तरी उच्च घराण्यांतील स्त्रियांशीं त्यानें आपला जबरीनें 'निका' लावला; मागील राजवटींतील पुष्कळ अधिकाऱ्यांस त्यानें क्रूरपणानें ठार केलें; आणि अमानुल्लानें जमविलेल्या अमोलिक वस्तूंचा विनाश करण्यासही त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. राष्ट्रीय प्रगतीची आपली हल्लींची कल्पना रास्त आहे असें मानलें, तर त्या दृष्टीनें बच्चानें राष्ट्रीय प्रगतीस पुष्कळच मोडता घातला असें म्हणतां येतें. कारण अमानुल्लानें केलें तें सर्वथैव हानिकारक असल्याबद्दल भिस्तीनंदनाची प्रामाणिक समजूत होती.

**१७३. काबूलमधील इंग्रजी वकील परतले**:—इकडे विमानांतून ब्रिटिश प्रजाजनांना व आश्रितांना सुरक्षित आणून पेशावरीं सोडण्याचें काम एकसारखें चालू होतेंच. तिकडे कोणी राहिलें नाहीं असें दिसतांच व काबूलमधील आग लवकर विझत नाहीं असें समजून येतांच ब्रिटिश वकील सर फ्रान्सिस् हंफ्रेज् आपलें चंबूगबाळें आटोपून व युनियन जॅक निशाण खाकोटीस मारून विमानांतून पेशावरीं आला (२५-२-२९). ब्रिटिशांचा वकील काबूलमधून निघाला त्या वेळीं तेथें तुर्कस्तान, रशिया, जर्मनी व इराण या देशांचे वकील अजून राहिले होते ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

**१७४. देशरक्षकाचें आगमन**:—अफगाणिस्तानांतील बंडाळी पेटत चालली, ती आटोक्यांत येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. तेव्हां अमानुल्लाचें व त्याच्या प्रभावळींतील अधिकाऱ्यांचें लक्ष फ्रान्सकडे गेलें. तिसऱ्या अफगाण युद्धांत सेनाध्यक्ष म्हणून गाजलेला व अमानुल्लाच्या प्रथम मंत्रिमंडळांतील युद्धमंत्री नादिरखान हा तिकडे होता. 'देशाला तारणें आतां केवळ तुझ्याच हातीं आहे' अशा आशयाचीं पत्रें त्याला गेलीं. तेव्हां प्रकृती ठीक नसतांहि मातृभूमीच्या हांकेला

'ओ' देऊन नादिरखान नीसहून निघाला. बरोबर त्याचे बंधु **हशमखान, शहा वलीखान** व **शहा महमद** हेही होते. २२ फेब्रुवारी १९२९ रोजीं हे बंधू मुंबईस 'कैसर-इ-हिंद' या बोटीनें आले. आगबोट धक्क्यास लागण्यापूर्वींच मुंबईसरकारच्या राजकीय खात्याचे अंडर-सेक्रेटरी बोटीवर गेले आणि केबिनमध्यें नादिरखानाशीं त्यांचें गुप्त संभाषण बराच वेळ झालें. मुंबईस राहून नंतर नादिर-खान बंधूंसह पेशावरीं गेला. अफगाणिस्तानांत जाण्यासाठीं तर तो आलाच होता; पण तो ताबडतोब अफगाणिस्तानांत गेला नाहीं, पेशावरींच राहिला. खैबर घाटांतून काबूलला जाऊन बच्चाचें मन वळवून एकंदर राष्ट्रकार्याची हानि करूं नकोस असें सांगण्याचा अधिकार व दर्जा नादिरखानाचा होता; परंतु आपलें म्हणणें वाऱ्यावारीं जाऊं नये, म्हणून असल्या पथ्यकर उपदेशाच्या किंवा मोफत सल्ल्याच्या मागें बलशाली सेना असावी लागते. ती प्रथमतः नादिरजवळ नव्हती, म्हणून त्यानें ताबडतोब काबूलला जाण्याचा विचारच केला नाहीं. अफगाणिस्तानांत जाऊन स्वतःचें वजन पाडण्यासाठीं आवश्यक असणारें सैन्यबल जमविण्याचे त्याचे प्रयत्न पेशावरीं असतांनाहि चालले असावेत.

बरें, नादिरखानाला अमानुल्लासाठीं खटपट करावयाची होती असें म्हटलें, तर त्यानें कंदाहारला जाऊन त्याची भेट कां घेतली नाहीं हा प्रश्न उद्भवतोच. नादिरखानाची श्रेष्ठता व वेळप्रसंग पाहून वागण्याचें चातुर्य अशाच प्रसंगीं दिसून आलें. अमानुल्लाच्या सुधारणांमुळें लोकांच्या मनांतून तो उतरला होता हें नादिरखानाच्या लक्षांत तत्काळ आलें. 'अमानुल्लासाठीं मी लढतों, त्यानें पुनः गादीवर यावें अशी माझी इच्छा आहे' इतकें जरी नादिरखाननें बोलून दाख-विलें असतें, तरी त्याला मिळणारें पुष्कळ सैन्य त्याच्या विरुद्ध उठलें असतें. अमानुल्लाचें वजन अफगाण जनतेवर पूर्वींइतकें राहिलें नाहीं हें खरेंच होतें; शिवाय बंडखोरांना व त्याच्या साथीदारांना अमानुल्लाविषयीं तिटकाराही आला होता व संधि सांपडली असती तर सूरय्यासह त्याला ठार करण्यास त्या अविचारी क्रूरांनी मागें पुढें पाहिलें नसतें.

हा सर्व दूरवर विचार करून हे तीनही खान बंधू वेगळ्याच मार्गानें अफगाणिस्तानांत जाण्यास निघाले. नादिरखानानें तिसऱ्या अफगाण युद्धाच्या वेळीं कुरम विभागाचें आधिपत्य स्वीकारलें होतें. तिकडे त्याची सरशी होऊन त्यानें ब्रिटिशांना थळपर्यंत मागें रेटलें होतें. ही त्याची शौर्याची कामगिरी तेथील

जनता विसरली नव्हती. अफगाणांना शौर्यवान्, शक्तिमान्, सामर्थ्यशाली असाच पुढारी मानवतो; व त्याला ते देवाप्रमाणें पूज्य मानतात. म्हणून नादिरखानानें आपलें वजन होतें त्याच प्रांतांतून-कुरम मार्गें खोस्तमध्यें-अफगाणिस्तानांत प्रवेश केला. ता. ६ मार्च रोजीं तो पेशावरहून निघाला. शहामहमुदास त्यानें वेगळ्या मार्गानें अफगाणिस्तानांत पाठविलें.

१७५. **तिरंगी सामन्यास रंग चढला:**—इंग्रेज् काबुलमधून जातांच बच्चाच्या अमानुष पराक्रमाला ऊत आला. परंतु नादिरखाननें अफगाणिस्तानांत प्रवेश केला असें समजतांच तो किंचित् चपापला. मार्च १९ रोजीं तर हबीबुल्लानें नादिरखानाशीं तडजोडीचें बोलणें लावल्याची बातमी आली. नंतर सात दिवसांनीं अमानुल्लानें सैन्य जमवून कंदाहारचें ' सीमोल्लंघन ' केलें. काबूल जिंकण्यासाठीं तो बाहेर पडला. परंतु मुहूर्त चांगला साधला नव्हता असें परिणामांवरून म्हणावें लागतें.

नादिरखानच्या बंधूंनीं आपला पराक्रम गाजविण्यास आरंभ केला. ता. २८ मार्च रोजीं **गार्देझ** नादिरखानच्या ताब्यांत आलें. दक्षिणेकडून हीं दोन प्रस्थें आपणांवर चालून येतात असें कळतांच बच्चानें आपल्या सैन्याकडे वेगळी कामगिरी सोंपविली. ठिकठिकाणी चढाई करणाऱ्यांस विरोध करण्यासाठीं त्यानें थोडें थोडें सैन्य ठेवलें होतेंच; परंतु त्याची स्वतःची चढाई वेगळ्या दिशेनें चालू होती. उत्तर दिशेकडील अफगाण तुर्कस्तानवर हबीबुल्ला गाझीची सत्ता प्रस्थापित झाल्याची बातमी एप्रिल महिन्यांत आली आणि नंतर मे ४ रोजीं बच्चाच्या वतीनें **अबदुर रहिमानखान**नें हिरात काबीज केल्याचें समजलें !

हिरातचें लष्करी महत्त्व विशेष असल्यानें बच्च्याचा हा मोठाच विजय म्हटला पाहिजे. शिवाय तेथील व्यापार देखील दांडगा असल्यानें उत्पन्नाच्या बाबीनें बच्चाचा फायदाच झाला. तेथील तिजोरीतील द्रव्य व कोठारांतील असलेला दारुगोळा बंडखोर अमिराच्या हातीं लागला; इतकेंच नव्हे तर अमानुल्लास तिकडून (रशियामार्गें ?) मदत येण्याचा सर्व संभव नष्ट झाला. हिरातवर अमानुल्लाची भिस्त होती. पण तेंच शहर त्याच्या भिस्ती प्रतिस्पर्ध्याच्या हातीं पडतांच, त्याचें स्वतःचें धैर्य खचलें नसलें, तरी त्याला सहाय्य करणाऱ्या टोळ्यांवर या बातमीचा अत्यंत प्रतिकूल परिणाम होऊन त्यांचें धैर्य गळत चाललें. अमानुल्लाबद्दल त्यांना थोडा आदरभाव उरला होता, तोही संपुष्टांत आला.

अमानुल्लानें एप्रिल १६ पर्यंत कंदाहार व गझनी यांच्या दरम्यान **मुकूर**-पर्यंत प्रगति केली होती. नादिरखानानें अहमदझी व मंगल यांचें ५००० चें एक लष्कर जमविलें आणि शहा महमुदानें जाजींची दुसरी तुकडी आपलीशी करून घेतली. दोघांनीं मिळून एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यांत **लोगरकडे** मोर्चा वळविला. "मी अमानुल्लासाठीं खटपट करीत नाहीं" असें नादिरखानास अहमदझी टोळीची समजूत पाडण्यासाठीं शपथेवर सांगावें लागलें असें म्हणतात*

नादिरखानाच्या प्रगतीस विरोध करण्यासाठीं काबूलहून सैन्य आलें. गझनींचा 'अमीर' ग्यासुद्दीन याचा विश्वास नादिरखानास नव्हताच. कारण हे स्वयंमन्य अमीर फारच चंचल वृत्तीचे होते. नादिरला सहाय्य करावे का बच्चाचा आश्रय घ्यावा हें त्यांचें निश्चित ठरलेंच नव्हतें. त्यांनीं वरपांगीं जरी नादिरखानाशीं दोस्ती केली होती, तरी या चढाईच्या वेळीं एकाएकीं आपलें सैन्य काढून घेतलें. यामुळें नादिरखानास माघार घ्यावी लागली. ग्यासुद्दीन यांस नादिरखानाची भीति वाटली व म्हणून स्वसंरक्षणार्थ तो ब्रिटिश मुलखांत पळाला.* (९ मे १९२९).

**१७६. अमानुल्लाचा राज्यत्याग व पलायन** :—अमानुल्ला पुनः काबूलचा अमीर व्हावा अशी त्याच्या हाताखालील सर्व अधिकाऱ्यांची तीव्र इच्छा असल्याचें प्रत्यंतर मे महिन्यांत पहावयास मिळालें. मॉस्को मधील अफगाण वकील **गुलाम नबी** म्हणून होता. त्यानें सैन्य जमविलें ( व कदाचित् रशियाकडून मदतही मिळविली असावी ) आणि उझबेग व तुर्कोमानांच्या सहाय्यानें अफगाण तुर्कस्तानांत उतरून मझर-इ-शरीफ काबीज केलें. **ताश्कुर्घान** व **हैबक** येथेंही त्याचा अंमल पसरला. नबीला रोखण्यासाठी भिस्तीनंदनानें **सय्यद हुसेन** यास रवाना केलें होतें; तेव्हां या दोन्ही सैन्यांची लढाई चालू असतांनाच आपण ज्याच्यासाठी लढतो तो अमीर पळून गेल्याची नबीला बातमी मिळाली; आणि मग काय विचारतां ? नबीच्या सैन्यानें धांवपळीस प्रारंभ केला व स्वतः नबीसही तोच मार्ग स्वीकारावा लागला. उत्तरेकडून नबीचा हल्ला व दक्षिणेकडून अमानुल्ला व नादिरखान यांचा मारा, यामुळें काबूलच्या बंडखोर भिस्त्याचें औट घटकांचें साम्राज्य संपुष्टांत आलें असें त्यावेळीं वाटलें. पण तें तसें ठरलें नाहीं.

---

*The Times*, London, 12-11-1929.

अमानुल्लाच्या सैन्याची प्रगति मुकुरपर्यंत झाली होती ही बातमी आशादायी होती खरी. पण पुढें तेथेंच त्याच्या सैन्यांत बखेडे माजले आणि फंदफितुरीचा सुकाळ झाला. कंदाहारशीं असलेलें तारांचें दळणवळण तुटलें व निश्चितपणें कांहींच कळेना. नादिरखान व अमानुल्ला यांच्या हल्लयापुढें आणि उत्तरेकडील नबीखानाच्या माऱ्यामुळें बच्च्याची दाणादाण उडून अमानुल्ला पुनः लवकरच काबूलचा अमीर होणार अशा सुखस्वप्नांत डुंबत असलेल्या जनतेला ता. २३ मे रोजीं अत्यंत उद्वेगकारी बातमी ऐकावी लागली. सैन्यांत फाटाफूट झाल्यानें, रक्तपात थांबवावा या इच्छेनें प्रेरित होऊन अमानुल्ला व इनायतुल्ला राज्यत्याग करून सकुटुंब ब्रिटिश हद्दींत चमनला आले ! अफगाण राजकारणाच्या नीलांबरावर चमकणारा अत्यंत तेजस्वी तारा निखळून पंकांत पडला ! सिंहाला शह देणाऱ्या या शूर वीरास त्याच सिंहाच्या आश्रयाला यावें लागलें ! सिंहाची शेंपटी मात्र वर झाली, खुनशी स्मितानें मिशा ताठरल्या, आयाळाचे केंस उभारले....... !

**१७७. वैमानिकांची अपूर्व कामगिरीः**—या बंडाचे वेळीं विमानांनीं केलेली कामगिरी जगाच्या इतिहासांत अपूर्व अशीच मानली जाईल. एकूण १०७ फेऱ्यांत मिळून त्यांनीं ५८६ जीव सुरक्षित ठिकाणीं आणले. ३३९३० मैल त्यांचें भ्रमण झालें. हें सर्व कार्य विश्वबंधुत्वाच्या प्रेमानें प्रेरित होऊनच इंग्रज अधिकाऱ्यांनीं केलें. हिंदी प्रजेशीं मायबाप सरकारचा सापत्न भाव आहे अशी तक्रार बऱ्याच वेळां करण्यांत येते. पण विमानांतून आणलेल्या माणसांत ३४३ हिंदी प्रजाजन होते यावरून काय दिसतें ? जर्मन ५७, तुर्की ४९, इराणी २५, फ्रेंच २३, ब्रिटिश २३, व बाकीचे इटालियन अशी त्या मंडळींची वर्गवारी करण्यांत येते. हें सर्व धोक्याचें काम प्राणाचीही पर्वा न करतां कोणत्याही आर्थिक लाभाची आशा नसतां, प्रेमळ व प्रजाहिततत्पर सरकारनें मोठी झीज सोसून केलें, त्यांवर अफगाण भानगडींत लावालावी केल्याचा आरोप करणें योग्य होईल काय ?

वैमानिक दलानें 'आपखुषीनें' स्वीकारलेलें हें काम केवळ शांततामय हेतूनींच प्रेरित होतें. ( बच्चाच्या ) अफगाण सरकारचें यांत सहकार्य मिळालें होतें. आणि महत्त्वाची बाब म्हणजे विमानें संचार करीत असतां त्यांच्या आंतील बाजूस अथवा वैमानिकांच्या जवळ कोणत्याही प्रकारचें स्वसंरक्षणाचें वा हत्या करण्याचें शस्त्र नव्हतें.

नेहमीं बरोबर असणारीं पिस्तुलेंही वैमानिकांनीं नेलीं नव्हतीं, असें हिंदी लष्करी सेनाध्यक्ष वारंवार बजावून सांगतात.‡

त्यांच्या भाषणांतील उद्धृत केलेला भाग वाचून पाहिला तर दैवी चमत्कार झाल्याचें आढळतें. इंग्रजी अंमलाखालीं आज नव्यानेंच आम्ही आलों असतों तर, कर्नेल लॉरेन्सच्या दैवी शक्तीविषयीं रानटी टोळ्यांना अचंबा वाटला, तसाच आम्हांसही ब्रिटिश सरकारच्या या भूतदयेच्या कामगिरीबद्दल वाटला असता. ब्रिटिशांना भूतदयेचा इतका पाझर एकाएकीं कां फुटला हें कोण सांगूं शकेल ? बगदादहून लष्करी मोठीं विमानें मागवून फाटके तुटके हिंदी प्रजाजन काबूलहून पेशावरीं आणण्याइतकी करुणा त्यांस कां आली ? बरें, तसें म्हणावें तर मार्चमध्यें काबूलमधील नामांकित वीसतीस हिंदी व्यापाऱ्यांनीं ' आमच्या वैमानिक प्रवासाची व्यवस्था करण्याची कृपा करा' अशी कळकळीनें मागणी केली होती, ती हिंदी सरकारनें कां नाकारली ? § बटलर, दाया बचावण्यासाठीं 'आपण होऊन वैमानिकांचे जीव धोक्यांत घालणाऱ्या सरकारास काबूलच्या हिंदी व्यापाऱ्यांची मागणी मान्य करतां आली नाहीं हें कोडें नव्हे काय ?

आणखीही थोडा विचार केल्यास पुष्कळच चमत्कार दिसूं लागतील. बंडखोरींनें त्रस्त झालेल्या मुलुखांत विमानें जातात; एक दिवस नाहीं, दोन नाहीं, तर २३ डिसेंबर पासून २५ फेब्रुवारी पर्यंत बहुश: त्यांची रोजचीच फेरी होई. असें असतां अमीर हबीबुल्लानें अथवा त्याच्या पुंड अनुयायांनीं या विमानांस अथवा वैमानिकांस कोणत्याही प्रकारें त्रास दिला नाहीं हें आश्चर्य नव्हे

---

‡ या ठिकाणी विस्तारदोष स्वीकारूनही त्या भाषणांतील मुख्य भाग देणें आवश्यक आहे...... This operation of the R. A. F. was from every point of view a task of peace involving risks willingly undertaken, for purely humanitarian purposes, and carried out with the consent and co- operation of the Afghan authorities. From the very first day to the last, our pilot went up to Kabul without a single weapon of any sort. The machines were service machines ; but they were stripped of everything in the nature of offensive weapons. The same applied to pilots themselves who carried no arms whatever, not even pistols."

H. E. Commander-in-Chief's speech in the Council of State, 6-3-29, *Times of India (7-3-29)*

§ Legislative Assembly Debates, 1929, Vol. III p.p. 2352-53.

काय ? ब्रिटिशांच्या विमानांत उत्तम तऱ्हेच्या दूर पल्ल्याच्या बंदुका अथवा पिस्तुलें असल्यानें त्यांना भिऊन अफगाण बंडखोर विमानाकडे ढुंकूनही पाहीनातसे झाले असें मानावें, तर आमचे सेनाध्यक्ष अधिकारयुक्त वाणीनें ' शपथेवर ' काय सांगतात तें वर दिलेंच आहे. मग याची संगति लावावयाची कशी ?

ब्रिटिश सरकार पूर्णपणें तटस्थ असल्याने आणि तटस्थांच्या सुरक्षिततेसाठीं जिवापाड झटत होतें म्हणून, कदाचित् हबीबुल्लाने त्यांना अडथळा केला नसावा. परंतु प्रथम पासूनच ब्रिटिश लिगेशनकडे—मित्रत्वाच्या नात्यानें नसलें तरी शत्रुत्वाच्या भावानें खास नाही—बच्चाची दृष्टि कृपाळूपणाची कां असावी या शंकेचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. तसेंच युद्धोपयोगी विमानांवर ( Service machines ) कसल्याही प्रकारचें हत्यार नव्हतें असें मुद्दाम सांगण्याची आवश्यकता कां वाटावी ? सरकारी खुलासा करतांना अथवा एखाद्या बातमींतील तथ्य नाकबूल करतांना जी दरबारी भाषा वापरतात तींतून जसा वेगळाच अर्थ निघतो, तशीच बाब सेनाध्यक्षांच्या वरील भाषणाची असू शकेल. तो अर्थ सुज्ञांस उमगला तर बच्चाला मिळत असलेल्या द्रव्यसहाय्याविषयींचें आणि त्याच्याजवळच्या अलोट दारुगोळ्याचें उगमस्थान अज्ञात राहणार नाही.

प्रस्तुत प्रसंगीं आणखीही एक दोन गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. नादिरखान ता. २२ रोजीं मुंबईस पोहोचला व त्याची बोट धक्क्याला लागण्यापूर्वीच सरकारी राजकीय खात्याचे अधिकारी त्याच्या मुलाखतीस गेले. काबूलहून हंफ्रेज् त्यानंतर तीन दिवसांनीं म्हणजे २५ तारखेस निघाला. नादिरखानादेखत हा सर्व खेळखंडोबा चालावयास नको, म्हणून एखादा गुप्त कानमंत्र हंफ्रेज्ला गेला असण्याचा संभव आहे. नादिरखानाच्या कर्तबगारीवर सर्वांचाच विश्वास असल्याने अफगाण यादवीचा सोक्षमोक्ष आतां लागणार, तेव्हां आपण तेथें रहा कशाला, अशी विचारसरणी ब्रिटिश वकिलाची असावी. नादिरखानानें काबूलप्रवेश केला तेव्हां हंफ्रेज् तेथें असता तर... ...!

परंतु पेशावरी परत आल्यावर देखील काबूल लिगेशन, पेशावर अथवा दिल्ली येथें काम करीत राहूं द्यावें असा हंफ्रेज्चा आग्रह होता, तो कशासाठीं ? त्याला परराष्ट्रीय मंत्र्यांनीं तत्काळ लंडनला बोलावून घेतलें तें कां ? आणि बंडखोरांचाही पूर्ण विश्वास संपादिलेल्या हंफ्रेज्चीच पुनः काबूलच्या वकिलातीवर नेमणूक न करितां बगदादला हायकमिशनर म्हणून त्याला पाठविण्याचें प्रयोजन

काय ? इत्यादि प्रश्नांचा विचार केल्यास बरीच माहिती मिळेल. प्रस्तुत लेखकाची आकलनशक्ति मर्यादित असल्यानें मात्र त्यासंबंधींचें विवेचन त्याला करतां येत नाहीं. अस्तु.

**१७८. अली अहमद्‌जानची आहुति** :—अमानुल्ला कंदाहारमधून निघून जातांच अली अहमदजाननें आपण अमीर असल्याचें पुनश्च घोषित केलें. जलालाबादेस पराभव झाल्यानें तो पळून ब्रिटिश मुलखांत आला तेव्हां त्याची व नादिरखानाची पेशावरीं गांठ पडली होती. नादिरखान खोस्तमार्गें अफगाणिस्तानांत जातांच अली अहमदनें कंदाहारचा रस्ता सुधारला व तेथें अमानुल्लास मदत करण्याचा त्याचा विचार होता. अमानुल्लाला कोणत्याही प्रकारें प्रतिस्पर्धी म्हणून अहमदजानचें वागणें खरोखरीं नव्हतें असें दिसतें. जलालाबादेस अमीर म्हणून त्यानें स्वतःचा पुकारा केला, ती एक युक्ति असल्याचें त्यानें स्वतःच नादिरखानास सांगितलें होतें. आणि तो जर खरोखरच अमानुल्लाचा प्रतिस्पर्धी असता, तर आपण होऊन तिकडे कंदाहारीं जाण्यांत व अमानुल्लास मदत करण्यांत त्याचा हेतु काय असावा ?

अमानुल्लाकडे गेल्यावर कांहीं दिवसांनीं म्हणजे ८ एप्रिल रोजीं अमानुल्लाच्या रोषामुळें अली अहमदजान यास कारागृहांत पडावें लागलें § आणि अमानुल्ला चमनला पळून जातांच त्यानें पुनः स्वतःस अमीर म्हणवून घेतलें. परंतु तें कोरडें अमीरपद देखील त्यानें फार दिवस उपभोगूं नये असा विधिसंकेत होता. अमानुल्ला अफगाणिस्तान सोडून गेला असें समजतांच बच्चाला आपलें आसन स्थिरावल्यासारखें वाटलें. त्यानें कंदाहार काबीज करण्यासाठीं सरदार **अबदुल कैयुमखाना**ची योजना केली. अमानुल्ला व इनायतुल्ला पळून गेलेले पाहून आणि विशेषतः हिरात बच्चाच्या ताब्यांत आलेलें कळल्यानें कंदाहार सर करण्यास कैयुमखानास फार त्रास पडला नाहीं. ता. ३१ मे १९२९ रोजीं भिस्त्याचें निशाण कंदाहारवर फडकलें ! अली अहमदजान हबीबुल्लाचा कैदी झाला आणि काबूलला नेल्यानंतर जुलैच्या मध्याचे सुमारास बच्चानें त्याला देहान्त शासन केल्याची बातमी आली !

अफगाणिस्तानांतील अमीरपदाचा सामना जिंकण्यासाठीं आखाड्यांत उतरलेले दोन मल्ल तर बाहेर पडले. एकाची पैगंबरधामीं रवानगी झाली, तर

§ *The Times*, London 14-10-1929.

दुसऱ्यानें आपण होऊन परदेशवास स्वीकारला. हे दोन्ही मोहरे राजकारणाच्या अफगाण पटावरून निघाले तेव्हां पुढील कथाभाग जुळविण्यापूर्वी त्यांच्या चरित्राचें निरीक्षण करणें आवश्यक आहे.

प्रथमतः अली अहमदजानचा परामर्श घेऊन टाकूं. अली अहमदजानचा जीवनक्रम म्हणजे परस्पर विसंगत अशा प्रसंगांची मालिकाच आहे. अमानुल्लाचा मेहुणा म्हणून त्याला महत्त्व द्यावें, तर त्यानें राजाविरुद्ध गुन्हे केल्याबद्दल बंदिवास किती तरी वेळां त्याच्या नशिबीं आला होता. कैदी होणें हा जवळजवळ त्याचा धंदाच होऊन बसला होता असें म्हणतां येतें; तर इकडे अफगाणिस्तानांतील कांहीं उच्च अधिकाराच्या जागांवरही त्याची नेमणूक करण्यांत आलेली दिसते. तो हुषार कर्तबगार मुत्सद्दी होता यांत शंका नाहीं. पण सच्छीलाची जोड नसल्यानें वरचेवर कायद्याच्या कचाटींत सांपडून त्याला कारागृहवास भोगावा लागला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अली अहमदजान हा ' बिघडलेल्या ' कर्तबगारांपैकीं एक होता.

त्याचें शिक्षण हिंदुस्थानांत **मरी** येथें झालें असल्यानें त्याला इंग्रजी व उर्दू चांगलें येत असे. अमीर हबीबुल्लाच्या वेळेपासून तो मोठमोठ्या हुद्यांवर नेमला जाई. अमानुल्लापेक्षां अहमदजान सुमारें दहा वर्षांनी वडील होता. म्हणजे मृत्युसमयीं त्याचें वय ४६ असावें. मंगल टोळ्यांची पुंडाई सुरू झाली तेव्हां ( इ. स. १९१५ ) तत्कालीन अमिरानें त्याची योजना त्या लोकांना वठणीवर आणण्यासाठीं केली. पण लोकांवर हुकमत चालविणें किंवा त्यांचेकडून काम करवून घेणें ह्या कला अहमदजानला अवगत नव्हत्या. म्हणून ज्या कामासाठीं त्याची नेमणूक झाली होती, तें त्याला पार पाडतां आलें नाहीं. नंतर नवे रस्ते बांधण्याचें काम त्याच्याकडे सोंपविण्यांत आलें. परंतु तेथें या स्वारीनें चांगलाच प्रताप गाजविला. इ. स. १९१९ मध्यें सरकारी पैशाची अफरातफर केल्याच्या आरोपावरून अहमदजानला तुरुंगवास लाभला.

तिसरें अफगाणयुद्ध झाल्यावर कच्च्या तहाची वाटाघाट करण्यासाठीं रावळपिंडी येथें अफगाणिस्तानतर्फे आठ शिष्टांचें जें मंडळ आलें होतें त्याचा अध्यक्ष हाच अली अहमदजान होता ! इतक्या योग्यतेचा मनुष्य तहाचें काम यशस्वी करून परत स्वदेशीं जातांच कारागृहांत डांबला जावा ही किती खेदाची गोष्ट आहे ! पुढील तीन वर्षांत अली अहमदजानचा बहुतेक कार्यक्रम तुरुंगवासांतलाच आहे.

इ. स. १९२५ मध्यें अली अहमदजान काबूलचा गव्हर्नर झाला. त्याला ' शाहागाऽसी ' ( गृहमंत्री ) म्हणूनच अफगाण प्रजा ओळखते. त्या नंतर अहमदजाननें इंग्लंडचीही यात्रा केली असें दिसतें. अमानुल्ला युरोपच्या सफरीहून परत आल्यावर अहमदजाननें नव्या सुधारणांस विरोध केला म्हणून त्याला पुन: कारागृहांत जावें लागलें होतें.‡ असा हा उपयुक्त मनुष्य अमानुल्लानें आपल्या हाताशीं ठेवला होता. वेळप्रसंग पाहून त्याला तुरुंगांतून बाहेर काढावयाचें व मोठमोठ्या कामगिरीवर त्याची नेमणूक करावयाची यावरूनच अली अहमदजानच्या कर्तृत्वशक्तीची कल्पना येते. प्रथम जलालाबाद व नंतर कंदाहार येथें स्वत: अमीर म्हणून त्यानें स्वत:स घोषित केलें एवढयावरूनच त्याला अमानुल्लाचा प्रतिस्पर्धी म्हणतां येत नाहीं. अमानुल्लाविषयीं अहमदजानच्या मनांत कोणत्याही प्रकारचा किंतु नव्हता हें त्याच्या उपरिनिर्दिष्ट आयु:क्रमावरून अगदींच स्पष्ट होतें. मात्र त्याचे पोरखेळ अथवा ' चाळे ' अनिर्बंधित चालूं देण्यासारखे नसल्यानें अमिरांना अहमदजान यास बंदिस्त करणें भाग पडे. अशा कर्तबगाराचा योग्य उपयोग करून घेणारा दुर्लभ योजक मिळाला नाहीं म्हणूनच अहमदजानकडून झाली त्यापेक्षां अधिक महत्त्वाची कामगिरी होऊं शकली नाहीं. जी कांहीं थोडी बहुत देशसेवा अहमदजान यास करतां आली तिचें श्रेय अमानुल्लाकडे जाईल. कारण अमानुल्लानें त्याची योग्यता पूर्णपणें ओळखली असल्याविना कैदेची शिक्षा झालेल्या इसमास इंग्रजांशी तह करणाऱ्या शिष्ट–मंडळाचा अध्यक्ष किंवा काबूल शहरचा गव्हर्नर, अशा हुद्याच्या जागा मिळूं शकल्या नसत्या हें लक्षांत घेण्यासारखें आहे. अली अहमदजानच्या अंगी लष्करी कौशल्य म्हणण्यासारखें नसावें हें मात्र उघड दिसतें.

**१७९. अमानुल्लाची योग्यता:**—अमानुल्लाच्या राजकीय अवताराची तूर्त तरी समाप्ति येथेंच झाली असल्यामुळें त्याचा पुढील इतिहास थोडक्यांत पाहून नंतर त्याच्या एकंदर कर्तबगारीचें विवेचन करणें इष्ट होईल. सिंहाला शह देणाऱ्या या अमिराची सर्व साधारण योग्यताही आपणांस अजमाविली पाहिजे.

अमानुल्ला व इनायतुल्ला सपरिवार ता. २३–५–१९२९ रोजीं चमनला आले. तेथून हिंदी सरकारच्या मेहरबानीनें त्यांना एक खास गाडी मिळाली व क्वेट्टा दिल्ली मार्गें ते थेट मुंबईस ( कुलाब्यास ) ता. २७ रोजीं पोहोंचले. दोन्ही

‡ *The Times of India*, 30–5–29.

भावांच्या बायका आसन्नप्रसव असल्यानें बरोबर खास धात्रीजनांची सोय केली होती. मुंबईत या पाहुण्यांची सोय ताजमहाल हॉटेलांत करण्यांत आली. दीड वर्षापूर्वीच अमानुल्ला मुंबईत आला होता त्या वेळीं सम्राटांच्या तोडीचा शेजारीं दोस्त म्हणून त्याचें मानमरातबानें स्वागत झालें होतें आणि आतां ? स्वदेशांतील अंतस्थ यादवी तशीच अर्धवट टाकून स्वप्राणरक्षणार्थ तो पळून आला व सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे ज्या इंग्रजांविरुद्ध त्यानें बरोबर दहा वर्षांपूर्वी स्वातंत्र्य-संग्राम केला त्यांच्या कृपाछत्राखालीं आश्रय मिळावा म्हणून पूर्वाश्रमींच्या दोस्ताच्या नोकरांची याचना करण्याचा प्रसंग अमानुल्लावर आला. एखादा स्वाभिमानी राजा '**याञ्चाऽमोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा**' या वृत्तीनें वागून स्वदेशांतच स्वजनांकरवीं काय तो सोक्षमोक्ष करून घेता. पण ही मानपानाची आर्य कसोटी 'म्लेंच्छ' अमिरास लावून चालेल कसें ? अस्तु.

यथाकालीं सूरय्या प्रसूत होऊन तिला बाहेर हिंडण्याफिरण्यास वैद्यकीय परवानगी मिळाल्यावर अमानुल्ला आपल्या परिवारासह रोमला जाण्यासाठीं निघाला. ता. २४ जून १९२९ रोजीं 'मुलतान' बोटींत बसण्यापूर्वी हें अफगाण राज-कुटुंब हिंदभूमीचा निरोप घेत असतां अमानुल्लाच्या डोळ्यांत आंसवें आलीं. त्याचा कंठ दाटला; त्याला एक अक्षरही बोलवेना. हिंदभूमीचा त्याग करींत असतां तिजशींच संलग्न असलेल्या अफगाणभूमीची त्याला आठवण झाली असेल काय ? आपण अत्यंत स्वार्थी बुद्धीनें प्राप्त–कर्तव्यपराङ्मुख होऊन पळून जात असल्याबद्दल त्यास पश्चात्तापाचे चरके बसत होते काय ? अथवा जनतेवर सुधारणा लादण्याच्या उमेदीत कांहीं महत्त्वाच्या गोष्टींकडे दुर्लक्ष झाल्याबद्दल त्याला चुटपुट तर लागली नसेल ना ? शेजारीं असलेल्या 'रक्त' सर्पानें दहा वर्षांपूर्वीचा अपमान लक्षांत ठेवून आज त्याचा सूड उगविला कीं काय ? अशा अनेक प्रकारच्या विचारांनीं अमानुल्लास मुळींच स्वास्थ्य लाभलें नसावें. साध्या माणसाप्रमाणें प्रयाणकालीं त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले !

मुंबईत असतांना आपण देशत्याग कां केला त्याचीं कारणें अफगाण अमिरानें वर्तमानपत्रांच्या माहितीसाठीं सांगितलीं होतीं. "माझा पराभव कधींच झाला नाहीं. माझ्यामुळें देशांत बंडाळी व यादवी माजून रक्तपात होतो तो टाळण्यासाठीं मीच देशत्याग करण्याचें ठरविलें" असें त्यानें म्हटलें होतें. तें खरें असो अथवा खोटें असो, मुंबईस अमानुल्ला स्वतंत्र होता असें म्हणतां येण्यासारखी

त्याची व्यवस्था नव्हती, हें खास. कदाचित् 'शरणागतांस अभय देण्यासाठीं' इतका कडक बंदोबस्त ठेवून अमानुल्लाचें संरक्षण केलें जात असावें. आणखीही लक्षांत घेण्याजोगी गोष्ट म्हणजे काबूलच्या ब्रिटिश वकिलातींतील लष्करी अधिकारी मे. फ्रेजर हे अमानुल्लाबरोबर पोर्ट सय्यदपर्यंत मुद्दाम रवाना करण्यांत आले होते. 'उदकान्तं स्निग्धो जनोऽनुगन्तव्यः' ह्या शिष्टाचाराच्या दंडकानुसारच हें वर्तन आहे. कारण हिंदी महासागराची सीमा भूमध्य समुद्रापर्यंत आहे. आणि पोर्टसय्यद हीच सागरमार्गानें हिंदुस्थानची देवडी होते असो.

हिंदुस्थान सोडल्यानंतर अमानुल्ला इटालींत रहावयास गेला यांत कांहीं विशिष्ट अर्थ असेल, असें म्हणण्यास बरीच जागा आहे. कारण आपल्या 'उदार बंधूच्या' –केमाल पाशाच्या–घरीं जाणेंच अशा पडत्या काळांत अमानुल्लास श्रेयस्कर झालें असतें. शिवाय गमावलेलें पद पुनः प्राप्त करण्यासाठीं मदत देखील त्याला तुर्की सरकारकडून मिळाली असती. तेव्हां अमानुल्लाच्या इटालींतील वास्तव्याविषयीं 'सीता–अशोकवृक्ष–न्यायानें' शंका न काढतां त्याच्या अंतस्थ हेतूंचा अंदाज पाहिला पाहिजे. अमानुल्लाचें व मुसोलिनीचें प्रेम किती आहे आणि इटालीचा व अफगाणिस्तानचा संबंध कसा आहे हें युरोपियन सफरीच्या वेळीं दिसून आलेंच आहे. भौगोलिक रचनेमुळें तुर्की गाझीच्या मदतीचा उपयोग अमानुल्लास होणें हें तिसऱ्या राष्ट्राच्या मर्जीवरचें काम होऊन बसतें. आणि स्वतंत्रपणें एका राष्ट्रास भरपूर सहाय्य करण्याची ऐपत आज तरी अमानुल्लाच्या 'उदार बंधूं'च्या राष्ट्रांत नाहीं. इटालीची तयारी फारच वेगळी. 'आकाशांत इटालीयन विमानास संचार करावयास लावून सूर्यप्रकाश रोधण्याची' भाषा मुसोलिनीनें अनेक वेळा तोंडांतून काढली आहे. आरमारी नियंत्रणाकडे त्याचें मनःपूर्वक लक्ष नाहीं आणि इटालींत लोकसंख्या भरपूर असतांही 'संतति नियमन' करणें त्यानें गुन्हा ठरविला आहे. त्या व अशाच आणखी तयारीवरून मुसोलिनीनें अमानुल्लास आश्रय कां दिला याचें कारण लक्षांत येईल. हिंदी सरकारनें अबदुल करीम, सरदार उमरखान इत्यादि माजी अफगाण अमिरांच्या वारसांस हिंदी मलिद्यावर पोसण्याचें कारण 'राष्ट्रकार्य' (reason of state) असें सांगण्यांत येतें.‡ तशा पैकींच मुसोलिनीची ही युक्ति नसेल ना ? (मुसोलिनी अमानुल्लास तैनात कदाचित् देत नसावा.) कारण लढाईची तयारी करतांना कांहीं तरी खुसपट उकरून

‡ Legislative Assembly Debates, 1929. Vol. I, pp. 313-14,

काढण्यासाठीं हातांत साधन असलें म्हणजे बरें असतें. फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी किंवा रशिया या देशांत अमानुल्ला कां गेला नाहीं याचीं कारणें इतकीं उघड आहेत, कीं तीं निवेदन करण्याचें प्रयोजन नाहीं.

अमानुल्लाच्या कारकिर्दीस महत्त्व येतें तें मुख्यत: तीन कारणांमुळें. त्यानें राज्यारूढ होतांच ब्रिटिशांचा वरचष्मा झुगारून देऊन अफगाण राष्ट्र स्वतंत्र केलें हें पहिलें कारण. अबदुर रहमाननें प्रारंभिलेल्या राष्ट्रीकरणाच्या इमारतीस कळस चढविण्याची दुर्घट पण श्रेष्ठ दर्जाची कामगिरीही अमानुल्लानेंच अंगीकृत केली, हें दुसरें कारण; आणि नैकविध हेतूंनीं प्रेरित होऊन अफगाणेतिहासांत अपूर्व उपक्रम पाडून परदेशसंचार केला हें तिसरें कारण होय. या तीनही बाबतींत त्यानें मिळविलेलें यश पाहतां अमानुल्लाची योग्यता उच्च ठरते. परंतु आपणांस अमानुल्लाच्या चरित्रांतील आणखीही पुष्कळ प्रसंग पाहूनच त्याची खरी किंमत ठरविली पाहिजे.

अमानुल्ला अमीर झाला तो प्रसंग लक्षांत आणला तर असें दिसतें, कीं तेव्हां सर्व बाजूंची परिस्थिति त्याला पूर्णपणें अनुकूल होती. काबूल सुभ्याची सत्ता त्याचेकडे, तिजोरीवर त्याचाच ताबा, सैन्यावर हुकमत त्याचीच आणि दारुगोळयांचा कारखाना त्याच्याच देखरेखीखाली. शिवाय वयाच्या १४ व्या वर्षापासून अमानुल्लास राज्यकारभाराचें प्रत्यक्ष शिक्षण मिळत होतें. हबीबुल्लानें अमानुल्लाकडे कांहीं कामें लहानपणापासूनच सोंपविलीं असल्यानें अशा अनुकूल परिस्थितींत अमानुल्लास राज्यलक्ष्मीचा अभिलाष उत्पन्न झाला नसता तर '**स वै मुक्तोऽथवा पशुः**' याच कोटींत त्याची गणना करावी लागली असती! राज्य मिळविण्यास त्याला विशेष आयास पडले नसून आयत्या वाढून आलेल्या ताटावर योग्य वेळीं दुसरा कोणीच लायक इसम आढळला नाहीं—काबूलमध्यें हजर होऊं शकला नाहीं—याच कारणामुळें अमानुल्लाचे हातीं काबूलची सत्ता राहू शकली. त्याच्या मातुःश्रीलाही या स्वास्थ्याचें व अमीरपदप्राप्तीचें श्रेय दिलें पाहिजे. तिचें दुराणी जमातींवर फार वजन असल्यानें व तिच्या कारस्थानी धोरणामुळेंच अमानुल्लास सैन्याची संमति मिळवितां आली.

गादीवर येतांच अमानुल्लानें जाहिरनामा काढून अफगाण स्वातंत्र्य घोषित केलें व अंतर्गत राजकीय सुधारणा केल्या. त्या सर्व ताझींच्या डोक्यांतील दिसतात. कारण कांहींही म्हणण्यासारखें शिक्षण झालें नसतां व वयाचीं २७ वर्षेंही

पूर्ण झालीं नसतां अमानुल्लास राज्यव्यवहाराचें इतकें ज्ञान होतें असें म्हणण्याचें धाडस करवत नाहीं.

अमानुल्लाच्या नामस्मरणाबरोबर इंग्रजांना तिसरें अफगाण युद्ध आठवतें. म्हणजे अमानुल्लांशीं तें इतकें निगडित आहे. त्या युद्धाचें वर्णन व इष्टानिष्टता मागें यथाक्रम आलेलीच आहे. खरा **युद्धप्रिय** अमीर त्या वेळीं काबूलपदाधिष्ठित असता तर—आणि अफगाण जनतेला शांतताप्रिय अमीर मानवत नाहीं हा इतिहासाचा सिद्धांत आहे—त्यानें **जातीनें** झुंज आरंभिली असती, **स्वतः** हातांत समशेर घेऊन तो समरांगणावर आला असता. वास्तविक पाहतां तिशीच्या आंतील उमर म्हणजे युद्धप्रसंग नसेल तर उकरून काढण्याची, प्राप्त युद्धांत 'मरूं कीं मारूं' या ईर्षेनें झुजत राहण्याची. असें असतां अमानुल्लानें त्या वेळी कोठल्याही आघाडीवर प्रत्यक्ष युद्धांत भाग घेतला नाही, यावरून त्या भरज्वानींतल्या अफगाण अमिरास काय म्हणावें ?

हें तिसरें अफगाण युद्ध दोन्ही पक्षांना अपरिहार्य असेंच होतें; पण त्यांत एकाची सरशी व दुसऱ्याचा पाडाव असा निश्चित निर्णय समरभूमीवर लागला नाही. खलबतखान्यांतील वाटाघाटीवरून, व अफगाणस्वातंत्र्यप्राप्तीनंतर अमिराची सरशी झाली असें म्हणतां येत असलें तरी तें बव्हंशीं राजकीय परिस्थितीमुळेंच व अफगाणिस्तानच्या स्थानमाहात्म्यामुळेंच होय. अमानुल्लाच्या वैयक्तिक कर्तबगारीचा त्यांत फारसा भाग नव्हता. कागदोपत्रीं प्रकट होणारी धूर्तता व राजनीति ताझींचीच असल्यानें, खरें बोलावयाचें तर, अफगाणिस्तानची १९१९ नंतरच्या कालांत आंतरराष्ट्रीय व्यवहारांत किंमत वाढली, तो बव्हंशी अमिराच्या परराष्ट्रमंत्र्यांच्या हुषारीमुळेंच, यांत संदेह नाहीं. अमानुल्लानें सर्वस्वी ताझींच्या तंत्रानें चालविण्याचें ठरविलें, ताझींच्या मार्गांत व्यत्यय आणले नाहींत, याबद्दल पाहिजे तर अमानुल्लास पुष्कळच शाबासकी देतां येईल. कारण योग्य सल्लागार मिळाला तरी त्याच्या मसलतीप्रमाणें चालण्यास सुद्धां शहाणपण कांहीं कमी लागतें, अशापैकीं मुळींच प्रकार नसतो. असो.

अमानुल्लाचा कल रशियाकडे विशेष झुकला होता म्हणूनच कित्येकजण त्याला राजकारणी मानतात. अमानुल्ला प्रथमपासून लोकमतानुवर्ती पद्धतीनें वागला असें मानण्यास पुष्कळ पुरावे आहेत. शक्य असतें तर त्यानें संपूर्ण लोकशाही—रिपब्लिक—अफगाणिस्तानांत स्थापिली असती. ( तसें करणें अत्यंत हानि-

कारक ठरलें असतें हा भाग अलाहिदा ). एकदां भर सभेंत तर त्यानें असेंच बोलून दाखविलें कीं, " समजा, बोल्शेव्हिक राज्यपद्धति तुम्हां सर्वांस पसंत असली, आणि बहुमतानें तिचा स्वीकार करावा असें ठरलें, तर मीही बोल्शेव्हिक म्हणून देशसेवा करण्यास एका पायावर तयार आहे."‡ अमानुल्लानें लेनिनला पाठविलेली तार (पृ. ८५ पहा) व पुढें १९२१ व १९२६ मध्यें अफगाणिस्ताननें रशियाशीं केलेले तह यावरूनच अमानुल्ला बोल्शेव्हिक मतास अनुकूल होता असा तर्क काढणें धाष्टर्याचें होईल. त्याच्या 'सुधारणा' सर्वांत जाचक झाल्या, त्या गरीब शेतकऱ्यांनाच आणि त्यांचेच ताब्यांत सर्व सत्ता असावी असें रशियाचें तत्त्व आहे. तेव्हां अमानुल्लाचा ओढा बोल्शेव्हिकांकडे दिसला याचें कारण असें कीं, धर्महीनांचें व समतावाद्यांचें साम्राज्य त्याला आवडलें. त्याला बोल्शेव्हिक तत्त्वांचा अभ्यास करणें कांहीं अवघड नव्हतें. जनतेची सुधारणा करण्यासाठीं बोल्शेव्हिक तत्त्वानुसार उपयुक्त सल्ला अमानुल्लास पाहिजे असतां तर तो काबूलस्थ रशियन वकिलाकडून सहज मिळू शकला असता. अमानुल्लास बोल्शेव्हिक तत्त्वांची आवड नसावी असें मानण्यास हेंच कारण आहे कीं, गरीब प्रजाच त्याच्या सुधारणांमुळें जास्त चिरडली गेली.

दुसऱ्या बाजूनें विचार केला तर असें दिसतें कीं, रशियनांना अमानुल्लाचा हा वेडेपणा पूर्णपणें कळून चुकला असूनही त्यांनीं अमिरास कोणत्याही प्रकारें सूचना दिली नाहीं. उलट 'कडक उपाय योजून बंडखोरांना शासन करा; त्यांच्या मागण्या मान्य करूं नका' असें सांगून अफगाण राष्ट्राच्या युरोपीकरणांत रशियानें अमानुल्लास दुजोरा दिला. रशियनांच्या या वर्तनाबद्दल संशय येतो. कारण प्रावडा व्होस्टोका (Pravada Vostoka) नामक रशियन वर्तमानपत्रांत १ जानेवारी १९२९मध्यें अफगाण परिस्थितीबद्दल वर्णन दिलें आहे, त्यांत " ह्या नव्या सुधारणांमुळें शेतकऱ्यांची दैना व बहुजनसमाजाचा नाश होत आहे, नव्या सुधारणांसाठीं लागणाऱ्या पैशाचा बोजा सर्वस्वी शेतकऱ्यांवरच पडला आहे " असें म्हटलें आहे. * अशा धोरणावरून अफगाणिस्ताननेंही आपल्या अमलाखालीं यावें अशी उत्कट इच्छा रशियनसरकारची असावी हें स्पष्ट होतें.

---

‡ A Gani : *A Survey of Political Situation in Central Asia, p. 146.*

* *The Asiatic Review*, July 1929.

आणि क्रांतीचा मार्ग सुकर करून ठेवण्यासाठीं जनतेंत असंतोष फैलावेल तितका चांगलाच ! म्हणून तर रशियाचा हा दुटप्पी डाव नसेल ना ? अशी शंका घेण्यास पुष्कळ जागा आहे.

तें कसेंही असो, अमानुल्लाला रशियांतील नव्या तत्त्वज्ञानाची श्रेष्ठता जशी कळली नव्हती, तसेच त्या नव्या पद्धतींतील दोषही त्याचे लक्षांत आले नव्हते. यावरून अमानुल्लास स्वतंत्र विचार करण्याची शक्ति नव्हती असें अनुमान निघतें. अमानुल्लास स्वत:ला थोडा अधिक विचार असता, तर आपल्या तुटपुंज्या ज्ञानाच्या भांडवलावर देखील त्यानें स्वदेशहित पुष्कळ साधलें असतें. हल्लींचे इराणाधिपति रेझाशहा यांचें तरी शिक्षण कोठें अधिक झालें आहे ? अमानुल्लास राज्यकारभाराचा अनुभव लहानपणापासून होता तसा देखील रेझाखानास नव्हता. पण आपल्या देशाची परिस्थिति लक्षांत घेऊन रेझाखान सर्व परराष्ट्रीय वकिलांचा सल्ला फुकटांत मिळवूं शकतो आणि नंतर त्या सर्वांचा नीटपणें विचार करून जें कांहीं करावयाचें तें करतो. म्हणजे, सर्व राष्ट्रांचे तेहरानमधील दूत जसे कांहीं त्याचे मोफत सल्ला-गारच ! आणि हा लाभ थोडा थोडका नव्हे. तसें अमानुल्लानें मुळींच केलें नाहीं. सर्वस्वीं तार्झीच्या निर्णयावर तो अवलंबून राहिला.

अमानुल्लाकडून घडलेली दुसरी एक चूक म्हणजे नादिरखानाचा स्वदेश-त्याग. त्याची देखील जबाबदारी अमिरावरच पडते. कारण राज्यकर्त्यांच्या हाताखालीं विविधकार्यांसाठीं विविधप्रकारचीं माणसें लागतात. तीं सर्व राज-सत्ताधारी व्यक्तीच्या गुणांनींच सूत्रबद्ध राहून समष्टीचें हित साधण्यास मदत करितात. तार्झीचा दरबारांतील वरचष्मा नादिरखानास मान्य झाला नाहीं, का द्रुतगतीनें युरोपीकरणाची योजना त्याला पसंत नव्हती, का आणखी तिसरेंच कांहीं कारण होतें, न कळे. पण नादिरखानानें आपल्या तीनही बंधूंसमवेत अफगाणि-स्तान सोडलें आणि युरोपचा रस्ता सुधारला ! अफगाणिस्तानसारख्या देशांत, मुरलेल्या व लोकप्रिय सेनानीची आवश्यकता किती आहे तें सांगावयास नकोच. पण हा हबीबुल्लाच्या वेळेपासूनचा सेनाधिपति, तिसऱ्या युद्धांत इंग्रजांना मागें रेटणारा यशस्वी वीर अमानुल्लानें हातचा दवडावा, यासारखी राष्ट्रीय नुकसानीची बाब कोणती असणार ? तार्झी एकवेळ अफगाणिस्तानांतून गेला असता तर चाललें असतें. पण नादिरखानासारखा प्रत्यक्ष व्यवहारदक्ष, यशस्वी योद्धा आणि अनुभविक मुत्सद्दी दूर करणें केव्हांही इष्ट झालें नसतें व झालें नाहींही.

ताझींकडे अमानुल्लाचा विशेष ओढा कां असावा याचें कारण पाहिलें, त
पदच्युत आमिराचा दुसरा एक दोष दृष्टोत्पत्तीस येतो. ताझींच्या अंगीं पुष्क
योग्यता तर होतीच, पण सूरय्याचा तो पिता म्हणूनच अमानुल्लानें ताझींल
इतकें महत्त्व दिलें. तसेंच सूरय्याच्या आग्रहामुळें इनायतुल्लाचा कारागृहवा
१९२०मध्यें सुटला असें म्हणतात. यावरून अमानुल्ला सूरय्याच्या मुठींत होत
असें म्हणावयाचें कीं काय ?

अमानुल्लाबद्दल सामान्य जनतेंत जो अंध आदर आहे तो मात्र विनाकार
होय, असें साधारणतः म्हणावें लागतें. त्यानें गादीवर येतांच प्रथमतः इंग्रजांन
सासुरवास झुगारून दिला आणि त्यांच्याशीं लढाई आरंभिली. ह्या कारणामु
हिंदी जनतेस अमानुल्लाबद्दल नकळत आदर वाटतो. नंतर अमानुल्लानें स्वदेशो
द्धाराचे जे भगीरथ प्रयत्न केले त्यामुळें तर सर्व जगांतील राष्ट्रांचें लक्ष त्या
आपणाकडे ओढून घेतलें आणि त्याचे यत्न सद्धेतुप्रेरित असल्यानें सर्वांना
अमिराबद्दल सहानुभूति वाटे. परंतु अमानुल्लास दिला जाणारा हा आदरभा
सुस्थानी होता काय, असा खोल विचार केल्यास असें आढळून येईल कं
त्याची पात्रता नसतांना ( जनतेच्या अज्ञानामुळें ? ) त्याची ही बडेजावी हो
गेली. आज अमीर पदच्युत होऊन देशांतरीं गेला म्हणूनच आपण अ
म्हणतों असें नव्हे, तर भावी रियासतकारही अमानुल्लाबद्दल तेंच मत नमूद करू
ठेवतील.

कारण अमानुल्लाचे अंगीं जे गुण आहेत अशी आपली सर्वांची समज
बरेच दिवस होती, त्यांची कसोटीची वेळ म्हणजे १९२८–२९ मधील अफगाणि
स्थानांतील यादवी हीच होय. गुणांची परीक्षा पाहिली नाहीं, सोनें कसाल
लावलें नाहीं, योद्धयाचे रणांगणपटुत्व समरप्रसंगीं दिसून आलें नाहीं, तर मग त्य
त्या गुणांचा आरोप त्या त्या वस्तूंचे ठायीं अथवा व्यक्तींचे ठिकाणीं कर
समंजसपणाचें होणार नाहीं. अमानुल्लाचें समरचातुर्य, त्याची मुत्सद्देगिरी, त्याचं
धूर्तता, त्याची प्रजाहिततत्परता व त्याच्या आणखीहि इतर गुणांची पारख
बंडाच्या उपशम करण्यांतच दिसून आली असती. पण इतिहासावरून अमानुल्लाचं
किंमत ठरविणें असेल, तर आयत्या वेळीं सैनिकाचा व स्वदेश बांधवांचा रक्तपा
टाळण्यासाठीं पळून आलेला अफगाण अमीर काय योग्यतेचा ठरतो हें ज्यान
त्यानेंच ठरवावें. अंतिम देशहिताची तळमळ जर अमानुल्लास लागलेली असत

तर लढाईतील तात्कालिक कौर्याकडे त्यानें लक्ष द्यावयास नको होतें. आणि तसें न मानलें, तर चुकार विद्यार्थ्याला शिक्षा करणारा ' तात्या पंतोजी ' क्रूर ठरेल !

तिसऱ्या अँग्लो-अफगाण युद्धांत लष्करी दृष्ट्या अफगाणिस्तानचा दोष काय होता हें मागें सांगितलेंच आहे. अमानुल्लानें स्वतः लढाईत पुढाकार घेतला नाहीं, अंतस्थ बंडाळीची शक्यता दिसत असतांही लष्करी बल पुरेसें तयार ठेवलें नाहीं, आणि जें होतें त्याची अव्यवस्था केली, त्यांना पगार वेळेवर मिळाला नाहीं, त्यांना नाखूष करणारे कायदे त्यांचेवर लादले, इत्यादि बाबींवरून काय सिद्ध होतें ? अमानुल्ला खरा लढवय्या असता, रणभीरु नसता, तर त्यानें यादवींतून अशा स्वार्थीपणानें आंग कधींच काढून घेतलें नसतें. या ठिकाणीं हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, 'युद्धामध्यें अपलायन, धर्म हा क्षत्रियांचा जाण' ही भारतीय कसोटी गांधारदेशाधिपतीस लावून चालणार नाहीं. अगदीं आधुनिक इतिहास जरी पाहिला तरी हबीबुल्ला खेरीज इतर सर्व अमिरांना केव्हां ना केव्हां तरी राज्यत्याग करून पलायन करावें लागलें आहे असें स्पष्ट दिसतें. दोस्त महमद, शेर अली, अबदुररहमान, या तीन मोठ्या अमिरांवरही 'शत्रूला पाठ दाखविण्याचा' आणि प्रजापालनकर्तव्य-पराङ्मुखतेचा आरोप आलेला आहे. परंतु अमानुल्लाचें सर्वच विलक्षण होतें. उपरोक्त तीन अमिरांची पलायन कालची परिस्थिति व अमानुल्लानें देशत्याग केला त्या वेळची परिस्थिति भिन्न भिन्न होती. 'अमीर पळून गेला' याबद्दल अफगाण जनतेस कांहीं विचित्र वाटत नसलें, तरी अमानुल्लाचे बाबतींत तें वाटलें असें दिसतें. आणि म्हणूनच अमानुल्लाची आत्या लाहोरमध्यें आली असतां तिनें पळपुट्या अमिरास ' भ्याड ' असें सर्वादेखत म्हटलें.

असें जर असेल तर अमानुल्लाची कारकीर्द महत्त्वाची तरी कां ठरते, किंवा त्याला महत्त्व तरी कां दिलें जातें, या प्रश्नांचा विचार केला पाहिजे. अमानुल्लानें अफगाण स्वातंत्र्य जाहीर केलें हीच बाब महत्त्वाची आहे. यांत त्याच्या कारकीर्दीचें व महतीचें रहस्य आहे. तिसरें युद्ध ( १९१९ ) करतांना कोणीही व्यवहारकुशल मनुष्य अमीरपदारूढ असतां तरी त्याची अशीच वाहवा झाली असती. या संबंधांत आलेल्या संधीचा संपूर्ण उपयोग करून घेण्याची अमानुल्लाची वृत्ति मात्र वाखाणण्यासारखी आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. तिसरें युद्ध व युरोपची सफर या दोनच बाबींवरून त्याच्या या गुणाचें वैशिष्ट्य दिसून येईल.

त्याला मनुष्य स्वभावाची पारख चांगली होती, तरी राजे लोकांच्या आंगीं आवश्यक असणारी लोकसंग्रहाची बुद्धि त्याजजवळ नव्हती हें स्पष्ट आहे. कुतूहल बुद्धीचें समाधान करण्यापुरतें ज्ञानार्जन करण्याची उत्कट इच्छा त्याला होती, पण त्या योगें मिळालेल्या ज्ञानाचें ' चर्वण ' करून तें पचनी पाडण्यासाठीं लागणारें शिक्षण त्याला मिळालें नव्हतें. स्वतंत्र विचारशक्ति त्याला नसली, तरी आपला हितचिंतक म्हणून एकदां ज्याला मानलें त्याला '**करिष्ये वचनं तव** ' असें वचन देऊन तदनुसार आचरण ठेवण्याची ' शिष्यवृत्ति ' ( भक्तवृत्ति ) अमानुल्लाचे आंगीं होती हें निर्विवाद आहे. आपल्या मातुःश्रीच्या आज्ञेनुसार व ताझींच्या शिकवणीस धरूनच तो चालत आलेला आहे. आणि अशा वडिलांचा आज्ञाभंग करण्याचे धाडस अमानुल्लांत नव्हतें. अमानुल्लास स्वतंत्र विचारशक्ति नसल्यानें त्यानें अशा विचारवंतांच्या पूर्ण तंत्रानें चालविण्याचें ठरविलें त्यांतच त्याचा शहाणपणा होता. परंतु विचार करण्याचें सामर्थ्य असतांना असें ' वडिलावलंबी ' राहणें राजे लोकांच्या दृष्टीनें कितपत इष्ट व समर्थनीय ठरलें असतें हा प्रश्नच आहे. घरगुती व्यवहारांत आज्ञाधारक मुलगा असणें हें भाग्याचें लक्षण समजलें जातें, तसें राजव्यवहारांत नाहीं. राजा प्रजानुरंजनी असावा पण तो सर्वस्वी स्वाधीन बुद्धीचा असण्यांतच त्याचें, त्याच्या स्थानाचें व अधिकाराचें श्रेष्ठत्व आहे. साधेपणा, विनोदी स्वभाव, लोकांशी मिळून मिसळून वागण्याची वृत्ति, वेळेचा सदुपयोग करण्याची संवय हे अमानुल्लाचे सर्व सद्गुण, त्याच्या आंगी इतर मोठे राजपुरुषांस साजणारे आणखी गुण असते, तर फारच खुलून दिसले असते. पण आहे या परिस्थितींत ते नगण्य करण्यापलीकडे त्यांस किंमत नाहीं.

अमानुल्ला राजनगरींत व इतरत्र लोकप्रिय होण्याचे आणखी एक कारण म्हणजे त्याला अमीरपदाची, स्वस्थानाची किंवा इतर कोणत्याही प्रकारची ऐट नव्हती. अगदीं साधेपणानें रोज नागरिकांशीं मिसळून त्यांच्या सुखदुःखाची तो चौकशी करीत असे. पेशावरहून काबूलला जाणारे मोटारहांकेदेखील " अमीर आमच्याशीं अगदीं मोकळेपणानें बोलला " असें सांगत. म्हणजे पूर्वी ' राजदर्शनं लेभे ' असें वाक्य फारच क्वचित् ऐकूं येई, तर राजदर्शन ही अमानुल्लाच्या कारकीर्दीत नित्याचीच गोष्ट होऊन बसली होती.

अमानुल्लाला धार्मिक वेडाचें वैयर्थ्य कळून आलें होतें व धर्म नकोच अशी त्याची भावना झाली असावी. ह्या त्याच्या दूरदृष्टीच्या विचाराबद्दल तारीफ करतां

" खूप शर्तीनें राज्य राखिलें "



अमीर ' नादिरशहा '

[ His Majesty King Nadir Shah of Afghanistan ]

चालोंयान प्रेस, पुणें.

बच्चाचा क्रूरपणें व 'विश्वासघाता'नें वध केल्याबद्दल नादिरखानाविषयीं कित्येकांचें मत कलुषित झालें आहे. पण एवढ्यानेंच अफगाण अमीर दोषास्पद ठरत नाहीं. बच्चाचा विश्वासघात आमिरानें केला नाहीं ही गोष्ट खरी, असें शहा वली यांच्या वृत्तपत्रीय मुलाखतीवरून मानतां येतें. आणि समजा, नादिरखानानें लोकापवाद आहे तसा विश्वासघात करून भिस्तीनंदनाशीं क्रूर वर्तन केलें असें मानलें, तर त्यांत बिघडलें कोठें? '**यस्मिन्यथा वर्तते यो मनुष्यस्तस्मिन् तथा वार्तितव्यं स धर्मः ।**' हें जर आपणांकडे रास्त ठरतें, तर रानटी प्रदेशांत, अडाणी जनतेस भीति दाखविण्यासाठीं, देशोपद्रवी नामांकित डाकूस ठार केलें हें कृत्य गैर कसें ठरेल? क्रांतीची लाट उसळते तेव्हां अनुयायांना ताब्यांत राखण्यासाठीं विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यांना कडक शिस्तीनेंच चालावें लागतें. रशियांत देखील क्रांती झाली तेव्हां लेनिननें किती तरी जणांना फांसावर लटकविलें होतें !

नादिरखानांत इस्लामी धर्मवेड नाहीं. तो मुसलमान असला, तरी त्याची निष्ठा पैगंबरावर नसून परमेश्वरावर आहे. अनेक प्रकारच्या कौटुंबिक आपत्तींतून तो तावून सुलाखून निघाला आहे. त्याचें परदेशांत वास्तव्य झालें असल्यानें जगांतील नव्या विचारांचा आणि मतांचा वारा कोणत्या दिशेनें व काय वेगानें वाहतो, याची त्याला जाणीव आहे. राष्ट्राची सुधारणा अमानुल्लानें ठरविलेल्या ध्येयानुसार नादिरखान करणार यांत संदेह नसला तरी आपल्या बरोबर अशिक्षित, अडाणी व अर्धरानटी जनसंमर्द आहे हें ओळखून, त्यांना झेपेल अशा वेगानेंच तो जाणार हें स्पष्ट दिसतें. राजनिष्ठा, ध्येयनिष्ठा किंवा तत्त्वनिष्ठा यांचा सर्वसामान्य अफगाणांत अभाव दिसतो. तसें नादिरखानाचें नाहीं. त्याच्या आंगीं तीनही गुण उत्कटतेनें वास करीत असल्याची खात्री त्याच्या आयुःक्रमावरून सहजच होते. राजनिष्ठा नसती तर पिढीजाद अधिकार त्याला मिळाले नसते. ध्येयांविषयीं किंवा तत्त्वांविषयीं आदर आहे म्हणूनच व्याधिग्रस्त असतांही दूरचा प्रवास अंगिकारून त्यानें स्वदेशांत पेटलेला वणवा विझविण्यासाठीं आगींत उडी घेतली. अशा 'लोकसंग्रही' लोकनायकाच्या अमदानींत अफगाणिस्तानची सर्वांगीण भरभराट व्हावी, ती त्यानें स्वनेत्रानें पहाण्याइतकें दीर्घायुष्य त्याला लाभावें हीच सर्वांची इच्छा असणार.

---

## प्रकरण दहावें

# अफगाण समाजस्थिति

**१८५. सामाजिक अभ्यासाची आवश्यकता** :—एखाद्या देशाविषयीं सूक्ष्म अभ्यास करतांना तेथील भौगोलिक रचनेकडे जसें लक्ष द्यावें लागतें तसेंच तेथें राहणाऱ्या लोकांची मनःस्थिती, त्यांच्या भावना, त्यांच्या समजुती, त्यांचे विचार, त्यांचे आचार इत्यादिकांचाहि विचार करावा लागतो. किंबहुना असेंही म्हणतां येईल कीं, भौगोलिक परिस्थितीकडे एक वेळ दुर्लक्ष केलें तरी चालेल, पण मानसिक वृत्ति अथवा विचार या बाबींकडे कानाडोळा मुळींच करतां येणार नाहीं. आणि त्याच कारणास्तव अलीकडे मनोविकासशास्त्राचें स्तोम जिकडे तिकडे माजलेलें दिसतें. अफगाणिस्तानच्या इतिहासाचें थोडक्यांत निरीक्षण केल्यानंतर आपणांसही आतां अफगाण जनतेच्या मनःस्थितीचा जिज्ञासू दृष्टीनें अभ्यास करावयाचा आहे.

**१८६. धर्मगुरूंचें सर्वांगीण वर्चस्व** :—कोणाही माणसाची मनोवृत्ति जाणण्यास त्याचा धर्म आणि शरीरसामर्थ्य यांचा प्रथम विचार करावा लागतो. अफगाणिस्तानांत इस्लामी धर्माचे अनुयायीच फार आहेत. झरतुष्ट्री, यहुदी आणि हिंदू लोक देखील अफगाण प्रजेंत समाविष्ट असले, तरी मुख्य भरणा महमदानुयायांचाच आहे. इस्लामचें नांव घेतांच कडवेपणा आणि धर्मवेड या दोन गोष्टी ठळकपणें मनांत येतात आणि तशा त्या अफगाणांत आहेतही. मुसलमानी धर्माच्या दोन शाखा,–शिया व सुनी–असल्या तरी काबूलाधिपतीचे प्रजानन बहुकेत सुनीच आहेत. या दोन भेदांशिवाय प्रत्येक टोळीनें किंवा निरनिराळ्या

मुल्लांच्या अनुयायांनीं आपापल्या गुरूंच्या योग्यतेनुसार वेगवेगळे पक्षोपपक्ष निर्माण केले आहेतच. कोठल्याही रानटी टोळ्यांच्या इतिहासाचा अभ्यास केला तर हाच प्रकार आढळेल. अरबस्तानांतील कांहीं 'मुसलमानी' टोळया पैगंबराला मानीत नाहींत असें सांगितलें तर कित्येकांना आश्चर्य वाटेल. पण तें तसें आहे खरें. अफगाणिस्तानांत इतक्या थराला गोष्टी गेल्या नसल्या, तरी पैगंबरापेक्षां मुल्ला अथवा काजी श्रेष्ठ, असें लोक मानतात. मग त्या काजीला कुराणाचा अर्थ समजत नसला तरी चालेल! धर्मगुरूच धर्मसंस्थापकांपेक्षां उच्चासन विराजित करतात अशी अवस्था विचारहीन समाजांतच संभवते.

मुल्लांचा जनतेवर इतका पगडा बसण्याची कारणें अनेक देतां येतील. मुसलमानी धर्माप्रमाणें न्यायदानाचें काम काजीमुल्लांकडेच असतें. आणि धर्मशास्त्राचा अर्थ कळण्याची पात्रता नसल्यानें आपल्या लहरींवरच हे दाढीदिक्षीत न्याय देणार हें उघड आहे. एखाद्या गुरूचा 'भगत' बनणें किंवा त्याची कृपा संपादून घेणें ह्मणजे न्यायाच्या तागडींतील आपलें पारडें अक्षय्य आपल्याच हितासाठीं जड करून ठेवणें होय. न्यायदेवता अशा अल्पायासें प्रसन्न होऊं शकते, यावरून अफगाण जनतेच्या न्याय्यान्याय्य ठरविण्याच्या बुद्धीची कल्पना करतां येईल.

मुल्लांचें वर्चस्व अफगाणांवर बसलें आहे त्याचें दुसरें कारण म्हणजे त्यांची शिक्षणपद्धति. लहानपणीं मुलानें लिहावाचावयास शिकावें ही इच्छा आईबापांना फार करून होत नाहीं. आणि झालीच तर वाचण्यास शिकण्यास तमाम दुनियेंत कुराणाशिवाय दुसरा ग्रंथ कोणता आहे? अरबीसारख्या पवित्र भाषेविना दुसऱ्या कोणत्या भाषेचा अभ्यास करावयाचा असतो? मग मुल्लाच 'तात्या पंतोजी' झाले नाहींत, तर मास्तरकी करणार कोण?

तिसरें कारण 'वैद्यकीय' आहे. तबीब म्हणून वैद्यांसारखा एक वर्ग अफगाण जनतेंत असला तरी बहुजनसमाजाची वैद्यकीय भिस्त मृत मुल्लांवर अथवा पीरावरच असते. अशा पूज्य व्यक्तींचें थडगें, त्याच्या आसपासची माती किंवा तेथील झाडाचा पाला, यांच्यांत सर्व रोगापहरण करण्याची शक्ति सांठवलेली आहे, अशीच ठाम समजूत असल्यानें धर्मोपदेशकांचा प्रभाव जनतेवर विशेष पडला आहे. तो पिढयानूपिढया चालत आला असल्यानें त्याचें दडपण कायद्यानें अथवा फर्मानांनीं जाणें शक्य नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें तर अफगाण कौटुंबिक जीवनाचा बहुतेक भाग मुल्लांच्या वर्चस्वानेंच भारलेला असतो असें म्हणतां येईल. कौटुंबिक संस्कारासाठी त्यांची जरूरी असते. शिक्षणाचें व न्यायदानाचें काम सर्वस्वीं त्यांचेकडेच आहे. वैद्यकीय गुण धर्मगुरूंनाच येऊन चिकटतात. नैमित्तिक समारंभप्रसंगी त्यांची प्रतिष्ठा मोठी असते. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्यास मुल्ला म्हणजे अफगाणांच्या मनावर ताबा चालविणारा दुसरा परमेश्वरच आहे असें म्हणतां येईल.

**१८७ शारीरिक व मानसिक विशेष** :—शरीरयष्टीच्या कसोटीनें पाहिलें, तर अफगाण लोक पृथ्वीवरील कोणत्याही—सुधारलेल्या वा रानटी—रहिवाशांच्या मानानें पुष्कळच श्रेष्ठ ठरतील. मजबूत बांधा, उंच आणि धिप्पाड देह, थोराड नाक, क्रूर मुद्रा आणि एकदम डोळयांत भरणारी, निश्चयात्मक विचार दर्शविणारी चाल, ह्या सर्व वैशिष्ट्यांचे धनी केवळ अफगाण—पठाणच आहेत. त्यांच्यासारखें पाऊल टाकण्याची ढब वर्षानुवर्षे सराव करून देखील कोणांस साधणार नाहीं. ‘ प्रत्यक्ष अमिराला देखील आम्ही जुमानीत नाहीं ’ अशी त्यांची वृत्ति प्रत्येक पावलागणिक दिसून येते, हें सूक्ष्म निरीक्षकास तत्काळ कळून येईल. चेहऱ्यावरून क्रूरतेची जाणीव प्रामुख्यानें होत असली, तरी त्यावर स्वाभिमानाची—बेपर्वाईचीहि म्हणतां येईल—छटा नसते असें नव्हे. स्वाभिमानापेक्षां बेपर्वाई हेंच नांव त्या वृत्तीला देणें चांगलें. कारण स्वाभिमान म्हटला, कीं स्वतःच्या स्वतंत्र विचार शक्तीचें अस्तित्व संभवतें. आणि विचारशक्तीचें तर पठाणांना वावडें आहे. त्यांचें शौर्य आणि धैर्य ही मात्र मुद्रेवरून यथार्थपणें दिसून येत नाहीत.

**१८८. धार्मिक कल्पना व समजुती** :—इतक्या साधनांचा उपयोग करून त्यांच्या मनःस्थितीचें दिग्दर्शन करणें सोपें जाईल. धर्मगुरूंचा व त्यांच्या अज्ञानी शिकवणीचा पगडा अफगाण आयुःक्रमांत किती आहे हें पाहिल्यानंतर ‘ धार्मिक ’ आचरण, वेडगळ समजुती, ‘दृष्टी’ची भ्रांति, भविष्याविषयीं विशेष उत्सुकता, मुल्लांच्या दैवी सामर्थ्यासंबंधीं दृढ विश्वास, इत्यादिकांची रेलचेल अफगाणिस्तानांत आढळली, तर मुळींच आश्चर्य वाटणार नाहीं. खुद्द अबदुर रहमान सारख्या स्वपराक्रमावर अमीरपद प्राप्त करून घेणाऱ्या अमिराचीच गोष्ट पहा ना : मझर—इ—शरीफ येथें तो खुर्चीवर बसला असतां त्याजवर कोणीं गोळी झाडली. खुर्चीच्या पाठीला चाटून गोळी निघून गेली, पण अमीर भरगच्च

बसला असतांही बचावला, ( पृ. ५४ पहा ) याचें कारण स्वतः अमिरानेंच असें दिलें आहे. " मला लहानपणीं एका साधूनें मंतरलेला कागद दिला होता व तो जवळ ठेवल्यास मृत्यूपासून संरक्षण होईल असा त्याचा आशिर्वाद होता. तो अखेरपर्यंत मी जवळ बाळगला. " याही पलीकडची पायरी त्याच अमिरानें सांगितली आहे. " लहानपणीं माझा त्यावर विश्वास बसेना म्हणून मी तो मंतरलेला कागद एका मेंढराच्या गळ्यांत बांधला आणि त्याला मारण्याचे अनेक प्रयत्न केले. पण ते सर्व व्यर्थ गेले. म्हणून त्यावर माझा विश्वास बसला "‡

कुराणाची मिरवणूक काढणें, निजतांना तें उशाखालीं घेणें, 'अल्ला ' ' अल्ला ' असा दिवसभर गिल्ला करणें, नियमित वेळीं मशिदींत जाऊन ( रोज पांच वेळां ) प्रार्थना करणें, इत्यादि बाबी धार्मिक महत्त्वाच्या समजल्या जातात. शकुनापशकुनां-वर अफगाणांचा भारी विश्वास आहे. पुढें काय होईल हें जाणण्यासाठीं एखादा ग्रंथ घ्यावयाचा व उघडल्यानंतर त्याचें येईल तें पान वाचून त्यावरून शकुनापशकून ठरवावयाचे अशी सर्वसामान्य रीत आहे. आणि कुराणाखेरीज दुसरा ग्रंथ घरांत ठेवण्याची दुर्बुद्धि कोणाही इस्लामानुयायास होणार नाही हें उघडच आहे ! ' अल्ला ' मात्र प्रत्येक क्षणाक्षणाला त्यांना ' पादपूरणार्थ ' लागतो. " काय हो संध्याकाळीं ' पुलाव ' खाण्यास याल कां ? " अशा साध्या प्रश्नाचें उत्तर देखील ' इन्शाऽल्ला' नें विभूषित असतें. ' ईश्वराची कृपा असेल तर ' असा त्या मंडनाचा अर्थ आहे. तसेंच कांहींही क्षुल्लक गोष्ट घडली तर ' माशा अल्ला ' तोंडांतून बाहेर पडतोच. माशा अल्ला म्हणजे ईश्वराची मेहरबानी.

१८९. **' धार्मिक ' आचरण** :—धर्मावर अफगाणांची इतकी अलोट श्रद्धा आहे, तेव्हां त्यांचें नित्याचरण शुद्ध असावें, निदान भ्रष्टाचरणी तरी ते नसावेत, असा कोणी साधा मनुष्य तर्क करील. पण तो सपशेल चुकीचा आहे. धार्मिक आचरणांत नीतिबंधनें मुळींच येत नाहींत असें मात्र नव्हे. पण कुराणांत सांगितलेले आचार, काजीमुल्लांना समजले, तरच आपल्या भक्तगणांना ते समजा-वून देणार ! आणि काजीनें स्वोदाहरणानें घालून दिलेला धडा, मनाला वाटला तर इतर जनतेनें गिरवावा, इतके विकल्प आहेत. तेव्हां सदाचार–अर्थात् आपल्या दृष्टीनें–त्या पठाणी मुलखांत किती आढळेल त्याची कल्पनाच केलेली बरी. ( या

‡ S. M. Khan : *Life of Abdur Rahman, Vol. I, p. p. 273–4,*

ठिकाणीं इतकें सांगून ठेवणें आवश्यक आहे कीं, ' अफगाण जनता ' या शब्दानें सर्व साधारण लोक असाच अर्थ अभिप्रेत आहे. कांहीं शेलके शिक्षित व उच्च-कुलीन थोडके लोक या विवेचनांतून वगळले आहेत. ) धार्मिक आचारासंबंधीं-चेंच एक उदाहरण देऊन अफगाण सदाचाराची कल्पना देतां येईल. प्रत्येक खेडेगांवांत कोणा तरी साधुपुरुषाचें थडगें असतें. आणि आपण ग्रामदेवतेला देतो त्यापेक्षां जास्त महत्त्व अशा मृतस्थानास अफगाण देतात. एका खेडेगांवीं तशी कबर मुळींच नव्हती. त्यामुळें तेथील लोकांनीं शेजारच्या एका नामांकित साधूस आपल्या गांवीं बोलावून आणलें, त्याला ठार केलें आणि आमच्या गांवीं × × ची कबर आहे, अशी बढाई मारण्यास सुरवात केली. सर्वांत आश्चर्य असेल तर हें कीं, साधू त्या गांवीं कसा मेला हें लपवून न ठेवतां मोठ्या फुशारकीनें सर्व कथाभाग सांगण्यांत येतो. § अशीं गांवें एक दोनच नाहींत; पुष्कळ आहेत.

अफगाण नीतिमत्तेच्या कल्पनांचें पृथःकरण करून त्यांतून कांहीं तत्त्वें काढणें हें अशक्यप्राय काम आहे. अतिथी-सत्कारांत त्यांची बरोबरी करणारी रानटी जात दुसरी कोणती नाहीं. परंतु कोणाला तरी मुद्दाम सत्कारासाठीं बोला-वून आणून स्वत: प्रत्यक्ष त्या पाहुण्यांच्या सत्कारांत गर्क रहावयाचें आणि आपल्या हद्दीपलीकडे हे अतिथी असतांना त्यांना ठार करावयाचें किंवा लुटवा-ट्यांचें ही तर अफगाणांची आज तागायतची ' शिष्टसंमत ' रीत आहे. हिच्या बुडांशीं असलेल्या नैतिक तत्त्वांची छाननी कोण करणार ? खोटें बोलणें, फसविणें विश्वासघात करणें, दरोडा घालणें, चोरणें इत्यादि कृत्यें जेथें अन्याय्य ठरत नाहींत, मनुष्यवध करणें हा अपराध मानला जात नाहीं, उलट सूड घेण्यास–खुनास खून करण्यास–कचरणारा षंढ ठरतो, तेथें न्याय आणि अन्याय हे शब्द प्रचारांत नसावेत असें वाटतें. पण साधारणपणें शक्ति व युक्ति यांचें वर्चस्व दिसून येणारी बाब, न्याय्य, धर्म्य व रास्त ठरते. याच्या उलट, दुर्बलतेचें प्रदर्शन करणारें कृत्य किंवा मूर्खपणा पदरीं आणणारी बाब, जो करतो तो अन्यायी ठरतो.

**१९०. अफगाण स्वभावांतील गुणावगुण** :—नीतिमत्तेची अशी उदात्त व व्यापक कल्पना लोकांत प्रसृत असल्यानें त्यांच्या आंगीं इतर कोणते गुण असतील याचा अंदाज करतां येईल. कमालीचें धाडस व पराकाष्ठेचें शौर्य

---

§ T. L. Pennel : *Among the Wild Tribes of the Afghan Frontier*, *p.p. 33-34.*

अफगाणी जनतेंत आहे खरें. कोणतेंही धाडसाचें काम बेडररीत्या पार पाडण्याची अफगाणांची शक्ति अचाट व कांहीं अंशानें अनुकरणीयही आहे. विचार शक्तीचा अभाव असल्यानें अशीं कामें त्यांच्या हातून होऊं शकलीं, तरी कांहीं प्रसंगीं ह्याच दोषामुळें त्यांचें फार नुकसानही होतें. थोड्याशा अपयशानें किंवा पराजयाच्या नुसत्या काल्पनिक भीतीनेंही ते विगतधैर्य होतात. अफगाण सैनिकांचा मोठा गुण व मोठा दोष देखील एकाच विचारशक्तीच्या अभावामुळें उद्भवतो. त्यांचा उत्साह दांडगा असून अक्षय्य भात्याची आठवण करून देणारा आहे. लढत राहणें हाच त्यांचा बाल्यापासूनचा खेळ. त्यामुळें चढाई करण्यांत त्यांचा हातखंडा आहे. हल्ला चढविण्यास त्यांचा फार उपयोग होतो हें त्या दिशेनें झालेल्या स्वाऱ्यांच्या इतिहासावरून स्पष्टच आहे. समोरासमोर लढाई करण्यांत त्यांचा गुण दिसून येत नाहीं, उलट अवगुणच बाहेर पडतात, हें खरें असलें, तरी चारकर्मांत अफगाणासारखा निपुण इसम अन्यत्र क्वचित्‌च आढळेल. विशेषतः अफ्रीद्यांची या कार्यांत प्रसिद्धी आहे.

चेहरा उग्र दिसला तरी अफगाण हे फारच प्रेमळ अंतःकरणाचे असतात हें त्यांच्याशीं मिळून मिसळून वागणारा इंग्रज सेनाधिकारीही मान्य करतो. वंग कवीश्वर **रवींद्रनाथ** यांच्या ' काबुलीवाला ' या गोष्टीवरून पठाणाचा स्वभाव उत्तम प्रकारें व्यक्त होतो. मायाळूपणा व क्रौर्य यांचा इतक्या प्रमाणांत संगम झालेला सहसा दिसून येत नाहीं. कौटुंबिक जीवनक्रमांत पिता किंवा पति म्हणून पठाण हा कोमल मनाचाच आढळतो. मात्र दोष इतकाच, कीं ह्या मनोवृत्ति क्षणाक्षणाला पालटणाऱ्या असतात. स्वस्थ बसून एकसारखें गप्पा गोष्टी करीत राहणें किंवा चकाट्या पिटणें यांत अफगाणांना गोडी वाटते. आणि ह्या फुलावरून दुसऱ्यावर, पुढें तिसऱ्यावर, उडत जाण्याची 'मधुकर'वृत्ति, लहान मुलांप्रमाणेंच अफगाणांच्या गप्पागोष्टींत देखील व्यक्त होते.

गनिमी काव्यानें लढण्यांतच काय ते अफगाण पटाईत. युद्धशास्त्राचे कांहीं निर्बंध त्यांना ठाऊक असतील म्हणावें, तर लढाई शिकविण्याची किंवा तिचा अभ्यास करण्यासारखी ती बाब नव्हे अशी त्यांची पक्की खात्री आहे. रसद लुबाडण्यांत व अचुक नेम मारण्यांत हातखंडा असल्यानें त्यांच्याशीं लढावयाचें म्हणजे जपूनच रहावें लागतें. समोरासमोर तोंड न देतां शत्रू गैरसावध असतां हल्ला करून त्याचा समूळ नाश करण्याची त्यांची युक्ति बहारीची आहे.

अफगाणांना सत्यासत्याची चाड नाहीं, स्वदेश, स्वबंधु इत्यादिकांविषयीं भावना नाहींत किंवा कोणत्याही प्रकारच्या तत्वनिष्ठतेचें बंधन त्यांचेवर नाहीं. म्हणून त्यांनी आपली मेहनत, आपली लढाऊ शक्ति व आपलें स्वातंत्र्य जो कोणी जास्त द्रव्य देईल त्यास विकली आहे, हें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. हिंदी स्वातंत्र्य-लढ्यानंतर ( १८५७ च्या बंडानंतर ) हिंदुस्थानसरकारनें मराठे पंजाबांत, पंजाबी मद्रासेकडे, मद्रासी संयुक्त प्रांतांत अशी निरनिराळ्या जातींच्या शिपायांची नेमणूक करण्याचें धोरण ठरविलें आणि एके ठिकाणीं जमलेल्या पलटणी कोणत्याही एका बंधानें संघटित होऊं नयेत अशी खबरदारी राखण्यास प्रारंभ केला. त्यांतील हेतु उघड आहे. पण अफगाण युद्धांत आणि रानटी टोळ्यांवरील अनेक मोहिमांत अनुभव आला तो अगदीं वेगळा ! अफ्रीद्यांविरुद्ध अफ्रीदीच चांगले निकरानें लढूं शकतात. जातीजातींचें आपसांत वैर असल्यानें आपण फक्त ठिणगी पाडावी, कीं मग वणवा सारखा भडकत राहतो, इत्यादि गोष्टी अनुभवानेंच इंग्रजांना ठाऊक झाल्या. व त्याचा त्यांनी फायदा घेतला.

शारीरिकदृष्ट्या अफगाणांची इतकी वाढ झालेली असतां आपण ज्याला नैतिक आचरण म्हणतों, त्या मोजमापानें त्याची ही अधोगति पाहून आश्चर्य वाटतें. कोणतेंही कृत्य करण्यास मागें पुढें न पाहणारे हे लोक हिंदुस्थानचे शेजारी असल्यानें त्यांना वठणीवर आणणें व त्यांचा उपद्रव कमी करणें हें एक सरहद्द-संरक्षणाचें मोठेंच काम होऊन बसलें आहे. पण त्यांची गप्पा मारण्याची हौस, कोणत्याही एकाच विषयासंबंधीं पांच मिनिटेंही सारखा विचार कल्पना करण्याची अपात्रता, चंचल वृत्ति, कांचनाचें विलक्षण वेड, खुनाची हौस, बंदुका, रायफल्स, पिस्तुलें इत्यादींवर मनस्वी प्रेम, सूड घेण्याची दुर्दम्य तृष्णा, पहिल्या दर्जाचें धैर्य, कमालीचा क्रूरस्वभाव, काटक व सोशीक शरीरयष्टि ह्या सर्व गोष्टींचा फायदा ' दुर्लभ योजक ' सहज घेऊं शकतो. नीत्शेनें ठरविलेली नरश्रेष्ठाची ( ! ) कसोटी अफगाणांना उत्तम प्रकारें लागूं पडते. डोळ्यांतून टिपूस न गाळतां किंवा हृदयावर कोणत्याच भावनेचा परिणाम होऊं न देतां, मनुष्यजातीवर प्रहार करण्याची शक्ति ज्या प्रमाणांत अधिक, त्या प्रमाणांत त्या मनुष्याची श्रेष्ठता वाढते असें नीत्शेचें म्हणणें आहे. आणि हीच कसोटी लावून पाहिली तर अफगाण हद्दीवरील व खुद्द अफगाणिस्तानांतील पुष्कळ लोक वरचा नंबर पटकाविणारे निघतील !

विचाराचा अभाव म्हटला, कीं मग इतरही आणखी गुणदोष येतातच. चौकसबुद्धी, कांहीं ‘ अजब ’ चीज पाहून थक्क होणें, नवीन कांहीं दिसलें, की तें काय, कसें वगैरेविषयीं जिज्ञासा या बाबी बालस्वभाव निदर्शकच होत. हास्य-रसही त्या क्रूर अफगाणांना अत्यंत प्रिय असतो. आणि हंसतमुख मनुष्य पाहिला, कीं त्यावर ते एकदम खूष होतात !

इतकें जरी आहे तरी अफगाणांशीं बोलतांना फार काळजी घ्यावी लागते. त्यांचें मन म्हणजे किंचित्काल निद्रिस्त असलेला ज्वालामुखीच समजावा. आंतून भडका उडेल केव्हां, स्फोट होईल केव्हां, किंवा एकदम शांतता येईल केव्हां, याचा कांहींच नेम नसतो. त्यांचा क्रोध, त्यांचें क्रौर्य अथवा त्यांची सूडाची तृष्णा केव्हां जागृत होईल किंवा तिला कोणतें निमित्त लागतें याबद्दल कांहींच निर्बंध नाहीं.

ही सर्व सामान्य जनसमाजाची रीत झाली. पण जगांतील कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्रांतील प्रजाजनांच्या तोडीचे हुषार, सच्छील व सदाचरणी असेही कांहीं अफगाण प्रजाजन आहेत हेंही खरें आहे. त्यांची गणना अपवादात्मक मानतां येईल. पण इतर सर्वसाधारण जनता वर वर्णिलेल्या स्वभावाचीच आहे. अशा जनतेला एका फर्मानासरशीं सुधारूं पहाणाऱ्या अमानुल्लाच्या कार्याचा विस्तार व त्याची जबाबदारी किती अजस्र असली पाहिजे !

**१९१. मानापमानाच्या कल्पना** :—अफगाणांची मानापमानाची चाड कांहीं औरच आहे. ‘इज्जत’ व ‘शरम’ (शॅर्भ) यांसंबंधीच्या त्यांच्या व्याख्या सांगण्यास ब्रह्मदेवाची चार मुखें पुरणार नाहीत. ज्या कृत्यांना आपण अघोर, निंद्य, तिरस्करणीय म्हणूं, तीं कृत्यें, आपली ‘ इज्जत ’ राखण्यासाठीं अफगाण करतील. आणि एखाद्या नांव घालण्याच्या यादींत कोणाचा क्रम खालीं लागला, तर देखील त्याची इज्जत जाईल. या इज्जतीचें मोजमाप करण्यासाठीं किती नाजुक यंत्र करावें लागेल याची कल्पनाही करतां येणार नाहीं. ‘लाजाळू’चें झाड देखील त्या मानानें नाजुक म्हणतां येईल. शरमेची गोष्ट तशीच. रूढ चालीविरुद्ध एखादें कर्म केलें तर त्यामुळें तें करणाऱ्यास शरम नाहीं असें सिद्ध होतें, तर रूढ आचारांत कांहीं उणेपणा आला तर ‘इज्जत’ जाते. शरम व इज्जत यांतील भेद हाच.

**१९२. कलहाचीं नित्य कारणें**:—अफगाण जनतेंत भांडण होण्याचीं कारणें तीन. जर, जान, जमीन—कनक कांता आणि कृषि. रानटी मुलखांत

अगोदर पीक बेताचें. जें येईल त्याची नीट किंमत येत नाहीं. तेव्हां सोन्यासाठीं तंटे माजावे हें साहजिकच आहे. कांता तर जगाच्या आरंभापासून सर्व देशीं, सर्व कालीं मानवी संकटांची जननी आहे, असें पुरुषवर्ग प्रथमपासूनच मानीत आहे. जमिनीबद्दल भांडण झालें नसतें तरच आश्चर्य !

१९३. **अफगाण स्त्रीजीवन** :—स्त्रियांचा सामाजिक दर्जा पुरुषाची अर्धांगी म्हणून पुरुषांपेक्षां थोडासा कमी असला, तरी स्त्री जातीस रानटी अफगाण जितका मान देतात, तितका व्यवहारांत अनेक ठिकाणीं संस्कृतीचे अभिमानी हिंदू देखील देत नाहींत असें म्हणतां येईल. स्त्री एकटी प्रवास करीत असेल, तर अफगाण तिच्या वाट्यास जाणार नाहींत इतकेंच नव्हे, तर कोणी पुंडाई करूं लागल्यास त्याचा प्रतिकार करतील. स्त्रियांना एकटें प्रवास करणें अफगाणेस्तानांत फार सोईचें व सुरक्षित आहे. परस्त्रीचें मुखावलोकन करणें हें पाप मानणारे अफगाण बरेच असतात आणि म्हणून स्त्रियांचीं चित्रें सहसा तिकडे आढळत नाहींत. स्त्रियांचीं चित्रें पुढें धरलीं, तरी देखील ढुंकून न पाहणाऱ्या रानटी लोकांना सूरय्याचीं फ्रान्समधील चित्रें दाखविण्यांत आल्यानंतर अशा मनोवृत्तीच्या लोकांची भावना तीं चित्रें पाहून किती खवळल्या असतील याची कल्पनाच केलेली बरी !

स्त्रियांना एकटें राहून प्रवास करतां येण्याजोगी सुरक्षितता असली, तरी घरगुती जीवनक्रमांत त्यांचे फार हाल होतात असें म्हणतां येतें. कारण प्रथमतः पत्नी ही ' बाजार भावाप्रमाणें ' असेल ती किंमत देऊन विकत घेतली असल्यानें तिजवर हक्क सर्वस्वी पतीचा असतो. दुसरें असें, कीं कोणत्याही कारणास्तव माहेरचीं माणसें किंवा सासरचीं वडील मंडळी तिच्याविषयीं काळजी करीत नाहींत. ती विवाहोत्तर सर्वस्वी यजमानाच्या मालकीची होते.

घरांतलें सर्व प्रकारचें काम अफगाण गृहिणीस करावें लागतें. दळण, कांडण, भांडीं घासणें व चूल आणि मूल संभाळणें हीं तर तिच्या नशिबाचीं सुटत नाहींतच. पण सर्वांत कठीण काम म्हणजे पाणी आणण्याचें. विहीर अथवा झरा जवळ असला तर भाग्य, नाहीं तर कित्येक गांवांना ८।१० मैलांवरून पाणी आणावें लागतें. आणि घरगुती कामाचा मक्ता बायकांचाच. पुरुष त्यांत ' ढवळाढवळ ' मुळींच करावयाचे नाहींत. पहाटे उठून इतके दूर जाऊन पाणी आणल्यानंतर इतर सर्व कामें करावयाचीं, म्हणजे त्या गृहिणीची नित्याची सत्वपरीक्षाच आहे.

पण स्त्रीजात पडल्यानें मुकाट्यानें पडेल तें काम ती बिनतक्रार करीत असते! दुभत्या जनावरांची म्हणजे शेळया, मेंढ्या, गाढवी इत्यादिकांची धार काढण्याचें काम देखील गृहिणीचेंच !

यापेक्षांही त्रासदायक काम बायकांवर पडत असेल, तर तें म्हणजे अफगाण रानटी टोळया फिरत असतात तेव्हां. त्यांचा सर्व संसार बरोबर असावयाचा आणि त्याची जबाबदारी स्त्रीवरच पडावयाची. गर्दभराजावर अथवा असेल त्या वाहनावर सर्व सामान लादल्यानंतर हातांत घेण्यासारख्या वस्तू हातांत, अथवा डोक्यावर घेऊन, तान्ह्या बाळाला पाठीशीं बांधून टाकावयाचें आणि बाकीच्या कच्चाबच्चांना हाताला धरून घेऊन जावयाचें; जातां जातां भारवाहकाला पुढें हाकीत रहावयाचें, इत्यादि सर्व कामें गृहिणीच्याच वांटणीला येतात. पतिराज काळजी वाहतात ती आपल्या अर्धांगीची—बंदुकीची, तिला 'खांद्यावर' टाकून संसारापासून अगदीं अलिप्त असल्याप्रमाणें बायकोच्या तिरपिटीकडे मुळींच लक्ष न देतां हे अफगाण वीर जात असतात. *

परंतु अफगाण गृहिणींचें दुर्भाग्य एवढ्यावरच संपतें असें नव्हे. गरोदर असतांनाही त्यांना आपल्या यजमानांबरोबर हिंडावें लागतें आणि वाटेंत प्रसूति झाल्यानंतर......!! लगेच दुसरे दिवशीं तान्ह्या अर्भकाला घेऊन पुढील मजल गांठावी लागते ! परंतु कोणत्याही प्रकारची कुरकूर न करतां अफगाण दांपत्य-रथाचीं हीं दोन्ही चाकें मार्गक्रमण करीत असतात. अशा कठीण प्रसंगांतून जन्मापासूनच अफगाणांना जावें लागत असल्यानें ते साहजिकच काटक, कणखर व निकोप प्रकृतीचे होतात.

लग्नोत्तर कालांत आपली बायको वाईट चालीची आहे असें पतिराजास आढळून आलें, तर लगेच तिला शासन मिळतें. आणि नाक कापणें हें नित्याचें शासन होऊन बसल्यानें, दुर्वर्तनी स्त्री ओळखणें सोपें जातें. नवऱ्याचा संशय नेहमींच रास्त असतो असें नाहीं किंवा क्रोधाचा पारा नाक कापण्यापर्यंतच

---

* पुश्तुमध्यें एक म्हण आहे तिचा अर्थ असा: माहेरीं गरिबी असल्यामुळें स्त्री बापाच्या घरून पळून जाऊं शकेल, पण सासुरवासी असतांना मात्र मुळींच नाहीं. यांत अफगाण महिलांची स्थिती दिसून येतें. (हिंदी 'भूगोल' मासिक अफगाणिस्तान अंक, मे, जून, जुलै १९२९ पृ. ६१.)

चढेल असें नव्हे. कधी कधीं नाकाऐवजीं ' मान ' कापून पत्नीला पैगबरसदनीं पाठवितात, तर शक्य असल्यास परदारागमन करणाराचाही खून पडतो. परंतु अशा दुराचारी पुरुषाला ठार करण्यापेक्षां त्याचें नाक कापणें हीच शिक्षा अधिक अपमानास्पद ठरते. कारण लपून छपून राहून गोळी घालून कोणाचाही प्राण घेणें हें सोपें काम होतें, तर त्या मनुष्याला खालीं पाडून त्याचें नाक खच्ची करण्यास विशेष शक्ति व शौर्य लागतें. म्हणून ' मान' कापणारापेक्षां नाक काटणारा श्रेष्ठ !

आपल्या भावाच्या, मुलाच्या अथवा बापाच्या मृत्यूस कारणीभूत झालेल्या इसमाचा खून करणें हें मृताच्या निकट संबंधीयांचें वा वारसांचें प्राप्त कर्तव्य होऊन बसतें. कित्येक वेळां बायका देखील असा सूड उगवून ' मृतांच्या आत्म्यास शांति' देतात. परंतु विवाहित पत्नीचा खून करणारास ठार करण्यासाठीं किंवा इतर कोणत्याही प्रकारें शिक्षा द्यावयासाठीं कोणी ' माय्चेचा पूत ' पुढें येत नाहीं हें मात्र आश्चर्य आहे खरें. कारण ' स्त्रीवर मालकी विवाहित पुरुषाची' हा अफगाण ' स्मृती 'तील नियम शब्दशः पाळण्यांत येत असल्यानें दांपत्यांच्या भानगडींत तिसरा ढवळाढवळ करूं शकत नाहीं.

भावजय विधवा झाली कीं, तिजवर हक्क तिच्या दिराचा असल्यानें तिला दुसऱ्या लग्नाच्या वेळींही कांहीं आवडनिवड दर्शवितां येत नाहीं. गरीब कुटुंबांत साधारणपणें एकच पत्नी करण्याची रीत आहे. मुसलमानी धर्मा-प्रमाणें एका वेळीं चार बायका बाळगण्यास मुभा आहे. परंतु फक्त अमीरउमराव व श्रीमंत लोकच याहीपेक्षां वरचा नंबर पटकावून ' झनानखाना ' ठेवतात. या पद्धतीमुळें नैतिक अधःपात किती होतो हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. अफगाण अमिरांचीं पोरें डझनावारी मोजण्याइतकीं होत याचें कारणही बहुपत्नी-कत्वच होय. झनानखान्यांत वावरणाऱ्या या ' बडे बापके बेट्यांना ' अंतःपुरां-तील विलासी स्त्रिया अत्यंत घातुक व वाईट व्यसनांत पाडतात आणि त्यामुळें त्यांच्या हातून पुढील आयुष्यांत म्हणावी तशी कर्तबगारी होत नाहीं.

बालविवाहाची चाल अफगाण जनतेंत रूढ नसली, तरी बहुधा १२-१५ वर्षांच्या सुमारास मुलींचीं व १८-२० व्या वर्षी मुलांचीं लग्नें होतात. ' लग्नाचा बाजार'भाव जसा असेल त्या मानानें नवरदेव आपल्या भावी पत्नीची किंमत श्वशुरास देतात. किंवा दोन्ही घरांत ' साटेलोटें ' होण्यासारखें असल्यास काम

भागतें. पण कसेंही असलें तरी विवाहापूर्वीं वधूवरांची दृष्टादृष्ट होऊं शकत नाहीं. कांहीं टोळ्यांत वाङ्निश्चयोत्तर कालांत नियोजित वर 'नामजादबाजी'चा अवलंब करतो. विवाहपूर्वसंतती यामुळेंच होते आणि तिजबद्दल कोणाही व्यक्तीस विधिनिषेध वाटत नाहीं. अमानुल्लाचा देखील हिदायतुल्लाखान नामक जो पुत्र आहे तो सूरय्याशी त्याचें लग्न होण्यापूर्वीचा आहे.

बुरखा अथवा पडदा घेण्याची चाल अफगाण स्त्रियांत असली, तरी उच्च वर्गीयांतच आहे. खेडेगांवीं अफगाणललना बुरखा घेत नाहींत. मात्र परपुरुष स्त्रियांकडे सहसा पहात नाहींत हेंही खरें आहे.

**१९४. अफगाणांचे भोजन विशेष** :—अफगाणांचें भोजन मांसमय आहे हें सांगावयास नकोच. पण चणे, (हरभरा) मका, गहूं, तांदूळ व सर्व प्रकारचीं फळें खाण्याची त्यांना हौस आहे. चणे व मका तर अफगाणांना फार प्रिय. फुटाणे भाजून अथवा उसळ करून हीं धान्यें ते नित्यशः खातात. गव्हाची जाड रोटी आणि तांदुळाचा 'पुलाव' (मसाले भात) ह्या जिनसा ते करतात. पुलाव नाना प्रकारचा असून मांसखंडमिश्रित असल्याने लज्जतदार असतो. अफगाणांचें आवडतें पक्वान्न तें हेंच. गृहिणीचा सुग्रणपणा पुलाव करण्यांत दिसून येतो. मांसाशनासाठी शेळयामेंढ्या, गाईबैल अथवा उंट ह्यांचा उपयोग होतो. 'दुंबा' ही लठ्ठ शेपटीची मेंढयाची जात आहे. त्यांच्या शेंपटींत निव्वळ चरबी भरलेली असते व त्यामुळेंच दुंब्यास विशेष किंमत व लज्जत येते. दुंबा 'कोंवळा' असला तर त्यास 'बरा' म्हणतात. ह्या दुंब्याच्या बच्चाचें मांस फारच रुचकर लागतें. प्रत्येक अफगाण घरांत असे दुंबे अथवा बरे राखून ठेवण्यांत येतात. आणि कोणी अतिथिविशेष आला, की पाहुण्याच्या स्वागतार्थ यजमान मेषहननाचें पुण्य पत्करतो ! सर्वांनीं बंधुप्रेमानें एकत्र बसून जेवावयाचें ही अफगाण भोजनाची रीत. हिवाळ्यांत सर्वच अफगाण प्रदेशांत थंडी फार पडते, तेव्हां उपयोगी पडावें म्हणून मिळतील ते ठराविक प्राणी मारून त्यांचें मांस मीठ घालून वाळवितात. 'क्रुत' म्हणजे 'केसीन' (Casin) व सुका चक्का खाण्याचा प्रघात अफगाणांत आहे.

इतर खाद्यपेयांत चहाचा व चहाबरोबरच साखरेचा खूप प्रसार आहे. बिनदुधाचा चहा घेण्याकडे अफगाणांची अधिक प्रवृत्ति. चहा हा नेहमीं शास्त्रोक्त पद्धतीनें तयार करण्याकडे त्यांचें विशेष लक्ष असतें. चहाचा 'काढा' न घेतां,

उकळी आलेल्या पाण्याचाच उपयोग चहा करण्याकडे करतात. पाणी उकळण्या-साठीं ' समावार ' नामक एक झटपट पाणी तापविणारें भांडें वापरतात. त्यांतून तोटीनें तें किटलींत ओतावयाचें. दारू मात्र सर्व अफगाण मुलुखांत वर्ज्य समजली जाते. आणि तिचें सेवन करणारे भक्त परकीय वकिलातींतच बहुधा आढळतात. म्हणून कोठल्याही प्रकारचें मद्य, वारुणी, अथवा द्राक्षारस किंवा तसलें कोणतेंही द्रव्य अफगाण हद्दींत नेतां येत नाहीं.

आदरातिथ्य खरेंखुरें असलें तर फारच हार्दिक व अगत्यपूर्वक होतें आणि एकदां सर्वांनीं मिळून रोटी खाल्ली, कीं पूर्वींचा कट्टा वैरी असला तरी दोस्त बनतो. मग मात्र त्यांचें प्रेम किती उज्ज्वल असतें तें पहावयास मिळतें. स्वत:चे प्राण खर्चून ' मेहमाना 'चें ( पाहुण्याचें ) संरक्षण करण्यास ते मागें पुढें पहाणार नाहींत. आदरसत्कारांत खाण्यापिण्याचा इतका मनस्वी आग्रह होतो, कीं कदा-चित् त्याच्या भाराखालींच आगंतूक ( मूळ शब्दार्थ अभिप्रेत आहे. ) पाहुणा जेरीस यावयाचा. बरें, मोठ्या अदबीनें, कांहीं कारण सांगून जरी पुढें आलेल्या आतिथ्याचा अस्वीकार केला, तरी यजमानांची मर्जी तत्काळ खप्पा होऊन त्यांचा क्रोधानल भडकावयाचा, तेव्हां अजीर्णामुळें प्रकृति बिघडलेली एकवेळ पुरवेल पण यजमानांची अवकृपा नको असें वाटतें ! ' रमझान 'चा महिनाभर दिवसा उपास असून रात्रभर मात्र पोटोबाची भरती चालू असते; तो काळ पाहुणचार उपभोगण्यास चांगला.

**१९५. अफगाण नाच व त्याचें पर्यवसान** :—अफगाण आयुष्य क्रमांतील एक मनोरंजक व महत्त्वाची बाब म्हणजे उत्सव प्रसंगीं अथवा सणावारीं होत असलेला नाच होय. आनंदोत्सव साजरा करण्यासाठीं केलेला हा नाच इतका भयंकर व क्रूर वाटतो, कीं ब्रिटिश हद्दींत तो करतां येणें अशक्यच आहे. त्यांचें स्वरूप लढाईपेक्षांही भीषण आहे, असें शांतताप्रिय प्रजाजनांस वाटेल. श्रावणांत आपणांकडे स्त्रियांचा जसा ' फेर ' चालतो तसाच हा एक फेराचा पुरुषी आणि म्हणून आडदांड प्रकार आहे असें म्हणतां येतें. मोठें मैदान निवडून काढून मध्यभागीं एक खुंट रोंवतात. फेरांत भाग घेणाऱ्या मंडळींचीं वर्तुळें करतात. वृद्ध आणि अकालीं वार्धक्य आलेले तरुण किंवा तुंदिलतनु लोक आंतलें वर्तुळ बनवितात. बाहेर मात्र चपळ व धांगडधिंगा घालण्यास न कंटाळ-णारे तरुण राहतात. त्यांचीही सोईप्रमाणें वर्तुळें कमीजास्ती होतात.

ह्या फेरांतील मंडळी नेहमीं सशस्त्र असतात. आपलें कौशल्य प्रकट करणारा जवानमर्द तर एका हातांत समशेर व दुसऱ्यांत बंदुक घेतो. खेळांत भाग घेणारांच्या दोन गती असतात. एक स्वतः भोंवती व दुसरी सर्वांनीं मिळून खांबा-भोंवतीं फिरण्याची. तरवारी अथवा बंदुका देखील आपल्या भोंवतीं लपेटीनें फिरवीत राहण्याची आवश्यकता असल्यानें आणि बायकांप्रमाणें कोणीं हातांत हात घालीत नसल्यानें हीं वर्तुळें वाढत जातात.

शिवाय घोडेस्वार असले तर त्यांचें सर्वांत बाहेरचें वर्तुळ होतेंच. तेही सशस्त्र असतात आणि घोड्यावर स्वार होऊन फेर धरणार! मग त्या नाचाला एकाद्या युद्धाच्या रंगीत तालमीचाच 'रंग' येत असल्यास आश्चर्य कसलें? घोडेस्वारांचें अश्वारोहण कौशल्य व चापल्य आणि बेफामवृत्ति यांचें छानच प्रदर्शन पहावयास मिळतें.

हा सर्व 'नाच' संगीताच्या तालावर होत असतो. मध्यभागीं मृदंगा-सारखें एक वाद्य घेऊन म्होरक्या बसतो. प्रथमतः अगदीं हळू हळू एक एक पाऊल ठेक्यांत पडेल असें वादन चालतें. नंतर एकदां कां सर्व पात्रांच्या आंगांत तें वारें शिरलेलें दिसलें कीं, पाहिजे त्या वेगानें त्यांना फिरण्यास लावण्याचें काम ती एकटी व्यक्ति करीत असते! संगिताचा प्रभाव आणि प्रत्यक्ष लढवय्यांपेक्षां शिंग फुंकणाराचें महत्वच जास्त असतें ही विरोधाभासात्मक बाब यांचा अनुभव, हा नाच पाहिल्यावर येईल. पुढें पुढें ठेका जसा त्वरेनें पडूं लागतो तसे हे वीर द्रुत-तर गतीनें फिरूं लागतात. समशेरीची चमक चपलाईनें होते आणि वीरांना देहभान रहात नाहीं. बंदुका बहुधा भरलेल्याच असावयाच्या. तरवारीही लुटु-पुटीच्या नसतात आणि बेभान झालेले सशस्त्र वीर—( १००—२०० मंडळी देखील एका फेरांत असतात ) संग्रामसंगिताधीन होऊन गिरक्या खात असतात, तेव्हां चुकून देखील किती अपघात होतील याची कल्पना सहज करतां येईल. पण तेवढ्यानें अफगाण वीर मुळींच कचरत नाहींत. उलट बेपरवा होऊन फेर चालू ठेवतात. सर्वांनाच अतिशय शीण आला म्हणजे अल्पकाळ विश्रांति घेतात व पुनः अल्पविरामोत्तर हा नाच सुरू होतो.

मंगल उत्सव साजरे करण्याचे वेळीं हा नाच नाचण्याचा प्रघात असल्याचें सांगितलेंच. पण बहुधा अशाच आनंदोत्सवांत पुढील भांडणांचें बीज असतें, आणि भांडणें संपलीं कीं, त्या निमित्त आनंददायी उत्सव साजरा करतात. भर-

लेल्या बंदुका व खऱ्याखुऱ्या तरवारी यामुळें प्राणांतक अपघात निर्हेतुकरीत्याही घडतात. पण इतकें कळतें, तर मग ते अफगाण कसले ! बंदुक उडाल्यानें वा तरवारीचा वार लागून कोणी गतप्राण झाल्यास त्या घातकी शस्त्रधाऱ्याचा खून पडलाच पाहिजे. तेथें कांही दयामाया अथवा विचार चालणार नाहीं. तो खून पडला कीं, मग हा टेनिस'चा खेळ सुरू होतो ! मनुष्य मेला–नव्हे मारला गेला–की, त्याचे वारस इष्टमित्र सगे सोयरे कोणी तरी मारणाराचा खून करतात. हेंच पितरांना तृप्त करण्याचें अफगाण श्राद्धकर्म ! आणि मग ही खून परंपरा सारखी चालू राहते ! तिचें पर्यवसान, ज्ञातिकलहांत–जातीजातींतील आपसांतील युद्धांत–होतें.

अफगाणांचें ' हाडवैर ' कसें पिढीजाद चालत राहतें तें एका अफगाणी म्हणींत थोडक्यांत ग्रथित केलें आहे " कॉरी ब पोस्त दम्वमन ब दोस्त नशी " म्हणजे दगड जसा मृदु होणार नाही तसा दुश्मनही दोस्त होणार नाही.

अशी फारच दीर्घकाल चालत आलेली हत्याप्रतिहत्येची ' कंदुक क्रीडा ' बंद होण्यास कोणी तरी शिष्टानें मध्यस्थी करून दोन्ही पक्षांकडील ' थडग्यांची ' संख्या सारखी आहे, विषम नाही, ह्याची खात्री पटवून द्यावी लागते. मग लगेच ' तह ' होतो, दोस्ती होते, मेजवान्या होतात, नाच होतो व पुनः ब्रह्म-देवाचा सृष्टिक्रम चालू राहतो.

**१९६. आरोग्य आणि वैद्यकः**—तबीब व हकीम असे अफगाणिस्तानांतले वैद्यांचे दोन वर्ग आहेत. परंतु मृतसाधूंच्या कबरस्थानांतच सर्व शारीरिक वा मानसिक दुःखांचा परिहार करण्याचें सामर्थ्य असल्यानें फक्त श्रीमंत लोकच अशा धंदेवाईक वैद्यांच्या गिऱ्हाइकांत समाविष्ट असतात. कबरस्थानांतील झाडाचा पाला खाणें, कुटून लावणें किंवा तेथील मातीचा उपयोग करणें, अथवा कुराण पठण, अल्ला नामाचा गजर इत्यादि अडाणी उपायांचाच विशेष अवलंब, सर्व साधारण जनतेनें केल्यास हंसण्याचें कारण नाहीं. परंतु अफगाणिस्तानांत शस्त्रवैद्यांचीच विशेष आवश्यकता असते. नेहमीं भांडाभांडी चालणार आणि बंदुका, सुऱ्या, तरवारी याच 'न्यायदेवतां'कडून निकाल मिळावयाचा ! मृतांना तर कसल्याही उपचाराची अवश्यकता नसतेच. जखमी झालेल्या वीरांची शुश्रुषा करण्याकरितां, गोळी बाहेर काढण्यासाठीं किंवा जाया झालेला हात अथवा पाय तोडून टाकण्याकरितां शस्त्रवैद्यांचीच जरूरी आहे हें उघड आहे.

अफगाणजनतेंत जन्मतः व्यंग असलेला इसम कदापि आढळावयाचा नाहीं. लंगडा, थोटा, अंधळा, नाक कापलेला, असा इसम 'समरांगणा'वरच जखमी झालेला असल्यानें त्याचीं व्यंगें म्हणजे सुधारलेल्या जगांतील यद्धयांचे बिल्ले (मेडलसच) होत.

नाक कापलेलें असल्यास ओठावरचें कातडें घेऊन तें शिवून टाकण्याचें काम करणारे देशी शस्त्रवैद्य अफगाणांत असतात. पण तें कार्य फार कौशल्याचें असल्यानें आणि आतां अफगाणहद्दीवर ख्रिस्ती मिशनऱ्यांचीं मोफत इस्पितळें असल्यानें ती शस्त्रक्रिया 'दोक्तरा' कडूनच करविण्यांत येते. साध्या जखमांना टांके घालून तोंड बंद करण्याचें कार्य अफगाणललना आपल्या कोमल ( ? ) करांगुलींनीं व स्वतःच्या केशभूषेंतील केसांनी साधतात. साध्या तापानें आजारी असणाऱ्यासाठी शस्त्रक्रिया रोग्यावर न करतां उपचारावर करतात! एका मेंढराला मारून त्याचें कांतडें, मांस वेगळें करून सकेश काढतात आणि मांसविरहित पण केशसहित तें कांतडें, लोंकर बाहेर करून रोग्याच्या आंगाभोंवती गुंडाळलें कीं, तत्काळ दरदरून घाम सुटतो! मेषहननाची 'शस्त्रक्रिया' व नंतरचा उपचार जितक्या तांतडीनें उरकला जाईल तितका गुण अधिक व जलद येतो!

अफगाणिस्तानांत प्लेग व कॉलरा जवळ जवळ नाहींच असें म्हणतां येतें. देवीची सांथ मधून मधून येते. पण हिंवाळ्यांत चोहोंकडे हिमवृष्टि होत असल्यानें आणि गोरगरिबांजवळ पुरेसें वस्त्र नसतें म्हणून फुप्फुसांच्या विकाराचा प्रादुर्भाव होतो. शिवाय सामायिक 'गुडगुडी', एकत्र भोजन, एकाच भांड्यानें पेयप्राशन इत्यादि गलिच्छ प्रकारानें क्षयासारख्या विकारांचे जंतु पसरण्यास फार मदत होते. नेत्रविकारांचें प्राबल्य अफगाणिस्तानांत आहे असें दिसतें. पेशावरच्या मिशनरी इस्पितळांत बहुधा अफगाणिस्तानांतले व यागिस्तानमधीलच * रोगी येत असल्यानें अफगाणिस्तानांतील रोगांची कल्पना त्यांवरून करतां येईल ¶

एकंदर रोगी ९५३७ पैकीं ७८८ क्षय व फुप्फुसाच्या इतर विकारांनीं २३४० नेत्र विकारांनीं, ६४० त्वचेच्या विकारांनीं गांजलेले होते. आणि एका वर्षांतील एकूण २६११ शस्त्रक्रियांपैकीं डोळ्यासंबंधींच्याच १४५० होत्या.

---

* यागिस्तान म्हणजे अफगाणिस्तान व हिंदुस्थान यामधील निस्तंत्र प्रदेश.

¶ The Swan in the Pool ( A Report of the Afghan Medical Mission ) pp. 21-22.

त्वचेच्या विकारांची इतकी संख्या अफगाण जनतेंत आढळतें याचें कारण उघड आहे. स्नान करणें ही नित्याची क्रिया नसून वेळ सांपडल्यास व पैसे असल्यास आणि लहर लागली तर करावी अशी साधारण बहुजनसमाजाची रीत. कपडे एकदां आंगावर चढविल्यानंतर ते फक्त स्नानाच्या वेळीं काढावयाचे आणि स्नानाची तऱ्हा वर सांगितल्याप्रमाणें असल्यानें फाटून गळून पडले म्हणजेच दुसरे नवे कपडे येणार अशीच स्थिति, दारिद्र्यामुळें, अडाणीपणानें आणि थंडीच्या कडाक्यामुळे त्या लोकांवर लादली गेली आहे. तिचा परिणाम रोगांच्या आंकड्यांत दृग्गोचर होतोच !

१९७. शेती:—बर्फाचें वितळलेलें पाणी नद्यांतून वहात मैदानांत आल्यावर भूम्यंतर्गत पाटांतून तें पाहिजे तिकडे खेळविल्यानें अफगाणिस्तानांत शेती, पाट आहेत तेथें, किफायतशीर होते. पण पाट सर्वत्र असतात असें नाहीं. आणि अफगाणिस्तानांत वर्षाकाल नियमित नसल्यानें शेतीसाठीं हिवाळ्यांत पडलेल्या बर्फावरच कित्येकांना अवलंबून रहावें लागतें. इतर सर्व बाबतींत अगदीं रानटी वृत्तीचें प्रदर्शन करणाऱ्या अफगाणांत भूम्यंतर्गत पाट खोदणारे कुशल कारागिर कोठून आले हें कळत नाहीं. तैमूरलंगच्या वेळेपासूनचे पाट आजमितीस बिनतक्रार काम देत आहेत. यावरूनच त्यांची रचना किती कौशल्यानें केली असली पाहिजे हें दिसून येतें. नदीचें जास्तींत जास्ती पाणी शेतीकडे उपयोगांत आणण्याची ही पद्धत जगाच्या दुसऱ्या कोणत्याही भागांत आज इतक्या विस्तृत प्रमाणांत अमलांत नाहीं.

शेतीचीं अवजारें सर्वच जुन्या पद्धतीचीं आहेत. म्हणजे त्यांत झालेला बदल केव्हां व कोणी केला याची माहितीही कोणास नाहीं. बैलांवरच त्यांची शेती पुष्कळशी अवलंबून आहे. दुभत्या जनावरांत गाई, शेळ्या, मेंढया, गाढवी व उंट इत्यादींचा समावेश होतो.

१९८. फळें व पिकें:—इतर धान्याच्या मानानें अफगाणिस्तानांत फळफळावळीचेंच जास्त उत्पन्न आहे. तिकडील द्राक्षोद्यानें तर जगांतील श्रेष्ठ प्रतीच्या द्राक्षोद्यानांत गणिलीं जातील. सफरचंद ( तिकडील नांव 'सेप' ) मोसंबी, डाळिंबें हीं उत्कृष्ट जातीचीं फळें तिकडे विपुल होतात, हफ्ताळू, जरदाळू, पेयर्स,( Pears) पीच, इत्यादि फळें तर नासून जाण्याइतकीं तिकडे पिकतात. खरबूज, टरबूज व कांकड्या यांच्या स्वादिष्ट जातींची लागवड तिकडे होते. हीं फळें भोपळ्या एवढीं

मोठीं असतात. त्यांचा विशेष गुण टिकाऊपणा. २-३ महिनेपर्यंत हीं फळें सहज टिकतात. पिस्ते, बदाम, अक्रोड आणि चलगोजा यांची लागवड 'स्वयंभू' असल्याप्रमाणें मनस्वी आहे. आपल्याकडे बाभळी, बोरी, तशींच तिकडे ही कवचीचीं फळें !

खरीप व रबी हीं जशी आपणांकडे दोन पिकें आहेत, तद्वतच अफगाणांची 'बहरक' व 'जिरमाई' अशीं आहेत. गहूं, बार्ली यांचा समावेश पहिल्या वर्गात होतो आणि तांदूळ, मका, तंबाकू इत्यादि दुसऱ्या वर्गातली पिकें होत. कालव्याचें पाणी जेथें पिकांसाठीं उपयोगांत आणण्यांत येतें त्यास 'आबी' म्हणतात. आणि नैसर्गिक जलवृष्टी अथवा हिमवृष्टीवर शेती अवलंबून असते त्या प्रकारास 'लालम्' म्हणतात.

शेतसारा घेण्याची पद्धत निरनिराळ्या प्रकारच्या पाणीपुरवठ्यावर ठरविली जाते. ढोबळ मानानें बियाणें, घरचें 'शेपूट' आणि पाण्याची सोय या तीनही गोष्टींचा विचार करूनच सारा आकारतात. नदीचें पाणी शेतीसाठीं येत असल्यास उत्पन्नाचा तिसरा हिस्सा सरकारांत भरावा लागतो. विहिरीच्या पाण्यावर पीक पिकत असल्यास सरकार सारा उत्पन्नाच्या $\frac{१}{५}$ बसतो आणि सरकारी 'कारेझ' ( भूम्यंतर्गत पाट ) मधून पाणी मिळत असलें तरीही तितकाच आकार पडतो. मात्र खाजगी कारेझवर शेती होत असल्यास उत्पन्नाचा दहावा हिस्सा साऱ्यासाठीं द्यावा लागतो. पावसाच्या पाण्यावरील जमिनीलाही हीच आकारणी लागू आहे. शहराच्या आसपास असणाऱ्या बागाईत फळ-झाडांच्या जमिनीस दर तनाबास* रु. ७॥ ते ९ पर्यंत आकार द्यावा लागतो.

पूर्वी सारा बहुतेक पीक रूपानेंच भरला जाई. पण अमानुल्लानें नव्या सुधारणा अंमलात आणल्यापासून सर्व सारा नगदी वसूल केला जाऊं लागला. दरवर्षीचें उत्पन्न पाहून शेतकऱ्यांचें पीक बुडालें असल्यास अथवा कमी आलें असल्यास सूट देण्याचा अधिकार स्थानिक अधिकाऱ्यांस होता. साधारणमानानें दरवर्षी उत्पन्नापैकीं दोन ते तीन आणे सारा रयतेकडे बाकी राही. आणि दोन तीन वर्षे लागोपाठ त्याच इसमाकडे बाकी राहूं लागली कीं, त्याची असमर्थता पाहून सर्व सारा माफी होई. नूतन राजा अथवा अमीर पदारूढ झाला म्हणजे, किंवा प्रजेला खूष करण्यासाठीं म्हणून, खातेबाकीची माफी जाहीर करतात.

---

* तनाब हें क्षेत्रफळाचें माप आहे. त्याविषयीं या प्रकरणाचे शेवटी विवेचन आहे.

**१९९. उद्योगधंदे–व्यापारः**—व्यापाराची व्याप्ति अफगाणिस्तानांतही प्रत्येकास कळून चुकली आहे. त्यांचा रोजचा चहा हिंदुस्थानांतून यावयाचा आणि त्यांच्या देशांतील फळें व इतर माल खपणार तोंही हिंदुस्थानांतच. तेव्हां व्यापाराशिवाय त्यांचें चालत नाहीं. ताजीं व सुकलेली फळें, कवचीचीं फळे, हिंग, लोंकर व लोंकरीचे गालीचे ह्यांचाच भरणा अफगाणिस्तानांतून येणाऱ्या मालांत असतो. त्याशिवाय 'पुस्तीन' काक्मा, 'बरक' व 'कुर्क' ह्या जातींचीं तऱ्हेदार 'पाशवी' वस्त्रेंही दूरदेशीं पाठविण्याचें काम अफगाण व्यापारी करतात. लोंकरीसह मेंढ्यांचे कातडें कमावून केलेल्या अंगरख्यास 'पुस्तीन' म्हणतात. उंटाचें मऊ चामडें घेऊन त्यापासून केलेल्या वस्त्रास 'काक्मा' असें नांव आहे. मेंढ्यांची लोंकर व डोंगरी बोकड यांच्या केसांचें मिश्रण करून विणलेल्या नरम कापडास बरक ही संज्ञा आहे. बरक, अधिक बारीक पोताचे व तलम असलें म्हणजे त्याला कुर्क म्हणतात. हीं सर्व पाशवी वस्त्रें हिरात प्रांतांत तयार होतात; पण तीं इतकी महागाईचीं असतात कीं, साधारण मध्यमवर्गाला तीं वापरणें शक्य नसतें! अलीकडे विलायती फॅशनचे भोक्ते अशा वस्त्रांची मागणी फार करतात म्हणून सर्व माल परदेशच्या रोखानें जात असतो. रेशीम, फेल्ट (उंची जिन, बुरणूस) जपमाळा, इत्यादि आणखीही वस्तु अफगाणिस्तानांत तयार होतात. विशेषतः कंदाहार भागांतील जपमाळा फार नामांकित असल्यानें मक्केपर्यंत त्यांचा व्यापार चालतो. शंभर रुपयांसही एक माळ विकतात–इतकी चांगली ती बनवितात.

व्यापाराचे जिन्नस समजल्यानंतर उद्योगधंदे काय चालत असतील याची कल्पना येईल. लोंकर कांतणें व हातमागावर कापड विणणें इत्यादिकांचा समावेश घरगुती उद्योगांत होतो. मेंढपाळांचा धंदा अफगाणिस्तानांत फारच मोठ्या प्रमाणावर चालतो. दळणवळणाचीं आधुनिक साधनें–मोटारी–नुकतींच उपलब्ध झाली आहेत. तरी पण बहुतेक सर्व व्यापार अजूनही उंट व खेचरां-वरूनच चालतो. त्यामुळे उष्ट्रपाल व गर्दभपाल तिकडे पुष्कळ आहेत. पांच सहा उंट ठेवणारे उष्ट्रपाल जसे पुष्कळ असतात तसेच शेंकडोवारी उंट ठेवणारे मात्र क्वचितच आढळतात. मात्र सर्वत्र उष्ट्रपाल मिळून एकदम प्रवासाला निघतात. एका वेळीं २०० -३०० उंट आढळले तर आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. दीड दोन हजार उंट एका समुदायांत एकामागून एक जात असतात व एकाच्या शेंपटीची दोरी दुसऱ्याच्या वेसणीला बांधली असल्यानें ही 'रानोमाळ भटकणारी

माळ ' मैलच्या मैल लांब होते. अशा उंटांच्या तांड्याला ' काफिला ' म्हणतात. ह्या ' ग्रंथिबद्ध ' उंटांची पावलें झपाट्यानें पण रेशमी बूट घातल्याप्रमाणें अगदीं आवाज न करतां जमिनीवर पडतात. थंडीच्या दिवसांत उष्ट्रपाल असाच प्रवास करीत असतात. महिनेंच्या महिने ते घरापासून दूर राहिलेले असतात. या काफिल्यांत कांहीं खेचरें, गाढवें व घोडेही मिळून यथाशक्ति बोजा लादून घेऊन जातांना आढळतात.

सर्व दळणवळण बहुतेक ' चतुष्पाद ' वाहनावरून होत असल्यानें माल भरावयाचा किंवा पडशींत ठेवावयाचा तो ठराविक वजनाचा असावा लागतो.

२००. **मुख्य रस्ते**:—व्यापाराची ही पद्धत असल्यानें तेथें रस्ते कोणते आहेत व ते कसे आहेत हेंही आपणांस पाहिलें पाहिजे. अफगाणिस्तानांतली मुख्य शहरें तीन; काबूल, कंदाहार व हिरात. तेव्हां त्यांना जोडणारे रस्ते महत्त्वाचे ठरतात. पेशावर ते काबूल हा तर राजमार्गच आहे. हिंदुस्थानवर हल्ला करणाऱ्या बहुतेक राजांनी ( ? ) खैबर घाटांतील हाच मार्ग स्वीकारला होता म्हणून त्याला ऐतिहासिक व लष्करीहि महत्त्व विशेष आहे, पेशावर, जमरूद, अली मशीद, लंडी-कोटल, डाका, जलालाबाद, गंडमक, सुर्खपूल, कतासंग, खुर्द काबूल व कुटक या गांवांवरून काबूलला पोहोंचणारा हा रस्ता सुमारें २०० मैल ( १९२ ? ) लांब आहे. मोटार वाहतुकीसाठी ह्याच्या इतका चांगला रस्ता अफगाणिस्तानांत दुसरा कोणता नसेल. या रस्त्यावरील अत्युच्च घाट समुद्रसपाटीपासून ८२०० फूट उंच आहे. हफ्तकोटल ( हफ्त=सप्त, कोटल=घाट; सात घाट ) पासून कांहीं अंतरापर्यंत हिंवाळ्यांत पुष्कळ बर्फ पडतें.

काबूलहून गझनी, मुकूर, कलात-इ-गझनी, या मुख्य गांवांवरून कंदाहाराला जातां येतें. हा रस्ता सवातीनशें मैल लांब आहे.* कंदाहार ते चमन ही सडक ७२ मैलांची असून सबंध वर्षभर रहदारी चालू असते. कंदाहार ते हिरात ह्या रस्त्यास लष्करी महत्त्व आहे. ज्याच्या हातीं हिरात तो कंदाहार सहज सर करूं शकतो आणि कंदाहार म्हणजे हिंदुस्थानचें प्रवेशद्वार. शिवाय कंदाहार ही व्यापाराची फार मोठी उतारपेठ आहे कंदाहारहून हिरातकडे जातांना हेलमंद नदीवरच्या **गिरिश्क** येथील पुलावरून जावें लागतें. पुढें फरा व नंतर हिरात असा हा रस्ता ४०० मैल आहे.* हिरातहूनच पुढें कुश्कपोस्ट ह्या

* G. Macmunn : *Afghanistan*, *p. 310.*

रशियन रेल्वे स्टेशनपर्यंत ६१ मैलांचा रस्ता आहे. कंदाहारहून चमन व हिरात-पासून कुश्क या दोन्हीं अंतरांचें, त्या स्टेशनांमागें असणाऱ्या परस्पर विरोधी लष्करी व राजनैतिक डावांचें आणि त्यांचें आंतरराष्ट्रीय महत्त्वाचें वर्णन करण्याची जरूरी नाहीं. चमन येथें कंदाहारपर्यंत रेल्वे नेण्याचें सामान जसें जय्यत ठेवलें असून अल्पकालांत तो फांटा तयार करण्याची सिद्धता राखण्यांत आली आहे, तशीच व्यवस्था कुश्क येथें रशियनांनीं केली आहे. आणि 'चमन'चें प्यादें पुढें सरकविण्यासाठीं इंग्रजांनीं कांहीं हालचाल करण्यासाठी हात हालविला कीं, रशि-याही दुसऱ्या टोंकाकडून आपलें घोडें पुढें दामटणारच आणि अस्वल व सिंह यांच्या या टक्करींत बिचाऱ्या अफगाणिस्तानचा........ ! असो.

हिरातकडून पश्चिमेकडे इराणी सरहद्दीपर्यंत व पुढें मशहदला जाणारी एक सडक आहे. इराणी हद्दीपर्यंत तिची लांबी ५१ मैल आहे. याखेरीज काबूल ते गार्देझ, १० मैल, काबूल ते आक्रोबत (बामियाँ कडे) १६२ मैल, काबूल ते गुल्बहार ५२ मैल, काबूल ते जौकुल ५९ मैल, हैबक ते पट्टकेशर १२४ मैल, हे रस्ते नेहेमींच्या रहदारीचे आहेत.

**२०१. पोषाख, भाषा**:—अफगाणांचा पोषाख कसा असतो हें सांगण्याची आवश्यकताच दिसत नाहीं. पोकळ विजार, तसाच सदरा, घट्ट जाकिट, थोराड रुमाल व आंत लहानशी गोल टोपी, मजबूत पादत्राणें इत्यादि सर्व ठराविकच आहे. स्त्रियांच्या वेषांत रंगीत कापडच जास्त असतें. कशिदा किंवा तशीच नक्षी करण्याची आवड रिकामटेकडया जनतेंत व्हावयाचीच व ती अफगाणांत आहेही.

बहुतेक पठाणांची भाषा पुश्तु असली तरी स्थानपरत्वें तींत थोडेफार भेद आहेत. काफिरिस्तानांत काफिरी भाषा निराळी आहे. इराणी हद्दीकडील प्रांतांत फार्सीचा पगडा दिसतो तर अफगाण तुर्कस्तानांत तुर्की व रशियन या भाषांचें वर्चस्व आढळतें. दरबारची भाषा मात्र फार्सी आहे व तिचा नेहमीच्या व्यवहारांत देखील उपयोग करतात. पुश्तु वाङ्मयासंबंधीं विवेचन शेवटीं परिशिष्टांत आहे.

**२०२. कांहीं अडाणी समजुती** :—अफगाण लोक मिशी फुटलेल्या अविवाहित मुलांस आपल्या घरीं निजूं न देतां गांवांतील सार्वजनिक 'चावडींत' झोपावयास पाठवितात. भविष्यावर किंवा फलज्योतिषावर त्यांचा तत्काळ विश्वास बसतो. इंग्रजांचें पाऊल प्रथम अफगाणभूमीवर पडलें (इ. स. १८३९) तत्पूर्वी काबूलमध्यें आतां सूकरभक्षकांचें राज्य होणार अशी भविष्यवाणी लोकांत

प्रसृत होती. कारण तुर्की पद्धतीनें प्रत्येक वर्षाला (आपल्या साठ संवत्सरां-प्रमाणें) ठराविक नांवें आहेत, त्यांत त्या वर्षाला डुकराचें नांव होतें. शिवाय एका पुण्यपुरुषाला स्वप्न पडलें, त्यांत त्यानें आपल्या यजमानाच्या घरांत सूकर-चर्म पसरून ठेवलेलें पाहिलें होतें. तेव्हां सूकरभक्षकांचा संसर्ग आपल्या पुण्यभूमीस होऊन त्यांची चलती होणार अशा अर्थाच्या आत्मविश्वासघातक वदंता काबुल-मध्यें प्रसृत झाल्या होत्या. * इतक्या प्रबल पुराव्यानें (!) अफगाणांचा आत्म-विश्वास फारच लवकर मारला गेला व म्हणूनच पहिलें अँग्लो-अफगाणयुद्ध इंग्रजांना अल्पायासें जिंकतां आलें.

**२०३. टपाल-तारा-टेलिफोन** :—टपालाची सोय अफगाणिस्तानांत अमानुल्लाच्या कारकीर्दींतच विशेष नियमितपणें झाली. आणि ' जागतिक टपाल-संघास ' अफगाणिस्तान येऊन मिळालें तेंही १९२८ मध्येंच ! त्यामुळें अफ-गाणिस्तानला जगांतील कोठल्याही सुधारलेल्या देशांतून ( कारण बहुतेक देश टपालसंघाचे सभासद आहेत म्हणून ) टपाल पाठवितां येऊं लागलें. पेशावरहून लंडीखाना येथें काबूलला जाणारें सर्व टपाल येतें व तेथून पुढें अफगाण वाहनां-तून तें पुढें येतात. त्याचप्रमाणें क्वेट्याहून चमन येथें टपाल पाठविण्यांत आल्या-नंतर तेथून कंदाहार मार्गें तें जेथल्या तेथें रवाना करतात. अडीच तोळ्यां-पर्यंतच्या पाकिटास तीन आणे, कार्डास दीड आणा असें हिंदुस्थानांतून अफगाणि-स्तानच्या टपाल हंशीलाचें प्रमाण आहे.

काबूल ते पेशावर तारायंत्र कसें सुरू झालें याचें वर्णन मागें येऊन गेलेंच आहे. पुढें व्हाइसरॉयनीं वायरलेसचा एक सेट अमीरें,अमानुल्लास नजर केला $ आणि दोन्ही देशास बिनतारी संदेशवाहन सुरू झालें. रशियनांनीं इतर तारा घालण्याचें काम आपण होऊनच पत्करलें होतें. त्याप्रमाणें बहुतेक मुख्य शहरांशीं

---

* Tate : *Kingdom of Afghanistan. p. 148.* शत्रु पक्षीयांना नामोहरम करण्याची ही युक्ति भविष्यकथनावर विश्वास असणारांवर फारच परिणामकारी ठरते आणि पानिपतच्या तृतीय रणसंग्रामप्रसंगीं दुराणी अहमदशहानें मराठ्यांच्या छावणींत अशाच गप्पा पसरवून त्यांचा विश्वास मारला असें कांहीं इतिहासाभ्यासी म्हणतात. तशापैकींच हा प्रकार आहे. मात्र ह्या अंधगप्पांचें जनकत्व कोणाकडे जातें तें निश्चित सांगतां येत नाहीं.

$ L. Thomas : *Beyond Khyber Pass.*

टेलिफोनचें दळणवळण चालू असून 'तिलीफून' वर बोलण्याची अफगाणांना फारच मौज वाटते,* अशी माहिती शौकत उस्मानी यांनीं दिली आहे. शिवाय तारायंत्रांचें काम करण्यासाठीं लागणारें शिक्षण, अफगाण जनतेस नसल्यानें टेलिफोनचा प्रसार झाला हेंच चांगलें. पुश्तु अथवा फार्सी भाषा तारायंत्राच्या संकेतांत उत्तम प्रकारें बसूं शकते; कारण इंग्रजीप्रमाणेंच त्यांचीं मुळाक्षरें २६ ते २८ इतकींच आहेत. तरीही तारायंत्राच्या 'कट्ट कडकट्ट' मध्यें तीं युक्तीनेंच बसवावीं लागतात. ही अडचण असल्यानें टेलिफोनचा प्रसारच जास्त झाला.

कंदाहार केंद्रा हीही तारेची लाइन आहेच. रशियाशीं बिनतारी संदेश वाहनाचें काम चालू असून वायरलेस ऑपरेटर्स 'बिनतारी (?) तारमास्तर' सर्व रशियन आहेत असें म्हणतात. हळूं हळूं अफगाणांना त्या कलेचें शिक्षण दिलें जात आहे.

२०४. न्यायदान:—अफगाणिस्तानांतील पूर्वीची न्यायदानाची पद्धत अमानुल्लानें थोडीशी बदलली. पण, मूळ रचना व घटना कायमच राहिली. अमिराचें काबूल मधील कोर्ट म्हणजे न्यायदानाची अत्युच्च पायरी. त्या विरुद्ध अपील कोठेंच चालावयाचें नाहीं. नुसतीं अपिलें तपासण्याचेंच काम अमिराच्या कोर्टाचें आहे असें नव्हे, तर कांहीं विशिष्ट गुन्ह्यांची चौकशी प्रथमपासूनच अमिराच्या कोर्टांत चालते. राजद्रोह, बंडखोरी, सरकारी द्रव्यापहार, खोटे दस्तऐवज बनविणें, लांचलुचपत आणि सरकारविरुद्ध इतर गुन्ह्यांचे खटले अमिरापुढेंच चालतात. अशा गुन्ह्यांसाठीं ठराविक नियम, कोड अथवा कायदे कांहींच नसून अमीर म्हणेल तेंच न्याय्य ठरतें. 'अंत:करण प्रवृत्तीच प्रमाण' मानली जाते. वरील प्रकारांपैकीं गुन्हा शाबीत करण्याजोगा पुरावा मिळाला तर बहुशः देहान्तशासन मिळतें. आसमंतातील प्रांतीं न्यायाधीशांनीं, चोरी व खून या गुन्ह्यांबद्दल दिलेल्या शिक्षा अमिराच्या कोर्टानें मंजूर केल्याविना अंमलांत येत नसतात.

अफगाणिस्तानचे, काबूल, कंदाहार, हिरात व अफगाणतुर्कस्तान असे चार मुख्य राजकीय विभाग आहेत. काफिरीस्तान, गझनी, हजाराप्रांत व जलालाबाद येथील अधिपती काबूलच्या अमिराचे अंकित मानले जातात.

अमिराखालीं प्रांतिक अथवा जिल्ह्याचें कोर्ट येई. तेथील मुख्य अधिकारी तें भरवी. दिवाणी व फौजदारी अशा दोन्ही खटल्यांचें काम पाहण्याचा त्याला

* Shaukat Usmani : *Peshwar to Moscow.*

अधिकार असे. अधिकाऱ्याला ' हाकिम ' म्हणतात म्हणून त्याच्या कोर्टाला ' महक्मे- इ-हाकिम ' असें संबोधितात. त्याच्या हाताखालीं काजीमुल्लांचें कोर्ट असतें. त्याला ' महक्मे इ-शरा ' असें नांव दिलें जातें. प्रत्येक काजीला मदतनीस म्हणून ' मुफ्ती ' असतो. दोघांनाही ज्या खटल्यांचा निवाडा समाधानकारकरीत्या करतां येत नाहीं किंवा जेव्हां मतभेदाचा प्रश्न उद्भवतो तेव्हां काबूल येथील ' खान-इ-मुल्लात ' याला निश्चित निर्णय विचारावा लागतो. तेथेंही मतभेद झाला किंवा आणखी कांहीं शंका निघाली तर मग अमिराकडे निकालासाठीं तें प्रकरण जातें. वरच्या दर्जाच्या कोर्टांसाठीं अमीर अबदुर रहमाननें एक कोड तयार केलें होतें. तेंच थोड्याफार फरकानें आज चालू आहे. त्याला ' किताबच्या-इ-हुक्मती ' असें म्हणतात. काजी मुल्ला व मुफ्ती अशांसारख्यांचें जें कोड आहे त्यास ' असास-उल-काझात ' असें नांव आहे. हें अर्थातच ' शरा ' प्रामाण्य मानून रचलेलें आहे. शराप्रमाणें किंवा प्रचलित कोडांत बसणारा एखादा खटला आला तर ' हाकिम ' सुद्धा तो खटला काजीकडे चौकशीस पाठवितात. व्यापारी दावे मात्र शराप्रमाणें चालू शकत नाहींत. ते व तशाच प्रकारचे दिवाणी खटले हाकिम निर्णयासाठीं पंचायतींकडे सोंपवितो. हबीबुल्लानें " नाईब-उस्-सुल्तान " ( शरियात कोर्ट ) व " मुइम्-उस-सुल्तान " ( पोलिस कोर्ट ) अशीं दोन नवीं कोर्टें काबूलमध्यें स्थापिलीं होतीं. त्यानेंच फिर्यादीसाठीं स्टांपाचा कागद वापरण्याची पद्धत चालू करून देशाचें उत्पन्न वाढविलें.

अफगाणिस्तानांत व आसपासच्या रानटी मुलखांत ' जिरग्या 'ची पद्धत फार प्राचीन कालापासून रूढ आहे. आपणांकडील ग्रामपंचायतीसारखीच ही संस्था असून तीत गांवांतील पांच किंवा सहाच शिष्टांचा समावेश न करतां बहुतेक सर्वच वडील मंडळी त्यांत बसतात. ' जिरग्या 'चें कार्यक्षेत्र फार व्यापक आहे. सार्वजनिक हिताच्या व आपसांतील तंटेबखेड्याच्या सर्व बाबींचा निर्णय करण्यासाठीं ' जिरगा ' भरतो आणि ' मुल्ला 'च तेथील ' सूत्रधार ' होतो.

**२०५. नाणीं, पैसा, वगैरे** :—काबूलमध्यें अबदुर रहमान अमीर असतांना एक टांकसाळ स्थापण्यांत आली. ( इ. स. १८९०-९१ ) तत्पूर्वी लुटारू येईल त्यानें वाटेल तीं नाणीं पाडावीं असाच प्रघात होता. नव्या टांकसाळींत रोज ४०,००० नाणीं निघण्याची व्यवस्था होती. अफगाण पैशांचें कोष्टक खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

५ पैसे = १ शाही
२ शाही = १ सन्नार
२ सन्नार = १ अब्बासी ( तंगा )
$1\frac{1}{2}$ अब्बासी = १ क्रान = ३ सन्नार
२ क्रान = १ ( काबुली ) रुपया
१५ रुपये = १ तिला ( सुवर्ण नाणें )

हें सुवर्ण नाणें बहुधा रशियन हद्दींतून येतें. अबदुर रहमाननें कांहीं मोहरा पाडल्या होत्या, पण त्या बंद केल्या. क्रान व रुपया हीं चांदीचीं नाणीं असून बाकीचीं निकेलचीं व तांब्याचीं असतात. अबदुर रहमाननें पांच रुपयांचेंही एक नाणें प्रचारांत आणण्याचा प्रयत्न केला होता. पण तो यशस्वी झाला नाहीं. ( या नाण्यांच्या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांचीं हीं नांवें मूळ अफगाण नाहींत ही होय. बाकीचीं सर्व नाणीं आज इराणमध्यें प्रचलित आहेत. मात्र कोष्टक निराळें आहे. )

२०६. **वजनें–मापें** :—हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत जशीं भिन्न भिन्न वजनें आढळतात व कित्येक ठिकाणीं जिल्ह्याजिल्ह्याला देखील तीं बदललेलीं दिसतात तसाच प्रकार अफगाणिस्तानचा आहे.

**काबुलमधील वजनें** :—( अफगाणतुर्कस्तानांत हैबकपर्यंत चालणारीं )

१६ खुर्द = १ चारएक ( चारएक = पाव, चतुर्थांश )
४ चारएक = १ शेर = ( बंगाली ७ शेर १३॥ छटाक. )
८ शेर = १ मण
१० मण = १ खरवार = ( बंगाली १५ मण $27\frac{1}{2}$ शेर. )

**कंदाहार प्रांतांत** ( हिरातमध्येंही हींच वजनें चालू आहेत )

२ मिस्कल = १ शेर ( $8\frac{5}{2}$ तोळे हिंदी )
४० शेर = १ मण
१०० मण = १ खरवार ( बंगाली १० मण ३१ शेर १० तोळे )

**मझार-इ-शरीफ येथें**

१ शेर = $1\frac{3}{4}$ काबुली शेर ( = बंगाली १४ शेर )
१६ शेर = १ मण
३ मण = मझार खरवार=( बंगाली १६ मण ३२ शेर )

धान्य, पीठ किंवा पातळ जिन्नस देखील तोलून देण्याचा परिपाठ असल्यानें त्यासाठीं वेगळीं मापें नाहींत. ताजीं फळेंही नगावर न मोजतां वजनानेंच विकतात.

**२०७. लांबी, रुंदी व क्षेत्रफळ यांचीं मापें:**—'गज' हें सर्वसाधारण लांबीचें माप आहे तरी त्यांत 'गज-इ-शाही' व 'गज इ-रयती' असे दोन प्रकार अढळतात. पहिल्यानें कापडचोपड मोजतात, तर दुसऱ्यानें जमिनीची मोजणी करतां येते. साठ रयती गजांचा एक चौकोन म्हणजे ( ६०×६० ) एक तनाब किंवा जरीब होतो. दोन्ही गजांत फारसा फरक नाहीं. आपल्याकडील वार, गज किंवा इंग्रजी यार्ड त्यांच्या इतकीच लांबी ( ३६ इंच ) अफगाण गजाची असते.

मौज म्हणून एक जमिनी मोजण्याचें मान ठरविलें आहे, पण देशाभिन्नत्त्वानुसार त्यांत ८० अथवा १०० तनाब असतात. कित्येक ठिकाणीं त्याहूनही अधिक असल्याचें दिसून येतें.

अफगाणतुर्कस्तानांत मात्र १६ तसूंचा एक कदम असें लांबीचें माप प्रचारांत आहे. एक तसू म्हणजे सुमारें पावणेदोन इंच.

१२००० कदमांचा एक संग अथवा फर्साख. फर्साख हें अंतर अदमासानेंच ठरविलें जातें. 'एका खेचरास एका तासांत सुखकर रीतीनें जितकें अंतर जातां येईल' त्यास फर्साख म्हणतात. ढोबळ मानानें हें अंतर चार पासून सहा मैल असतें. जमिनीचें मोजमाप देखील अशाच प्रकारें कित्येक ठिकाणीं करतात. एका दिवसांत एक बैल जितकी जमीन नांगरूं शकतो, तिला 'कुल्बा' असें म्हणतात.

'फर्साख' हें माप इराणांतही आज प्रचलित आहे. रानटी पद्धत, अफगाण लोकांच्या अंगांत किती मुरली आहे याचें प्रत्यंतर त्यांच्या मोजमापाच्या साधनांत आढळतें. शिक्षणाचा व सुधारणेचा अंमल जसजसा जनतेवर बसूं लागतो, तसतसें आपल्या मापनपद्धतीस निश्चित स्वरूप देण्याचा ते प्रयत्न करतात. ह्या सर्व विविध व अनश्चित प्रकारामुळें अमानुल्लानें फ्रेंच मेट्रिक प्रद्धत मोठमोठ्या शहरांतून सुरू केली होती.

या प्रकरणांतील विवेचनावरून अफगाणिस्तानांतील सामाजिक जीवनस्थितीची स्थूल कल्पना येईल अशी आशा आहे. आतां पुढील प्रकरणांत ज्याला सामान्यपणें वायव्य सीमाप्रांत म्हणतात त्यासंबंधीं विवेचन करूं.

---

## प्रकरण अकरावें

# वायव्य सीमाप्रांत

२०८. **अफगाणिस्तानांत प्रवेश करण्याचे मार्गः**—हिंदी सर हद्दीवरील अफगाणिस्तानचें कोणतेंही विवेचन हिंदी जनतेच्या दृष्टीनें पुरें होण्यासाठीं त्यांत हिंदुस्थानच्या वायव्य सीमाप्रांताचें वर्णन समाविष्ट केलें पाहिजे. अफगाणिस्तानचा व हिंदुस्थानचा संबंध कशा प्रकारचा आहे हें मागील प्रकरणांवरून कळून चुकलेंच आहे. हिंदभूमीशीं दळणवळण ठेवण्याचे अफगाणिस्तानांतून मार्ग आहेत त्यांचें वर्णन आतां करावयाचें आहे.

प्रथमतः उत्तरेकडून खालीं दक्षिणेकडे येतांना नौशेरामधून चित्रळकडे जाणारा एक रस्ता आहे. तो एकच घाट नव्हे, तर सर्व मार्ग डोंगराळ प्रदेशांतून असल्यानें ती घाटांची परंपराच म्हणतां येईल. मालाकंद, लोवरी, चकदारा यांवरून चित्रळ गांठल्यावर पुढें नदीखोऱ्यांतून अफगाणिस्तानांत प्रवेश मिळवितां येतो. पण हा मार्ग अत्युच्च पर्वतांमधून असल्यानें बहुधा तो बर्फाच्छादित असतो. आणि म्हणूनच कोणत्याही प्रकारे लष्करी भीति त्या बाजूनें नाहीं. लष्करी दृष्टीनें ज्या मार्गाचें महत्त्व नाहीं त्याची वास्तपुस्त कशी होणार? तो नुसता नांवाचा रस्ता आहे इतकेंच.

दुसरा घाट मात्र इतिहासांत नामांकित आहे. जगांतील ऐतिहासिक महत्वाचे जे मार्ग आहेत त्यांपैकीं हा आहे. थोर जगज्जेते, लुटारू, पराक्रमी बादशाह इत्यादिकांच्या आक्रमणानें पुनीत झालेला हा भाग म्हणजे हिंदुस्थानच्या संपन्न जामदारखान्यास पाडलेली खिंडच होय. हा खैबरघाट या नांवानें प्रसिद्ध असून त्याची एकंदर लांबी वीस मैलांची आहे. डोंगराळ प्रदेशांतील घाटास जमरूद

येथून प्रारंभ होतो व लंडीखाना येथें संपतो. लंडीखान्याजवळच अफगाण हद्दीस प्रारंभ होतो. तेथून डाका, जलालादाबाद या गांवावरून काबूलला जातां येतें. जमरूद पेशावरपासून सुमारें ७ मैलांवर आहे. ब्रॉडगेज रेल्वे, मोटारींसाठी उत्तमपैकीं सडका, लष्करी यांत्रिक वाहतुकीसाठी वेगळे रस्ते, उंटावरून चालणाऱ्या व्यापारी दळणवळणाकरितां निराळा मार्ग, सर्व घाटांत शुद्ध व स्वच्छ पाणी सदैव मिळण्याची व्यवस्था, ठिकठिकाणीं टेकड्यांवर टेहळणीचीं २०–२२ नाकीं इत्यादि तजविजी त्या २०–२५ मैलांच्या टापूंत केलेल्या आहेत.

**२०९. आसपासच्या प्रदेशाचें वर्णन** :—खैबर घाटांतून पूर्वी आठवड्यांतून दोनदांच रहदारी होत असे. बाकीच्या दिवशीं काफिल्यांना बंदी असे. कारण तेव्हां तो रस्ता सदैव मोकळा ठेवतां येण्याइतका सुरक्षित नव्हता. आतां तसे भय कोठलेंच उरलें नसल्यानें तो रस्ता नेहमींच मोकळा आहे. मात्र खैबर घाटाच्या हद्दीत–जमरूद ते लंडीखाना–कोणासच रात्रीं रहावयास परवानगी नसते. लंडीकोटलपासून दुपारीं ३।। नंतर रहदारी बंद करतात.

खैबर घाटास सुरवात जमरूदपासून होते. जमरूद हें ब्रिटिश हद्दीचें अखेरचें ठिकाण. तेथून पुढील २७ मैलांचा रेल्वेचा फांटा स्वतंत्र मुलखांतून २५३ लक्ष रुपये ( दर मैलास ९,१२,००० रु. ) खर्च करून बांधला * असून तेथील रानटी अफ्रीदी टोळ्यांस वश करून खूष राखण्यासाठी भाडेंही जबर द्यावें लागतें. या घाटांत २७ मैलांत एकूण ३४ बोगदे असून दोन ठिकाणीं ' रिव्हर्सिंग ' ( उलट फिरणें ) आहे. लंडीकोटलपर्यंतच उतारूंना जातां येतें. तेथें ब्रिटिशांचा भुईकोट किल्ला आहे. तेथून पुढें ४–५ मैलांवर लंडीखाना हें अखेरचें ठिकाण अफगाण सरहद्दीशीं–ड्युरांड लाईनला–लागून आहे. काबूलचें सर्व टपाल लंडीखाना पोस्टामार्फत जातें. जमरूद ते लंडीखान्यापर्यंतच्या मार्गांत उंच ठिकाणीं टेहळणीचीं नाकीं असून तेथून सर्व रस्त्यांवर अत्यंत बारकाईनें लक्ष ठेवतां येतें. खैबर घाटांत सर्वत्र नळाचें पाणी ( शुद्ध केलेलें ) लष्कराच्या सोईसाठीं खेळविलें असलें तरी तेथें राहात असलेल्या आफ्रिद्यांना त्याचा उपयोग करण्यास मुभा आहे. खैबर घाटांतून जाणाऱ्या येणाऱ्या व्यापाऱ्यांकडून जो कर घेतला जातो तो १९२६–२७ मध्यें १,५७,९५५ रु. जमला. मागील वर्षापेक्षां ही रक्कम सुमारें नउ हजार रु. नीं अधिक होती.

---

* Legislative Assembly Debates, 1924. Vol. IV, p. 3915.

पेशावर ते कोहाट हा मोटारीचा सुमारें चाळीस मैलांचा रस्ता आहे. त्याचा कांहीं भाग यागिस्तानांतून जातो. पण येथेंही शाळा व टपाल ह्या सोयी करून देऊन त्या लोकांचा विश्वास हिंदी सरकारनें संपादन केला आहे. कोहाटपासून यागिस्तानी मुलूख अगदींच जवळ असल्यानें कोहाट गांवांस कडेकोट बंदोबस्तासाठीं तट व वेशी आहेत.

तिसरा कुरम नदीच्या खोऱ्यांतला मार्ग. कोहाटपासून थळपर्यंत सुमारें साठ मैलपर्यंत एक रेल्वेचा फांटा आहे. थळपासून पाराचिनार व तेथून पैवार कोटल ( कोटलघाट ) मधून अफगाणिस्तान असा हा रस्ता आहे. खैबर रस्याइतकी वाहतूक या मार्गावर नसते आणि हिंवाळ्यांत तर या मार्गावर बर्फाची विपुलता असते. व्यापारी दळणवळणास हा रस्ता सोईचा आहे. दुसऱ्या अफगाण युद्धाचे वेळीं **रॉबर्टस्** यानें इकडूनच अफगाणिस्तानांत प्रवेश केला होता.

कुरमच्या दक्षिणेसच तोची नदीच्या खोऱ्यांतील चौथा मार्ग आहे. बन्नु स्टेशनपासून ४० मैलांवर **मिरानशहा** व तेथून पुढें २५ मैल गेल्यावर **दत्ताखेल, ह्रातोई** या गावांवरून मध्य अफगाणिस्तानांत प्रवेश होतो. गझनीस जाण्यास हाच रस्ता सोईचा आहे. आणि काबूल-कंदाहार रस्यावर गझनी हें एकच मोठें शहर आहे.

**गोमल** खोऱ्यांतून जाणारा पांचवा रस्ता आहे व टंकपासून गोमलनदीच्या कांठाकांठानें अफगाण हद्दीवर **दोबंदी** गांवापर्यंत जातां येतें. टंक हें रेल्वेचें स्टेशन आहे. तेथून दुसरा एक चांगला रस्ता फोर्ट सांडेमान वरून गोमलनदी किनाऱ्यानें अफगाणिस्तानांत जातो. लष्करी वाहतुकीसाठीं ती सडक बनविली असल्यानें व्यापारी दळवळणही त्याच मार्गानें वाढण्याचा संभव आहे. मध्य-अफगाणिस्तानांतील काफिले बहुतेक या दोन्ही पैकीं कोणता तरी मार्ग स्वीकारतात. दरोडेखोर व उच्छृंखल वर्तनाचे गुन्हेगार ( out laws ) यांना कायद्याच्या कचाटींतून निसटून राहण्यास गोमलप्रदेशांत पुष्कळ अवसर आहे. हा एक या प्रांताचा विशेष आहे.

सहावा व सातवा मार्ग. दक्षिणेकडे **डेरागाझीखान**पासून उत्तर बलुचिस्तानांतून जाणारे दोन रस्ते आहेत. ह्या ठिकाणीं उपरोक्त रस्त्यांपेक्षां डोंगर कमी उंचीचे आहेत व म्हणून ह्या बाजूनें दळणवळण जास्ती आहे. शिवाय या खोऱ्यांतील टोळ्यांचा भांडखोर स्वभाव किंचित् कमी दर्जाचा आहे. व त्यांचीं

हत्यारेंही जुनींपुराणीं असल्यानें उपद्रवाच्या दृष्टीनें याच भागांत सुख अधिक आहे. डेरागाझीखानपासून क्वेट्याला जाणारा एक गाडयांच्या वाहतुकीचा रस्ता लष्करी दृष्ट्या महत्त्वाचा ठरतो. पुढें लष्करासाठीं वेगवेगळे रस्ते आहेत. हिंदुस्थानांतून खुष्कीच्चा मार्गानें बलुचिस्तानांत सैन्य नेण्यास हाच मार्ग उपयोगी असल्यानें त्याचा बंदोबस्त विशेष राखण्यांत येतो.

दुसरा रस्ता हर्रंद्मार्गे चाचा घाटांतून जातो. त्यांत जनावरांच्या दळणवळणासच वाट आहे खरी; पण तो फार प्राचीन व सोपा आहे. दिल्लीहून इस्फाहान ( इराण ) ला जाणाऱ्या **स्टील** व **कौथर** या दोन युरोपियनांनीं इ, स. १६१४ मध्यें हाच रस्ता स्वीकारला होता असें म्हणतात. *

आठवा म्हणजे दक्षिणेकडील सर्वात शेवटचा मार्ग मात्र खैबर घाटाइतकाच महत्त्वाचा आहे. त्याला **बोलनघाट** असें म्हणतात. आणि **सिबी**पासून क्वेट्टामार्गें दक्षिण अफगाणिस्तानांत प्रवेश मिळविण्यासाठीं हाच रस्ता आहे. हा घाट इतका मोठा (लांबीनें) आहे कीं, त्याला घाट असें न म्हणतां रस्ताच म्हणतां येईल. सिबीपासून बोलन नदीच्या कांठाकांठानें पन्नास मैलपर्यंत जाऊन क्वेटा ज्या उंच पठारावर वसलें आहे तेथून हा मार्ग पुनः वर चढतो. सत्तर मैल गेल्यानंतर खोजक घाट लागतो. सुलेमान पर्वताचा हा भाग समुद्रसपाटीपासून ७६०० फुट उंच आहे. खोजकपासून उतारास आरंभ होतो व चमनला आल्यावर उंची खोजकापेक्षां ३६०० फूट कमी होते. चमनपासून पुढें दिसणाऱ्या पठारावरच कंदाहार वसलें आहे.

सिबी ते चमन हा नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचा ब्रॉडगेजचा फांटा आहे आणि बिकट परिस्थितीस तोंड देण्यासाठीं एक वेगळा फांटाही घालून ठेवला आहे. सडका मोटारीसाठीं उपयोगी असल्यानें लष्करी वाहतुक झाली आहे. बोलन घाटांत मारी टोळ्यांचें प्राबल्य फार आणि मारी म्हणजे लपून छपून हल्ला करण्यांत अत्यंत निष्णात. तेव्हां तेथें लष्करी बंदोबस्त विशेष ठेवावा लागतो.

अफगाणिस्तानांतून हिंदभूमींत प्रवेश मिळण्याचे हे मार्ग ज्या भागांत आहेत त्यांचा अफगाण इतिहासाशीं अर्थातूच संबंध येतो. तेव्हां त्या प्रदेशाचें निरनिराळ्या दृष्टीनीं विवेचक वर्णन केलें म्हणजेच अफगाणिस्तानचा अभ्यास पूर्ण होईल.

---

*" A. Vincent " : *The Defence of India*, p.38.

**२१०. यागिस्तान, वा. सी. प्रान्त व बलुचिस्तान** :—प्रथमतः या प्रदेशाचें राजकीय विभाग पाहूं. वर सांगितलेले आठ रस्ते ज्या भागांतून जातात त्याचे राजकीय सोईसाठीं तीन विभाग केले आहेत. ते म्हणजे यागिस्तान ( याग-स्थान ? ), हिंदुस्थानसरकारच्या खास देखरेखीखालीं असलेला वायव्य-सीमाप्रांत ( North West Frontier Province ) व बलुचिस्तान. यागिस्तान हा रानटी टोळ्यांचा मुलुख. वायव्य सीमाप्रांताची हद्द व अफगाणांची डयुरांडलाइन या मध्यें यागिस्तान असल्यानें हिंदी सीमासंरक्षण विशेष त्रास-दायक, खर्चाचें व जोखमीचें होऊन बसलें आहे. तेथें कोणी सत्ताधारी अधिकारी नसून सर्वच टोळ्या आपापल्या हद्दींत अगदीं निस्तंत्र वृत्तीनें वागत असल्यानें त्यांच्यांशी व्यवहार करणेंही दुरापास्त आहे. बलुचिस्तानचा भाग गव्हर्नर जनर-लच्या एजंटकडे आहे, तर वायव्यसीमाप्रांतावर चीफ कमिशनर म्हणून खास अधिकारी नेमण्यांत येतो. ब्रिटिश बलुचिस्तान 'स्वतंत्र' बलुचिस्तान व लासबेला ह्या तीन विभागांचे आधिपत्य क्वेटा येथें राहणाऱ्या ए. जी. जी. ( Agent to the Governor-General ) कडे असतें. चीफ कमिशनर पेशावरला राहून हजारा, पेशावर, कोहाट, बन्नू व डेरा इस्माइलखान या पांच जिल्ह्यांची व त्या पलीकडील यागिस्तानाची व्यवस्था पाहतो. बलुचिस्तान व वायव्यसीमाप्रांत यांची माहिती हिंदी सरकारच्या कोणत्याही अहवालांत सांपडूं शकते. पण त्या पलीकडील यागिस्तानचें तसें नाहीं. लष्करी तज्ज्ञांनीं त्या प्रांताविषयीं कांहीं लिहिलेल्या पुस्तकांवरूनच अभ्यास करावयास पाहिजे.

वास्तविक पाहतां अफगाण हद्द संपतांच रीतीप्रमाणें सीमान्तभूमीचा ( No man's land ) निरुंद पट्टा सोडून हिंदी सरहद्द सुरू व्हावयास पाहिजे होती. आणि तसें झालें असतें तर हिंदी सरकारवर आज इतकीं वर्षें पडलेला ताण व तिजोरीवर बसणारा मनस्वी बोजा अगदींच राहिला नसता. पण 'नो मॅन्स लॅन्ड' असा जो दोन्ही सरहद्दींत भाग आहे तेथें सहस्रावधि स्वतंत्र व सशस्त्र टोळ्यांचें वास्तव्य असल्यानेंच हिंदभूमीची वायव्यसीमा राखणें हें आधुनिक राजकारणांतील कसलेल्या कारस्थानी मुत्सद्यांना कष्टाचें काम वाटतें. राजनीतिशास्त्रकोविदांची ती कसोटीच आहे असें म्हणतां येण्यासारखें कार्य केवळ रानटी टोळ्यांच्या अस्तित्वामुळेंच तेथें आहे. आतां त्याशिवाय नैसर्गिक व मानवी अडचणी कोणत्या आहेत तें पाहिलें पाहिजे.

२११. **भौगोलिक विशेष:**—हिंदुस्थानची वायव्यसीमा उत्तरेस **गिल्गित** पासून सुरू होऊन दक्षिणेस अरबी समुद्रापर्यंत जाते तिची एकूण लांबी १४०० मैल होईल. उत्तरेकडे सुमारें ३०० ते ४०० मैलांत हिमाच्छादित उच्च शिखरें आहेत म्हणून तिकडून वाहतुक होण्याची मुळींच भीति नाहीं, तर दक्षिणेकडे **मक्रान, कोह-इ-मलिकासिया** ते **नुष्की** हा भाग अत्यंत रुक्ष अशा वालुकामय प्रदेशांतून असल्यानें तिकडूनही विशेष संकट येईल अशी अपेक्षा नाहीं. राहतां राहिला मध्यंतरीचा प्रदेश. त्याची लांबी साधारणपणें ६०० मैल भरते. **अटक** ते **शोरवाक** पर्यंतचा हा भाग इतर प्रदेशाशीं तुलना करितां किंचित् अधिक सुपीक अतएव लोकवस्तीनें जास्त गजबजलेला आढळतो. सुलेमानपर्वताच्या शाखांमधून अफगाणिस्तानांत जाण्यासाठीं रहदारीचे मार्ग याच भागांत अधिक आहेत म्हणून देखील याला महत्त्व प्राप्त झालें आहे. काबूल, कुरम, तोची, गोमल व बोलन या सर्व नद्यांच्या बाजूबाजूनें दळणवळणाचे मार्ग आहेत हें वर दर्शविलेंच आहे. 'यागिस्तान' हें सर्व डोंगराळ प्रदेशांत असून त्यांतील कित्येक गिरीशिखरें तर १०,००० फुटांपेक्षा अधिक उंचीचीं आहेत.

२१२. **लोकविशेष:**—मागील प्रकरणांत वर्णिलेली सामाजिक रचना थोड्याफार फरकानें यागिस्तानासही लागू आहे. या एकंदर डोंगराळ प्रदेशांत वास्तव्य करणारे लोक अर्थातच काटक, चपल व शूर असावयाचे. निसर्गानें भूमीचे ठायीं उत्पादनसामर्थ्य कमी ठेवलें असल्यानें शेजारच्या सुपीक प्रदेशांतील समृद्ध जनतेच्या मालमत्तेवर अशा लोकांना 'हक्क' सांगतां येतो. आणि नुसती शाब्दिक मालकी न दर्शवितां व कसलाही मागचा पुढचा विचार करण्याचे श्रम न घेतां तो हक्क बजावण्यास ते कचरत नाहीत. अशीं कार्ये पार पाडण्यासाठीं आवश्यक असणाऱ्या धैर्य, धाडस व बेडरस्वभाव इत्यादि देणग्या उपजतच त्यांचेपाशीं असल्यानें त्यांना कशाचीच अडचण भासत नाहीं. फिरंग्यांचें राज्य प्रस्थापित झाल्यापासून अलीकडे मात्र आपणावर फार निर्बंध विनाकारण लादले जातात, अशी त्यांची तक्रार वरचेवर ऐकूं येते.

हिंदुस्थानच्या सर्वसामान्य वायव्य सीमेचें हें सामान्य वर्णन झाल्यानंतर आतां त्या सीमेवरील प्रत्येक भागासंबंधानें कांहीं विशेष विवेचन करणें क्रमप्राप्त होईल. प्रथमत: ( अ ) यागिस्तान विवेचनास घेऊन नंतर ( ब ) ब्रिटिश वायव्य सीमाप्रांत आणि शेवटीं ( क ) ब्रिटिश व स्वतंत्र बलुचिस्तान यांकडे लक्ष वळवूं.

## ( अ ) यागिस्तान

२१३. **भूप्रदेश, हवामान** :—यागिस्तानचें हवामान देखील तेथील लोकांना कणखर बनविण्यासाठींच खास योजिलेलें दिसतें. नद्यांच्या व ओढ्यांच्या दऱ्याखोऱ्यांतून लागवड उत्तमपैकीं होते, तर बाकीच्या भागांत हिरव्या गवताची काडी देखील दृष्टीस पडूं नये अशी खबरदारी विश्वकर्म्यानें घेतली असल्याचें दिसतें. तेथें दहा दहा हजार फूट उंचीपर्यंत चढणारीं गिरिशिखरें कांहीं कमी नाहींत. पण एकावरही वनस्पतीचें जाळ अथवा वन्यवृक्ष आढळतील तर शपथ ! चतुर्थाश्रमी स्वामींच्या मस्तकाप्रमाणें सर्व डोंगरभाग अगदीं वनस्पति-विरहित दिसतो. मधून मधून बारीक ठिपक्याप्रमाणें लहान झुडपांचा एकादा पुंज दृष्टीस पडतो पण तो देखील हिरवा नसल्यानें दगड असल्यासारखाच वाटतो. नगाधिराज हिमालयावर वनराजी व सृष्टिशोभा प्रसन्न असल्याचें अनुभवास येतें, पण त्याच्या बंधूवर—सुलेमान पर्वतावर—त्या दोन्ही देवतांचा इतका कडक रोष केवळ त्यानें ‘ यवनप्रदेश ’ जवळ केला म्हणून झाला कीं काय ?

उन्हाळ्यांत भरपूर ऊष्णता आणि हिवाळ्यांत विलक्षण कडाक्याची थंडी असे दोनच ऋतु, यागिस्तान व आसपासच्या प्रदेशांत असतात. पावसाळा असा तेथील जनतेस ठाऊक नसतोच ! वर्षांतून मधून मधून पावसाची सर केव्हांही येते. परंतु या स्वर्गीय जलवृष्टीचें महत्त्व फार नाहीं. हिवाळ्यांत डोंगरमाथ्यावर पडलेलें बर्फ उन्हाळ्यांत वितळून त्याचें पाणी होतें तेव्हांच खरी पाण्याची विपुलता असते. सिंधमधील सक्करपासून ते कंदाहारपर्यंतच्या प्रदेशांत पाण्याचें दुर्भिक्ष इतकें आहे, कीं सर्वांत श्रीमंत मनुष्य ओळखण्याची त्या भागांतली खूण म्हणजे त्याचा पाणीपुरवठ्यावरील हक्क हीच होऊन बसली आहे ! शेजारच्या ओढ्यावर रोज अमुक तास फलाण्याचा हक्क; तर आठवड्यांतून तीन दिवस रोज चार तासाप्रमाणें गोम्याचा हक्क; अशा प्रकारची हक्कविभागणी सूक्ष्म प्रमाणांत वंशपरंपरेनें चालू असते. यावरून तेथील परिस्थितीची थोडी तरी कल्पना येईल.

अशा विचित्र प्रदेशांत प्रवास करणें किती कष्टदायक असलें पाहिजे याची कल्पनाच केलेली बरी. उन्हाळ्यांत तीव्र उष्णतेमुळें, हिंवाळ्यांत थंडीच्या कडाक्यानें व दोन्हीकाळीं पाण्याच्या दुर्भिक्षामुळें सैन्याची किती वाताहत उडत असेल ? आणि मग धान्य अथवा रसद अशा प्रांतांत आणावयाची कोठून ? दृष्टि-

पथांत क्षितिज दिसतें तेवढया टापूंत दांतीं तृण धरून शरण जाऊं म्हणावें तर गवताची काडी मिळावयाची नाहीं आणि मिळालीच तर शरण कोणाला जाणार हा प्रश्न उरतोच ! मनुष्याची गांठच अगोदर तशा रुक्ष प्रांतांत पडण्याची मुष्किली. आणि यदाकदाचित् पडलीच, तर तो बव्हंशीं लुटालूट, मारहाण व खून करण्याच्याच निश्चयानें प्रेरित झालेला असणार. त्याच्याशी युक्तिवाद, याचना, अभ्यर्थना इत्यादि सर्व फोल ठरणार !

**२१४. जाती जमाती व त्यांचे पोटभेदः**—या नैसर्गिक देणग्यांचा परिणाम तेथील जनतेवर झाल्याविना कसा राहील ? तेथील रानटी टोळ्या बहुतेक ' पठाण ' या सामान्य सदराखालीं येतात. त्यांची भाषा पुश्तु. त्यांच्या किती पोटजाती आहेत याचा अंदाज करतां यावा म्हणून कांहीं नेहमी संबंध येणाऱ्या जातींची नांवें खालीं दिलीं आहेत.

अफ्रीदी, महशुदी, वजिरी, मोहमंद, शिनवरी, स्वात, इसाझी, आमझी, उत्मानझी, आकझी, हलीमझी, ओरकाझी, मद्दाखेल, मितीमुसाखेल, सर्फी, हसनखेल, अशुखेल, गदुना, मलीकदीनखेल, कंबेरखेल, आदमखेल, झर्गुनखेल, जुवकी, भिस्ती, रबियाखेल, बिलंदखेल, थलवाल (थळवाले ?), अलीशेरझी, खानीखेल, तुरी, जाजी, भित्तानी, खोनियाखेल, अबदुररहमानखेल, तोरीखेल, मोहमीनखेल, दोतानी, किकरी, मसनझी, मिरातखेल, जलालखेल, शेवराणी, हाजीखेल...... इत्यादि इत्यादि.

यांतही पुनः हसनखेल अफ्रीदी, दोतानी पोविंदा, मोहमीनखेल वजीर इत्यादि मिश्र जाती असतात. ( खेल व झी हे जातनिदर्शक प्रत्यय आहेत. ) कित्येक जातींत फार तर वीस सुद्धां इसम नाहींत अशी स्थिती असूनही हे सर्व भेद मोठ्या अभिमानानें मानले जातात. मात्र सर्वांचा एकच इस्लामी धर्म आहे.

किंचित् मागील इतिहास पाहिला तर ह्या टापूंतील सर्वच प्रजा भिन्न संस्कृतीच्या जोडप्यांपासून झाली असावी असा तर्क करण्यास पुष्कळ जागा राहते. स्वात टोळींत अलेक्झँडरबरोबर आलेल्या ग्रीक अनुयायांच्या चालीरीतीच आढळतात असें नव्हे तर शरिराचा बांधा व अवयवांची ठेवण यांतही विलक्षण साम्य आढळतें. बहुतेक टोळ्यांचें यहुद्यांशीं नातें जुळण्यासारखीं साम्यस्थलें कमी नाहींत. तसेंच ब्रहुई लोकांची भाषा व कांहीं रिवाज द्रविडी लोकांप्रमाणें असल्याचें तज्ज्ञ सांगतात.

**२१५. लोकांचे स्वभावविशेष** :—आज त्या टोळ्यांची इतकी विचित्र परिस्थिती आहे, की त्यांना वठणीवर आणणें किंवा निदान निरुपद्रवी बनाविणें यांतच हिंदी प्रजेनें दिलेल्या करांचा किती तरी मोठा भाग खर्च होत आहे. त्यांचा आपसांत मुख्य कोणी असलाच तर तो फार दिवस टिकेल असें सांगतां येत नाही. तेथें लोकशाही नाही म्हणावें, तर सर्वांच्या संमतिप्रमाणें चालण्याविना मुख्याला गत्यंतर नसतें. सुलतानी अधिकार तेथें गाजविण्याची पद्धत आहे असें म्हटलें, तर प्रत्येक जण स्वतंत्र राजाप्रमाणें बलशाली आणि विरक्त साधूप्रमाणें हेकेखोर व आपलेंच म्हणणें खरें धरून चालणारा आहे. कोणा विशिष्ट माणसाला जन्मत: कर्तबगारीनें विशेष महत्पद प्राप्त होतें, त्याला आदर व मान द्यावा अशी त्या प्रांतां कोणाचीच वृत्ति नसली, तरी मुल्ला अथवा काजी म्हणजे पैगंबरापेक्षांही श्रेष्ठ मानण्याची त्यांची रीत आहे. तेव्हां त्यांच्या या 'राज्य' व्यवस्थेस अथवा समाजरचनेस कोणतें नामाभिधान द्यावें हें अभ्यासूनींच ठरवावें.

यागिस्तानांतील जनतेच्या धार्मिक आचरणाबद्दलही असेंच विरोधाभासात्मक वर्णन करतां येईल. त्यांचा सर्व साधारण धर्म इस्लामी आहे खरा. पण जगांतील सर्व राष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या मतें निंद्य ठरलेलीं सर्व पातकें नित्य आचरणांत आणून देखील यागिस्तानी इसम पूर्णपणें धार्मिक राहूं शकेल. त्याची कुराण, पैगंबर, मशीद, काझी, झियारत ( थडगें, समाधि ) इत्यादिकांविषयींची अढळ श्रद्धा पाहिली तर पंढरीची वारी पायीं करणारे वारकरी लाजेनें माना खालीं घालतील ! पण असें असूनही आम्ही ज्याला निंद्य कर्म म्हणूं तें धर्म्य आहे, याच भावनेनें यागिस्तानी तें पार पाडील. अंधश्रद्धा, शकुनापशकुनांवर पराकाष्ठेचा विश्वास, वेडगळ समजुतींचा पगडा इत्यादि अज्ञानी जनतेचीं लक्षणें यागिस्तानांत ज्या प्रमाणांत आढळतात त्या प्रमणांत अन्यत्र कोठेंच दिसून यावयाचीं नाहीत.

त्यांची क्रूर वृत्ति अश्रुतपूर्व आहे. सूड घेण्याचें बाळकडू त्यांच्या रक्तांतून पिढ्यान् पिढ्या खेळत असल्यानें आपल्याकडील लोकांना मृतांचीं श्राद्धपक्षादि क्रियाकर्मांतरें करण्याविषयीं जे अगत्य व जो श्रद्धामय आदर वाटतो तोच सूड घेण्यांत, मनुष्य ठार करण्यांत, तेथील आबालवृद्धांना, स्त्री-पुरुषांना सारखाच वाटत असतो. त्यांचें शौर्य वाखाणण्यासारखें आहे, तसाच त्यांचा स्वाभिमानही पण आहे. मात्र त्यांचें सुवर्ण—अथवा रौप्यवेड आणि शस्त्राची विलक्षण आवड, हीं

किती तीव्र व उत्कट आहेत तें शब्दांनीं सांगतां येण्यासारखें नाहीं. मनुष्याचा खून करणें किंवा झाडाचें पान तोडणें या दोन्ही क्रियांत त्या यागिस्तानी लोकांना कांहींच फरक वाटणार नाहीं, इतकी त्यांची मनःस्थिति ‘ स्थितप्रज्ञावस्थे ’प्रत पोहोंचली आहे असें म्हणतां येईल !

**२१६. उपद्रववृत्ति :**—यागिस्तानांत सत्ता जर कोणाची चालत असेल तर शक्तिमानांचीच. इतरांना तेथें राहतांही यावयाचें नाही. लोक रांकट, कणखर व कडवे; त्यांची मनोवृत्ति क्रूर, लबाडीची, उच्छृंखल, गर्विष्ठ पण लोभी. त्यांच्या प्रदेशावर सत्ता अशी कोणाचीच नाही. तेथें आधुनिक पद्धतीची शस्त्रास्त्रें भरपूर आणि लोकांना स्वैरसंचाराची संवय जडलेली. अशा गुणसमुच्चयास मुसलमानी शिकवणीची जोड मिळालेल्या यागिस्तानी जनतेस शेजारच्या हिंदी प्रजेला कशा प्रकारें छळता येतें याची कल्पना येण्यासाठीं एक वर्षाचेच आंकडे पुरे आहेत.

इ. स. १९१९ मध्यें सरहद्दीवरील ब्रिटिश मुलखांत ६११ लहान मोठे दरवडे पडले, २९८ इसम ठार मारले गेले, ३९२ जखमी झाले, ४३६ ब्रिटिश प्रजाजनांना पळवून नेलें, ३० लक्ष रुपायांची मालमत्ता लुटली गेली ! *

यागिस्तानांतील आधुनिक बंदुकीचा वाढता प्रसार पाहिला म्हणजे तर विशेष आश्चर्य वाटतें. “ तेथें असलेल्या बहुतेक बंदुका ( रायफल्स ) इंग्लंड-मध्यें बर्मिंगहॅम येथेंच तयार झाल्या असून इंग्रजी जहाजांतूनच त्या इराणी आखातांत पाठविल्या जातात ”§ तेथून कंदाहारमार्गे रानटी टोळ्यांच्या मुलखांत त्या पसरतात, असा साधार पुरावा आहे. ‡ शिवाय खेडोखेडीं साध्या हातानें चालणाऱ्या यंत्रांवर बंदुका करण्याचे कारखाने यागिस्तानांत आहेत व त्यांतून कितीतरी बंदुका नेहमी तयार होतात. यागिस्तानमध्यें एकंदर किती आधुनिक बंदुका वापरल्या जात आहेत याचे अंदाज निरनिराळ्या लष्करी अधिकारी तज्ज्ञांनी दिले आहेत. इ. स. १९२० मध्यें तेथें आधुनिक बंदुका ( रायफल्स ) १,४०,००० होत्या † असा एकाचा अंदाज आहे, तर दुसऱ्यानें ब्रीच लेडिंग रायफल्स व कार्बाइन्स १४०४९८, व मझल लोडींग रायफल्स

---

* *India in 1920-21.*

§ D. Fraser: *Persia and Turkey in Revolt, pp. 260-61.*

‡ *The Times*, London, 24-5-22.

† *The Round Table :* December 1925. (Quoted by Toynbee ).

५६७२९ असे आंकडे दिले आहेत. यागिस्तानांत एकंदर सुमारें १,३०,००० लढवय्ये लोक एका क्षणास मिळूं शकतील. हा सरकारी अंदाज‡ पाहतां या बंदुकांचें महत्त्व व त्यामुळें शेजारच्या प्रदेशास होणारा त्रास याची कल्पना करतां येईल. प्रत्येक दोन लढवय्यांत मिळून तीन बंदुका हें प्रमाण सुमारें दहा वर्षापूर्वीचें होतें. दरवर्षी त्यांत भर पडत जाणारच आणि आज तेथें किती बंदुका आहेत हें कोणी सांगावें ? ( नंतरचे अंदाज उपलब्ध नाहींत. )

**२१७. राजकीय विभाग** :—यागिस्तानचे राजकीय व्यवस्थेसाठीं तीन भाग कल्पण्यांत येतात. चित्रळ नदीपासून काबूल नदीपर्यंतचा पहिला, काबूल व कुरम या नद्यांमधील दुसरा आणि वझिरिस्तानचा तिसरा. या प्रत्येक भागांतील लोक निरनिराळे असून त्यांच्यांशीं ब्रिटिश सरकारचे संबंधही अगदीं भिन्न भिन्न आहेत. ब्रिटिश राजकार्यधुरंधरांचें यागिस्तानासंबंधींचें मुत्सद्देगिरीचें धोरण पाहण्यापूर्वी मागील थोडासा इतिहास पाहणें इष्ट होईल.

यागिस्तानावर ‘ देखरेख ’ करणारे पांच ‘ पोलिटिकल एजंट ’ पेशावरच्या चीफ कमिशनरच्या हाताखालीं आहेत. मालाकंद, खैबर, कुरम, तोची व वना अशा या पांच एजन्सी आहेत. यागिस्तानचें क्षेत्रफळ सुमारें २५,५०० मैल भरतें हिंदुस्थानसरकारच्या शिरोगणति तज्ज्ञांच्या मतें तेथील लोकसंख्या ( १९२१ च्या अंदाजानुसार ) सुमारें २८, २५, १३६, आहे.§

**२१८. मागील इतिहास** :—यागिस्तानशीं ब्रिटिशांचा संबंध इ. स. १८४९ पूर्वी मुळींच नव्हता. कारण तेव्हां पंजाबांत शिखांचें राज्य होतें. अफगाण सरहद्दीला लागूनच यागिस्तान असले तरी तिकडील सीमा आंखण्याचें काम त्या वेळीं झालें नव्हतें आणि राष्ट्राराष्ट्रांतील सीमा जर निश्चित नसतील तर भांडणाला काय तोटा असणार ? परंतु शिखांचें राज्य मटकावतांक्षणींच एकदम नवी जबाबदारी अंगावर आल्यामुळें ब्रिटिश मुत्सद्यांना काळजी वाटली आणि हिंदी सरहद्दीचा बंदोबस्त करण्याविषयीं नव्या नव्या योजनांचा खल होऊं लागला.

यागिस्तानचा मुलूख आज शेंकडों वर्षें आहे त्याच स्थितींत आहे. म्हणजे त्यांनीं कोणच्याच राजाची सत्ता मानली नाहीं. अफगाणिस्तानवर इराणी लुटारूंचे हल्ले झाले; नंतर तेथें स्वतंत्र अमीर पदारूढ झाले; इकडे हिंदुस्थानांत

---

‡ A "Vincent" : *The Defence of India, p. 45.*

§ Census of India, 1921, Vol. XVI, Part I.

मोंगल बादशाही असो किंवा नंतरचा शिखांचा अंमल असो, यागिस्तानवर कोणाचेंच निशाण फडकलें नाहीं, किंवा तेथील लोकांनीं कोठल्याही राजाला करभार दिला नाहीं. उलट हिंदुस्थानवर स्वारी करणारास किंवा अफगाणांवर खैबर घाटांतून हल्ला चढविणारांस रानटी स्वतंत्र टोळ्यांच्या मुलखांतून जाणें अपरिहार्य असल्यानें, त्यांनाच उलट अशा आक्रमणशाली वीरांकडून ' करभार ' मिळत असे. तसेंच पंजाबांतील तत्कालीन अधिकाऱ्यांना-त्या वेळीं हल्लींचा वायव्यसीमाप्रांत वेगळा नव्हता व यागिस्तानी लुटारूंकडून पराकाष्ठेचा उपद्रव पोहोंचत असे. पण त्यांच्या कायमच्या बंदोबस्ताची सोय कोणीच केली नव्हती. कदाचित् तें शक्य नसावें.

परंतु इंग्रज अंमल पंजाबावर प्रस्थापित होतांच त्या सर्व व्यवस्थेचा नूर बदलला. आपलें आसनच स्थिर नाहीं ही खात्री (?) पंजाबच्या इंग्रजपूर्व अधिकाऱ्यांस होती म्हणून, अथवा राजव्यवहारांतील दूरदृष्टी व पोंच त्यांचे आंगीं नव्हता म्हणून असेल, त्यांनीं यागिस्तानसंबंधी कांहींच निश्चित धोरण ठरविले नव्हतें असें म्हणावें लागतें. निदान आज तें उपलब्ध तरी नाहीं हें खास. वेळप्रसंग पडेल तसें साम–दाम-दंड–भेदादि प्रकारांनीं त्यांनीं आपली सीमा शक्य तों सुरक्षित राखण्याचा प्रयत्न केला.

इंग्रजांचें मात्र तसें नव्हतें. हिंदुस्थानचें समृद्ध कुरण आतां यावच्चंद्र-दिवाकरौ आपणांस चरावयास मिळालें याच भावनेनें त्यांचा सर्वत्र बंदोबस्त सुरू झाला. आणि वेगवेगळ्या योजनांच्या यशापयशांवरून त्यांची अफगाणिस्तान व यागिस्तान संबंधींची वागण्याची वृत्ति निश्चित ठरविली गेली. 'हें धोरण यशस्वी झालें व होईल' असें मानण्यास पुरेसा पुरावा सुमारें दहा वर्षांनंतर म्हणजे १९२९ मध्यें हिंदी सरकारास मिळाला आणि शक्याशक्यतेचा दूरवर विचार केला तर तेंच धोरण शेवटपर्यंत चालविणें इष्ट, योग्य व हितावह होईल.

आतां निरनिराळ्या धोरणांचा विहंगमदृष्ट्या थोडक्यांत विचार केला पाहिजे. अभ्यासी दृष्टीनें पाहिलें तर अशा धोरणाचीं दोन आंगें असतात. प्रस्थापित राजसत्तेनें शेजारच्या राष्ट्राशीं कोणत्या वृत्तीनें वागावयाचें हें प्रथमत: ठरवून सविस्तर कार्यक्रम आंखून द्यावयाचा व नंतर त्याची अंमलबजावणी करतांना लष्करी खात्यानें आपली विचारशक्ति–मूळ तत्त्वास व कार्यक्रमास बाध न आणतां–खर्च करावयाची. अशा वेळीं लष्करी खात्याकडे विशेष जबाबदारी

नसली, तरी प्रत्यक्ष व्यवहाराचें अनुभवी ज्ञान, देशसंरक्षणासाठीं घ्यावयाच्या लष्करी खबरदारीचें यथायोग्य आकलन आणि अंमलबजावणी करण्याची शक्ति, यामुळें सत्ताधारी राज्यव्यवस्थापकांस लष्करी तज्ज्ञांचा सल्ला घ्यावा लागतो. तो कानामागें टाकून चालत नाही. अशा स्थितींत पहिल्या दोन अँग्लोअफगाण युद्धांचे वेळीं जो मतभेद व धरसोडीचा प्रकार दिसून आला, त्याचीच पुनरावृत्ति सरहद्दीसंबंधानें धोरण ठरविण्यांत झाली असल्यास नवल कसचें? कारण अफगाणिस्तानशीं कशा प्रकारचें नातें ठेवावें यावरच सीमाप्रांत व यागिस्तान विषयक धोरण अवलंबून असतें आणि अफगाणिस्तानपलीकडील रशियन भूताच्या हालचालीवरच अफगाणिस्तानशीं कसें वागावें हे ठरणार होतें.

**२१९. यागिस्तानविषयक ब्रिटिश धोरणें** :—ब्रिटिशांचीं वायव्य-सरहद्दविषयक धोरणें दोन वेगवेगळया गटांत घालतां येतील. एक फॉर्वर्ड म्हणजे पुरोगामी वृत्तीचें. त्याचें अंतिम साध्य असें कीं, हळुहळू अफगाण सरहद्द गांठीपर्यंत आपण आपलें घोडें पुढें पुढें दामटीत रहावें. यागिस्तानचा मुलुख हिंदुस्थानांत समाविष्ट करण्याचाच हेतू पर्यायानें या धोरणानें दर्शविला जातो. दुसरें धोरण कौशल्यपूर्ण शैथिल्यजनक आहे ( पृ. २९-३० पहा ) त्याला 'संतुष्ट वृत्ति', असें नांव देतां येईल, किंवा 'फॉर्वर्ड' च्या विरोधी म्हणून 'क्लोजबॉर्डर' असेंही त्या धोरणास म्हणण्याचा प्रघात आहे. संतुष्ट वृत्तीचे पुरस्कर्ते असें म्हणतात कीं, "हिंदी सरहद्दीपलीकडे मुळीं डुंकून देखील पाहूं नका. यागिस्तानांतील जनतेनें हिंदी प्रदेशावर हल्ला केला अथवा उपद्रव दिला, तरच तेवढ्यापुरतें आपलें सैन्य त्या प्रांतांत नेऊन अपराध्यांचें पारिपत्य करा. पण हिंदी सरहद्दी-पलीकडे आक्रमण करण्याची इच्छा मुळींच ठेवूं नका."

**२२०. डयुरांडची श्रेष्ठ कामगिरी** :—दोन्ही धोरणें परस्पर विरोधी आहेत. आणि तिसऱ्या अँग्लो-अफगाण युद्धापर्यंत इंग्रज मुत्सद्यांची सरहद्दीपलीकडील प्रांतासंबंधाची राजकारणी वृत्ति ह्या दोन्हीं टोकांमध्यें हेलकावे खात होती. अफगाण मुलखापर्यंत चढाई करून मधील प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणण्याची ब्रिटिश कारस्थान्यांची इच्छा साध्य होण्यांत निदान अफगाणसरहद्द तरी ठरली पाहिजे ना? कारण अफगाणांची हिंदुस्थानाकडील सरहद्द निश्चित कोठें आंखली होती? सर डयुरांड ह्यांच्या नेतृत्वाखालीं अफगाणिस्तानची हिंदुस्थानच्या बाजूची सीमा निश्चित आखण्यांत आली. ती सीमा ठरविण्यांत ब्रिटिश कारस्थानी

अफगाण सरहद्द—डयूरांड लाईन




काबूल—पेशावर रस्ता.

चालोद्यान प्रेस, पुणें.



हिंदुस्थानवरील हल्ल्यांचा राजमार्ग.

चालोद्यान प्रेस, पुणें.

राजनैतिकपटूंनीं फार दूरदृष्टि, साम्राज्य संरक्षणाची उत्कट इच्छा आणि स्वार्थ साधण्याची मानवी धडपड या सर्वांचें एकसमयावच्छेदेंकरून प्रदर्शन इतकें चातुर्यानें केलें आहे, की तत्संबंधीं जों जों विचार करूं लागावें, तों तों ड्यूरांडच्या कर्तबगारीचें कौतुक—ब्रिटिशांशीं हाडवैर असणारास देखील—करावेंसें वाटतें.

अफगाणिस्तानांतून हिंदुस्थानवर हल्ला होण्याचे जे मार्ग आहेत ते सर्व तोंडाशींच रोधतां यावे किंवा तेथील जमातींवर आपलाच ताबा असावा ह्या दूरदृष्टीच्या हेतूनें अफगाण हद्द ठरविण्यांत आली. रशियाच्या चढाईचें भूत भीति दाखवीत होतेंच. त्याची शक्यता अनुभवास आली, तरी देखील हिंदुस्थानचें संरक्षण करणाऱ्या लष्करी तज्ज्ञांना अवसर मिळावा, हिंदुस्थानच्या मूल्यवान 'ठेवी'ला धक्का पोहोंचू नये अशाच मुत्सद्देगिरीनें ही सरहद्द ठरविली. म्हणून हिला (युद्धनीति) शास्त्रोक्तसीमा असें म्हणतात.

पुरोगामी धोरण निश्चित करण्याचा तो पायाच म्हणतां येईल. कारण ही अफगाण सीमा यागिस्तानपलीकडे आंखण्यांत आली, त्या वेळी अबदुर रहमान इंग्रजांच्या पूर्ण मुठीत होता. तेव्हां इंग्रज मुत्सद्दी म्हणतील त्यास अमिरानें मान डोलाविली तर आश्चर्य कसलें ? शिवाय ड्युरांडचें काम चालूं असतानाच अमिरास मिळणारी सालीना बारा लाखांची खंडणी दीडपट वाढविण्यांत आली. मग अमीर खूष कां होऊं नये ? ही 'ड्युरांड' हद्द ठरल्यानंतर राणीसरकारनें अबदुर रहमान ह्यास मोठ्या (कोरड्या) मानाच्या पदव्या बहाल केल्या ही बाब नजरेआड करतां येणार नाहीं. अस्तु.

**२२१. धोरण कोणतें स्वीकारावें** :—ड्यूरांडकराराप्रमाणे अफगाणहद्द ठरल्यानंतर पुरोगामी धोरणानें जावें, कां संतुष्टवृत्तीनें चालावें असा लढा वरचेवर चालत असे. हें धोरण निश्चित राहीना. याचें मुख्य कारण यागिस्तानमधून हिंदी मुलखावर होणारे हल्ले. कोणत्याही धोरणानें वागलें, तरी हल्ले होतात. मग कांहीं दिवस पुरोगामी वृत्ति, तर कांहीं दिवस संतुष्टवृत्ति असे प्रयोग होत. परंतु कशाचाच परिणाम दृश्यमान् होण्यास पुरेसा अवधि मिळत नव्हता.

ह्या दोन्हीं धोरणांमुळें कांहीं वर्षेपर्यंत वेगळ्याच मार्गाचा अवलंब करणें हिंदी अधिकाऱ्यांस भाग पडलें. त्याला ( Hit & retire ) असें नांव देतात. यागिस्तानमधील टोळ्यांनीं हिंदुस्थानी प्रदेशांत फारच धुमाकूळ माजविल्यानें त्यांना शासन करण्यासाठीं वारंवार मोहिमा कराव्या लागत. मोहीम करण्यासाठीं स्वतंत्र

मुलखांत प्रवेश करणें क्रमप्राप्त होई आणि शासन करून हिंदी सैन्य परत फिरलें, कीं त्याचा सूड उगविण्यासाठीं यागिस्तानचा फिरून गनिमी काव्याचा छापा येई, असें हें हल्लाप्रतिहल्ल्याचें चक्र थांबणार तरी कधीं, हा प्रश्न हिंदी सरकारास पडला. कारण अपराध्यांना शिक्षा करण्यासाठीं मोहीम केली नाहीं, तर साम्राज्यसरकारची इभ्रत जाते, इंग्रजांचा आब रहात नाहीं आणि स्वतंत्र लुटारू सोकवतात! बरें लढाई केली, तर खर्च फार येतो, पुष्कळ योद्धे कामास येतात व आपसांतील तेढ एकसारखी वाढत जाते. १८४७-९७ पर्यंतच्या ५० वर्षांत यागिस्तानांत एकूण लहान मोठ्या वीस मोहिमा ब्रिटिशांनीं इभ्रत राखण्यासाठीं केल्या. आणि त्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. मालाकंदपासून गोमलपर्यंतची सर्व सीमा वणव्यानें पेटल्याप्रमाणें ब्रिटिशांना वाटलें. यागिस्तानांतले सर्व लोक इ. स. १८९७ त इंग्रजांविरुद्ध उठले. नेहमीं आपसांत भांडणारे हे लोक एक होतात ते फक्त सामायिक शत्रूशीं लढतांनाच! त्यांची ही मनोवृत्ति इंग्रजींतच चांगल्या प्रकारें सांगतां येईल. "They are never at peace unless they are at war." इ. स. १८९७ मध्यें आलेलें हें सरहद्दीवरील संकट, त्या निमित्त झालेली मनुष्य व द्रव्यहानि हीं पाहून मात्र ब्रिटिश मुत्सद्यांना आपल्या धोरणांत कांहीं तरी बदल केला पाहिजे, नुसत्या लष्करी धमकीनें यागिस्तानचे लोक वठणीवर येणार नाहींत हें कळून चुकलें.

**२२२. कर्झनशाही नवीन धोरण व त्याचें वैयर्थ्य** :—तत्कालीन स्टेटसेक्रेटरींनीं एक जाडा खलिता लिहून व्हाइसरॉयना नवें धोरण आंखून दिलें. "यागिस्तानांतील टोळ्यांशीं येणार संबंध मर्यादित करून तुमची सत्ता अथवा तुमचे नियम त्यांना बंधनकारक होणार नाहीत"† अशी व्यवस्था ठेवण्याबद्दल व्हाइसरॉयना वरून लिहून आलें. लॉर्ड लिटन यांनीं १८७७ मध्यें सुचविलेलें धोरण तें हेंच. पण कांहीं तरी अडचणींमुळें त्यांची अंमलबजावणी त्यावेळीं झाली नव्हती. ती करण्याचा मान लॉर्ड कर्झन यांस मिळाला.

इ. स. १८९९ पासून उपरोक्त नवें धोरण लार्ड कर्झनच्या कारकीर्दींत अंमलांत आलें लॉर्ड कर्झन यांनीं आपली अक्कलहुशारी खर्च करून प्रथमतः फ्रॉटीयर मिलिशिया या नांवानें एक नवी सैन्यभरति सुरू केली. तींत आलेल्या

† *The Indian Year Book 1923*, ( The Times of India ) P. 188.

सैनिकांना प्रत्यक्ष लढण्याचें काम द्यावयाचें नसून रस्ते सुरक्षित ठेवणें किंवा व्यापारी वाहतुक बिनहरकत चालूं देणें अशा सारखींच कामें त्या सैनिकांकडे सोंपवावयाचीं होती. शिवाय ज्या भागांतील सैनिकांना त्याच भागांत काम करावयास लावावयाचें असें ठरलें.

मिलिशियांतील लोकांना बंदुका व गणवेष (युनिफॉर्म) सरकारांतून मिळे व त्या खेरीज मासिक वेतन असें. यापैकीं कुरम व खैबर ( रायफल्स नामक ) पलटणी सर्वांत वरच्या प्रतीच्या ठरल्या. त्यांचे वरिष्ठ अधिकारी मात्र ब्रिटिश असत. ही योजना झाल्याबरोबर स्वतंत्र मुलखांत ब्रिटिश फौजेचीं जीं ठाणीं होतीं तीं बहुतेक उठविण्यांत आलीं. हिंदी सरहद्दीवर मात्र त्यांना अगदीं जय्यत ठेवण्यांत आलें. नव्या धोरणाचा आणखी एक भाग म्हणजे वायव्य सीमाप्रांत ( North West Frontier Province ) म्हणून हजारा, पेशावर, कोहाट, बन्नू व डेराइस्माइलखान हे पांच जिल्हे मिळून नवा प्रांत बनविण्यांत आला व तो व्हाइसरॉयांच्या खास देखरेखीखालीं दिला गेला. त्यावर चीफ कमिशनर नेमण्यांत येऊन त्याचें ठिकाण पेशावर हें शहर ठरलें ( १९०१ ). तसेंच खुशालगड ते कोहाट रेल्वे बांधण्यांत आली; दर्गाई, तंक व बन्नू ह्या गांवांस जाणारे निरनिराळे फाटेही बांधले गेले.

टोळ्यांना विविक्षित काम केल्याबद्दल किंवा निरुपद्रवी राहिल्याबद्दल वेतन देण्याची व्यवस्था करण्यांत आली. पण त्यांचे आचार अथवा त्यांच्या स्वतंत्र वृत्ति कोणत्याही प्रकारें न दुखविण्याची पूर्ण खबरदारी घेण्याचें ठरलें. त्यामुळें रानटी टोळ्यांना कोणताही त्रास पोहोंचेना. उलट वेतन मिळूं लागलें; म्हणून त्यांचेकडून लष्करीदृष्ट्या उपद्रव होईना. केवळ चोरी, लुटालूट इत्यादि 'न्याय्य' धंद्यासाठींच त्यांचा उपद्रव मधून मधून होऊं लागला. पण तो अपरिहार्यच होता.

पण ही लॉर्ड कर्झन यांची योजना कांही वर्षेंपर्यंत विशेष त्रास न होतां अंमलांत असली, तरी इ. स. १९१९ मध्यें तिची योग्य किंमत कळली आणि ती त्याज्य असेंच ठरलें. कारण त्या वेळीं अफगाणिस्तान व हिंदी सरकार यांचेमध्यें युद्धास तोंड लागलें होतें. यागिस्तानांतील टोळ्यांना हा मोह अनावर झाला व ते बहुतेक अफगाणांना मिळाले. म्हणजे हिंदी सरकारनें दिलेल्या बंदुका व लष्करी शिस्तीचें शिक्षण यांचा उपयोग हिंदी सरकाराविरुद्ध झाला, हाच कर्झनशाही योजनेचा फोलपणा होय.

**२२३. चेल्म्सफर्डसाहेबांचें नवें अर्धगुरोगामी धोरण** :—तेव्हां आणखी एक नवी योजना ठरवून तिचा प्रयोग करून पहाण्याचें ठरलें. लॉर्ड चेल्म्सफर्ड, व्हाइसरॉय असतांना त्यांनी ह्या योजनेसंबंधीं आपलें मत जनतेपुढें मांडून लोकपक्षीयांकडून तिला संमति मिळविण्याचा प्रयत्न केला. तिजसाठीं अवाढव्य लष्करी खर्च करावा लागणार असल्यानें करांचा बोजा प्रजेवर मनस्वी पडणार होता. अगोदरच कांहीं वर्षे सरकारला तूट पडत होती. त्यांत ह्या नव्या योजनेची भर पडली. ही नवी व्यवस्था यागिस्तानांतील प्रमुख भाग जो वजिरिस्तान त्या संबंधीं होती. वजिरिस्तानचा भाग म्हणजे अव्वल प्रतीच्या नाठाळ लोकांचा मुलुख. त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांना रात्रदिवस जागरूक रहावें लागतें. वजिरी म्हणजे अट्टल लुटारू. त्यांनीं ब्रिटिश मुलखांत इतके हल्ले चढविले होते, की १८५२ ते १९२४ पर्यंत एकूण १७ मोहिमा त्यांचे विरुद्ध इंग्रजांना लढवाव्या लागल्या! साधारणपणें दर चार वर्षांस एकदां वजिरिस्तानांतील ब्रिटिश सैनिकांस तरी ‘लढाई’ करावी लागतेच!

तेव्हां अत्यंत त्रासदायक अशा लोकांनाच प्रथम नरम आणावे म्हणून नव्या धोरणाचा प्रयोग वजिरिस्तानांतच प्रथम करण्याचें ठरलें. खैबर घाटांतून रेल्वे वाढवीत नेऊन अफगाण सरहद्दीपर्यंत ती भिडवावी अशी योजना अमलांत आणण्याचें ठरलें.

ही योजना आंखतांना सर्व परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून तेथील प्रश्नांना यथायोग्य तोड काढण्यांत आली आहे हें विचारांतीं पटेल. यागिस्तानांतील जनतेकडून हिंदी मुलखास त्रास होतो त्याचे मुख्य कारण म्हणजे यागिस्तानमधील जमीन नापीक आहे हें होय. लोकसंख्या तर भरपूर आणि पुरेसें खावयास नाहीं अशी अवस्था होतांच लुटालूट व चोरी करण्याचा अनावर मोह व्हावयाचा. इतर व्यापारधंदा करावयासाठीं दळणवळणाचे मार्ग उपलब्ध नाहींत. शिक्षणाचा मागमूस नाहीं आणि कोणत्याही प्रकारें त्यांना व्यग्र राहतां येईल अशी व्यवस्था नसल्यानें, तेथील लोकांना आपल्या ‘नैसर्गिक व जन्मसिद्ध’ हक्कांची बजावणी करावीशी वाटते.

ह्या सर्व बाबींचा विचार केल्यास चेल्म्सफर्डच्या नवीन धोरणांतील उपाययोजना सहज सुचण्यासारखी आहे. यागिस्तानी लोकांस कांहीं तरी काम देऊन त्यांना व्यग्र ठेवून व ठराविक वेतन द्यावें. मात्र त्यांच्यावर प्रत्यक्ष अधिकार न

चालवितां त्यांना आपण स्वतंत्र आहोंत ही जाणीव वरचेवर करून देणें फायद्याचें होईल. व्यापारधंदा वाढावा म्हणून नवीन नवीन सडका बांधून दळणवळणाचीं साधनें उपलब्ध करून देण्यांत त्यांचा दुहेरी हेतु. एक वाटेल तेव्हां लष्करी वाहतुक तिकडे होऊं शकेल म्हणून ठिकठिकाणीं लष्कराचीं ठाणीं बसवावीं लागणार नाहींत आणि दुसरा व्यापारवाढीचा. रस्ते बनविण्याचें काम देखील तद्देशीय मजुरांनाच द्यावें म्हणजे आणखी एक हेतु साध्य होईल. नंतर इस्पितळें, शाळा, पाण्याचे नळ, इत्यादि सुखसोयी करून दिल्या म्हणजे तर विचारावयासच नको. इतकेंही करून पुनः कांहीं लोक रिकामे राहिले, तर कालवे खणून शेतीची व्यवस्था करून देणें किंवा लहान लहान घरगुती उद्योगधंद्यांचा त्यांच्या खेड्यापाड्यांतून प्रसार करणें हे मार्ग अवलंबितां येतील. अशानें त्यांचा स्वभाव पूर्णपणे बदलला नाहीं, तरी उपद्रव पुष्कळ कमी होईल यांत शंका नाहीं. अशा स्वरूपाचें हें चेल्म्सफर्ड साहेबांनीं नवीन आखलेलें धोरण आहे.

**२२४. धोरणाचें गुणदोषविवेचनः**—हा कार्यक्रम पार पाडण्यासाठीं खर्च पुष्कळ करावा लागणार हें उघड होतें. हिंदी तिजोरीवर भलताच बोजा पडतो आणि आपला हक्क नसलेल्या प्रदेशांत आपण हें भांडवल गुंतवून ठेवीत आहों; रानटी लोक केव्हां उलटतील व सर्व रेल्वे वगैरेचा नाश करतील तें सांगवत नाहीं, अशा आशयाची ओरड 'लंडन टाइम्स' सारख्या पत्रांतून **मेजर ऑर्थर मूर** ह्या खास सरहद्दीवरील बातमीदारानें चालविली. ‡ स्वतंत्र मुलखांत प्रवेश करून सैन्य तेथें ठेवावयाचें आणि नंतर रसद पुरविण्यासाठीं तेथें रेल्वे बांधावयाची. मग रेल्वे रक्षण करण्यासाठीं सैन्य लागतें. अशी ही चंचुप्रवेशाची परंपरा आहे.

पूर्वीच्या 'मिलिशिया'च्या ऐवजीं आतांच्या धोरणांत 'खासदार' आले. त्यांना काम मिलिशिया सारखेंच. पण हत्यारें ज्याचीं त्यानें आणावीं असें ठरविण्यांत आलें. सरकारकडून फक्त एक 'पगडी' त्यांना मिळावयाची आणि ठराविक वेतन त्यांच्या पदरीं पडावयाचें. रस्ता संरक्षण, वाहतुकीची व्यवस्था इत्यादि अंतर्गत पोलिसांचें काम खासदारांकडे सोंपविलें आहे. त्यांच्यावर कोणी अधिकारी नाहीं किंवा कांहीं नाहीं. त्यांचे ते स्वतंत्र. त्यामुळें खासदाराचें काम अगदीं बिनतक्रार चालतें.

‡ *The Times*, London, April and May 1922.

शिवाय खैबर घाटांतील अफ्रीद्यांना व इतर भांडखोर टोळ्यांना त्यांनीं कोणत्याही प्रकारें ब्रिटिश मुलखास उपद्रव दिला नाहीं, तर ठराविक खंडणी,-बक्षीस, पारितोषिक, काय वाटेल तें नांव द्या—दिली जाते. खबर घाटांतील रेल्वेसाठीं व इतर लष्करी नाकीं, ठाणीं व किल्ले यांसाठीं लागणाऱ्या जमिनीचें जबर भाडेंही देण्यांत येत असल्यानें कोणत्यांना कोणत्या प्रकारानें त्या स्वतंत्र टोळ्यांना द्रव्य लाभ होत आहे. कित्येक खेड्यांतील लोकांना (रायफल्स) बंदुका वाटण्याची पद्धत तर यशस्वी ठरल्याचें सरकारी रिपोर्टांतच नमूद आहे.§

**२२५. यागिस्तान आत्मसात करण्याचे प्रयत्न** :—आणखीही अनेक प्रकारें यागिस्तानांत शांतता नांदावी म्हणून हिंदुस्थानसरकारची खटपट चालू आहे. स्वातचे वली, दीरचे नबाब, चित्रळचे मेहतर इत्यादिकांचीं 'स्वतंत्र' राज्यें कायम (?) ठेवून त्यांना मासिक रुपेरी शृंखलांनीं बद्ध करून टाकलें आहे. शिवाय त्यांचीं आपसांत भांडणें चालत तींही बंद करण्यासाठी ब्रिटिश मुत्सद्देगिरी उपयोगी पडली आहे. स्वातच्या वलीचें नांव **मियाँगुल गुलशाहाजादा** असें असून त्याला फक्त (?) दहा हजार रुपये दरसाल देण्यांत येतात! यामुळें स्वातमध्यें इंग्रज अधिकारी म्हणतील तेंच ब्रह्मवाक्य मानलें जातें. आणि इतकेंही करून स्वातचे वली पूर्ण स्वतंत्र आहेत ते आहेतच. त्यांच्या स्वातंत्र्याला धक्का कोण लावणार?

स्वात व दीरमध्यें आतां चांगल्या सडका झाल्या आहेत. स्वातकनालमुळें ३,२०,००० एकर जमीन भिजली जात असल्यानें पूर्वी जेथें ओसाड प्रदेश होता तेथें आतां सर्वत्र वनस्पतींची शोभा दिसत आहे. लोकांना शेती करण्याची आवड उत्पन्न झाली व रस्ते उत्तमपैकीं असल्यानें व्यापारही वाढला आहे. पंजकोरा नदीवरील **बालंभट** (Balambhat) येथील पूल १९२६ मध्यें तयार झाल्यानें दळणवळण साहजिकच वाढलें आहे. दीर येथें एक शाळा व मालाकंद येथें एक इस्पितळ असल्यानें तेथील जनतेची सोय उत्तम झाली आहे. यागिस्तानच्या कुरम विभागांत म्हणण्यासारखा त्रास नाहीं. पण वझिरिस्तानमध्यें मात्र या सर्वांचें उट्टें निघतें. तेथील असंख्य टोळ्या आपसांत तर भांडतातच; पण शिवाय त्यांचा उपद्रव शेजारच्या हिंदी मुलखास फार होतो. हिंदी सरकारचे अधिकारी यांत पडून

---

§ Report on the Administration of the N. W. F. Province for 1926-1927.

त्यांचीं आपसांतलीं भांडणें मिटविण्यास पदव्या वगैरे देऊन मदत करतात. एका मालिक **मर्वतखान शमनखेल** या महशुदी टोळी नायकास (मालिक=टोळी नायक) "खानसाहेब" ही पदवी देऊन त्याचा गौरव करण्यांत आला (१९२६.) महशुदी गृहस्थास हा (कोरडा) बहुमान प्रथमच मिळाला.

याखेरीज रु. १७,८७,०००* खर्चून थळ ते इदकपर्यंतची एक सडक बांधण्याचें काम चालूं आहे. शवा येथें १९२७ मध्यें एक पोष्ट व तार ऑफिस उघडलें. मिरमशहा येथें असलेलें इस्पितळ फार लोकप्रिय होत चाललेलें पाहून रझमक येथें नवीन इस्पितळाची इमारत बांधण्याचें काम चालूं आहे. प्राथमिक, मध्यम, व उच्च शिक्षण देण्यासाठीं शाळा उघडत आहेत व आणखीही किती सुखसोयी करून दिल्या जात आहेत. अशा रीतीनें यागिस्तानांत हळूं हळूं पुढें सरकत शेवटीं 'डयुरांड लाईन गांठणें हीच हल्लींच्या अर्धपुरोगामी धोरणाची इतिकर्तव्यता आहे. रानटी टोळ्यांना दरसाल येनकेन प्रकारेण पैसे पोहोंचवून त्यांचेकडून काम करून घेण्यांत धूर्तता व भेदनीतीचाच उपयोग ब्रिटिशांनीं जास्त केला आहे. आफ्रिद्यांचें आपसांत वांकडें असतें याचा फायदा घेऊन अफ्रिद्यांकरवींच आफ्रिदी गुन्हेगार पकडवावयाचा असे प्रकार नेहमीं चालूं असतात. कांहीं कामगिरीबद्दल रानटी टोळ्यांना जशी सामायिक खंडणी किंवा बक्षिसें मिळतात, तशींच शिक्षाही पण सामायिक भोगावी लागते. एका मालिकाच्या किंवा खासदाराच्या विवक्षित हद्दींत गुन्हा घडला, कीं त्याची सर्व जबाबदारी त्या मालिकावर अथवा खासदारावर पडते. चोराचा वा खुनी इसमाचा तपास लावणें, चोरीचा माल आणून देणें हीं कामें जर त्या त्या ठराविक माणसांकडून झालीं नाहींत, तर त्यांना दंड करण्यांत येतो व तो दंड फार सांठला अथवा गुन्ह्यांचें प्रमाण वाढलें कीं, वैमानिक दलातर्फे त्या टोळीच्या प्रदेशावर हल्ला चढविण्यांत येतो, मग ते मालिक शरण येतात, क्षमा मागतात आणि नंतर मागील सर्व बाकी विसरून जाऊन नव्या हिशेबास सुरुवात होते. अशा प्रकारें ही व्यवस्था चालूं आहे.

**२२६. तात्त्विक व व्यावहारिक चर्चा** :—आतां या सर्व धोरणाचें गुणदोष विवेचन करणें क्रमप्राप्त आहे. पहिलें पुरोगामी, दुसरें संतुष्ट वृत्तीचें, तिसरें कर्झनशाही व तदनंतर प्रचलित' अर्धपुरोगामी' अशीं हीं चार धोरणें निरनिराळ्या

---

* Report on the Administration of the N. W. F. Province for 1926-27. p. 11.

वेळीं आवरलीं गेलीं. पुरोगामी धोरणाच्या पुरस्कर्त्यांना कंदाहारदेखील आपल्या हातीं ठेवण्याची आवश्यकता भासूं लागली होती, हें द्वितीय अँग्लो-अफगाण युद्धोत्तर कालीं दिसून आलेंच (पृ.४३-४४).हिंदुस्थानचें संरक्षण करण्यासाठीं अफगाणिस्तानवर दिल्लीश्वराचीच सत्ता चालली पाहिजे अशा प्रकारची विचारसरणी एका काळीं लढविली जात असे आणि लष्करी तज्ज्ञांच्या मतें व तत्कालीन परिस्थितीचा विचार केला, तर तीच रास्त ठरली असती. इतिहासाचा, पुराणांचा किंवा इतर अनेक शास्त्रांचा आधार घेऊन ('अहिगणस्थान' हें आमचेंच असल्यानें) काबूल, हिंदी सरकारच्या अंमलाखालीं यावें अशी महत्त्वाकांक्षी इच्छा आजच्या राजकीय वातावरणांत अत्यंत हास्यास्पद, अशीच ठरेल. ती शक्य कोटींतील नव्हे, रास्त नव्हे, वाजवी नव्हे...म्हणूनच पुरोगामी धोरणाचें अतिशयोक्तीचें हें टोंक विचारांत घेण्याची आवश्यकताच रहात नाहीं.

पुरोगामी धोरणाचा दुसरा प्रकार म्हणजे ड्युरांड लाईन गांठेपर्यंत पुढें सरकण्याचा होय. त्यायोगें हिंदी मुलखास शांतता व आबादानी मिळत असेल, तर तो अवश्य स्वीकारला पाहिजे. कारण आपला हा अभ्यास हिंदी राज्यकारभाराचा गाडा शांतपणें व सुरळीत कसा चालेल याच दृष्टीनें व्हावयाचा आहे. तेव्हां ड्यूरांड हद्द गांठण्याचा विचार वावगा नसल्यानें आतां कोणत्या उपायानें हें ध्येय साध्य करावयाचें तें ठरविलें पाहिजे. केवळ तरवारीच्या जोरावर यागिस्तानांतल्या मुलखांत चढाई करणें तात्पुरतें यशस्वी ठरलें, तरी तें केव्हांही टिकाऊ होणार नाहीं. म्हणून एकदां पुढें टाकलेलें पाऊल मागें घेण्याचा प्रसंग येणार नाहीं अशा तयारीनेंच चालणें जरूरीचें आहे.

इ. स. १९१९ नंतर अवलंबिलेलें अर्धपुरोगामी धोरण याच ध्येयासाठीं आंखलें असल्यानें मागें दर्शविल्याप्रमाणें प्रचलित कालच्या सर्व अडचणी लक्षांत घेतां, तेंच श्रेयस्कर अतएव अनुकरणीय ठरतें. यागिस्तानमधील लोकांचें दारिद्र्य नाहींसें करण्याची व त्यांना सदैव कोणत्या ना कोणत्या तरी व्यवसायांत व्यग्र राखून त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था करणें हेंच अर्धपुरोगामी धोरणाचें थोडक्यांत स्वरूप आहे. एखाद्या कुटुंबांत अत्यंत खोडकर पण सशक्त मुलगा असला, म्हणजे त्याच्या बंदोबस्तासाठीं इतर कुटुंबियांना जशी तरतूद करावी लागते तशापैकींच हा कांहींसा प्रकार आहे. यागिस्तान हिंदुस्थानच्या शेजारीं आहे खरें. तें कांहीं दूर फेकून देतां येत नाहीं किंवा संतुष्टवृत्तीचे पुरस्कर्ते म्हणतात

त्याप्रमाणें एखादा तट बांधून त्यांचा संबंध तोडून टाकला, तरी इच्छित हेतु सिद्धीस जाईल कीं नाहीं याची जबरदस्त शंकाच आहे.

**२२७. अर्धपुरोगामी धोरणाचें समर्थन** :— यागिस्तानसंबंधीं अर्धपुरोगामी धोरण ठरविल्यानें हिंदी तिजोरीवर व पर्यायानें जनतेवर मनस्वी करांचा बोजा पडतो हें यद्यपि खरें असलें, तरी अनन्यगतिकत्वात् तो सोसणें भाग आहे. याचा अर्थ हिंदी सरकारची तरफदारी करण्याचा प्रस्तुत लेखकाचा हेतु आहे असा नव्हे. कर्झनशाही धोरण यशस्वी ठरलें असतें, फक्त लॉर्ड कर्झन यांनीं ठरविल्याप्रमाणेंच अक्षरशः वागावयास पाहिजे होतें, अशी मे. ऑर्थर मूर यांची ' लंडन टाइम्स ' मधून ओरड होती. कर्झनशाहीचें सरहद्दीचें धोरण इ. स. १९१९ मध्यें अत्यंत घातुक झालें याचें कारण, ' लंडन टाइम्स ' च्या उपरोक्त खास बातमीदाराच्या मतें असें, कीं मिलिशियाच्या कार्याचा मूळ हेतू दृष्टिआड करून अगदींच वेगळ्या वृत्तीनें नंतरचे अधिकारी वागले. 'मिलिशिया' चें काम पोलिसांसारखें म्हणजे अंतर्गत व्यवस्था राखण्याचें होतें. लढण्याचें किंवा लष्करी संरक्षण करण्याचें मुळींच नव्हतें. ही मुख्य गोष्ट कर्झनांच्या अमदानींत आचरणांत आली असली, तरी त्यांचे पश्चात् मिलिशियाचा कित्येक वेळां योद्धे-सैनिक-म्हणून उपयोग केला गेला. आणि वरचेवर होत असलेल्या मोहिमांत मिलिशियाच्या लोकांना लढण्याचें काम दिलें गेलें. ज्या कामासाठीं तिचा जन्म होता तें दूरच राहून दुसरें महत्त्वाचें व जबाबदारीचें काम मिलिशियावर पडतांच त्या पोलिसांची स्वार्थी धांदल उडाली आणि सरकारनें पुरविलेलीं हत्यारें घेऊन सरकारच्या लष्करी शिक्षणानें तयार होऊन पुनः सरकारशींच युद्ध करण्यास मिलिशियाचे लोक तयार झाले. त्यांना त्यांत कांहींच वाटलें नाही. परंतु सरकारनें आपलीं शस्त्रें देऊन आणीबाणीच्या वेळीं आपणांस विरोध करणारीं यागिस्तानी माणसें तयार कां करावी हाच मोठा विचारणीय प्रश्न आहे. कर्झनशाहीचा फोलपणा एकदम डोळ्यांत भरला तो याच अनर्थामुळें !

आतां विश्वबंधुत्वाचे भोक्ते अशीही शंका काढतील, कीं रानटी टोळ्यांच्या या स्वतंत्र मुलखावर हिंदुस्थानसरकारनें आक्रमण कां करावें ? त्यांचा मुलुख आज शेंकडों वर्षे स्वतंत्र राहिला आहे, तो तसाच राहूं देणें इष्ट आहे. त्यांचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा हक्क ब्रिटिश मुत्सद्यांना अथवा स्वतंत्र हिंदुस्थानसरकारला पोहोंचतो कसा ?

त्याला उत्तर सोपें आहे. हिंदुस्थानांत शांतता नांदावी असें वाटत असेल, तर त्याला उपाय दोन. एक यागिस्तानमधील जनतेची मनोवृत्ति एका क्षणांत बदलून तरी टाकण्याची व्यवस्था करावी, नाहीं तर त्यांच्या कल्याणासाठीं हिंदुस्थानचा कांहीं भाग तोडून द्यावा. मात्र त्या ठिकाणीं सर्व प्रकारची सुबत्ता हिंदी जनतेनें यागिस्तान्यांच्या सुखासाठीं साल दरसाल करीत रहावें. किंवा थोडक्यांत बोलावयाचें तर यागिस्तानच्या लोकांपासून होणारा सर्व उपद्रव खिस्ताच्या शिकवणीप्रमाणें सोशीत रहावा! या दोन्हींपैकीं एकही बाब साध्य होत नसेल तर मग अर्धपुरोगामी धोरणानुसार चालण्याविना गत्यंतर नाहीं.

**२२८. लष्कराचा मनस्वी बोजा** :—एवढें विवेचन झाल्यावर सरहद्दीवरील लष्करी खर्चासंबंधींही थोडें लिहिणें अप्रस्तुत होणार नाहीं. कारण हिंदी सरकारचा लष्करी खर्च अवाढव्य आहे, त्यानेंच रयतेवर करांचा बोजा विनाकारण पडतो इत्यादि ओरड, इतकी नित्याची झाली आहे कीं, तींत कांही सांगावयाचें उरलें नाहीं. ती ओरड सर्वथैव समर्थनीय अशीच आहे. कारण हिंदी प्रजेवर विशेष बोजा कशाचा असेल तर तो ह्या लष्करी खर्चाचाच आहे. लष्करी खर्चाचा हिस्सा सर्व उत्पन्नापैकीं शेंकडा ४६ पेक्षां कधींही कमी नसतो. मध्यंतरींच्या काळांत तर लष्करी खर्च बेसुमार वाढला होता. त्याची कल्पना येण्यास खालील आंकडे पहावे:—

| वर्ष | * एकूण उत्पन्न ( लक्ष रुपयांत ), | लष्करी खर्च | |
|---|---|---|---|
| १९२०-२१ | १,३५,६३ | ८८,२३ | |
| १९२१-२२ | १,१५,२१ | ७७,८७ | § |
| १९२२-२३ | १,२१,४१ | ७१,०० | § |
| १९२३-२४ | १,३३,१६ | ६१,०४ | § |
| १९२४-२५ | १,३८,०३ | ५९,६६ | § |
| १९२५-२६ | १,३३,३२ | ६०,३९ | § |
| १९२६-२७ | १,३१,७० | ५५,९६ | ‡ |
| १९२७-२८ | १,२१,७३ | ५४,७९ | ‡ |
| १९२८-२९ | १,२९,६४ | ५५,१० | ‡ |

* East India ( Budget ) 1928-29, Part II, pp. 14, 20-21.
§ Stiatitcal Abstract for British India, 1916-17 to1925-26.
‡ Report of the Indian Central Committee, p. 336.

असा इतका खर्च प्रजेला पिळून कांहीं काळ निघूं शकला, तरी असें एक-सारखें चालूं शकणार नाहीं. राष्ट्रसंवर्धनासाठीं खर्च करण्यास सवड ठेवली नाहीं, तर मोठीच कष्टदशा हिंदी जनतेस अल्पावधींत प्राप्त होईल. लष्करी खर्च वाढतो तो गोऱ्या पलटणींच्या महागऱ्या वेतनामुळें व भत्त्यामुळें. हिंदी जनतेचा लष्करी खात्यानें घ्यावयास पाहिजे तितका उपयोग करून न घेतल्यानें गोरी पलटण विलायतेहून आणावी लागते. सर्वसाधारणपणें ७५००० ब्रिटिश सोजीर व १६०,००० हिंदी सैनिक अशा प्रमाणांत* हिंदीसेनेची विभागणी केलेली असते. तीमुळें व गोऱ्या सैनिकांच्या 'बादशाही' राहणीमुळें खर्च भयंकर वाढतो.

" सरहद्दीवरील हवामान अत्यंत विचित्र आहे; तेथें राहणें म्हणजे आयुष्य " कमी करून घेण्यासारखें आहे. सैनिकांना नेहमीं खूष व संतुष्ट ठेविल्याविना " त्यांची कार्यक्षमता राहणार नाहीं. म्हणून कसल्याही प्रकारची काटकसर " लष्करी खर्चांत सुचवूं नका " अशा आशयाचे उपदेश लष्करी तज्ज्ञ वरचे-वर देत असतात. आणि त्यांत मुळींच तथ्य नाहीं, असें नाहीं. पण लोकपक्षीयांची मुख्य हरकत गोऱ्या पलटणीलाच आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, हिंदी सैनिक सर्व प्रकारचें काम करण्यास समर्थ असतां गोऱ्या सोजिरांना भरपूर मलिदा चारून इतकें दूर आणण्याचें प्रयोजन नाहीं. आणि आवश्यक तितके अधिकारी ठेवून घेऊन बहुतेक सर्व सेनाबल हिंदी केलें, तर वायव्यसीमा संरक्षणाचा व इतर लष्करी खर्च निम्म्यानें सहज कमी होईल. आणि या म्हणण्यांत पुष्कळच तथ्य आहे हें कोणाही देशहितेच्छु मनुष्यास मान्यच होण्यासारखें आहे. असो. आतां वायव्यसीमाप्रांताकडे वळूं.

## ( ब ) वायव्यसीमाप्रांत

**प्रांताचा इतिहासः—**पूर्वीं पंजाबचाच भाग असलेला हा पांच जिल्ह्यांचा विभाग १९०१ मध्यें लॉर्ड कर्झन यांनीं 'वायव्य सीमाप्रान्त' ( North-West Frontier Province ) म्हणून वेगळा केला आणि गव्हर्नर जनरलच्या खास देखरेखीखालच्या चीफ कमिशनरकडे त्याची व्यवस्था सोंपविली. हे पांच जिल्हे म्हणजे हजारा, पेशावर, कोहाट, बन्नू व डेरा इस्माइलखान हे होत. पैकीं हजारा सिंधू नदाच्या पूर्वेस असून हिंदुस्थानांत नैसर्गिकरीत्याच मोडतो. बाकीचे चारही

* N. D. Harris ; *Europe & the East*, p. 278.

जिल्हे सिंधूपार असल्यानें आक्रमणवृत्तीनेंच हिंदुस्थाननें ते आज आत्मसात् केले आहेत हें उघड आहे. इ. स. १८१८ त १८४९ पर्यंत हा सर्व भाग शिखांकडे होता. आणि शिखांचें राज्य जेव्हां ब्रिटिशांकडे 'चालत' आलें, तेव्हां ह्या सर्व जबाबदारीच्या मुलखाची जबाबदारीही त्यानांच वहावी लागली.

यागिस्तानला लागून असलेल्या या प्रान्तांत लष्करी सैन्य सदैव सिद्ध ठेवावें लागतें, वरचेवर होणाऱ्या लुटारूंच्या हल्ल्यांचा बंदोबस्त करावा लागतो, हिंदुस्थानचें संरक्षण करण्यासाठीं जागरूकता ठेवावी लागते...... आणखीही बरीच दक्षता बाळगावी लागते. तिची कल्पना फक्त गोरीं कातडीं असणाऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनाच येते. म्हणून तर हिंदुस्थानच्या संरक्षणार्थ कोट्यावधि रुपये दरसाल खर्चावे लागतात. आणि हे गोरे अधिकारी नसते तर......

या आत्मप्रौढीत तथ्य थोडेसें आहे. हिंदी राष्ट्राचें संरक्षण करण्याचें मुख्य काम याच विभागाधिपतींवर पडतें. तेथें रानटी स्वतंत्र टोळ्यांचा मनस्वी त्रास आहे. हवामान अत्यंत विचित्र असल्यानें माणूस अल्पकालांत जेरीस येतो. दाणापाणी, रसद व दारूगोळा पुरविण्याच्या कार्यांत अडथळे पुष्कळ आहेत, डोंगरांत लपून छपून राहण्यासाठीं जागा बऱ्याच आहेत. ह्या सर्व गोष्टी खऱ्या असल्या, तरी त्यांची जाणीव पूर्वीच्या हिंदी राज्यकर्त्यांस नव्हती असें नव्हे. त्यांनींही आपल्या शक्तीप्रमाणें ( व आपल्या अल्पमतीप्रमाणें असेल ) वायव्य सरहद्दीचा बंदोबस्त ठेवला होता, ही गोष्ट नाकबूल करतां येणारी नाही. आतां हिंदुस्थानच्या 'श्वेत' पालकांनीं फुकट मिळणाऱ्या पैशाच्या जोरावर तो बंदोबस्त अधिक चांगला ठेवला हेंही खरें, पण तेवढ्यानें अवाढव्य खर्च व ही फुशारकी समर्थनीय ठरत नाहीं. असो.

पांच जिल्हे मिळून सुमारें १३,४१९ चौरस मैल जमीन आहे. तेथील लोकसंख्या ( १९२१ च्या शिरोगणतीप्रमाणें) वा. सी. प्रांताची १२,५१, ३४० आहे. या प्रांताचें उत्पन्न साधारपणें सालीना ७०-८० लक्ष रुपयांचें असून खर्च मात्र दरवर्षी उत्पन्नापेक्षां फक्त दोन कोटींनीं अधिक असतो ! १९२४-२५ सालीं ७७ लक्ष रु. उत्पन्न असतां खर्च २,७१, लक्ष रु. झाला. १९२५-२६ सालचे आंकडे अनुक्रमें ७८ लाख व २८४ लाख रु. आहेत.§ अर्थात्‌च मध्यवर्ति

§ Administration Report of the N. W. F. Proviuces, ·1925-26 pp. 36-37.

सरकारकडून ह्या सर्व अधिक खर्च भरून निघतो. खर्चाचा आंकडा इतका फुगतो त्याचें कारण " राजकीय " खात्याचा खादाडखाऊपणा. त्या एकाच खात्यासाठीं वरील दोन वर्षांत अनुक्रमें ९१ व ९६ लक्ष रुपये ( सर्व ठिकाणीं पुढील हजारांचे आंकडे मुद्दामच सोईसाठीं वगळले आहेत ) लागले! आतां ह्या राजकीयखात्यांत कशाकशाचा समावेश होतो तें एक परमेश्वराला ठाऊक किंवा त्याच्यापासूनच हिंदुस्थानचें संरक्षण करण्याची जबाबदारी घेऊन अवतरलेल्या सरकारला ठाऊक!

रस्ते, इमारती व कालवे यासाठींही बरीच रक्कम सालोसाल खर्च होते. त्या रकमेची आवश्यकता कां आहे हें मागें सांगितलेंच. कालव्यांची वाढ करणें इष्ट आहे. कारण त्यायोगें लुटालूट करण्याकडील यागिस्तानी जनतेची प्रवृत्ति कमी होते.

**२२९. मोठीं शहरें** :—प्रांताचें मुख्य शहर पेशावर येथेंच चीफ कमिशनरचें वास्तव्य आहे. तेथील वस्ती १०,४,००० असून त्यासारखें शहर सिंधूपैलतीरीं इस्तंबूलपर्यंत दुसरें नाहीं अशी पठाणांची म्हण आहे, व तें खरेंही आहे. खाद्यपेयांची समृद्धि व स्वस्ताई, हवामान सुखकारक, सर्व आधुनिक सुधारलेल्या सोयींची व्यवस्था आणि आचारस्वातंत्र्य व जीवितसुरक्षितता यांमुळें पठाणांना तें शहर आवडतें. लष्करी मोठें ठाणें, वैमानिकदलाचें केंद्र, रेल्वेचें टर्मिनस, वा. सी. प्रांताचें मुख्य शहर, मध्य आशियांतील व्यापाराची जंगी उतारपेठ इत्यादि कारणांमुळें त्याला आणखी महत्त्व येतें. पौराणिकदृष्ट्या पाहिल्यास, एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करणाऱ्या परशुरामानें ही नगरी वसविली असें म्हणतात. गांधार प्रदेशाची मुख्य नगरी म्हणजेच पेशावर, असा कित्येकांचा सिद्धांत आहे. वैय्याकरणी पाणिनीची जन्मभूमी ही ' परशुनगरी 'च असें म्हणतात. अल्बीरुणीनें आणि अबुल फझलनें वर्णिलेलें पर्शुशावर किंवा पुरुषावर तें हेंच पेशावर असा तज्ज्ञांचा निर्णय आहे. पेशावरचा लष्करी किल्ला, शहरांतील पांडव-कुंडें, पदार्थसंग्रहालय, सार्वजनिक उद्यानें, छावणीचा भाग, इस्लामिया कॉलेज इत्यादि प्रेक्षणीय स्थळें आहेत.

डेरा इस्माइलखान हें पेशावरच्या खालोखालचें महत्त्वाचें शहर. पण तेथील वस्ती पेशावरच्या एक तृतीयांशच आहे! कोहाट, नौशेरा, बन्नू ( एडवर्डासबाद ) व मर्दान अशीं सहाच गांवें ह्या प्रांतीं महत्त्वाचीं आहेत. हजारा जिल्ह्यांतील तक्षिला ( तक्षशीला ) येथील प्राचीन वैभवाचें दृश्य पाहण्यास पुष्कळच अभ्यासू व जिज्ञासू मंडळी जातात.

**२३०. इतर महत्त्वाच्या गोष्टी** :—सर्वच वा. सी. प्रांतांत हिंदु व मुसलमानांची तेढ फार आहे. पंधरा मुसलमानास एक हिंदु असें लोकसंख्येत प्रमाण असलें तरी त्या प्रांतांतील सर्व उत्पन्नाचा कर हिंदूंच्याच खिशांतून जातो. याचा अर्थ श्रीमंतांत हिंदूंचाच भरणा आहे. दुसरेही कारण असें आहे कीं, साक्षरतेंत हिंदूच मुसलमानांच्या एकूण संख्येपेक्षां अशा विषम परिस्थितीत वरचढ आहेत. म्हणजे आहे या प्रमाणांत एकूण साक्षर मुसलमान व साक्षर हिंदु घेतले तर हिंदूच अधिक भरतील ! पठाणांची वृत्ति मर्कटाप्रमाणें असल्यानें पुढील अडचणीसाठीं तरतूद करून ठेवावी हा विचार त्यांच्या डोक्यांत शिरत देखील नाहीं. हिंदूंची सधनवृत्ती अशा वेळीं एकदम डोळ्यांत भरते आणि त्यांचे घरांवर दरवडे येतात. ह्याच कारणासाठीं वा. सी. प्रांतांत हिंदूंचा व मुसलमानांचा झगडा नेहमीं तीव्र स्वरूपांत चालतो. सबंध सीमाप्रांतांत बन्नू ( एडवर्डसाबाद ) ह्या एकाच गांवांत हिंदू व शीख मिळून मुसलमानांपेक्षां अधिक लोकवस्ति आहे. बाकी इतरत्र मुसलमानांचेंच प्राबल्य आहे.

खासगी व सरकारी असे दोन प्रकारचे कालवे या प्रांतांत आहेत. मोंगलांच्या वेळेपासून चालत आलेले कित्येक कालवे आज तागायत काम देत असून सरकारी कालव्यांच्या बरोबरीनें जमीन भिजवीत आहेत. स्वात नदीचे दोन ( खालचा व वरचा ), काबूल नदीचा एक व पहापूर कालवा असे एकंदर सरकारी चार मुख्य कालवे असून खासगी व सरकारी पाट बंधारे मिळून एकूण ३,६८,००० एकरांहून अधिक जमीन भिजविली जाते. कोहाट जवळ खनिज मीठ आहे. सालीना सुमारें पांच ते सहा लाख मण मीठ तेथून निघतें.

हवामानाच्या दृष्टीनें सर्वच प्रांत अत्यंत त्रासदायक आहे. उन्हाळ्यांत भरपूर उन्हाळा व थंडीच्या दिवसांत कडाक्याची थंडी असे दोनच ऋतू तेथें आहेत. पाऊस वर्षांतून दोन वेळां येतो, पण तो फारसा नसतो. उन्हाळ्यांत व हिवाळ्यांत दोन्ही वेळेस पावसाची नक्षत्रें असतात. किमान व कमाल उष्णतामानांत एका दिवसांत ४० ते ५० अंशांचा फरक पडणारीं ठिकाणें थोडीथोडकीं नाहींत. त्यामुळें सरहद्दीवर नौकरीसाठीं येणारांस खास सवलती द्याव्या लागतात.

वा. सी. प्रांतावरील सर्वच अधिकारी सज्जन असतात. आणि हिंदुस्थानांतील इतर अधिकाऱ्यांशीं तुलना केल्यास आपण एखाद्या नव्या देशांत आलों असें वाटतें. बोलण्याचालण्यांत, प्रजेच्या गाऱ्हाण्यांची दाद लावण्यांत आणि

सुखसोई पाहुण्यांत तिकडील अधिकारी विशेष सौजन्य, सभ्यता व प्रेमळपणा व्यक्त करतात. उद्धटपणाचा पुतळा समजला जाणारा गोरा सोजीर देखील तिकडे अगदीं नरम आलेला दिसतो. कारण सरहद्दीवर उर्मटपणानें राहून भागणार नाही. गांठ यागिस्तानी पठाणांशीं असल्यानें तडकाफडकी निकाल लागावयाचा. म्हणून वा. सी. प्रांतांतील अधिकारी अगदीं निवडक असतात.

पेशावरमध्यें पठाणांचाच भरणा फार आढळतो. पण पंजाबी, हिंदको, पुश्तु व हिंदुस्थानी या भाषा नेहमीं प्रचारांत असतात. पुश्तुपेक्षां हिंदकोचाच प्रसार वाढत आहे व पुश्तु कमी होत असल्याचें साधार मत शिरोगणतीच्या अधिकाऱ्यांनीं दिलें आहे. ‡ पंजाबी भाषेचाच पश्चिम पंजाबी म्हणून एक प्रकार आहे. तिला हिंदको, हिंदकी, असें म्हणतात. वास्तविक हें नांव सिंधपार असलेल्या यवनांनीं हिंदुस्थानच्या भाषेस दिलें. 'हिंदको' याचा अर्थ हिंदी जनतेची, हिंदुस्थानची. पठाणांना जवळचे हिंदी लोक म्हणजे हल्लीं वायव्य सीमाप्रांतांत वास्तव्य करीत असलेलेच. तेव्हां त्यांच्या भाषेस हिंदको, हें नांव मिळालें.

## (क) बलुचिस्तान

बलुचिस्तानचे ब्रिटिशबलुचिस्तान व स्वतंत्रबलुचिस्तान असे दोन भाग असून एकंदर क्षेत्रफळ १,३४,६३८ चौ. मै. व लोकसंख्या ७,९९,३२५ आहे. ब्रिटिशांची राजधानी क्वेट्टा व "कलात" ही स्वतंत्र बलुच्यांची राजनगरी आहे. मात्र बलुचिस्तानच्या स्वातंत्र्याचा अर्थ अगदीं निराळा आहे हें सांगितलें पाहिजे. कलाताधिपतींना 'खान' म्हणतात. प्रस्तुतचे खान "धृतराष्ट्र" पदवीला पोहोंचले असल्यानें त्यांचा सर्व कारभार वजीर पाहतो. आणि वजीर हे माजी ब्रिटिश नोकरींतले असल्यानें त्यांच्या कर्तबगारीचें वेगळें वर्णन नकोच. बलुचिस्तानचे धृतराष्ट्र स्वतंत्र्य असल्याचें इंग्रज अधिकाऱ्यांनीं इ. स. १८७६च्या तहानें मान्य केलें, आणि आम्ही ब्रिटिश सरकारच्या सहकार्यानें राज्यव्यवस्था पाहूं आणि इंग्रजांच्या तंत्रानें चालूं, असें खानसाहेबांनीं कबूल केलें. ब्रिटिशांच्या वतीनें गव्हर्नरजनरलचे क्वेट्टा येथील एजंट यांनीं कलातच्या खानांच्या 'राजकीय' कारभारावर देखरेख करावी असें ठरलें आहे. मग स्वातंत्र्य उरलें कोठें ? पण पुस्तकांत आणि कागदोपत्रीं कलाताधिपति स्वतं मानले जातात.

‡ Census of India, 1921, Vol. XIV, p. 272.

दुसऱ्या अफगाणयुद्धानें पिशिन, शोरारूद, दुकी, सिबी आणि शारीग हे जिल्हे इंग्रज निशाणाखालीं आले. नंतर सुमारें तीन वर्षांनीं म्हणजे इ. स. १८८३ मध्यें खानांनीं सालिना ५५ हजार रुपये घेण्याचें मान्य करून क्वेट्टा व बोलन हे दोन जिल्हे इंग्रजांना दिले. बोरी व्हॅली हा लष्करी ठाण्यासाठीं एक भाग इ. स. १८८६मध्यें आपण होऊनच ब्रिटिशांनीं घेतला. आणखी एका वर्षानें खेतरान प्रांत हवासा वाटल्यानें तोही लाल रंगानें रंगून गेला! झोबकाकर व खुरासान हे जिल्हे इंग्रजी अंमलाखालीं येणें आवश्यक झालें. १८९९ मध्यें खानसाहेब 'नुष्कीचा भाग द्या' म्हणून सरकारच्या मांगे लागले, तेव्हां त्यांना सालीना ९ हजार रुपये देण्याचें मान्य करून तोही भाग आपल्या हाताखालीं ब्रिटिश सरकारनें घेतला. नसिराबादचा जिल्हा १९०३ मध्यें "भाडयानें" घेतला. त्याला दरसाल रु. १,१७,५०० द्यावे लागतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हें सर्व भाडें दरसाल आजन्म चालू राहावयाचें आहे, आणि तें भाडेंच म्हणावयाचें. खानाला ती खंडणी देतात अशांतला भाग नव्हे. मात्र खानाच्या मनांत भाडोत्री जागा परत मागण्याचें आलें तर ती त्याला पाहावयास तरी मिळेल की नाहीं कोण जाणे!

**२३१. केट्टयाचा इतिहास व वर्णन** :—ब्रिटिश बलुचिस्तानाची राजधानी क्वेट्टा ही आहे. उद्यानमय शहर, समुद्रसपाटीपासून ५८५८ फूट उंची, आजूबाजूस वृक्षहीन टेकड्या आणि सदैव उत्तम हवा यांनीं तर क्वेट्टा मनोहर ठरतेंच; पण फुलाफळांची रेलचेल पाहूनही क्वेट्टयासारखें दुसरें शहर नसेल असें वाटतें! उन्हाळ्याच्या प्रारंभीं तेथें गुलाबांची इतकी पैदास होतें कीं, जिकडे तिकडे गुलाबांशिवाय दुसरें फूल दिसत नाहीं! आपल्याकडे श्रावणाच्या आरंभीं लाह्या भाजून देण्यासाठीं भडभुंज्यांच्या भट्ट्या जशा लागतात तशा गुलाबपाण्याच्या भट्ट्या क्वेट्ट्यास लागतात आणि उच्च दर्जाचें सुवासिक गुलाबपाणी, गुलाबी अत्तर आणि गुलकंद इत्यादि बादशाही पदार्थ तेथें तयार होतात. कंदाहारकडून गुलाबफुलांच्या 'वाघिणी' भरून येतांत तेव्हां तर शहरांत दुसरा वासच येत नाहीं. क्वेट्टा येथें बदाम, आक्रोड, तुती यांचींही झाडें असून इतर सर्व प्रकारचीं फळें त्या त्या मोसमांत पुष्कळ मिळतात. थंडींत क्वेट्ट्यास सुमारें ४ महिने बर्फ असतें आणि तज्जन्य होणारा त्रास मनांत ठेवला नाहीं तर दिसणारी शोभा अवर्णनीय असते.

क्वेट्टा हें नांव इंग्रजी भाषापटूंनीं अपभ्रष्ट केलें आहे ! मूळचें नांव 'शाल' असें होतें. म्हणजे अंगावर घेण्याची शाल जशी सुंदर दिसते तसेंच हें नगर हिरव्या वृक्षराजीनें विभूषित झालें म्हणजे रम्य दिसे. पूर्वी अफगाणिस्तानचा ताबा क्वेट्ट्यावर होता आणि अठराव्या शतकाच्या अखेरीस अफगाणाच्या अमिराची व बलुचिस्तानच्या खानाची सोयरीक झाली त्या वेळी क्वेट्टा आंदण म्हणून कलाताधिपास मिळालें. "काता" म्हणजे किल्ला असा अर्थ तद्देशीय भाषेंत आहे. "शाल कोट" म्हणजे शाल किल्ला असें चांगलें नांव असतां शाल कोणी तरी हिरावून घेतली आणि लोक "काता" "काता" करूं लागले. त्याचा इंग्रजी सोजिरांनीं क्वेट्टा असा विपर्यास केला ! हिंदींत आज "कोइटा" असेंच लिहितात. हुमायून दिल्लीहून पळून निघाला तेव्हां तो क्वेट्टा येथें आला होता. अकबर बादशहा येथें असतांना १-१॥ वर्षांचा होता. त्याला आपल्या नातलगाकडे ठेवून पळपुटे मोंगल बादशहा पुढें गेले !

सर्व बलुचिस्तानची व्यवस्था ब्रिटिशच पाहतात असें म्हणतां येतें. हिंदुस्थानाचें प्रवेशद्वार म्हणून या प्रांताचें विशेष महत्त्व ओळखून इंग्रज मुत्सद्यांनीं तो पटकावला आहे. याच्याहि पुढें जाऊन कंदाहार इंग्रज अमलाखालीं असणें हिंदुस्थानसंरक्षणाच्या दृष्टीनें आवश्यक आहे असें प्रतिपादण्यापर्यंत कांहीं व्हाइसरॉयांची मजल गेली होती ! आणि स्टेट-सेक्रेटरींनी नको म्हणून आज्ञा दिल्यामुळें व पुनः पुनः बजावल्यामुळें कंदाहार ताब्यांत आलेलें अफगाण अमिरास परत द्यावें लागलें !

अशा डोंगराळ व रानटी लोकांनीं भरलेल्या प्रांताचा राज्यकारभार करणें म्हणजे सर्पावर राज्य चालविण्यापैकींच आहे. कोण कोठून आणि कसा सुटून जाईल हें कळावयाचें नाहीं. दंश होईल तोहि प्राणांतकच. तेव्हां ही बिकट परिस्थिति ओळखण्यासाठीं राजकर्त्यांनीं योजलेले उपाय अभ्यासी दृष्टीनें पाहणें अयोग्य होणार नाहीं.

**२३२. राज्यव्यवस्था** :—एकंदर बलुचिस्तानचें उत्पन्न सालिना सुमारें वीस लाख असून खर्च पाऊण कोटि रुपयांवर आहे. हा जास्त होणारा खर्च मध्यवर्ती सरकारच्या थैलींतून येतो. जमिनीचा सारा रुपयांत घेण्याची पद्धत हिंदुस्थानांत सर्वत्र असली तरी बलुची शेतकरी आपापल्या शेतांतील धान्यही सरकारचा भाग म्हणून सरकारी कोठारांत नेऊन भरतात ! स्थानिक स्वराज्य संस्था म्हणजे

केव्याची एकटी म्युनिसिपालिटी. " लेव्ही " पद्धतीनें ब्रिटिशसरकारनें आपला कार्यभाग मोठ्या काव्यानें व धूर्ततेनें पार पाडला आहे. प्रत्येक ठिकाणीं कांहीं " लेव्ही " ठरलेले असतात. त्यांना मासिक वेतन सरकारांकडून मिळतें. अमुक भागांतून कोणी अधिकारी जावयाचा असेल तर त्या त्या लेव्हींना सूचना द्यावयाच्या. बाकीची सर्व व्यवस्था त्या लेव्हींकडे. टपाल पोहोंचविणें, फरारी आरोपीचा शोध लावणें इत्यादि सर्व कामें लेव्हींकडे वांटून दिलेलीं असून प्रत्येकाचें कार्यक्षेत्र ठरविलें आहे. जिल्ह्यांत चोरी झाली किंवा दरवडा पडला तर त्याबद्दल सर्वस्वीं जबाबदार तेथील लेव्ही. मग त्यांनी त्या गुन्हेगारांना पकडून तरी आणावें, नाहीं तर सरकार ठरवील तो दंड तरी द्यावा. अशानें " लेव्ही " संपूर्ण स्वायत्त आहेत असें कां म्हणूं नये?

एकंदर खर्च कोणत्या सदरांखाली काय प्रमाणांत होतो हें पाहण्यासारखें आहे. पाऊण कोटीपासून तें सुमारें एक कोटी रुपयांची विल्हेवाट अशी लागते:—

राजकीय खर्च शेंकडा १६·४, सरहद्दसंरक्षण २९·९, पोलीस १२·३, सरहद्दसंरक्षणाची कामें, इमारती वगैरे १५·४, म्हणजे रुपयांतील सुमारें " बारा आणे " अशा राजकीय खर्चातच गेले. उरलेल्या रकमेंत शिक्षण शेंकडा ३·३, आरोग्य ३·३, जमीनमहसूल ३·३, कारभाराची व्यवस्था २·१, किरकोळ २·७. या रीतीनें खर्च चालतो आणि राष्ट्रघटनेच्या खात्याची गळेचेपी कशी होते हें दर्शविण्यास वरील प्रमाण पुरेसें आहे.

'बोलन घाट' हा अफगाणिस्तानांतून येण्याचा मार्ग याच भागांत असल्यानें लष्करीदृष्ट्या महत्वाची नाकेबंदी तेथें आहे. प्रत्येक टेकडीवरील उच्च ठिकाणीं टेहळणीचें नाकें, पूल असल्यास तो बंद करण्यासाठीं लोखंडी दरवाजे व त्याचें संरक्षण करण्यासाठीं थोडीं लष्करी माणसें, तारांचें जाळें, गुप्त पोलिसांचा सुळसुळाट इत्यादि गोष्टीवरूनच आपण एका लष्करी छावणींत शिरलों ही जाणीव स्पष्ट होते. कलात हें जसें एक ब्रिटिशांच्या हातांतील स्वतंत्र संस्थान आहे, तसेंच पण बोलूनचालून संरक्षणाखालीं आलेलें दुसरें एक संस्थान आहे. त्याचें नांव लासबेला आणि तेथील अधिपास जामसाहेब म्हणतात.

**२३३. पूर्वोतिहास**:—ह्या दोनही राजघराण्यांपूर्वीं बलुचिस्तानांत हिंदु राजे राज्य करीत. सुमारें तीनशें वर्षांपूर्वीं कलातचें राज्य हिंदूंकडे होतें! नादिरशहानें हिंदुस्थानवर स्वारी केली त्याच सुमारास हिंदु राजास पदच्युत करून एका

पठाणी धनगरानें राज्य बळकावलें. तें त्याच्याच वंशांत चालत आहे. बलुचिस्तानांतील मुख्य भाषा ' ब्रहुई ' ही दाक्षिणेकडील तामीलशीं फार जमते. आणि ती द्रवीड भाषांपैकीं आहे असेंच तज्ज्ञ म्हणत आहेत. सिंधी. पंजाबी, फार्सी व भाषा " हिंदी-इराणी" (इंडो-इराणीयन) वर्गातल्या असतां मध्यंतरीच हे द्रवीड भाषेचें बेट कसें आलें याची कारणमीमांसा समाधानकारकरीत्या कोणासच देतां येत नाहीं. बलुचिस्तानचें पूर्वीचें नांव "बोलेदीस्तान" असें असावें. बोलेदि जात तेथें अजून आहे. आपल्या इच्छेविरुद्ध विश्वामित्र आपणांस मारहाण करून वसिष्ठाश्रमांतून घेऊन जातो, ह्या उन्मत्तपणामुळें संतप्त झालेल्या "सुरधेनु नंदिनी" नें " पुच्छापासुनि केलें प्रकट तिनें म्लेंच्छ यवन शबर शक" असें वर्णन आहे. त्यांतील " शक " लोक हे बलुचिस्तानांतील असें तज्ज्ञांचें मत आहे. " बेलू " म्हणून एक जुने अधिकारी अभ्यासी आहेत, ते म्हणतात की, " नाग " आणि " गरुड " अशा दोन प्रकारचे लोक हिंदुपुराणांत वर्णिलेले आहेत. त्यांपैकीं " गरुड " प्रचलितकालीं बलुचिस्तानांत बदललेल्या स्वरूपांत-म्हणजे धर्म, जात, धदा बदलून गेल्यामुळें अगदींच निराळ्या स्वरूपांत—अवशिष्ट आहेत.

खनिज संपत्ति या प्रांतांत विपुल आहे; पण रेल्वेच्या साधनाभावीं तिची भूगर्भांतून सुटका होणें कठीण झालें आहे. तरी कोळसा, क्रोमाइट हीं द्रव्यें सध्यां बाहेर पडत आहेत.

**सिंहाला शह** लावण्याचीं ' पटा'वरील हीं घरें नेहमीं सुरक्षित ठेवण्यासाठीं हिंदुस्थानसरकारची धडपड चालू असते.

---

# प्रकरण बारावें

# उपसंहार

**२३४. गतेतिहासाचें सिंहावलोकन** :—अफगाणिस्तानच्या अर्वाचीन इतिहासास प्रारंभ झाला, तेव्हांपासून काबूलच्या सिंहासनासाठीं कोणाकोणाची कशी धडपड होत होती, यशःश्री व राज्यःश्री यांनीं आपल्या चंचलत्वाचें प्रदर्शन करून किती स्वयंवरें मांडलीं आणि किती पार पडलीं हें पाहिल्यानंतर अँग्लो-अफगाण युद्धांची हकीकत आपण पाहिली. स्वदेशसेवक अमीर कोण होते व विलासलोलुप कोण होते तें आपल्या दृष्टीस पडलें. तरुण अफगाणांत जागृति कशी झाली व ती कोणी केली आणि विचार प्रवर्तकांच्या ' तुतारीच्या पडसादा 'नें स्वकार्यरत झालेल्या तरुण अफगाणांची कामगिरी काय होती हें आपणांस कळून आलें. अमीर अमानुल्लाची स्वातंत्र्यघोषणा, तिजमुळें चिडलेले ब्रिटिश मुत्सद्दी व तदनंतर अल्पावधींत झालेलें अल्पकालचें पण अत्यंत महत्त्वाचें तृतीय अँग्लो-अफगाण युद्ध इत्यादिकांचें सविस्तर विवेचन झालेंच आहे. अमानुल्लानें अफगाणराष्ट्र, आंतरराष्ट्रीय जगांत उच्च दर्जाचें ठरावें म्हणून उत्साहातिशयानें आणि सद्धेतूनें केलेले इष्ट व आवश्यक प्रयोग, त्यांचे बरेवाईट परिणाम, त्याच्या व सरदार तार्झी यांच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटलेल्या गोष्टी यांचेंही आपण निरीक्षण केलें. अमिराच्या युरोपसंचाराची महति कळण्यासाठीं त्याची देशवार हकीकत आपण पाहिली. पुढें अमानुल्ला अफगाणिस्तानांत परत येतांच त्यानें नवीन सुधारणा अंमलांत आणण्यासाठीं केलेली घिसाडघाई व त्यामुळें प्रक्षुब्ध झालेलें लोकमत यांचेंही विवेचन केलें. ह्या संधीचा फायदा 'व्रणार्त पशुच्या

शिरावरि वर्नी उभे काकसे ' अशा वृत्तीच्या लोकांनीं कसा सफाईनें व बेमालूम-रीत्या घेतला, आणि अमानुल्लास स्वदेशत्याग करावयास लाविलें, इत्यादि राज-कारणी आखाड्यांतील डावपेचांचे खेळही आपण पाहिले. औट घटकांचें साम्राज्य गाजविण्यासाठीं पुढें आलेल्या भिस्तीनंदनास नऊ महिने अमीरपद उपभोग-ण्यास मिळालें. नंतर ' खूप शर्तीनें राज्य राखिलें ' असें सर्वांमुखीं वदवून घेणाऱ्या राष्ट्रभक्तानें अफगाणिस्तानची भिस्तीग्रहणांतून सुटका केली. या सत्कृ-त्याचें व उत्कट देशप्रीतीचें फळ म्हणूनच कीं काय, अफगाणिस्तानच्या अमीर-पदाचा मान, त्याच्या इच्छेविरुद्ध, नादिरखानावर लादला गेला आणि खऱ्या वीराला साजेल अशा वृत्तीनेंच त्यानें तो स्वीकारला हेंही आपण पाहिलें.

अफगाणांच्या सामाजिक चालीरिती, त्यांची समाजस्थिती, त्यांचे आचार, त्यांचे विचार, आकांक्षा इत्यादिकांचीही जातांजातां आपण ओळख करून घेतली. तसेंच इतकें झाल्यावर हिंदुस्थानची वायव्य सीमासंरक्षणाचें काम किती बिकट आहे, याचें आपण थोडक्यांत परिशीलन केलें. आतां आपणांस थोडेसें भविष्य काळाकडे डोकावलें पाहिजे. मागील इतिहासाची माहिती व इतर आव-श्यक तीं साधनें उपलब्ध झाल्यानंतर पुढें दृष्टिक्षेप करणें क्रमाप्राप्तच होतें. शिवाय अफगाणिस्तान म्हणजे आमचा अगदीं निकटचा शेजारी. त्याजपासून आम्हांस पुष्कळ त्रास व उपद्रव गत कालांत पोहोंचला आहे, आजही लष्करी खर्चाच्या रूपानें तो जाणवत आहे. तेव्हां त्यासंबंधीं इतर देखील पुष्कळच बाबी आपल्या विचारकक्षेंत येतात. त्यांचा क्रमानुसार यथाशक्ति विचार करून हें लांबलेलें अफगाणपुराण आतां समाप्त करावयाचें आहे.

**२३५. अफगाणिस्तानसंबंधीं ब्रिटिश धोरणांतील फरक :—** " पूर्वीपासून आमचें अफगाण धोरण एकच आहे व तें आजमितीसही बदललें नाहीं. आम्हांस स्वतंत्र व शक्तिमान् अफगाणराष्ट्र शेजारीं ठेवून रशिया व ब्रिटन यांच्या लढ्यांत त्याचा बफरसारखा-धक्का जिरवणाऱ्या कमानीसारखा-उपयोग करावयाचा आहे, " असें ब्रिटिश लष्करी अधिकारी एकसारखें सांगत असतात.* परंतु त्या धोरणांत किती तरी फेरबदल झाल्याचें मागील वृत्तांता-वरून कोणाच्याही लक्षांत येईल. वास्तविक शुजा व झमान यांच्यासारख्या पदच्युत अमिरांना मोठी तैनात देऊन आश्रयाला ठेवून घेण्याचा हेतूच अफगाण

* *Cf.* " A. Vincent " : *The Defence of India*, pp. 47–48.

भानगडींत नसता चोंबडेपणा करण्यासाठीं होता हें स्पष्ट दिसतें. नंतर दोस्त महमद गादीवर आला असतां शुजाला छूः म्हणून सोडून देण्यांत किंवा नंतर पहिल्या अफगाणयुद्धाची कुरापत काढून वृद्ध शुजास ब्रिटिश तरवारींच्या जोरावर काबूलच्या अमीरपदावर बसविण्यांत इंग्रज राजकारस्थान्यांचा अफगाणिस्तान ' स्वतंत्र ' व ' शक्तिमान् ' ठेवण्याचा हेतु होता असें मानावयाचें असेल, तर प्रथमत: स्वतंत्र व शक्तिमान् या शब्दांचे अर्थ बदलून घेतले पाहिजेत. इतकें करून दोस्त महमदास हिंदुस्थानांत आणवून, त्याची बरदास्त राखून त्याला पेन्शनीनें बद्ध केलें तें कशासाठीं ?

अमीर शेरअलीच्या वेळींही तीच स्थिती. तो रशियाच्या भीतीनें घाबरून इंग्रजी सहाय्याची अपेक्षा करीत होता तेव्हां त्याला झिडकारून लावलें. त्याची अत्यंत आणीबाणीच्या वेळीं उपेक्षा केली. आणि त्यानें रशियाकडून मदत मिळवितांच ब्रिटिशांच्या डोक्याची तिडीक उठली, दुसरें ॲंग्लो-अफगाण युद्ध झालें, इंग्रजांचा मानभंग झाला, ब्रिटिश इभ्रत धुळीस मिळाली व नंतर ती अफगाण रुधिराभिषेकानें साफ झाली. नंतर येईल त्या अमिरास ब्रिटिशांनी मानलें. हिरात इराणी शहाच्या अमलांत जाऊं नये म्हणून कारस्थानें रचलीं आणि शेवटीं अबदुर रहमानला अमीरपद दिलें. याप्रमाणें एक सारख्या बदलणाऱ्या धोरणासंबंधीं लॉर्ड कर्झन सारखे ' वरवंटा ' बहाद्दर व्हाइसरॉय काय म्हणतात पहा :—

"...My own opinion is that the policy ( of the Home
" Government re: Afghanistan ) was neither well-
" judged, nor well-directed and that Lord Lytton's
" aspirations for a scientific frontier which was to be
" identical with the Hindukush were mistaken." *

याचा आशय असा कीं, " ब्रिटिश सरकारचें अफगाणिस्तानसंबंधींचें धोरण योग्य विचारांतीं ठरविलें नव्हतें; आणि तें योग्य रीतीनें अंमलांतही आणलें नाहीं. हिंदी सरहद्द लष्करी दृष्टीनें नैसर्गिक हिंदुकुश पर्वतापर्यंत नेऊन भिडविण्याच्या आकांक्षा चूक होत्या. "

याहीपेक्षां स्पष्ट शब्दांत वंगभंगार्थ चंग बांधलेले बडे लाट काय म्हणतात तें पाहण्यासारखें आहे. पहिल्या ॲंग्लो—अफगाण युद्धासंबंधीं उद्देशून त्यांचें लिखाण पहा:—

---

* Lord Curzon : *British Government in India*, Vol. II, p. 239.

" To us at this distance of time, it seems inconceivable
" that any man or body of men should have committed
" themselves to such an initial sequence of blunders,
" as disposition of Dost Mohammed, setting up Shah
" Shuja and posting a British Resident in Kabul; in-
" conceivable that such a display of incompetence and
" vascillation...... ; inconceivable also that at Calcutta
" a Governor-General and a Commander-in-Chief
" should have shown such consistent incapacity to
" grapple with the situation." *

( दोस्त महमदाला पदच्युत करणें, सुजाला तत्स्थानापन्न करणें, काबूल-मध्यें ब्रिटिश रेसिडेंट ठेवणें इत्यादि घोडचुकांची परंपरा एका किंवा अनेक माणसांच्या हातून कशी घडून आली हेंच आम्हांस आज आकलन करतां येत नाहीं. त्या प्रसंगीं दर्शविलेल्या कार्याक्षमतेचें व चंचल वृत्तीचेंहि आकलन करवत नाही. कलकत्ता येथील गव्हर्नरजनरल व सेनाध्यक्ष यांना देखील प्राप्त परिस्थितीस तोंड देण्याची योग्यता नसावी याची मला कल्पनाही करवत नाहीं. )

इतक्या थोर अधिकाऱ्यांनींच अफगाण धोरणाविषयीं आणि तें अंमलांत आणणाऱ्या साम्राज्यसरकारच्या सेवकांविषयीं मत दिलें आहे. तेव्हां यापेक्षां अधिक चर्चा पाहिजे कशाला ? रशियाच्या भीतीमुळें असें करणें न्याय्य अशी कोणीं समर्थनार्थ क्लृप्ति काढली, तर त्यालाहि **ड्यूक ऑफ अर्गायल,** हिंदुस्थानचे एक वेळचे स्टेट सेक्रेटरी यानी मोजक्या शब्दांत उत्तर देऊन ठेवलें आहे.

" ...On account of it ( Russian fear ) and this is perhaps
" the worst of all, we are now to see English Secretaries
" of State instructing the Viceroy of India *to practise*
" *deceit* in our dealings with a neighbour and to make
" ostensible demands upon him which are to cover a
" direct breach of faith......

" ...We have interfered with the independence of a
" people with whose independence we had no right to
" interfere, *whose independence moreover, it was above all*

---

* Lord Curzon: *British Government in India*, Vol. II, pp. 197-8.

" *things our interest to maintain.* The particular object of
" our interference had been as foolish as it was unjust.
" We had opposed ourselves to a brave and an able
" prince ( Dost Mohammed ) and we had sought to set
" up in his stead a man who was naturally weak and
" whom *we had induced to be a traitor to his country and*
" *to his race.**

(रशियाच्या भीतीमुळें स्टेट सेक्रेटरी हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयांना आपल्या शेजारच्या राष्ट्राशीं व्यवहार करतांना लबाडी करण्याचा कानमंत्र देऊन त्याला दिलेल्या वचनाविरुद्ध आचरण करण्यास व्हाइरॉयांना उद्युक्त करूं लागले.... ज्यांच्या स्वातंत्र्याशीं आपला कांहीं संबंध नव्हता, उलट त्यांचें स्वातंत्र्य कायम हेंच आपल्या हिताचें असतां, त्यांच्या स्वातंत्र्यांत आपण ढवळाढवळ केली. या लुडबुडीचा हेतु जितका अन्याय्य होता तितकाच तो मूर्खपणाचाही होता. ( दोस्त महमदासारख्या) एका शूर व कर्तबगार सरदाराला विरोध करून त्याचे ऐवजीं एक जात्याच दुबळा माणूस आम्ही उभा केला. तो कसा म्हणाल तर, आमच्या फुसलावर्णानें देशद्रोह करण्यास व स्वजनांचा घात करण्यासही उद्युक्त झालेला ! )

इतकी सर्व परिस्थिति असतांना अफगाणिस्तान स्वतंत्र व सामर्थ्यवान् ठेवण्याची आमची पहिल्यापासूनची इच्छा आहे ही बढाई वर मिरविली जातेच ! वर सविस्तर उद्धृत केलेलीं मतें इंग्रजांचीं–व्हाइसरॉय व स्टेटसेक्रेटरी अशा हुद्यांचीं कामें बजावणाऱ्या मुत्सद्यांचीं–आहेत म्हणून ठीक. असो.

अमीर अबदुर रहमान व हबीबुल्ला यांचे कारकीर्दींत सर्व राजकीय सूत्रें परकी इंग्रजांच्या हातीं राहून अफगाणिस्तान सामर्थवान् व स्वतंत्र कसें राहिलें हें एक त्या अफगाणांना ठाऊक किंवा बढाईखोरांना माहीत. पण इंग्रजांच्या अमदानीमुळें खरें स्वातंत्र्य व इंग्रजी राजकीय कोषांतलें स्वातंत्र्य यांतील तफावत अफगाणांना लवकरच दिसून आली; आणि स्वपराक्रमानें–पराक्रम गाजविण्याच्या केवळ तयारीनेंच–त्यांनीं अल्पकालच्या लढाईमुळें अफगाणराष्ट्र खरेंखुरें स्वतंत्र केलें; आणि अमानुल्लाच्या अंमलाखालीं ताज्ञींच्या धोरणानें तें सामर्थ्यवान् होण्याच्या मार्गाला लागलें.

---

* Duke of Argyll: *The Eastern Question*, Vol. II, pp. 219-21.

अमीर अमानुल्लाच्या कारकीर्दीत ' प्रथमग्रासे मक्षिकापात ' झाल्यामुळें इंग्रजांच्या धोरणास वेगळें वळण प्राप्त झालें. तदनंतर मात्र अफगाणिस्तान स्वतंत्र व सामर्थ्यवान् ठेवण्याच्या बढाईस साजेशी कृति, त्यांना (मोठ्या नाखुषीनें) करावी लागली. मग याबद्दल त्यांना श्रेय कितपत द्यावें हें वाचकांनींच ठरवावें! इतकें जरी होतें, तरी अमिरानें सदैव आपणांशीं सलगीनें रहावें, रशियाला जवळ करूं नये, अशी तीव्र इच्छा इंग्रज मुत्सद्यांची होतीच; आणि त्या इच्छेविरुद्ध वागल्या-बद्दल दीर्घ कालांतरानें कां होईना पण, सूडच उगविण्यांत आला ही गोष्ट संभव-नीय मानण्यास पुष्कळ सबळ कारणें आहेत.

**२३६. अफगाणिस्तानचें राजकीय भवितव्य —रशियन राज-कारणाचा जोर** :—आतां अफगाणिस्तानचें राजकीय भवितव्य व राजकीय संबंध यांसंबंधीं विचार केला पाहिजे. जनरल नादिरखान काबूलाधिपती झाला असून त्याला ब्रिटिश साम्राज्याचे वतीनें परराष्ट्रीय मंत्री मि. **हेंडर्सन्** यांनीं मान्यता दर्शवून ' नादिरशहा 'चें गौरवपर अभिनंदनही केलें आहे. **अर्ल क्रयू** यांनीं तर नादिरशहाच्या मनांत इंग्रजांविषयीं पुष्कळ आदर असल्याची स्वानुभवावरून ग्वाही देऊन अगोदर पासूनच गोंडा घोळण्यास प्रारंभ केला होता.

अमानुल्ला अफगाण अमीरपदावर टिकणार नाहीं, निदान त्यानें फार दिवस तेथें टिकूं नये, अशी ब्रिटिश राजकारणपटूंची इच्छा होती, हें ब्रिटिश वकील सर फ्रॅंसिस हंफ्रेज् यानें **लोवेल टॉमस** या अमेरिकन लेखकांजवळ काबूलमध्यें ( इ. स. १९२५ मध्यें ) काढलेल्या उद्गारावरून सिद्ध होतें. " अमानुल्लानें आपल्या प्रजाजनांवर जरी हुकमत चालविली, तरी त्यानें फारच बहादुरी केली असें म्हणतां येईल." $ हा हंफ्रेज्च्या म्हणण्याचा आशय काय दर्शवितो ? इंग्र-जांना अफगाणिस्तानमध्यें कोणीं तरी आपल्या तंत्रानें चालणारें बाहुलें पाहिजे आहे. मात्र तोंडानें व कागदोपत्रीं स्वतंत्र व सामर्थ्यवान् अफगाणाधिपती हिंदु-स्थानचा शेजारी असावा अशी मायावी भाषा त्यांजकडून उच्चारण्यांत येते.

रशियाच्या हातीं जाणारा अमीर, हिंदुस्थान संरक्षणाच्या दृष्टीनें इंग्रजांना अर्थातच नको आहे. तेथील रानटी लोकांना माणसाळून सुधारलेल्या जगाची ओळख करून देणें इष्ट असल्यानें त्यांच्यावर अंमल गाजविणारा परावलंबी असून चालणारच नाहीं. अबदुर रहमान जरी इंग्रजांच्या तंत्रानें चालत असे,

$ L. Thomas : *Beyond Khyber Pass*, p. 217.

तरी त्याचें सामर्थ्य अपूर्व होतें. म्हणूनच सर्व अफगाणिस्तानभर त्याचा कडक दरारा बसला आणि त्याला विरोध करणारे यशस्वी झाले नाहींत.

इंग्रजांचा साम्राज्यवाद एकीकडून अफगाणिस्तानवर डोळा ठेवून आहे, तर दुसरीकडून रशियाचा समाजसत्तावाद आपलें पाऊल हळूंहळूं अफगाणिस्तानांत कसें स्थिर होईल याची विवंचना करीत आहे. अस्वल-सिंहांच्या या झटापटींत वनराजाला विन्मुख फिरावें लागणार, इतकेंच नव्हे तर अस्वल यशस्वी होऊन 'प्राणांतक गुदगुल्या' करण्यासाठीं सिंहाजवळ येऊन ठेपणार, हेंही प्रचलित परिस्थितीवरून संभवनीय दिसतें. कारण ऑक्सस नदीपलीकडील सोव्हिएट अंमलाखाली लरशियनतुर्कस्तान व अलीकडील अफगाणतुर्कस्तान या दोन्ही प्रदेशांतलि लोक एकाच भाषेनें, समान आचारविचारांनीं, संस्कृतीनें व आर्थिक गरजांनीं देखील बद्ध आहेत. केवळ भौगोलिक दृष्टीनें—ऑक्सस नदीनें—मध्यंतरी 'अंतरपट' धरला आहे. इतकेंच नव्हे, तर ते दोन्ही प्रदेशांतील लोक एकच असल्यानें आपणावर सत्ता एकाच पद्धतीची असण्याविषयीं इच्छा त्या जनतेंत (आधींच उद्भूत झाली नसल्यास) उद्भूत झाली तर आश्चर्य नव्हे. कारण रशियन राज्यपद्धतीचे कांहीही गुणदोष असोत, (त्यांची छाननी करण्याचें प्रस्तुत स्थळ नव्हे) ती पद्धत बहुजनसमाजाला तत्काळ पटते, आवडते, रुचते, हें नाकबूल करतां येणार नाहीं. आणि अनुकरण हा तर मनुष्याचा धर्मच असल्यानें, विशेषतः आपल्या शेजाऱ्यांस—रशियन तुर्कांस—प्राप्त असलेलें 'सुख' (आपणांहून इतर सर्व सुखीच असतात असा मानसभ्रम आपणांस नेहमीं होतो) आपणांस मिळावें अशी अफगाण तुर्कांस इच्छा झाल्यास नवल नाहीं. याच दृष्टीनें रशियन मतांचा फैलाव अफगाणिस्तानच्या उत्तर भागांत—ऑक्ससच्या दक्षिणेकडे—होणें ही गोष्ट अगदीं साधी व निसर्गास धरूनच आहे. आणि ब्रिटिशांना अशा आक्रमणशील रशियाला दोन हात दूर ठेवावयाचें असेल, तर अर्थात्‌च अफगाणिस्तानांत स्वावलंबी, स्वतंत्र व सामर्थ्यवानच अमीर असणें त्यांच्या दृष्टीनें जरूर आहे. शक्तिमान् अमीर नसेल तर तो रशियाच्या तावडींत जाईल किंवा आपण होऊनच लोकांना मोह पाडणारी रशियन राज्य-व समाज-पद्धती स्वीकारण्यास उत्तेजन देईल.

वर उल्लेखिलेल्या तुर्कस्तानप्रमाणेंच उझबेगिस्तानची गोष्ट आहे. उझबेगिस्तानचें स्वतंत्र लोकशाही राज्य रशियाच्या राज्यसंघांत समाविष्ट आहे.

अफगाणिस्तानांत एकूण उझबेगी प्रजाजन २,३७,५०० आहेत असा तज्ज्ञांचा* अंदाज आहे. मातृभाषा, रीतरिवाज आणि भौगोलिक नातें ह्यांचा उपयोग एकी घडविण्यास होतो असा आजपर्यंतचा इतिहासाचा अनुभविक सिद्धांत आहे. त्यावरून पाहतां रशियाच्या अभिनव राज्याखालीं राहण्यासाठीं अफगाण उझबेग प्रवृत्त होतील यांत शंका नाहीं. त्या लोकांचे आचार, विचार, आणि निर्भेळ स्वातंत्र्याची तीव्र इच्छा या सर्वांच्या पूर्ततेसाठीं त्यांना रशियन अंमल श्रेयस्कर वाटेल आणि म्हणून ते केव्हां रशियन प्रजाजन होतील तें सांगतां येत नाहीं.

अशा परिस्थितींत (भर टाकण्यासाठींच ?) रशियानें 'ताजिकस्तान' स्वतंत्र करण्याचें ठरविलें आहे. त्यासंबंधीं त्या वेळीं रशियन वरिष्ठ सभांत झालेलीं भाषणें वाचलीं म्हणजे रशियाच्या चळवळीस यश कसें झपाट्यानें येत आहे तें कळून येईल. ताजिकस्तान आतांपर्यंत उझबेगिस्तानांतच एक अवलंबी घटक म्हणून समाविष्ट होतें. तें अतःपर स्वतंत्र राष्ट्र म्हणून रशियाच्या संयुक्त राष्ट्रसमुदायांत जाणार हो गोष्ट, हिंदुस्थानला हिंदी आकांक्षेप्रमाणें डोमिनियन स्टेटस मिळण्यापेक्षांही अधिक महत्त्वाची असल्यानें, ह्या नवीन राजकीय हेतुप्रदर्शनाचा परिणाम अफगाणिस्तानांतील जनतेवर होणार नाहीं अशी खात्री कोणीं द्यावी ? अफगाणिस्तानांत देखील ताजिक प्रजाजन आहेत. बाल्फोर यांच्या ज्ञानकोशांतील अंदाजानुसार अफगाणिस्तानांत ताजिकांची लोकसंख्या सुमारें पांच लक्ष आहे. मानवी अंतःकरणांतील अनुकरणाची अनिवार हौस आणि अज्ञानी जनतेंतील निर्भेळ स्वातंत्र्य-लालसा यांचा विचार केल्यास रशियाच्या ताजिकस्तानांत-ताजिकस्तानच्या स्वतंत्र राज्यांत—अफगाण ताजिक समाविष्ट होण्याची धडपड करतील हें सूर्यप्रकाशाइतकें उघड आहे.

**२३७. अफगाण धर्मवेड व धर्महीन बोल्शेव्हिझम् :—** रशियाचें राज्य तर धर्महीनांचें आहे. धर्माविरुद्ध मोहीम करणें हाच रशियाचा राष्ट्रधर्म, असें असतां मुल्लाधीन राहणारे धर्मभोळे व धर्मवेडे अफगाण प्रजाजन बोल्शेव्हिक मतांचा स्वीकार कसा करतील किंवा त्यांना रशियन अंमलाखालीं सौख्य कसें वाटेल, ही शंका संभवते. तिचें निराकरण करणें सोपें आहे. अफगाणांचें धर्मवेड हें धर्मपुस्तकांच्या विशेष अध्ययनानें आलें नाहीं अथवा त्या धर्मांतील मतें

---

* Balfour : *Cyclopædia of Asia.*

पटलीं आहेत म्हणून त्यांचा हट्ट आहे अशांतला मुळींच प्रकार नाहीं. मुस्लीमे-तरांनाही बहुतेक अफगाणांपेक्षां इस्लामी धर्माची अधिक ओळख असूं शकेल. नाममात्रेंच ते मुसलमानी धर्मानुयायी आहेत. त्यांनीं किंवा त्यांच्या मुल्लांनींही कुराणाचें पूर्ण अध्ययन केलें नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत घेतल्यास त्यांच्या धर्म-प्रेमाचें महत्त्व करण्यास सोपें जाईल. शिवाय 'कुराणांतही बोल्शेव्हिजम्' असल्याचीं हस्तपत्रकें (पृ. ८५ पहा) अफगाणिस्तानांत वाटलीं गेलीं आहेतच ! बोल्शेव्हिकांची मतप्रसाराची प्रचंड व कार्यक्षम व्यवस्था पाहूनच त्यांच्या यशाची खात्री वाटते. अफगाणांची 'जिरग्या'ची पद्धति व मुल्लांचे सर्व बाबतीत वर्चस्व या दोनच बाबी अशा आहेत की, त्यायोगानें सर्व अफगाण जनता वश करून घेण्यास फारसे आयास, धूर्त कारस्थान्यास पडणार नाहींत, आणि रशियांतील मुत्सद्दी अशा संधीचा व मनोवृत्तीचा फायदा घेण्यास पूर्णपणें समर्थ आहेत यांत तिलप्राय संदेह नाहीं. तेव्हां 'धर्मवेड' तात्पुरतें कायम ठेवून रशियांतील अधिकारी प्रथमत: अफगाण मुलुख आत्मसात करून घेतील व नंतर क्रमाक्रमानें आवश्यक त्या सुधारणा त्यांचेवर लादतील.

**२३८. अफगाणदृष्ट्या बोल्शेव्हिजमची इष्टानिष्टता** :—दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केल्यास अफगाणिस्तानचें हितही बोल्शेव्हिजम्चा स्वीकार करण्यांतच आहे असें दिसून येईल. रशियांशी संबद्ध असलेल्या उत्तर व पूर्व भागांत तरी बोल्शेव्हिक राज्यपद्धति येणें इष्ट आहे यांत शंका नाहीं. अफगाण प्रजाजनांची मनोवृत्तीच इतकी स्वैरसंचारी आहे कीं, शासनाधिकाऱ्यानें कोणताही कर मागितला, लुटालुटींत व्यत्यय आणला अथवा खून केल्याबद्दल शिक्षा दिली, तर तो त्यांना मोठा 'जुलूम' वाटतो. राजा असा असावा कीं, त्यानें आम्हांला कांहीं विचारूं नये, कसलाही कर आमचेकडून मागूं नये, हिंदुस्थानवर हल्ला करून किंवा दुसरीकडे कोठेंही आम्हांस नेऊन त्यानें 'लूट' मारण्याची संधि वारंवार आणून द्यावी, अशा अपेक्षा ज्या अफगाणांच्या मनांत आज पिढ्यान् पिढ्या चालत आलेल्या आहेत, त्यांचेवर सुलतानशाही अंमलच गाजला पाहिजे हें शासन-शास्त्राचा कोणीही अभ्यासी मान्य करील. अफगाणांनीं शांतता राखली तर ती, अमीर आपणा सर्वांच्या संघटित शक्तीपेक्षांही अधिक सामर्थ्यवान् आहे हें कळल्या-नंतरच. तेव्हां त्यांची सुधारणा करून त्यांना माणसांत आणणें हें काम विश्वबंधुत्वाच्या भावनेनें प्रेरित झालेली रशियन राज्यपद्धतीच करूं शकेल. इतर

साम्राज्यवादी किंवा तत्सम राज्यकर्ते, यांस त्यांचा वाटेल तसा उपयोग करून घेऊन शेवटीं अमेरिकेंत रेड इंडियनांना जसें नेस्तनाबूत केलें, त्याच सुधारलेल्या (?) उपायांनी आफगाणांना जगांतून नाहींसें करण्याचा मोह व्हावयाचा.

बोल्शेव्हिक अंमलाखाली प्रजेला सुख मिळतें हें उघड आहे. परराष्ट्रीय साम्राज्यवादी धोरणें संभाळावयाचीं नसल्यानें करांचा बोजा नागरिकांवर पडत नाहीं, सर्वत्र सुबत्ता होते आणि राज्यसंस्थेविरुद्ध चळवळ करणारे लोक नसतील तर त्यांना रशियन अधिकाऱ्यांकडून कसलाच त्रास पोहोंचणार नाहीं. शिवाय रशियाची हल्लींची शासनपद्धति एकतंत्री असली, तरी प्रजेला आपल्या हिताचें भरपूर माप मिळाल्यानंतर तिला कुरकुरण्यास जागा नाहीं. म्हणून लोकशाही असो वा सुलतानशाही असो, अडाणी जनता फक्त परिणामाकडेच लक्ष देत असल्यानें, कोणत्याही राज्यपद्धतीविरुद्ध अफगाणांची तक्रार राहणार नाहीं. दुसरें असें कीं, तत्त्वनिष्ठ रशियांतील अवतार हा लोकसेवेचें कंकण बांधूनच आशियांत पराक्रम गाजवीत असल्यानें, ( आशियांतील इतर राष्ट्रांना वश करून घेण्यासाठीं देखील ) रशियनांचा अंमल अनेक दृष्टींनीं हितावह व उन्नतिप्रद होईल यांत संशय नाहीं. अशा प्रकारें अफगाणांना गुंतवून ठेवल्यास त्यांना 'दाबांत ठेवल्यासारखें होऊन परिणामदृष्ट्या एकतंत्री सुलतानशाही किंवा सर्वतंत्री लोकशाही हीं समान ठरतील.

हल्लींचें ' धर्मवेड' अफगाणांत आहे त्यामुळें व त्यांच्या आंगच्या इतर 'सद्गुणां'मुळें हिंदुस्थानला विनाकारण मनस्वी उपद्रव सोसावा लागत आहे. लष्करी अवाढव्य खर्चाची बाब सोडून दिली, तरी लुटालूट, चोरी, दरोडे, खून, पाशवी अत्याचार इत्यादिकांचा प्रत्यक्ष त्रासही कमी नाहीं. तो कमी व्हावा, शक्य तर थांबवावा म्हणून हिंदी राष्ट्राच्या दृष्टीनें अफगाणिस्तानांत व यागिस्तानांतही बोल्शेव्हिक मतप्रसार होईल तर तो इष्ट आहे. हिंदु व इस्लामी या दोन्ही धर्मांचा विरोध आहे म्हणूनच असें म्हणावें लागतें असें नव्हे. हिंदुस्थानाऐवजीं अफगाणांचा शेजारी 'क्रिस्तीस्तान' असतां तरीही अशा उपद्रवापासून रक्षण करण्यासाठीं क्षणोक्षणाला क्रिस्तीस्तानांतील लोकांना आकाशांतील बापाची प्रार्थना करून ' या सैतानांच्या पोटांतील काळोख दूर कर ' अशी विनवणी करावी लागली असती. अखिल मानवजातीला कालिमा आणणारे हे ' सद्गुण ' यागिस्तानी प्रजेंत असल्यानें ज्या उपायानें ते नष्ट होतील तो शोधून काढला

पाहिजे. त्याला बोल्शेव्हिजम्सारखें दुसरें रामबाण औषध नाहीं असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे.

**२३९ हिंदुस्थान व बोल्शेव्हिजम्** :—अशानें हिंदुस्थानजवळ 'लाल-बावटा' येतो त्याची काय वाट, हा मोठा प्रश्न तत्काळ उद्भवतो. हिंदुस्थान सुरक्षित रहावें म्हणून शेजाऱ्यांना जें औषध दिलें, तेंच हिंदी जनता पिणार आणि मग त्या औषधाचा व्हावयाचा तोच परिणाम हिंदुस्थानवर होणार ...! अशा अनर्थ-परंपरेंत ज्यांचे ज्यांचे म्हणून हितसंबंध नष्ट होण्याचा संभव आहे, ते सर्व लोक ह्या वेळीं एक होतील आणि हिंदुस्थानांतील आपलें उत्पन्न अव्याहतपणें चालूं रहावें याच हेतूसाठीं अफगाणिस्तानांतही बोल्शेव्हिजमूला विरोध व्हावा, रशियाला पुढें पाऊल टाकण्यास अवसर मिळूं नये, अशी कारस्थानी खटपट त्यांची चालूं राहील. परंतु मनुष्यानें कितीही खटपट केली, तरी उत्क्रांतीची लाट—जुन्या लोकांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे कालाचा ओघ—अडवून धरणें त्याच्या शक्तीबाहेरचें आहे. **प्रे. विल्सन्** यांनीं स्वयंनिर्णयाचें तत्त्व काढून राष्ट्रसंघाची स्थापना केली, यामुळें कित्येक परतंत्र राष्ट्रांना स्वातंत्र्यसूर्योदयाची पहाट झाली असें वाटलें ! कित्येकांना आनंद झाला; किती तरी स्वदेशनिष्ठांनीं आपल्या देशांत शिरलेल्या आगंतुकांना हुसकावून लावण्याचा प्रयत्न केला. ह्या सर्व गोष्टींवरून हेंच दिसतें कीं, नव्या नव्या मोहक कल्पना, बिनतारी संदेशाप्रमाणें, हवेंतून पसरतात. त्यांना प्रतिबंध कोणाचा नसतो. अखिल मानवजातीला स्वयंनिर्णयाचा हक्क आहे असें घोषित करणारे प्रे. विल्सन् दुबळे ठरले हें खरें. पण त्याचें कारण, जें तत्त्व त्यांनीं प्रतिपादलें तें स्वतः त्यांनीं किंवा त्यांच्या स्नेह्यांनीं आचरणांत उतरविलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्या तत्त्वाविरुद्धच त्यांनीं आचरण केलें हेंच होय. परंतु रशियांतील तत्त्वनिष्ठा अशी तकलुपी, बेगडी किंवा नकली नाहीं. वेळोवेळीं राजनैतिक कारणांसाठीं त्यांनीं तत्त्वनिष्ठेंत किंचित् बदल केला असता, तरी तो स्वतत्त्वपुरस्कारार्थच केला ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. रशियांतील अंमल कांहीं दिवस सुलतानशाहीचा वाटेल, धर्मस्वातंत्र्य किंवा आचारविचारस्वातंत्र्य तेथें कांहीं काळपर्यंत असणार नाहीं हें खरें. परंतु 'हिरेजडित कनकपंजरीं' बसून भक्षणस्वातंत्र्य, पानस्वातंत्र्य किंवा भाषणस्वातंत्र्य मनसोक्त उपभोगण्यापेक्षां वनवृत्तीचीच किंमत अधिक ठरते हें शुकासारख्या गोटीएवढें डोकें असणाऱ्या 'सपक्ष' द्विजालाही कळतें. मग बुद्धिश्रेष्ठ मनुष्याला तें समजत नाहीं काय ?

त्याच कारणासाठीं रशियनांनीं पुढें ठेविलेल्या पण कित्येक महत्त्वाकांक्षी राज्य-कर्त्यांनीं चिंध्या करून टाकलेल्या किस्त्याबरहुकूम वळण, मध्य-आशियांतील राष्ट्रांचें निघणार. आणि अफगाणिस्तान व हिंदुस्थान त्याला अपवाद कसें ठरणार ? अफगाणिस्तानांत बोल्शेव्हिकांची मतप्रसाराची चळवळ इतकी तीव्र व जुनी आहे कीं, अद्याप तेथें रशियन मतें प्रस्थापित कां झालीं नाहींत याबद्दलच आश्चर्य वाटतें.

**२४०. इंडो-अफगाण बहिष्कार शक्य आहे काय ?**:—अफगाण-राष्ट्र संपूर्ण बोल्शेव्हिक झालें तरीही कडेकोट बंदोबस्त ठेवून दोन्ही शेजारी राष्ट्रांतील रहदारी थांबवून हिंदुस्थान 'रक्त' संपर्कापासून अलिप्त राखतां येईल अशी कोणास शक्यता दिसत असेल, तर तीही साफ चुकीची आहे. अफगाणिस्तान पूर्वी हिंदुस्थानचा एक घटक असो, किंवा तेथें हिंदु राजा राज्य करीत असो, आजच्या परिस्थितीत हिंदुस्थानांतल्या 'नळावर पाणी भरण्यास' अफगाणिस्तानला सदैव येत रहावें लागणार हें अगदीं उघड आहे. ह्या रूपकाचा अर्थ असा कीं, अफगाणिस्तानला हिंदुस्थानवर 'बहिष्कार' घालून चालणार नाहीं. तसेंच, ब्रिटिश सरहद्द ओलांडून कोणाही मनुष्यास हिंदुस्थानांतून अफगाणिस्तान-कडे किंवा तिकडून इकडे जाण्यायेण्याची आजिबात बंदी करतां येणें अशक्य आहे. ही रहदारी नष्ट होईल तर हिंदी व्यापारास मोठें नुकसान पोहोंचेल हें खरें. अशा रीतीनें इंडो-अफगाण बहिष्कारानें हिंदुस्थानचा आणि पर्यायानें इंग्लंडचा व्यापार बुडेल, म्हणून हिंदी सरकार आपण होऊन अफगाणिस्तानशीं व्यवहार होतां होईल तो बंद ठेवणार नाहीं. आणि अफगाणिस्तानलाही तसें करून चालणार नाहीं. आत्मनाशाचाच तो एक मार्ग होईल.

**२४१. हिंदुस्थानवर अफगाण स्वारी होईल काय ?**:—या ठिकाणीं आणखीही एका 'भीतीची' भीति नष्ट केली पाहिजे. अफगाणांना हिंदुस्थान पादाक्रांत करण्याची तीव्रतर इच्छा आहे. दिल्लीच्या सिंहासनावर काबुलच्या अमिरानें बसावें, अशी महत्त्वाकांक्षा अफगाण जनतेची आहे अशा आशयाचीं बरींच विधानें देशी व इंग्रजी वर्तमानपत्रांतून आणि अधिकृत ग्रंथ-लेखकांकडून केलेलीं वाचनांत येतात. वास्तविक महत्त्वाकांक्षेच्या दृष्टीनें विचार केला, तर त्यांत वावगें असें कांहींच नाहीं. म्हणजे सुप्तावस्थेंतून जागृत झालेल्या अफगाण राष्ट्राची, समीपस्थ प्रदेश आक्रमण करण्याची इच्छा-आकांक्षा-अगदींच

बालिश कोटींतील असल्यानें तिचा एवढा गाजावाजा करून घाबरून जाण्याचें कांहींच कारण नाहीं. अफगाणांच्या बलाबलाचें संपूर्ण विवेचन पांचव्या व सहाव्या प्रकरणांत दिलेंच आहे, त्यावरून त्यांची कुवत किती मर्यादित आहे हें कळून येतें. आणखीही एक बाब लक्षांत घेतली पाहिजे. ब्रिटिशसरकारच्या कृपाछत्राखालीं हिंदुस्थान जोंपर्यंत आहे तोंपर्यंत सूर्य कधींही न मावळणारें साम्राज्य हिंदी प्रजेच्या सुरक्षिततेची हमी घेत आहे. त्यांत प्रजाहितदक्षता नसून सर्वस्वी स्वार्थामुळेंच परचक्रापासून हिंदुस्थानचें संरक्षण करण्यांत येतें ही मख्खी असल्यानें अफगाणांच्या शाब्दिक महत्त्वाकांक्षेनें घाबरून जाण्याइतकी मानसिक दुर्बलता हिंदी जनतेनें दाखवावी हें कशाचें लक्षण ?

**२४२. अफगाणी सुधारणेचे मार्ग व अडचणीः**—अफगाणिस्तानांतील जनतेस 'रिकामे' ठेवल्यामुळेंच तेथील राजासन नेहमीं डळमळीत असतें. लोकांना जमिनीचें उत्पन्न वर्षभर पोटभर पुरेल इतकें नसतें. व्यापार व उद्योगधंदे यांची व्हावी तितकी वाढ झाली नसल्यानें रिकामपणांतच त्यांचा वेळ फार जातो. मग इतर सर्व गुणांनीं युक्त असलेल्या अफगाणांना रिकामपणीं रानटी अत्याचाराचे विचार सुचत असले तर त्यांत नवल कसलें ? 'रिकामें मन म्हणजे सैतानाचा स्वैरसंचार' अशा अर्थाची इंग्रजी म्हण तर प्रसिद्धच आहे. तेव्हां अफगाणिस्तानांत प्रथमतः कशाची आवश्यकता असेल तर ती रिकामटेकड्या लोकांना नेहमीं कामांत व्यग्र ठेवण्याची. मग खाष्ट सासूबाई राजगिरा व वरी मिसळून निवडण्यासाठीं सुनेला देतात तशापैकींही कांहीं काम त्यांस दिलें तरी चालेल. पण त्यापासून पोटापुरतें तरी उत्पादन व्हावयास पाहिजे ही आवश्यक बाब आहे.

रेल्वे, सडका, कनाल, खाणी इत्यादिकांचा प्रसार जितका जास्त प्रमाणांत अफगाणिस्तानांत होईल तितक्या अधिक प्रमाणांत अफगाण जनता जगांतील सुधारलेल्या राष्ट्राच्या तोडीस येऊन बसेल. शाळांचा प्रसार झाल्यास--आणि तो होणार यांत संशय नाहीं--अफगाणांना आपले दोष कळून येतील व शांततामय आयुःक्रमाकडे त्यांचें लक्ष वेधलें जाईल.

रेल्वे, सडका, खाणी, पाटबंधारे ......हे शब्द उच्चारण्यास सोपे आहेत, पण अफगाणिस्तानांत ह्या बाबी साध्य व्हाव्या कशा हाच प्रश्न आहे. अफगाणिस्तानांतील राजकीय स्थैर्याकडे लक्ष देतां तेथें भांडवल गुंतविण्यास जबर व्याज

देऊं केलें असतांही कोणी इंग्रज अथवा इतर परके हावरे 'शायलॉक्' जातील असें वाटत नाही. शिवाय परकीयांनी भांडवल गुंतविल्यानंतरही त्यावर प्रथमतःची २०-३० वर्षे तरी कांहीं व्याज सुटेल--नफ्याची गोष्ट तर दूरच-अशी कल्पनाही करवत नाही. मग या गोष्टी साध्य व्हाव्या कशा ?

रेल्वेसंबंधीं तर दुसरीही एक महत्त्वाची अडचण आहे. 'अफगाणिस्तानांत रेल्वे' याचा अर्थ लष्करी तज्ज्ञ असा करणार कीं, ब्रिटिशसाम्राज्याची इमारत उडवून देण्यासाठीं टपून बसलेल्यांस अगदीं देवडीपाशीं आणून सोडणारा मार्गच उपलब्ध झाला. "**वणिक्पथः परातिसंधानस्य योनिः**"* असें व्यापारी दळणवळणाच्या मार्गाचें वर्णन प्राचीनकालचेंही आहे. म्हणून अफगाणिस्तानांत रेल्वे झालीच तर ती सर्वस्वीं आपल्या हातीं असावी अशी इच्छा ब्रिटिशांची असल्यास साम्राज्यसंरक्षणाच्या दृष्टीनें ती साहजिकच आहे.

परंतु अशी इंग्रज हुकमतीखालील रेल्वे तेथें व्हावी म्हणून खटपट करण्यास किंवा तींत भांडवल घालण्यास कोण तयार होईल ? इंग्रजांना होतां होईल तों दोन हात दूर ठेवण्याची इच्छा अफगाण अमिरांची आजकालची नाहीं. बरें, इंग्रज भांडवलवाल्यांकडून द्रव्य घ्यावयाचें नाहीं म्हटलें कीं, अफगाण अमिराला अन्यत्र कोठून तरी कर्ज काढलें पाहिजे. कारण अफगाणिस्तानांतच रेल्वेसाठीं किंवा अन्य कार्यासाठीं लागणारें भांडवल मिळेल अशी अपेक्षा फोल ठरले. फ्रान्सकडे हल्लीच्या अमिराचा—नादिरशहाचा ओढा विशेष दिसून येतो आणि त्याप्रमाणें फ्रेंचसरकारकडून कर्जाची मागणी त्यानें केली असल्याची वदंता आहे. अर्थात् त्या राजकीय स्थैर्याभावाच्या कारणास्तव इंग्लंड अफगाणिस्तानांत पैसे गुंतविण्यास भितें तेंच कारण फ्रेंच्यांच्या बाबतींत लागू असलें तरी ब्रिटिशांच्या वाढत्या साम्राज्याला आळा घालण्याची इच्छा फ्रान्सला असल्यानें हिंदुस्थानच्या प्रवेशद्वारावर सवलती मिळविण्याची ( व शक्य तर नाकें हातीं घेण्याची ) ही संधि फ्रान्स सहसा गमावणार नाही. शेवटीं रशिया तर अफगाणिस्तानास मदत करण्यास केव्हांही तयार आहेच. त्यांचेजवळ अशा लोकोपयोगी कार्यासाठीं लागणारें द्रव्य भरपूर आहे व अफगाणांच्या उन्नतीप्रीत्यर्थ रशिया तें आनंदानें खर्च करील.

---

* "व्यापारी रस्ते शत्रूवर सरशी करण्यास उपयोगी पडतात."
कौटिलीयमर्थशास्त्रम्, उत्तरार्ध, ७-११२ ( **करंदीकरकृत** भाषांतर ).

जी बाब रेल्वेची तीच सडकांची व कालव्यांची. सडकांप्रमाणें कालव्यापासून अर्थात् हिंदुस्थानला लष्करी दृष्टया कोठलीही भीति नाहीं हें खरें, तरी पण त्या साठींच लागणारें भांडवल आणावें कोठून हा प्रश्न राहतोच. खाणी चालू करण्या-सही तीच अडचण आहे. आणि अफगाणिस्तान स्वावलंबी झाल्याशिवाय या सर्व प्रश्नांची कायमची विल्हेवाट यथायोग्य रीत्या लागणार नाहीं. एवढें मात्र खास की, अफगाणिस्तानचा तरणोपाय, तो देश सुधारण्याची आशा आणि त्याचा भाग्यकाल, याच साधनांत आहे. फर्मानें किंवा पोकळ सद्धेतूनें प्रेरित झालेले अमीर त्या दिशेनें कांहीं कार्य करूं शकणार नाहींत. जो तो देश आपापल्या परीनें स्वाव-लंबी असावा व त्या देशांतील लोकांना नित्याच्या गरजांसाठीं शेजारच्या संपन्न नागरिकांना लुबाडण्याची इच्छा होऊं नये, अशी व्यवस्था असावी म्हणून, अफ-गाणिस्तानांत सडका, पाटबंधारे व घरगुती उद्योगधंदे इत्यादिकांचा प्रसार झालाच पाहिजे. मग त्यासाठीं लागणारें तात्पुरतें भांडवलरूपी सहाय्य इंग्लंडकडून येवो, फ्रान्सकडून येवो अथवा रशिया आपण होऊन तें पुढें करो किंवा आणखी कोणी चवथा उपटसुंभ अफगाणांच्या कल्याणार्थ पुढें सरसावो.

**२४३. अफगाणांस इष्ट राज्यपद्धति** :—अफगाणिस्तानमध्यें राज्य-पद्धति कोणत्या प्रकारची रूढ होण्यासारखी आहे किंवा आधुनिक प्रकारची लोक-शाही तेथें प्रस्थापित झाल्यास त्या देशाची विशेष प्रगति कांहीं होईल कीं नाहीं या दोन प्रश्नांचा विचार करणें क्रमप्राप्त आहे. अफगाणांच्या मुख्य अडचणी आहेत त्या वर सांगितल्याच. त्यांच्या जमिनीतून वा अन्य रीतीनें पोट भरण्या-इतकें उत्पादन होत नाहीं व व्यापाराच्या सोयी नसल्यानें उद्योगधंदा वाढत नाहीं. यामुळें त्यांना रिकामपण फार मिळतें. तेव्हां राज्यपद्धति कोणतीही असो, या तीन अडचणी नाहींशा करण्याच्या राज्यसंस्थेची तेथें आवश्यकता आहे. नैस-र्गिक रीत्या सामर्थ्यवानापुढें मात्र डोकें नमवावयाचें हीच त्यांची आजपर्यंतची रीत आहे. त्यांच्या जवळून करभार घेणें म्हणजे त्यांच्या स्वातंत्र्यावर घाला घालणें होय अशी त्यांची समजूत आहे. असें जुलमी कृत्य करणारा राजा त्यांना अर्थातूच नकोसा वाटतो. म्हणून अफगाणांना बरींच वर्षेपर्यंत तरी एकतंत्री अंमल राखणारी सत्ता पाहिजे. लोकशाहीची तेथें वाढ होणार नाहीं असें मात्र नव्हे. जिरग्याची पद्धत त्यांच्या समाजांत आपल्याकडील ग्रामपंचायतीप्रमाणेंच खेडो-खेडीं रूढ असल्यानें सार्वजनिक प्रश्नांचा निवाडा सर्वांनीं मिळून करण्याचें

त्यांना थोडेसें शिक्षण मिळालेलें आहे. रशियन पद्धतीप्रमाणें सर्वच जबाबदारी जरी अफगाणांवर पडली, तरी कोणत्याही प्रकारें इतर शेजारच्या देशांना संकटांत आणण्यासारखीं कृत्यें त्यांचेकडून होणार नाहींत असा तर्क करण्यास जागा आहे. एखाद्या सामर्थ्यशाली अमिराच्या हातीं—तो अबदुर रहमानसारखा असल्यास—अफगाणिस्तान तीन पिढ्या एकसारखें जाईल तर त्यांत पुष्कळच सुधारणा घडून येतील. परंतु मानवी सृष्टींत अडचण असते ती हीच कीं, एकासारखा त्याच्या मागचा दुसरा राजा नसतो. पराक्रमी व शूर अमिराचा मुलगा दुर्बळ निघतो. त्याला उडवून देणारा तिसराच बंडखोर येतो. पुनः त्या उपटसुंभाला हुसकावून लावणारा कोणी तरी येतो आणि व्यक्ती बदलतात त्याप्रमाणें त्यांचीं धोरणें, देशोन्नतीच्या कल्पना, ध्येय गांठण्याचे मार्ग, हीं सर्व भिन्नभिन्न होतात आणि भरीव एकसूत्री काम कोणाकडूनही होत नाहीं. एकानें बांधलेली इमारत जमीन-दोस्त करून पुनः पहिल्यापासून प्रारंभ करण्याचीही आवश्यकता कधीं कधीं भासते. आणि असें झाल्यानें राष्ट्रकार्याची किती तरी हानि होते !

**२४४. हिंदुस्थानांत अफगाणमार्गें येणारी नवीन विचारांची लाट** :—अफगाणिस्तानला हिंदी राष्ट्राशीं दुजाभाव ठेवून कदापिही चालावयाचें नाहीं. हिंदुस्थान हें अफगाणिस्तानचें मोठें गिऱ्हाइक तर आहेच आहे, पण इतर अनेक बाबतींतही हिंदुस्थानवरच अफगाणिस्तानास अवलंबून राहिलें पाहिजे.

आतां अफगाणिस्ताननें 'धर्मांतर' केलें—रशियन पंथ स्वीकारला-तर, हिंदुस्थान काय करील ? बोल्शेव्हिजमला दूर राखण्यासाठीं हिंदुस्थाननें अफगाणि-स्तानशीं अजीबात संबंध तोडल्यास तो हेतु सफल तर होणार नाहींच; पण आणखी अफगाणिस्तानचा हिंदुस्थानशीं असलेला व्यापार मात्र बुडेल. तत्त्वांचा प्रसार हा भौगोलिक बंधनें न जुमानतां वायुरूपानें मनसोक्त संचार करतो. त्याचा प्रसार होऊं नये म्हणून जितक्या जोराची व कडक बंदोबस्ताची योजना करावी तितक्याच जोरानें तो फोंफावत जातो.

रशियांतील तत्त्वज्ञान मग-तें अनिष्ट ठरो वा आवश्यक ठरो—आशियांत फैलावून लवकरच हिंदुस्थानांत येणार व तें अफगाणिस्तानमार्गेंच येणार हें भविष्य वर्तविण्यास कोणा फलज्योतिष्याची आवश्यकता नाहीं. रशियांतल्या राज्यपद्धतीमुळें एकदम हिंदुस्थानचें नंदनवन होईल असा त्या तत्त्वनिष्ठेवर विश्वास असणारांचा दृढ भरंवसा असला, तरी तो उत्साहातिरेकामुळेंच असावा असें म्हणतां येतें. तसेंच ती पद्धति

हिंदुस्थानांत प्रचलित झाल्यावर सर्व समाजरचनेची इमारत कोसळेल, प्राचीन परंपरेचा डोलारा एकदम थंड होईल, सर्वत्र गोंधळ माजेल, इत्यादि दुसऱ्या टोंकास जाणाऱ्यांच्या भीतिग्रस्त कल्पना याही अतिशयोक्तीच्याच म्हणतां येतील. हिंदुसंस्कृति सहस्रावधी वर्षें टिकली एवढ्यांतच तिचें वैशिष्ट्य आहे असें समजून अभिमान मानावयाचा असेल, तर आणखीही एका नव्या माऱ्यापुढें तिचा टिकाव लागेल, अशी आशा करीतच किंवा 'दैवावर सांकडें' घालून कित्येक भक्त वसतील. देवाची इच्छाच असेल तर हिंदु तत्त्वज्ञानाचा विजय होईल. तरी सुद्धां चालू परिस्थितींत निःसंशय बदल होईल. उलट पक्षीं, हिंदु तत्त्वज्ञानाचा विजय झाला नाहीं,तर जीर्ण झालेलें वस्त्र टाकून देतात त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील लोक आपलें जुनें पुराणें तत्त्वज्ञान सोडून नव्या तत्त्वांची कास धरतील. कांहींही झालें तरी प्रचलित समाजांतील शैथिल्य, निष्काळजीपणा जाऊन कांहींतरी 'नवें' त्या ठिकाणीं येईल, म्हणूनच हा बदल हवासा वाटतो. सध्यां सर्वच बाजूंनीं तुंबलेलें हें पाणी हालचाल करीत नाहीं म्हणून चोहोंकडेच एकदां खळबळ उडेल तर बरें, असें वाटावयास लागतें.

राजकीय दृष्टीनें पाहिलें तरीसुद्धां असेंच वाटतें की, जी एक प्रचलित ठराविक पद्धत आज कित्येक वर्षे आंगीं मुरली ती कसेंही करून बदलून टाकावी! प्रगति अथवा अधोगति व्हावयाची असेल ती त्वरेनें होऊं द्या, हें मुंगीच्या पावलानें हलणारें, बदलणारें, जगच्चक्र अत्यंत कंटाळवाणें वाटूं लागलें आहे. त्यानें मळमळूं लागतें, कशांतच राम दिसत नाहीं. जों जों विचार करावा तों तों आपल्या दौर्बल्याचीच जाणीव होते. मूर्खपणानें व अज्ञानानें आम्ही संतुष्ट राहून घरापलीकडे दृष्टि फेंकली नाहीं, श्वेतसर्पांना आमच्याच घरीं आमच्या पोटावर पाय आणून वाढूं दिलें, आतां त्यांचा विषदंश सारखा भोंवतो आहे, ह्या विचित्र वातावरणांतून सदैव वावरल्यामुळें येईल ती परिस्थिति येऊं द्या, त्यामुळें आम्हांस फेरबदलीचा आनंदच होईल, मागलीं भांडणें त्या निमित्तानें तरी विसरतां येतील, ह्या विचारसरणीच्या अनुरोधानें जाणारे लोक सध्यां शिक्षितांमध्यें अधिक असल्यानें नव्या मतांचा फैलाव त्वरेनें होणार यांत शंका नाहीं. **'पुराणमित्येव च साधु सर्वम्'** म्हणून नुसतें प्राचीन वैभवांचे गोडवे गाणारे जे थोडेसे ( शारीरिक व मानसिक ) वृद्ध आहेत, त्यांच्या विरोधाकडे, 'आंतड्याच्या पिळाकडे' किंवा एखाद्या परंपरेच्या ज्वलज्जहाल अभिमानाकडे दुर्लक्ष करावें लागेल, आणि तें केलें पाहिजे. कांहीं जणांच्या मानसिक भावना दुखविल्या जाणार एवढ्याचसाठीं 'काळाचा

अखंड ओघ' थांबूं शकत नाहीं, किंवा उत्क्रांतीची एखादी लाट थोपवून ठेवणें हें 'मानवी' शक्तीच्या आवाक्यांतही नसतें.

एकूण असें दिसतें कीं, अफगाणिस्तानच्या दिशेकडूनच **सिंहास शहाची** भीति आहे. तिकडूनच हिंदुस्थानवर हल्ले पूर्वी जसे होत गेले तसेच अतःपरही होणार ! मात्र या हल्ल्याचें स्वरूप पूर्वीच्याहून इतकें भिन्न आहे कीं, खैबर रेल्वे, विमानांचा तांडा किंवा रात्रंदिवस जय्यत ठेवलेलें लष्कर त्याचा प्रतिकार करण्यास उपयोगी पडणार नाहीं. उलट जितका विरोध नव्या 'लाल' तत्त्वज्ञानाविरुद्ध दाखवावा तितकी जोराची चळवळ तें आत्मसात् करण्याकडेच होणार.

२४७. **ब्रिटिशांचें स्वार्थी सीमाप्रांतीय धोरण** :—रशियन तत्त्वज्ञानाचा फैलाव प्रथम अफगाणिस्तानांत व तेथून पुढें हिंदुस्थानांत होण्याची शक्याशक्यता पाहिल्यानंतर आतां हिंदुस्थानसरकारचें पुढें काय होणार हेंही पाहिलें पाहिजे. बोल्शेव्हिकांचें तत्त्व हिंदी प्रजेला पटलें, तरी त्यामुळें व्हावयाचा तो परिणाम एक दोन पिढ्यांत घडून येईल असें विधान करण्यासाठीं आवश्यक असलेली तयारी हिंदी जनतेची आजमितीस झालेली नाहीं. कदाचित् प्रसंग पडलाच तर १०-१२ वर्षांत देखील ती होऊं शकेल. पण तावत्कालपर्यंत तरी आमचे हितसंबंध ब्रिटिश सरकारशींच संबद्ध राहाणार हें खास ! त्यांच्या धोरणाचा हिंदुस्थानच्या व अफगाणिस्तानच्या हिताहितावर काय परिणाम होणार हा विचारार्ह प्रश्न आहे.

हिंदुस्थानांतील लोकांना ( कौंसिलांतील सभासदांना ) अफगाणिस्तानकडून स्वारी होईल अशी भीति सदैव दाखवीत राहून "लष्करी" व्यवस्थेसाठीं कोट्यावधी रुपये दरसाल खर्च करावयाचे ही ब्रिटिश राज्यव्यवस्था कांहीं वर्षे चालली तरी, ती चिरकालची नव्हे. अफगाणिस्तानकडून हल्ला येईल ही भीति अगदीं पोकळ तर आहेच, पण ती अत्यंत भ्याडपणाची ठरून तिजवर विश्वास ठेवणारास युद्धशास्त्राचा 'ओनामा' ही ठाऊक नाहीं असें म्हणावें लागेल. खैबरघाट, बोलनघाट, कुरममार्ग, कोठूनही घ्या, हल्ला यावयाचा म्हटलें तर, अफगाणिस्तानची ( किंवा त्यांना उठविणाऱ्या तिसऱ्याच एका राष्ट्राची) आपल्या चढाईच्या सैन्यास रसद, दारूगोळा पुरविण्याची काय व्यवस्था आहे ? हिंदुस्थानवर हल्ला करणें ही गोष्ट साधी नाहीं. लढाईच्या वेळीं लागणाऱ्या पुरवठ्याची व्यवस्थित योजना नाहीं हें कळत असून देखील कोणी शत्रूनें खैबरघाटाच्या तोंडीं लष्करी पलटणी

जमविण्याचा प्रयत्न केला तर त्याचा प्रतिकार करणें अल्पायासाचें काम होईल हें उघड आहे. परंतु ब्रिटिश लष्करी तज्ज्ञ नेहमीं अफगाणबाजूकडून हल्ला येईल असा बागुलबोवा हिंदी जनतेस दाखवीत आहेत. पुरोगामी धोरणानिमित्त यागिस्तानांत ओतावा लागणारा पैसा, टोळ्यांना द्यावी लागणारी जबर खंडणी आणि महागडीं व चैनी गोरीं बाळें आणून सरहद्दसंरक्षणाचें काम करावयाचें ठरविल्यानें होणारा अजस्र खर्च इत्यादिकांचा विचार सध्यां होत नाहीं, याचें कारण हेंच कीं, हिंदी प्रजेचा हिंदी तिजोरीवर ताबा नाहीं. इंग्लंडसारखी जबाबदार राज्यपद्धती येथें असती तर, ब्रिटिश (त्या वेळीं सल्लागार म्हणूनच ते हिंदुस्थानांत राहिले असते) लष्करी अधिकाऱ्यांनीं सध्यां चालू आहे. अशीच योजना सुचविली असती काय, ह्या प्रश्नाचें उत्तर अर्थातच नकारात्मक आहे.

सध्यांच्या सीमाप्रांतीय धोरणाचा दुसरा पण अधिक महत्त्वाचा मुद्दा असा आहे कीं, यागिस्तानमधील रानटी लोक अफगाण अमिराशीं किंवा स्वतंत्र हिंदुस्थानच्या ‘अध्यक्षां’शीं नेहमीं विरोधी वृत्तीनेंच रहावें अशी व्यवस्था प्रचलित धोरणामुळें ब्रिटिशांनीं करून ठेविली आहे. हिंदी तिजोरींतील पैशाचें “बक्षिस” यागिस्तानमधील रानटी टोळयांना मिळतें; त्यांना हिंदी मुलखांत येऊन पठाणी अत्याचार व जुलूम करावयास मिळतात व इतरही अनेक फायदे सरहद्दीवर मिळतात. हे सर्व लाड स्वतंत्र हिंदुस्थानची राज्यसंस्था चालू ठेवूं शकणार नाहीं. उलट त्यांना पायबंद घातल्यामुळें किंचित् कठोरपणाही नव्या राजवटींतील हिंदी अधिकाऱ्यांच्या पदरीं येणार. याचा दुसरा काय परिणाम होणार? आम्हांला ब्रिटिशच शेजारीं पाहिजेत, स्वतंत्र हिंदी राष्ट्र नको, अशी ओरड त्या रानटी टोळ्यांची होणार आणि एकसारखा उपद्रव त्या देत राहणार. अफगाण अमिराविरुद्ध देखील अशाच प्रकारची तक्रार यागिस्तानी प्रजा किंवा ड्युरांड लाइनच्या आसपासचे लोक करतील. अशा संकटांना किंवा अडचणींना भिऊन चालणार नाहीं हें खरें असलें, तरी ब्रिटिश कारस्थान्यांची परस्पर हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवून, दान दिल्याचें पुण्य आपणांकडे घेण्याची ही वृत्ति, राज्यकारभाराच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. असो.

हिंदुस्थानवर अफगाणिस्तानकडून हल्ला होण्याची लष्करी शक्यता अलीकडे सुधारलेल्या काळांत तर मुळींच राहिली नाहीं. केवळ एक दोन टेहळणीच्या विमानांनींच खैबर घाटावर पहारा ठेवतां येईल इतकी प्रगति युद्धोपयोगी साधनसामग्रींत

आतां झाली आहे. तरी पण सरहद्दीवर नेहमींच जय्यत फौज ठेविली पाहिजे, त्यांची बरदास्त उत्तम प्रकारें ठेवून त्यांच्या मनोवृत्ति सदैव संतुष्ट राखल्या पाहिजेत, इत्यादि बाबी लष्करी कार्यक्षमतेच्या दृष्टीनें आवश्यक आहेत, याबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं. फक्त प्रश्न इतकाच, कीं तेथील कामकाजासाठीं निवळ 'गोरीच' पलटण पाहिजे कीं काय ? प्रत्यक्ष अनुभवावरून असें दिसतें कीं, हिंदुस्थानांतल्या व हिंदुस्थानबाहेरच्या सर्व भागांवर हिंदी पलटणी जाऊन आल्या आहेत. त्यांनीं तेथें काम उत्कृष्टपणें केलें आहे.

लष्करी खर्चाचा मुख्य भाग वायव्यसीमेवरच खर्च होतो याचें कारण सैन्याचीं ठाणीं त्याच भागांत विशेष आहेत हें होय. 'पोलिटिकल' (राजकीय) खात्यांतूनही वायव्यसीमाप्रांतावर दरवर्षी सुमारें एक कोट रुपये खर्च होतात, त्याचा तपशील दिला जात नाहीं व देणें 'इष्टही ' नसेल ! सरकारी पुस्तकांत राजकीय खर्च ( २९, २९ अ ) अशीं जीं सदरें आहेत त्यांतील खर्च लाख रुपयांत खालीं दिला आहे. ‡

| वर्षे | खर्च लक्ष रु. |
|---|---|
| १९२३-२४ | १३०-५ |
| २४-२५ | १३२-१ |
| २५-२६ | १३५-४ |

यानंतरचे आंकडे सरकारी अंदाज पत्रकांतून घेतले आहेत. §

| | |
|---|---|
| १९२६–२७ | ३३१ लक्ष रुपये |
| २७–२८ | ३९५ ,, ,, |
| २८–२९ | ३९९ ,, ,, |

हा खर्च वाढला किंवा ती रक्कम कशी खर्च झाली असें विचारण्याचा अधिकार नसल्यानें असाहाय्यतेचे उद्गार काढण्यापेक्षां आपण अधिक तें काय करणार ?

‡ Finance & Revenue Accounts of the Government of India.
२९ ( अ ) हें खातें अलीकडेच उघडलें आहे. ' फ्रॉंटियर वॉच अँड वॉर्ड ' ( सरहद्दीचा पाहरा व संरक्षण ) साठीं हा खर्च लागतो. म्हणजे लष्करी खर्च वेगळा, राजकीय निराळा आणि सरहद्द संरक्षणाचाही पण वेगळा. राजकीय खात्याच्या अवाढव्य ' अक्कलकोटां 'त सरहद्दीच्या संरक्षणाचा समावेश कसा झाला, लष्करी खात्यांत तें कां समाविष्ट होऊं शकलें नाहीं याचा विचार वाचकांनींच करावा.

§ East India (Budget) 1928–29 Part II P. 72–73.

आखेरीज राजनैतिक कारणासाठीं याकुबखान व अयुबखान यांच्या पोरां-बाळांचें लटांबर हिंदुस्थानसरकार आज किती तरी वर्षें पोसत आलें आहे तो खर्च निराळाच. दरसाल या माजी आमिरांच्या पोरांनिमित्त निदान अडीच लाख रुपये आतिथ्यांत खर्च होतात. स्पेशल 'पोलिटिकल' खर्च म्हणून मधून मधून लक्षावधि रुपये खर्च होतात त्यांची गणना केली नाहीं. १९२७-२८ सालांत स्पेशल पोलिटिकल खर्च रु. १०,६३,६१७ असा दर्शविला आहे!

ही द्रव्याची नासाडी थांबलीच पाहिजे आणि त्यासाठीं तरी निदान प्रचलित राज्यपद्धति बदलून दुसरी कोणती कां येईना—झारशाही असो, मुसोलि-नीची सुलतानशाही असो किंवा रशिर्शातील लोकशाही असो—नवीन व्यवस्था यावी असें सर्वांस वाटतें. अर्थात् नवीन कोणतीही शाही आली तरी तिनें **सिंहास शह** बसणार यांत शंका नाहीं.

'सिंहा'नें समान दर्जाच्या दुसऱ्या सिंहाशींच सामना द्यावा; कारण आपल्याहून कमी प्रतीच्या प्रतिपक्षीयांशीं दोन हात करण्यासाठीं आखाड्यांत उतरणें हें देखील वनराजाच्या मृगेंद्रतेस शोभत नाहीं. मग आशियांतील एका 'क्षुल्लक' राष्ट्राकडून, प्राचीन संस्कृति नसलेल्या अर्ध रानटी जनतेकरवीं आपणांस शह लावून घेण्याचा वेडेपणा पराक्रमशाली सिंहानें कां करावा? आपल्या 'गुहें'तच राहून, आपल्या हाताखालच्या इतर 'मांडलिकां'करवीं आपल्या 'किरकोळ' शत्रूंचा पराभव करणें हेंच सिंहाला शोभतें! आतां लागला अशा शहानें सिंहाची इज्जत मात्र कमी होते. स्वतः विरोधियांच्या शहाच्या कक्षेंत न सांपडतां प्यादीं किंवा इतर मोहरीं पुढें करून आपल्या हस्तकांकडून प्रतिपक्षीयांचा पाडाव करविणें यांतच मृगेंद्राचें श्रेष्ठत्व आहे. शत्रूचा पराभव करविण्यासाठीं आपल्या प्रजेला सामर्थ्यशाली व स्वावलंबी बनाविणें हेंच सिंहाच्या हिताचें आहे. आपली प्रजा दुबळी झाल्यास प्रत्येक वेळीं सिंहालाच आघाडीला जावें लागेल आणि त्यामुळें वनराजाचा दबदबा मुळींच राहणार नाहीं. आणि कदाचित् एखादे वेळीं सांप-ळ्यांत सांपडण्याचा किंवा प्रतिपक्षीयाच्या काल्पनिक भीतीनें विहिरींत उडी मारण्याचा प्रसंग सिंहावर आला, तर त्याचें सर्वत्र हंसें होईल, बायकामुलेंही खडे मारूं लागतील.

पण ही युक्ताचाराची 'घंटा' सिंहाच्या गळ्यांत बांधणार कोण?

---

# परिशिष्टें

## परिशिष्ट पहिलें—भौगोलिक माहिती

**अफगाणिस्तानची सविस्तर सरहद्द** :—इराणी प्रदेशांमधून अफगाणिस्तानची हद्द पहात पहात जावयाचें म्हटलें तर प्रथमतः **झुल्फिकार** हें आरंभस्थान धरावयास पाहिजे. झुल्फिकार हरीरूदचे कांठीं आहे. तेथून उत्तरेकडे जातांना अफगाण व रशियन सरहद्द पॅरोपॅमिसस पर्वतांच्या रांगेला समांतर अशी ३५ मैल सुमारें जाऊन ‘जमशेदी’ भागांतील किश्क या गांवांपर्यंत येते. किश्क हें पूर्वी ‘चाहिल दुख्तरान्’ ( चाळीस मुली ) या नांवानें प्रसिद्ध होतें. परंतु सध्यां त्याला ‘कुश्किस्की’ म्हणतात. हें रशियन नाकें असून मर्व्हपासून येणाऱ्या रेल्वेचें टर्मिनस आहे. जुन्या जमशेदी लोकांच्या वसाहतींत कुश्क म्हणून जें मुख्य गांव आहे तें व हें रशियन कुश्क–कुश्किस्की–एक नव्हत. दोन्हींमध्यें सुमारें वीस मैलांचें अंतर आहे.

कुश्किस्कीपासून सरहद्द ईशान्येकडे जाते व **मरुचाक**जवळ मुर्घाब ओलांडून पुनः ईशान्य दिशेनें ‘चोल’ प्रांतांतील डोंगरांतून पुढें वाळवंटांत शिरते. मरुचाक हें एक अफगाणिस्तानांतील किल्ल्याचें गांव आहे. वाळवंटावर ‘अलेली’ तुर्कोमानांची सत्ता आहे. मरुचाकपासून अलेली तुर्कोमानी वाळवंटांत येत असतांना चारशंबा व अंधकुई यांच्या दऱ्यांना अफगाणसीमा समांतर राहते. या दोन्ही दऱ्या अफगाण हद्दींतच आहेत. आणि त्यांच्या पलीकडे जमीन सर्वच ओसाड असल्यानें कसलेंही पीक तींत होत नाहीं. या सर्व प्रांतांत सरहद्दीचे ‘दगड’ निश्चित असे नाहींतच. डोंगराची ओळ अथवा नदी-नाला अशा नैसर्गिक खुणेऐवजी ठिकठिकाणीं खांब रोंवूनच ही हद्द ठरविलेली आहे. मधूनमधून लहानसे ओहोळ खूण म्हणून मानले जातात. ख्वाजासालेर येथें अफगाण सरहद्द ऑक्सस नदीला मिळाल्यानंतर पूर्वेकडे व्हिक्टोरिया सरोवरापर्यंत ( गजकूल ? ) ऑक्सस हीच नैसर्गिक सीमा आहे. गजळकूलाच्या पूर्वेची हद्द पामीर कमिशननें १८९५ मध्यें ठरविली. पामीरचा थोडासा भाग अफगाणिस्तानांत समाविष्ट आहे. पामीर ओलांडून बर्फाच्या कड्यांतून हद्द कोठें जाते हें नक्की सांगतां येत नसलें तरी

चित्रळ बाजूस सरीकूल नामक बर्फमय प्रदेशापर्यंत ती गेली आहे हें खास. नंतर पश्चिमेकडे वळून हिंदुकुशाच्या पाणउताराच्या बाजूनें ती जाते. या ठिकाणीं अफगाण प्रदेश फार तर १० मैल रुंद आहे. अफगाणिस्तानशीं हा तुकडा पंजदरीनें जोडला जातो. हा निरुंदसा भाग 'वाखान' म्हणून ओळखतात. यांत १९००० फूट उंचीचे घाट व २४००० उंचीचीं हिममय शिखरें आहेत. पुढें दक्षिणेस काफिरिस्तानपर्यंत येत असतां अफगाण हद्द हिंदुकुशाच्या पाणउताराच्याच मार्गानें चालते. तेथें चित्रळ व पंज या रांगांना सांधणारा "दोरा" घाट आहे. दक्षिणाभिमुख जाणारी हिमाच्छादित कड्यांची रांग '**अर्णवी**' या गांवापर्यंत हद्द मानण्यांत येते. चित्रळगांवापासून अर्णवी ४५ मैल दक्षिणेस आहे. पुनः 'पश्त' या जुन्या गांवीं पोहोंचेपर्यंत डोंगरांतील पाणउतारासच हद्द मानतात. पश्त हें कुनारखोऱ्यांत आहे. पुढें काबूल नदी येईपर्यंत अफगाण हद्द अनिश्चितच आहे. लंडीकोटल, सफेदकोह, आफ्रिदीतिरा, कुरमखोरें यांवरून कैतू व गोमल नद्या ओलांडून पश्चिम वजिरिस्तानांत सरहद्द येते. बलुचिस्तान व अफगाण हद्द एकच आहे. म्हणजे हिंदी वायव्यसीमेकडे अफगाण हद्द व हिंदी प्रदेश यांच्यामध्यें जसा स्वतंत्र मुलूख आहे तसा अफगाणिस्तान व बलुचिस्तान यांचेंमध्यें नाहीं. दोमंडी-हून चमन व तेथून शोरावाक, नुष्की या मार्गानें सीस्तानमधील "कोह–इ–मालिकसिया" (गिरि) शिखरास पोहोंचल्यावर हेल्मंदच्या मुखांतून पुढें हस्तदान, हरीरुद व तुमान आगा यावरून मूळपद झुल्फिकार गांठलें कीं अफगाण सरहद्द पुरी झाली.

**डोंगर, पर्वतः—**

हिंदुकुश ( मध्य व उत्तर अफगाणिस्तानांत ), सुलेमान ( हिंदुस्थानच्या वायव्येस ), कुंद ( काफिरीस्तानांत ), पाघमान ( काबूलजवळ ), पश्चिम सुलेमान ( वजिरीस्तानचे पश्चिमेस ), सुन्हटक ( कंदाहार व गझनी यांचे दरम्यान) पेरोमिंयस ( हिरांत प्रांतांत ), सफेद कोह ( कुरम ) ( कुरम प्रांतांत ), सफेद कोह ( हरीरूद ), हरिरूदच्या मध्यमार्गांत ).

**शिखरें व घाटः—**

नरीन, ( ८८१० ), कंदाहारच्यापूर्वेस; गुलकोह, ( १४३६० ), गझनी-जवळ; ( कु. ) सफेदकोह, ( १५६२२ ); कुरममध्यें; तिरामीर, ( २४३४३ ), ( २५४२१ ), चित्रळच्या उत्तरेस; ख्वाजानिहंग (१६०७८), कालानाव जवळ;

कोह–इ–संगम, (१२८९५) मध्य अफगाणिस्तानांत; शुतरगर्दन घाट (उंटाची-मान) ( १०८०० ) गझनी व काबूलच्या दरम्यान.

कोह याचा अर्थ डोंगर, पर्वत. सफेदकोह–'पांढरा डोंगर' हें नांव हिमाच्छादित गिरीशिखरांस दिलें गेलें हें साहजिकच आहे मात्र " तीं तीं पदें नित्य फिरोनि येतीं " अशी परिस्थिति अफगाणिस्तानच्या भूगोलांत फार झाली आहे. गांवांचीं, डोंगरांचीं नांवें तींच तींच आली याचें उदाहरण " सफेदकोह " हें एकच पुरें आहे. इराणांतील प्रांत व गांवे डोंगर, यांचीं नांवें तर जशींच्या तशींच अफगाणांत " प्रतिध्वनित " झाल्यासारखीं दिसतात. उदाहरणार्थ, खुरासान, फिरोजकोह, सब्झवार, हीं नांवें इराणांतही आढळतात. इराणी भाषेचा, संस्कृतीचा व राज्याचा अफगाणिस्तानवर दीर्घ कालाचा पगडा हें तर त्याला कारण आहेच, पण मुख्यत: अफगाणांची स्वत:ची संस्कृति, स्वत:चे जुने वाङ्मय किंवा परंपरा अशी कांहींच नसल्यानें अनुकरणाविना त्यांचें चालत नसावें.

" शुतरगर्दन " हें घाटाला नांव देण्याचें कारण उघड आहे. एखाद्या पहाडावरील चढण ' नागमोडी ' आहे असें आपण म्हणतों. पण नेहमी उंटावरून प्रवास करणाराला वळणें घेत गेलेला रस्ता ' उंटाच्या माने ' सारखाच दिसणार ! [ शुतर ( उष्ट्र ? ) उंट; गर्दन–मान ] इराणांतही कित्येक घाटांना शुतरगर्दन म्हणतात. इंग्रजी वाक्प्रचारांत ' हेअरपिन बेंड ' म्हणतात, तशांपैकीच हा प्रकार आहे.

नद्या:—

**उत्तरेपासून क्रमानुसार** :—ऑक्सस, ( अमुदर्या, जुहून हीं तिचींच नांवें ) कोकचा, कुंदुज, कुल्म, बाल्क, मुर्घाब, हरीरूद, फरारूद, काश्रूद हेल्मंद, अर्घंदाब, तरनक, झोब, गोमल, तोची, कुरम, काबूल, पंजशर, ( पंचशर ? ) कुनार, स्वात.

(सूचना:–आब व रूद या दोन्ही शब्दांचा अर्थ नदी असाच होत असल्यानं हरीरूद ' नदी ' म्हणणें ही द्विरुक्ति होय. आब याचा नेहमीचा अर्थ पाणी.

**सरोवरें**:—हामुन, सीस्तानमध्यें; आब–इ–इस्तादा, खुरासानमध्यें; नौर, गझनीच्या पश्चिमेस; शिवकूल § ( १०८९० ) बदकशानमध्यें; गजकूल § ( ? ) व्हिक्टोरिया सरोवर वाखानमध्यें; * दर्या दरा—हझारा प्रांतांत. * चाहीबार:—चित्रळ नदीच्या उगमाजवळ

§ या दोन सरोवरांच्या बाबतींत थोडासा संशयच आहे. शिवकूल व गजकूल हीं नांवें अगदीं संस्कृत दिसतात. कूल याचा संस्कृतांत सरोवर असा अर्थ आहे. शिवकुलाला इंग्रजी नांव दुसरें दिलें नाहीं. पण " गजकूल " हीं अक्षरें बारीक लिहून त्याचें दुसरें नांव "लेक व्हिक्टोरिया" असें लंडनटाइम्सच्या नकाशांत दिलें आहे. हीं संस्कृत सरोवरें दुसऱ्या नकाशांत आढळत नाहीत. अफगाणिस्तानची भौगोलिक पाहणी अद्याप परिपूर्ण झाली नसल्यानें हे दोष राहिले असावेत. * हीं दोन सरोवरें कोठल्याच नकाशांत सांपडत नाहींत मात्र Cyclopædia of Central Asia—Balfour या आधार ग्रंथांत त्यांची नांवें व ठिकाणें दिलीं तशींच उतरून घेतलीं आहेत.

**वाळवंटें:**—( रणें )

दश्त–इ–अबु; दश्त-इ–मार्गो; रेगिस्तानी वाळवंट; दश्त–इ-बक्का; दश्त इ-नाउमेद.

[ सूचना-" दश्त " याचा अर्थ वाळवंट-ओसाड प्रदेश. हीं नांवें विशिष्ट अर्थ सूचक असावींत असें वाटतें. उदा० दश्त-इ-नाउमेद याचा अर्थ उघड आहे. नाउमेद हा फार्सी शब्द आपणांकडे त्याच अर्थानें प्रचलित आहे. दश्त-इ-नाउमेद हें नांव यथार्थ आहे, असें तिकडून जाऊन आलेले प्रवासी सांगतात.]

**मुख्य शहरें:**—( कंसांत दिलेले आंकडे समुद्रसपाटीपासूनची उंची फुटांत दर्शवितात. )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| काबूल | ( ५७९० ) | कंदाहार | (३४६२) | हिरात | ( ३०२० ) |
| गझनी | ( ७२८० ) | जलालाबाद | (१९५०) | गिरिष्क | ( २८८० ) |
| फरा | ( २४६० ) | सब्झवार | (३५५०) | मेमाना | ( २३६० ) |
| अंधकुई | ( १०८० ) | शिबरघम | (१३००) | सरीपूल | ( २०४० ) |
| बाल्क | ( १२६५ ) | कुल्म(ताश्कुर्घान) | (१४००) | कुंदुज | ( ११०० ) |
| मझर-इ-शरीफ | ( ? ) | | | | |

# परिशिष्ट दुसरें—लोकांच्या जाती व पोटजाती

**लोक–जाती-जमाती:**—अफगाणिस्तानांत राहणारे ते अफगाण असें आपणांस वाटलें, तरी अफगाणांत भेद–पोटभेद फार आहेत. बहुधा त्यांच्या जाती भौगोलिक स्थानावर अवलंबून असतात. म्हणजे त्या त्या प्रांतांवरूच, जिल्ह्यावरूनच त्यांच्या जाती ओळखतां येतात. ( किंवा असेंही पाहिजे तर म्हणावें कीं,

ते लोक जेथें राहूं लागले त्या ठिकाणास त्यांचें नांव प्राप्त झालें ) असें, घोरमध्यें राहणारे घोरी, वजिरिस्तानांत राहणारे वजीरी, चित्रळचे चित्रळी वगैरे. सामान्य जातीस एक व्यापक नांव असून त्यांत अनेक पोटजातींचा समावेश अफगाणांत आहे. खेल व झी म्हणजे पंथ अथवा पोटजात. "सुलेमानखेल जात" असें म्हणण्यांत द्विरुक्ति कशी होतें याचें आपलेकडील नेहमींचें उदाहरण म्हणजे "विंध्याद्रीपर्वत" हें होय.

**लोकांच्या जाती व पोटजाती** :—साधारण अंदाजानें प्रत्येक जातीचे लोक किती असावेत याचा तर्क ले. क. ग्रेगर यांनी केला आहे. त्यांनीं डॉ. लार्ड, ले. वुड, बॅम्ब्रे, एल्फिन्स्टन्, लीच, बर्नस्, बेलू, टॅपल, चेंबरलेन, जेम्स ब्रॉडफूट, अगा आयास व एडवर्डस् या तज्ज्ञांनीं स्वानुभवानें जमविलेल्या माहितीच्या आधारें आपलीं अनुमानें ताडून पाहून जे आंकडे दिले आहेत ते उपयुक्त वाटतात. कारण अधिकृत व विश्वसनीय खानेसुमारी जेथें झालीच नाहीं तेथें हा अंदाजच मार्गदर्शक मानला पाहिजे. प्रत्येक जातीपुढें गोल कंसांत त्या जातीची खानेसुमारी दिली आहे. आंकडे हजारांचे आहेत.

१. **उझबेग** ( २३७½ ) अफगाणतुर्कस्तानांत म्हणजे हिंदुकुश पर्वताच्या उत्तरेस असलेल्या प्रांतांत हे लोक आढळतात मेमाना, अक्चा, अंधकुई, सरीपूल, बाल्क, व कुंदुज ह्या गांवांत त्यांचा भरणा विशेष आहे.

उझबेगांचा "चार विलायत" ( विलायत=स्वदेश ) म्हणून एक प्रांत कल्पिला आहे. त्यांत **मेमाना** ( ९० ) **अंधकुई** ( ५० ) **शिबरघम** ( २५½ ) **सरीपूल** ( ७२ ) हीं चार मोठीं शहरें आहेत.

२. **हजाराजात** ( ४०० ) यांत ऐमक व हजारा या दोन जातींचा समावेश होतो. मुर्घाब, हरीरूद, हेल्मंद व अर्घंदाब या ( नद्यांच्या ) कांठाकांठानें त्यांची वस्ती आहे.

**ऐमक** ( २५० ) मध्यें चार पोटजाती आहेत. झैदनात ( १२० ) फिरोजकोही ( ४० ) जमशेदी ( ४० ) तेमुनि ( ५० ).

**हजारा** ( १५० ), हे हेल्मंदच्या पूर्वेकडील प्रदेशांत राहतात.

३. **दुराणी** ( ६०० ) हिरात-कंदाहार-क्वेटा या राजरस्त्याच्या दोन्ही बाजूंस प्रत्येकीं तीस मैलांच्या टापूंत या इतिहास प्रसिद्ध लोकांचें वास्तव्य आहे. त्यांच्यांत पोपलझी, अलीकुझी, बरकझी, अच्छकझी, नुर्झी, इशकझी व खुगियानी या पोट-

जाती आहेत. अर्वाचीन अफगाणिस्तानचा संस्थापक व पानिपतच्या संग्रामांत 'भाऊंशीं' सामना देणारा अहमदशहा अबदाली हा दुराणी होता. अमानुल्लाही याच जातींतील आहे.

४. **सीस्तानी** ( १२७½ ) सीस्तानच्या आसपास राहणाऱ्या टोळ्या.

५. **तरीन** ( ३८ ) पोटभेद मुख्य दोन ( १ ) स्पिन तरीन—अद्वानी, लासरान, मारपानी व शादीझी.

( २ ) तोरतरीन:—अबदुलरहमानझी, अलीझी, बतेझी, हबीलाझी हैकलझी, हमरानझी, कादाझी, कालाझी, करबेला, खामझी, खानाझी, मालीझी, मुसीझी, नाईझी, नुर्झी, सेझी ).

६. **काकर** ( ७२ ) जलझी, मुसाखेल, कादीझी, उस्मानखेल, अबदुलझी, काबीझी, हमजाझी, शाबोझी, खिदरझी. यांची वस्ती केट्ट्यापासून तख्त इ. सुलेमानपर्यंतच्या प्रदेशांत आहे.

७. **गिलझी** [ गिलचे ? ] ( २७६ ) दुराण्यांच्या उत्तरेस व पूर्वेकडील प्रदेशांत लोगर व तरनक नद्यांच्या कांठीं बहुधा ते असतात. पूर्वी अफगाण राजघराणें यांचें होतें. पण आतां उंटावरील व्यापार वाहतुकीखेरीज यांचे हातीं कांही नाहीं. थोडेसें रूपकाच्या भाषेंत बोलावयाचें अफगाणिस्तानांतील रेल्वेचा मक्ता यांचेकडेच आहे असें म्हणतां येईल.

८. **युसफझीः**—( ४०० ), लासपिसार डोंगरपठारांत राहणारे. बैझी, ख्वाजोझी, मालीझी, तुर्कीलानी, उत्मानझी, हेस्नझी, आक्झी, मादाखेल, इलियार्झी, दौलतझी, चगरझी, नुरीझी, उत्मकखेल या पोट जातींचा समावेश युसफझीमध्यें होतो.

**कुरम सफेदकोहच्या पठारावर राहणारे** :—९. **मोहंमद** ( ८० ) तारकझी, आलमुझी, बैझी, ख्वैझी, उत्मानझी, दवेझी, १० **अफ्रिदी**, ( ७० ) कुकिखेल, मलिकदीन, कंबार, कम्र, झकाखेल, आकाखेल, सिपा, जाजी. [ खैबरघाटांतील नाठाळ जाती ] ११. **ओरकझी**, ( १०६ ) १२. **शिनवरी**, ( ५० ) १३. **खटक**. ( २ ) १४. **तुरी** ( २१ )

१५. **वजिरी** ( १२७½ ) महशूदी, उत्मानझी, अहमदझी, या जातींची मिळून झालेली वजिरीसेना हिंदुस्थानसरकारला वरचेवर जेरीस आणते. कुरम व गोमल या नद्यांमधील वजिरिस्तानांत त्यांचें वास्तव्य असतें.

१६. **पोपिंदा** ( ३० ) नासिर, लोहानी, नाझी, खरोती. १७. **हिंदकी जात** ( ६०० ) ???. १८. **तजक** ( ५०० ) ???. १९. **काझिलबश** ( १५० ). २० **झैमुक्त** ( २१ ). मामुझी, ख्वादादखेल. २१. **दावरी** ( ३४ ). २२. **मंगल** ( ३ ) ? ( मिरलखेल, खजुरी, झाब, मारगे, कमालखेल. ) २३. **जाद्रन** ( ३ ) ? २४. **चित्रळी** ( १५० ) निमचा, लुगमानी. (चित्रळ विभागांत राहणारे.) २५. **काफर** ( १०० ) काफिरिस्तानांत राहणारे. २६. **कोहिस्तानी** ( १०० ) कोहिस्तानांतील. २७. **शेवरानी** ( ३० ) २८. **इतर-सरमिसळ** ( ६५ )

## परिशिष्ट तिसरें—भाषा व वाङ्मय

**पुश्तु-भाषा व वाङ्मय**—अफगाणिस्तानांत सर्वत्र भाषा एक अशी नाहीं. काबूल-कंदाहार या भागांत पुश्तु, तर हिरातकडील बाजूस फार्सीमिश्रित पुश्तु आणि तुर्कस्तानांत तुर्कोमानी व रशियन यांचा भरणा आहे. परंतु सर्व साधारणरीत्या पुश्तु ही अफगाणांची भाषा मानता येते. दरबारी कारवाई मात्र फार्सीतून चालत आहे. वास्तविक पाहतां पुश्तु ही फार्सीपासूनच झालेली आहे.

या भाषेतील अगदीं जुनें वाङमय म्हणजे इ. स. १४१३-१४ मधील आहे. युसफझी जातीचा **शेख मली** म्हणून एक शूर वीर होऊन गेला. त्यानें **स्वात** प्रांतावर हल्ला करून तो काबीज केला, त्या पराक्रमाचें वर्णन त्या लिखाणांत नमूद आहे. त्याच भागांतील **काजूखानानें** १४९४ मध्यें **बुनेर** व पंजखोरें जिंकून मिळविलें तत्संबंधींचें वर्णन असलेलें दुसरें काव्य आहे. १७ व्या शतकांतला **अबदुर रहमान** नांवाचा एक पुश्तु कवि अजूनही आफगाण वाङ्मयांत स्थान पटकावून आहे **खुशालखान** हा अवरंगजेबाचा समकालीन कवि होऊन गेला. तो अफगाण जननेंत विशेष लोकप्रिय आहे. पण त्यानें अफगाणांची खरी किंमत ओळखून त्याच्या वृत्तीवर खरमरीत टीका केली. त्याचें उदाहरण पहिल्या प्रकरणांत दिलेंच आहे. ( पृ. ५ पहा ) खुशालखान हा खटक जातीचा पुढारी असून नामांकित लढवय्या होता. अहमदशहा अबदाली देखील कविता करीत असे असें म्हणतात. यावरून पुश्तु काव्य हें वीरांचेंच क्षेत्र आहे असें समजावयाचें कीं काय ? अबदुर रहमानखेरीज बाकी सर्व ज्ञात कवि योद्धे म्हणूनच कर्तबगार ठरणारे आहेत. तेव्हां पुश्तूंत काव्य वीररसात्मकच असा सिद्धांत ठरला आहे काय ?

मात्र एवढें खरें कीं, अफगाणांना गाण्याची फार आवड आहे. त्यांच्या नाचाच्या वेळीं संगीत पाहिजेच असतें. साध्या लढाया किंवा चकमकी झाल्या तरी त्यांत लढणारे वीर तत्काळ पोवाडेवजा गीतें रचतात हा अनुभव, ब्रिटिशांच्या यागिस्तानवर झालेल्या छोटयामोठया मोहिमांत देखील आला आहे. अद्याप पोवाड्याच्या पलीकडील पायरी अफगाण काव्यानें गांठलेली दिसत नाहीं. आधुनिक अफगाण कवींत हिंदुस्थानांत आलेल्यांचाच भरणा आहे.

पुश्तु भाषेंत नेहमीं घसा खांकरून बोलावें लागतें. म्हणजे त्यांचो सगळी अक्षरें बहुधा ' नाभिस्थाना'पासून निघालीं आहेत असें वाटतें ! कंठस्थानापेक्षांही खोल ठिकाणांतून ' क ' वर्गाचा उच्चार होतो. मुसलमानी प्रांतांत सर्व भाषांसंबंधीं एक म्हण रूढ आहे. " अरबी भाषा शास्त्रोक्त आहे; तुर्की डामडौलाची; फार्सी मधुर; हिंदुस्तानी लज्जतदार; आणि पुश्तु गर्दभगर्जनेप्रमाणें आहे. " श्री. श्री. कृ. कोल्हटकरांनीं कानडी भाषेचें केलेलें वर्णन जसेंच्या तसेंच अफगाण लोक आपल्या भाषेस लावतात व तत्संबंधीं एक दंतकथाही त्या देशीं प्रचलित आहे. अफगाण प्रदेशाचें जें स्वरूप तेंच तेथील भाषेंत प्रतिबिंबित झालेलें दिसते.

## परिशिष्ट चवथें--पुराणवस्तुसंशोधन

**पुराणवस्तुसंशोधन** :—अफगाणिस्तानांत इराणी ग्रीक, बुद्ध व हिंदी संस्कृतीचेंच अवशेष विशेषेंकरून सांपडतात. काबूलच्या उत्तरेस पुष्कळच जुनीं पुराणीं नगरें होऊन गेलीं असावींत. त्यांपैकीं **बेघराम** नांवाच्या गांवीं सांपडलेलीं नाणीं हजारांनीं मोजतां येण्याइतकीं होतीं. अलेक्झँडरचें ( Nicaea ) तें हेंच असावें असा तर्क आहे. कोह–इ–बाबाच्या उत्तरेस बामियाँ येथें प्रचंड बुद्धमूर्ति व कोरीव लेणीं आहेत. अशींच लेणीं हैबकजवळ पुष्कळ आढळतात. बाल्क येथें वर वर दिसण्यासारखें कांहीं नसलें तरी आजूबाजूस खणल्यास महत्त्वाचे शोध लागतील, अशी तज्ज्ञांस बळकट आशा आहे. कारण बाल्क हें अतिप्राचीन शहर असून पारशी धर्मसंस्थापक झरतुष्ट्र तेथलाच राहणारा होता. तरनक नदीच्या आसपास, गिरिश्कजवळ आणि सीस्तानमध्यें फार प्राचीन नसले तरी बाराव्या तेराव्या शतकांतील इमारतींचे पुष्कळच अवशेष दिसून येतात. सर्व मूर्तींच्या व स्मारकांच्या अवशेषांत एक गोष्ट प्रामुख्यानें डोळयांत भरते व ती म्हणजे इस्लामानुयायांची विध्वंसकवृत्ति.

अफगाणिस्तानांतील पुराणवस्तुसंशोधनाचें काम करण्याचे सर्व अधिकार (Monopoly) मौ. **फूचर** या फ्रेंच तज्ज्ञास तीस वर्षांसाठी अमानुल्लाच्या कारकीर्दींत मिळाली असून जमिनींत सांपडणाऱ्या वस्तूंपैकी निम्या अमिराच्या व बाकीच्या फूचरच्या संस्थेच्या मालकीच्या व्हावयाच्या असें ठरलें होतें. ब्रिटिशांतर्फे सर **ऑरेल स्टीन** परवाना मिळविण्यास गेले होते. पण अमिरानें फ्रेंचांसच जवळ केलें. † आतां नादिरखानाचा कल फ्रेंचांकडेच आहे, तेव्हां तीच सवलत चालू राहील. काफिरीस्तानांत हिंदी संस्कृति व संस्कृत भाषा अवशिष्ट असावी असें म्हणतां येतें. तेथें जाऊन अभ्यास करण्यास व नवे नवे शास्त्रीयशोध लावण्यास अभ्यासूंना विस्तृत क्षेत्र आहे.

† L. Thomas : *Beyond Khyber Pass*, pp. 213–14.

## परिशिष्ट पांचवें—खनिजसंपत्ति¶

**सोनें**:—कंदहारच्या उत्तरेस तीन मैलांवर सोनें जमिनीत आहे. पण यंत्रांभावीं तें बाहेर येऊं शकत नाहीं. कंदाहारच्या पूर्वेकडील गांवाजवळ सोनें सांपडतें. बहुतेक नद्यांतूनही सुवर्ण कण मिळतात.

**रूपें**:—हजाराजात प्रांतांत आहे असें म्हणतात. पंजशर दरींतील खाणीं एकाकाळीं विख्यात होत्या. पण सध्यां त्यांचें काम चालू नाहीं.

**लोखंड**:—बामियांकडे जाणाऱ्या मार्गावर पुष्कळच ठिकाणीं लोखड अशुद्धावस्थेंत आहे. जाबुल-उस्-सिराज जवळ, पंजशर दरींत आणि हिंदुकुशाच्या कित्येक भागांत लोखंडी दगड बरेच आढळतात.

**दगडी कोळसा**:—खुर्द काबूलच्या आपणास, काबूलच्या दक्षिणेस, सुर्खाब नदीच्या दरींत, कुंदुजच्या दक्षिणेस ५० मैलांवर नरीन येथें, अफगाण-तुर्कस्तानांत चाहिल येथें, कोळशाचे थर असावेत.

**तांबें**:—काबूलच्या दक्षिणेस५ मैलांवर, नैऋत्येस २४ मैलांवर, तांबें आहे.

**शिसें**:—अँटीमनी, संगमर्मर, खनिज मीठ, गंधक व स्लेट आणि 'लाल' मण्यांच्या खाणीही अफगाणिस्तानांत आहेत. त्यांतील कांहींचें काम पूर्वीच्या अमिरांनीं केलें होतें. पण व्यापारी प्रमाणावर त्यांचें काम रेल्वेच्या अभावीं कोठेंच चालूं शकत नाहीं.

¶ Sir G. Macmunn : *Afghanistan, from Darius to Amanullah* *pp. 316-17.*

# परिशिष्ट सहावें—वंशवृक्ष

## सदुझी वंश





अमानुल्लाचा वंशवृक्ष
बरकझी वंश
पायंदाखान ( सर्फराजखान )
फतेखान
अझमखान
अमीर दोस्त महमद
इतर अठरा भाऊ
अमीर अफझल
(मृ.) १८६७
अमीर अझम
१८६९ (मृ.)
वली महमद
फैझ महमद
अकबरखान
गुलाम हैदर
अमीर शेरअली
अमीर अबदुररहमान
याकुब (ह्यांचें लटांबर हिंदी सरकार पोशीत आहे.)
अयुबखान
अबदुल्ला
अमीर हबीबुल्ला
नासिरुल्ला
इनायतुल्ला
अमीर अमानुल्ला
इतर चार भाऊ

# परिशिष्ट सातवें—अफगाण पूर्वेतिहासांतील मुख्य सन

| इ. स. | |
|---|---|
| ९७६ | अलप्तगीनाचा मृत्यु. त्याचा गुलाम जांवई सबक्तगीन गझनीच्या गादीवर येतो. |
| १२२१ | चेंगीझखानाची स्वारी. |
| १३३६–१३८३ | घोर घराण्याची सत्ता. |
| १३९८ | तैमुरलंगाची स्वारी. |
| १५२५ | बाबर काबूल सर करतो. |
| १५३५ | इराणी शहा तहमास्प हिरात घेतो. |
| १५५६ | तहमास्प कंदाहार जिंकतो. (इ. स. १६०३ पर्यंत इराण्यांचा अमल तेथें होता.) |
| १५७९ | अकबराच्यावतीनें मानसिंग व सलीम काबूल सर करतात. |
| १५८६ | राजा मानसिंगची काबूलचा गव्हर्नर म्हणून नेमणूक. |
| १५८८ | अकबराची काबुलास सफर. |
| १६०३ | अकबराचें सैन्य कंदाहार घेतें. |
| १६०६ | जहांगिरची काबूलला भेट. |
| १६२२ | इराणी शहा अब्बासनें कंदाहार चार दिवस वेढा देऊन सर केलें. |
| १६२५–६ | जहांगिरची काबूलची दुसरी यात्रा. |
| १६३७ | शहा अब्बास मेल्यामुळें कंदाहारचा सुभेदार शहाजहानचें स्वामित्व मानतो. |
| १६४५–७१ | बदकशान भाग जिंकण्यासाठीं जगतसिंग १४००० रजपुतांनिशीं निघाला. बाल्क, अफगाण तुर्कस्तान व बदकशान दिल्लीच्या मोंगल साम्राज्यांत समाविष्ट झालें. |
| १६४७ | इराणी शहा दुसरा अब्बास कंदाहारला वेढा देण्यास येऊन दहा आठवडे तेथें राहिला. |
| १६४९ | औरंगजेब कंदाहारीं गेला. |
| १६५२ | ” ” ” |

| | |
|---|---|
| १७०९ | मीर वैस भेदनीतीनें कंदाहारचा मालक होतो. |
| १७१० | इराणी फौजेचा हिरात येथें पराभव करून मीर वैस कंदाहारवरील तिचा हल्ला चुकवितो. |
| १७१२ | इस्पाहानी जॉर्जियन अमीर खुश्रूखान कंदाहारवर हल्ला करतो. |
| १७१३ | मीर वैसनें पराभव केल्यावर खुश्रूखान पैगंबरवासी होतो. |
| १७१५ | मीरवैसचा मृत्यु. |
| १७१६ | त्याचा मुलगा मीर महमद, काकाशीं झगडून कंदाहारचा स्वामी होतो. |
| १७१७ | मीर महमदाची हिरातवर स्वारी. तो प्रांत त्याच्या अंमलाखालीं येतो. |
| १७२०-२२ | **मीर महमद इस्पाहान काबीज करून इराणचा शहा होतो.** |
| १७२५ | मीर महमदाचा मृत्यु. अशराफ—त्याचा पुत्र-इराणचा शहा झाला. |
| १७३० | नादिरकुली ( शहा ) तहमास्प ( दुसऱ्या )च्या वतीनें अशराफचा पराभव करतो. |
| १७३६ | नादिरखान इराणचा शहा होतो. |
| १७३८ | सर्व अफगाणिस्तान नादिरच्या अमलाखालीं येतें. |
| १७४७ | नादिरशहाचा खून करून अहमदशहा अबदाली अफगाणिस्तानचा अमीर होतो. |
| १७७३ | अहमदशहाचा मृत्यु. तिमूर गादीवर येतो. |
| १७९३ | तिमूरचा मृत्यु, झमान अमीर होतो. |
| १८०० | झमान पदच्युत होतो. त्याचे डोळे काढतात. |
| १८०१ | महमूद अमीर होतो. |
| १८०३ | महमुदास पदच्युत करून शुजा अमीर होतो. |
| १८०९ | महमुदाचें पुनरागमन. |
| १८१६ | फतेखानाचे डोळे काढले जातात. महमूद पळून जाऊन हिरात येथें अमीर होतो. |

| | |
|---|---|
| १८२६ | दोस्त महमद–काबूलचा अमीर होतो. |
| १८३८ | दोस्त महमदास पदच्युत करून कलकत्त्यास आणला. शुजाची काबूल येथें स्थापना. |
| १८४१ | २ नोव्हें. सर बर्न्स व इतर २३ जणांची काबूलमध्यें कत्तल. |
| १८४२ | १२००० अनुयायी आणि ३८४९ ब्रिटिश शिपायी यांची खैबरघाटांत अफगाणांनीं कत्तल केली. डॉ. ब्रायडन बचावले ( जानेवारी ) |
| १८४२ | दोस्त महमद अमीर होतो. |
| १८६३ | दोस्त महमदाचा मृत्यु. |
| १८६९ | शेर अलीची व्हाइसरॉयांशीं अंबाल्यास मुलाखत. |
| १८७८ | ब्रिटिश शिष्टमंडळास जाऊं न दिल्यामुळें द्वितीय अफगाण-युद्धास प्रारंभ. |
| १८७९ | शेर अलीचा मृत्यु. कावेगनारी व इतर ब्रिटिश प्रजाजनांची क्रूर कत्तल. |
| १८८० | अबदुर रहमान अमीर होतो. |
| १८८८ | अबदुर रहमान रावळपिंडी येथें व्हाइसरॉयाची मुलाखत घेतो. |
| १८९५–९६ | नसिरुल्लाखानची विलायतेची सफर. |
| १९०१ | अबदुर रहमानचा मृत्यु. हबीबुल्ला अमीर होतो. |
| १९०४ | इनायतुल्लास हिंदुस्थानांत पाठविलें. |
| १९०७ | हबीबुल्लाची हिंदुस्थानभर सफर. |
| १९१९ | हबीबुल्लाचा खून. अमानुल्लास अमीरपद. |

# शुद्धिपत्र

पृ. ११ वर पहिल्या ओळींत मुलगा, पुत्र व १२ व्या ओळींत ज्येष्ठ मुलगा या तिन्ही ठिकाणीं भाऊ असें वाचावें.

पृ. ४८ वर दुसऱ्या ओळींत अबदरच्या ऐवजीं अबदुर पाहिजे आहे.

पृ. ११५ वर ७ व्या ओळींत हबीबुल्लाच्या ठिकाणीं याकुबखान वाचावें.

पृ. १७३ वर ४ थ्या छेदकारंभीं व पृ. १८१ वर २२ व्या ओळींत ' बुल्विच व ' बोरोशिलॉफच्या ऐवजीं वुल्विच व वोरोशीलाफ अशीं नांवें असावयास पाहिजेत.

पृ. १८० वर खालून ७ व्या ओळींत ' मा ' ऐवजीं ' भा ' वाचावें.

पृ. २१९ वर ७ व्या ओळींत कंदाहार ऐवजीं जलालाबाद वाचावें.